मकरन्दपुस्तकमाला.

पुस्तक २८ वें.

# कुलोद्धार.

( मनोरंजक कादंबरी )



लेखक,

**श्रीयुत समर्थशिष्य.**



प्रकाशक,

**नरहर नारायण पटवर्धन.**

**मकरन्द कचेरी,**

वांई.



मुद्रक

**श्रीयुत दामोदर लक्ष्मण लेले.**

**मोदवृत्त प्रेस,**

४१०, मधली आळी, वांई.



**आक्टोबर, सन १९१६.**







किंमत १||.

# प्रस्तावना.



नामींच सोडुनि दुजा पथ वावरावें ! रामायणादिकृतिला अथवा वरावें ।
हें सूपदेश मनिं भव्य वहा रसाचे । त्याहूनिया इतर न व्यवहार साचे ॥ १ ॥
वे रामराजचि अनंत धनादरातें । पावे न तो प्रभु करीन अनादरातें ।
जे नीतिचा प्रकट मोडिति काय दातें ! विद्यावयाद्रविणदुर्मद काय दाते ॥ २ ॥

सत्वर काय करावें ! स्वामी ! तुमचाचि बोल मज वेद ।
वत्सा, शीघ्र करावा ज्ञानें संसार संततिच्छेद ॥
स्वामी ! मोक्षतरूचें बीज कथावें तुह्मीं मुखोदक जें ।
शिष्या, साधो ! आइक अति शुद्ध ज्ञान आणि सक्रिय जें ॥

मयूरपंडित.

भूलोकावर अवतीर्ण होणाऱ्या सर्व प्राणिगणांत मनुष्यप्राणीच श्रेष्ठ आहे. तो ज्ञानसंपन्न असल्या कारणानें त्याला आपलें सुख कसें साधावें हें उत्तम प्रकारें समजतें. प्रपंचव्यवहारामध्यें ज्याला सुख असें मानण्यांत येतें त्याच्या प्राप्तीचीं असंख्य साधनें मनुष्यानें आपल्या करामतीनें प्राप्त करून घेतलीं आहेत. आपल्या सर्वश्रेष्ठतेबद्दल अभिमान वाहण्यास मनुष्याला जागा असल्याकारणानें तो जगतांतील अखिल वस्तुजात व भूतमात्र यांना आपल्या सौख्याचीं साधनें समजून आपल्या मनाचें व देहाचें चोज पुरविण्यांतच धन्यता मानून राहतो. अनेक प्रकारच्या उपभोग्य वस्तूंनीं संपन्न व अनंत तऱ्हेच्या सौख्य व सोयी साधून देणाऱ्या साधनांनीं युक्त अशा या जगतीतलावर यथेष्ट आराम करून घ्यावा, देहाला चलनवलन करण्याचें सामर्थ्य आहे तोंपावेतों ऐहिकसौख्याचा लाभ करून घेण्याच्या विचारांत व आचारांत मन व शरीर मनसोक्त राबवावें व एखादे दिवशीं नाइलाजास्तव

कालवश व्हावें यांतच बहुतेक मनुष्यप्राणी आपल्या मनुष्यजन्माचें सर्वसार समजतात ! पण ही त्यांची भयंकर चूक आहे. ही चूक होण्याचें कारण विषयमोहावांचून अन्य कांहींएक नाहीं. विषयमोहाच्या प्रबलतेनेंच मनुष्याला सर्वश्रेष्ठता देणारी विवेकशक्ती निर्बल झाल्यासारखी होते. या विषयमोहाचें सामर्थ्य असें कांहीं अगाध व अचिंत्य आहे कीं, त्याच्या तडाक्यांत सापडलेल्या मी मी ह्मणणारांची अगदीं हबेलंडी उडून जाऊन त्यांना त्यांची ढळढळीत चूकही दिसेनाशी होते. इतकेंच नव्हे तर ही विषयप्रियता किंवा विकारवशता मनुष्यांना त्यांच्या चुकांचें समर्थन करण्यांतच भूषण, थोरवी व ज्ञान आहेसें वाटावयास लावून त्यांच्याकडून आपापल्या मनसोक्त वाकचापल्याचाच गौरव करावयास लावते ! विषयलोलुपताजन्य विवेकभ्रष्टता बाजूला ठेवून शुद्ध मनानें विचार केला आणि खऱ्या सज्जनांच्या वाणींतून स्रवलेल्या अमृतबिंदूंचा आस्वाद घेतला असतां कोणाही शुद्धभावी व निःपक्षपाती माणसाच्या मनाला असें स्पष्टपणें कळून येईल कीं, मनुष्यप्राणी हा सर्वस्वी कर्तव्यानें बद्ध झालेला आहे. अजाणपणाच्या स्थितींतून निघून जाणतेपणाच्या स्थितीला येणें ह्मणजे मनुष्यानें आपलें कर्तव्य ओळखणें हेंच होय. बाल्यावस्था जाऊन प्रौढपणा प्राप्त झाला तरी जोंपावेतों कर्तव्याची जाणीव पटली नाहीं तोंपर्यंत मनुष्याला खरा प्रौढपणा प्राप्त झाला आहे असें ह्मणणें अप्रयोजकच होय. कर्तव्याविषयीं पूर्ण अज्ञान असलेल्याचा प्रौढपणा आणि जुनाट वृक्षांचा जुनेपणा यांत काडीचेंही अंतर नाहीं. तसा मनुष्य स्वतःला ज्ञानी, विद्वान, सुधारलेला, सुशिक्षित असें मानीत असला तरी त्याचें ज्ञान, विद्या, सुधारणा, सुशिक्षण आणि मोरपिसावरील डोळे यांत रतिमात्र तफावत नाहीं असेंच ह्मटलें पाहिजे. विद्या, शिक्षण, ज्ञान, हुषारी, चातुर्य, सुधारणा यांचा उपयोग कर्तव्य ओळखून तें बजाविण्याच्या कामीं होणेंच इष्ट होय. ज्ञान-विद्या-शिक्षण यांच्या सहाय्यानें जें कर्तव्य ओळखावयाचें तें अनेक प्रकारचें आहे. या कर्तव्यवैचित्र्यांतून आपल्या खऱ्या व खरोखर कल्याणकारक कर्तव्याची निवड करणें हेंच जाणत्या मनुष्याचें अत्यंत महत्वाचें काम आहे. हीं कर्तव्यें नवीन ठरवावयाचीं नाहींत. तीं एकदा कायमचीच प्रस्थापीत झालेलीं आहेत. स्थितिवैचित्र्य आणि कालमहात्म्य यांच्या धोरणानुसार करावी लागणारीं कामें ह्मणजे कांहीं कर्तव्य नव्हे. कोणत्याही प्रकारचा खडतर प्रसंग प्राप्त

झाला ह्मणजे मनुष्याला नानाप्रकारचीं कामें किंवा उलाघाली करणें भाग पडतें. तीं कामें किंवा त्या उलाघाली ह्मणजे कांहीं कर्तव्य नव्हे. नुसत्या कर्तव्य या शब्दाचा सामान्य अर्थ विचारांत घेऊन चालायाचें नाहीं. त्याचा विशेष अर्थच ध्यानांत वागवून कर्तव्यजागृती राखावयाची आहे. हें कर्तव्य ह्मणजे अर्थातच विहित कर्तव्यच होय असें मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. कर्तव्य या शब्दाचा सामान्य व सोइस्कर अर्थ पोटाशीं बाळगून मनाच्या सौख्यपर लहरीनुसार त्यांत जर हवातसा फेरफार होऊं शकेल तर कर्तव्य या शब्दाचें महत्व नाहींसें होऊन एकच घोटाळा माजून राहील. तात्पर्य कर्तव्य ह्मणजे काय व ज्या कर्तव्याकर्तव्यानें मनुष्यजात सर्वस्वी बद्ध झालेली आहे, ज्या कर्तव्यामुळेंच मनुष्यप्राणी इतर प्राण्याहून श्रेष्ठ ठरला आहे त्या कर्तव्याचा सर्व खुलासा होऊन गेलेला आहे. तें कर्तव्य ह्मणजे धर्म, शास्त्र, उन्नत नीति यांना मान्य असलेलें जातिधर्मानुसार विहित आचरण हेंच होय ! विकारवशता, विषयमोह, सौख्यलोलुपता, दुराग्रह, अहंकार यांच्या चिथावणीप्रमाणें व प्रेरणेनुसार होणाऱ्या मनाच्या धांदलींतून जन्म पावणाऱ्या विचाराप्रमाणें घडणाऱ्या आचारास जर कोणी कर्तव्याच्या सदरांत घातलें तर ती गोष्ट ईश्वरप्रणीत धर्मास मात्र कधींही मान्य व्हावयाची नाहीं. हा सर्व विचार शुद्धभावानें ध्यानांत घेऊन जो कोणी आपलें कर्तव्य ओळखील आणि अनंत अपेक्षा, हाल, कष्ट, त्रास, पीडा, श्रम सोसावे लागले तरी त्यांची मुळीच पर्वा न करतां आपल्या कर्तव्यास जागून कर्तव्यपर आचारापासून तिळमात्र ढळणार नाहीं त्याचें इहपरलोकीं कल्याण होईल ही गोष्ट निःसंशय सत्य आहे. विहित कर्तव्याची जाणीव पटली ह्मणजे मग मनुष्याच्या हातून शुद्ध सदाचारावांचून अन्य आचरण घडण्याचा बहुतेक संभवच नाहीं. त्याचें चित्त शास्त्रमान्य प्रमेयें व धर्ममान्य कर्मे यांच्यांतच गढून राहील. मग तो कल्पनेला हवी तशी सैल सोडून परिस्थितीचा गुलाम बनणें शक्यच नाहीं. त्याच्या हातून बुद्धीचा दुरुपयोग होणें दुरापास्तच आहे. अशी स्थिति झाली ह्मणजे जर यदाकदाचित् त्याच्यावर विकार किंवा ऊर्मी यांनीं हल्ला केला तर त्याच्या शुद्ध कर्तव्यपरायणतेच्या सहाय्यानें त्याचें खात्रीनें संरक्षण होईल आणि सदा जागृत असलेला विवेक त्याच्या पाठीवर राहून अखेर त्याचा शेवट गोड होईल ही गोष्ट निश्चित होय. ज्यांनीं अशा प्रकारच्या विचाराचा अवलंब करून आपल्या विहितकर्तव्यपर आचारास प्राणापलीकडे जपले;

पोटार्थी, हिकमती, कावेबाज व धूर्त जनांच्या शब्दजालांत न आडकतां व कीर्ति-मान-धन-कांताप्रिय शहाण्यांच्या झगझगीत व नटव्या प्रमेयास न भुलतां ज्यांनीं आपला सात्विक वर्तनक्रम कायम ठेविला त्यांचें प्रत्येक आपत्तींपासून तारण होऊन अखेर कल्याणच झालें आणि ज्यांनीं विरुद्ध आचरण केलें किंवा शुद्ध, धर्ममान्य, सज्जनसंमत कर्तव्याला पायाखालीं तुडविलें त्यांची सर्वस्वी फसगत होऊन अखेर त्यांना पश्चात्तापांत पडण्याचा प्रसंग प्राप्त झाला असेंच सामान्यतः या कादंबरींतील कथानकावरून दिसून येण्यासारखें आहे.

ता. १०।१०।१९१६. समर्थशिष्य.



# अनुक्रमणिका.

प्रकरण. पानें.

# कुलोद्धार.



## प्रकरण १ लें.

### पुरातन राजघराणें.



प्राचीन काळीं पांचाळखंडांत वसुप्रसाद या नांवाचा अति विख्यात राजा होऊन गेला. त्यानें त्या खंडांतील सिंधुदेशावर राज्य केलें. सिंधुदेशाचा विस्तार मोठा होता. त्या खंडांत सिंधुदेशाप्रमाणें अनेक स्वतंत्र राज्यें होतीं. विस्तृतपणाच्या मानानें सिंधुदेशाचें राज्य दुय्यमप्रतीचें होतें; तरीपण सुपीकपणा, वसूल, खनिजसंपत्ति, व्यापार, कलाकौशल्य, उद्योग या प्रमाणानें पाहिलें असतां तें अव्वल दर्जाचें राज्य होतें. या देशाच्या राजधानीचें शहर सिंधावती या नांवानें प्रख्यात होतें.

सिंधावतीचें सिंहासन अतिशय पुरातन होतें. या सिंहासनाचा उपभोग घेणारे राजे अस्सल क्षत्रिय असून ते अति उच्च कुलोत्पन्न होते. हा क्षात्रवंश पौरव या नामाभिधानानें दिगंतरांत गाजत होता. सांप्रतचा राजा वसुप्रसाद हा या घराण्यांतील तेविसावा पुरुष होता. याच्या पूर्वीचा सहावा राजपुरुष जो पुरु त्याच्या लोकोत्तर गुणांवरून या वंशास पौरव हें नाम प्राप्त झालेलें होतें. त्यापूर्वी हा वंश सिंधु या संज्ञेनेंच प्रसिद्ध होता.

या राजघराण्यांतील अगदीं प्रारंभाच्या पुरुषापासून वसुप्रसादाच्या कारकीर्दीपर्यंत औरससंततीची प्रवाहगति अव्याहत चालत आलेली होती. हें घराणें अत्यंत जुनाट होतें. बावीस कारकीर्दी मिळून हें घराणें सरासरी आठशें नऊशें वर्षें राज्याधिकाराचा उपभोग घेत होतें. यामध्यें अनेक महापराक्रमी व सद्गुणसंपन्न राजे निपजल्या कारणानें हा वंश प्रजाजनांला अतिशय

आदरणीय वाटत होता. या घराण्यांतील राजपुरुषाबद्दल प्रजेला मोठाच अभिमान असे.

हल्लीं या विख्यात सिंहासनाला मंडित करणारा नृपति वसुप्रसाद हा वयानें सरासरी चाळीस-पंचेचाळीस वर्षांचा होता. तो क्षात्रतेजसंपन्न असून त्यानें आपल्या अंगच्या उज्ज्वल गुणानें लोकांचीं मनें वेधून टाकलीं होतीं. तो प्रजाहितदक्ष असल्यानें त्याच्यावर जनतेचें अत्यंत प्रेम होतें. तो दीनांचा कैवारी, अनाथांचा परामर्ष करणारा व गुणांचा भोक्ता होता. तो वीर्यशाली असून त्याचें अंत:करण ह्मणजे औदार्यगुणाचें मूलस्थानच होतें. तो आपल्या शत्रूंचा कर्दमकाळ होता. रिपुरूपी हत्तींना तो सिंह वाटे, तरीपण दीनदुबळे, संतसज्जन, भोळेभाबडे यांना तो वसुप्रसाद ह्मणजे आपला सख्खा बंधुच वाटे.

ज्या गोष्टींचा लाभ पूर्वसुकृतावांचून होणें सामान्यतः दुरापास्त होय अशांतील मुख्य गोष्ट जी सुखप्रद भार्याप्राप्ति त्यांत वसुप्रसाद अत्यंत दैववान् होता. त्याची पत्नी इंदुमती ही कुलशीलसंपन्न असून गुणानें लक्ष्मीशीं साम्य पावणारी होती. ती अतिशय सौंदर्यसंपन्न असून लज्जा, विनय, नम्रता, मृदुत्व इत्यादि गुणांनीं युक्त होती. तिचें वर्तन साध्वीच्या अस्सल आचरणानें युक्त होतें. तिचें अंत:करण ह्मणजे धर्माच्या पवित्र तत्वाचें क्रीडास्थान असावें असें वाटे. ती पतिसेवारत असून पतीच्या मनाप्रमाणें वागणारी धर्मानुकूल शुद्ध साध्वी होती.

वसुप्रसादाला त्याच्यापेक्षां लहान असे दोन बंधु होते. कालाच्या अवकृपेनें त्यांच्यावर कृतांताचा घाला पडल्या कारणानें वसुप्रसादाला अत्यंत खेद वाटत होता. दुःखांत आनंदाची गोष्ट ही कीं, त्या दोघांनाही एकेक पुत्र होता. भोगपाल आणि मोहसंघ हे दोघांचे दोन पुत्र होत. या दोघांचीं वर्षे अनुक्रमें वीस, एकवीस वर्षांचीं असून ते दोघेही विवाहित होते. भोगपालाच्या पत्नीचें नांव माधवी असें असून मोहसंघाचें कुटुंब शांभवी या अभिधानानें युक्त होतें.

भोगपाल व मोहसंघ या दोघांच्या मातोश्रींनीं आपापल्या पतींच्या मागून थोड्याच कालांत राम ह्मटलें. तेव्हांपासून मातापितारहित झालेल्या त्या दोन्ही मुलांना वसुप्रसाद व इंदुमती यांनीं सांभाळलें हें सांगणें नकोच. दोन्ही पुतण्यांचें लालनपालन उत्तम प्रकारें करून वसुप्रसादानें त्या

दोघांचें शिक्षण व विद्याभ्यास मोठ्या काळजीनें व कळकळीनें करविला. ते दोन्ही चुलत भाऊ बरेच विद्वान व क्षात्रविद्यापारंगत बनले. पण त्या दोघांच्याही मनावर शिक्षणाचा भलताच संस्कार झाला. इतर शिक्षणाच्या मानानें त्यांच्या मनावर धार्मिक शिक्षणाचा व्हावा तसा योग्य परिणाम न घडल्यानें ते पढतमूर्ख निपजले. आधिभौतिक ज्ञानानेंच त्यांच्या अंतःकरणावर छाप बसविली. ऐहिक विषयोपभोगापलीकडे सर्व सौख्यप्रद व सर्वसामर्थ्यसंपन्न असें कांहीं तत्व अस्तित्वांत आहे या गोष्टीची त्यांना कल्पनाही राहिली नाहीं. प्रापंचिक स्वास्थ, संसारिक आराम, व्यवहारिक सोय, ऐहिक विषयानंद या गोष्टींच्या आसक्तीनेंच त्यांचें अंतःकरण व्यापलें. या गोष्टींच्या विचारांनींच त्यांच्या डोक्यांत ठाणें दिलें. चित्तचतुष्टय भ्रामकसौख्याच्या कल्पनेंत मग्न होऊन राहिल्यानें धर्म, नीति, तत्वज्ञान, सत्य, सदाचार, सत्व, शांति, दया, परोपकार, विनय इत्यादि उज्वल गुणांबद्दल ते भलभलतेच सिद्धांत ठरवूं लागले. मनुष्याच्या ठिकाणीं वास्तव्य करणारे निरनिराळे गुण आणि अंतःकरणांत खेळणाऱ्या अनेकविध कल्पना यांमध्यें गोंधळ उडून जाऊन ते बंधुद्वय वाटेल त्या गोष्टीच्या हव्यातशा रीतीनें मनसोक्त व्याख्या ठरविण्यांत भूषण व विद्वत्ता मानूं लागले. या सर्व गोष्टींचा असा परिणाम झाला कीं, त्यांच्या मनःसाम्राज्यांत सर्वत्र बंडाळी माजून गुणावगुणांचीं स्थानें भ्रष्ट होऊन गेलीं. त्यांच्या धर्माधर्म, नीति-अनीति, कर्माकर्म इत्यादि द्वंद्वांचीं स्वरूपें पार पालटून गेलीं. शास्त्रग्रंथावलोकनानें उत्पन्न होणाऱ्या चातुर्यास आपली जागा कावेबाजपणाला द्यावी लागली. धूर्ततेनें शहाणपणाची जागा पटकावली. स्वार्थपरायणतेनें विवेकाची गादी बळकावली. भीरुत्वानें सावधानतेचें स्थान घेतलें. विविध-विषय-प्राप्तीच्या साधनोत्पत्तीनें ज्ञानाच्या पवित्र सिंहासनाचा कबजा घेतला. साहसानें धैर्याचा किरीट चढविला. पोकळ पांडित्यानें सौजन्याचीं वस्त्रें परिधान केलीं. जिव्हाचापल्य सदुपदेशाच्या अधिकारावर रूढ झालें. क्रूरता, स्वैरिता, लोलंगता, द्रव्योत्पादक उद्योग, दुराग्रह आणि अत्यंत कीर्तिलोलुपता किंवा अप्रत्यक्ष आत्महितदक्षता यांच्या चेहऱ्यावर शौर्य, निस्पृहपणा, अपराङ्मुखता, कर्तव्य, दृढनिर्धार, आणि लोककल्याण किंवा परोपकार यांचीच लखलखीत कांती झळकूं लागली.

या दोन चुलत बंधूंना ज्या दोन भार्या प्राप्त झाल्या होत्या त्या त्यांना अगदीं अनुरूप होत्या. भोगपालाची कांता माधवी व मोहसेनाची कांता शांभवी या दोघींही राजकुलोत्पन्न होत्या. पण त्यांच्या माहेरची स्थिति राजवैभवाच्या दृष्टीनें बरीचशी खालावलेली होती. त्यांतल्यात्यांत शांभवीचें माहेर माधवीपेक्षां कांहीं बरें होतें. वसुप्रसादाच्या स्थितिसंपन्नतेशीं तुलना करतां या दोन्हीं स्नुषा गरीब स्थितींतल्या होत्या. तरीपण त्यांच्या शरीरसौंदर्यावर व त्यांच्या अंगांतील चणचणीतपणावर नजर देऊनच वसुप्रसादानें त्यांना स्नुषा करून घेतलें होतें. त्या कामीं निवळ पैक्यावर नजर देण्यास राजा वसुप्रसाद तितका द्रव्यलोलुप नव्हता. माधवी व शांभवी या दोन्ही बायका शिकल्या सवरलेल्या होत्या. शिक्षण किंवा विद्या हा विषय असा आहे कीं, त्याच्या क्रमांतील शुद्धाशुद्धतेशीं त्याचा चांगला वाईट परिणाम अगदीं निगडित झालेला असतो. या दोघींच्या शिक्षणाचें वळण भलतेंच असल्या कारणानें त्यांच्या अंतःकरणावर शिक्षणाचा दुष्परिणाम झाला होता. शिक्षणाबरोबर शिक्षणाचा सोज्वलपणा कायम असेल तर शिक्षणाइतकी सुखदायक व सुपरिणामकारक गोष्ट क्वचितच सांपडेल. शिक्षणक्रमामध्यें भलभलत्या गोष्टींचा शिरकाव होईल आणि विद्या किंवा शिक्षण यांचा धार्मिक व पवित्र सदाचाराच्या तत्वांशीं असलेला संबंध यत्किंचितही ढिला होईल तर शिक्षणाइतकी घातक गोष्ट दुसरी क्वचितच सांपडेल. माधवी व शांभवी यांचें शिक्षण धार्मिक तत्वांशीं विरोधकारक असल्यानें त्यांच्या विचारांस भलत्याच प्रकारचें वळण लागलें होतें. भोगपाल माधवी आणि मोहसेन शांभवी हीं विद्वान, ज्ञानी, धोरणी, शहाणी जोडपीं म्हणजे धोत्रा आणि भांग यांचीं मिश्रणेंच होतीं.

# प्रकरण २ रें.



## मानसिक यातना.



न पुतणे, दोन स्नुषा, एक कन्या आणि कलत्र इंदुमति अशा प्रकारचा वसुप्रसादाचा परिवार होता. राजकन्येचें नांव प्रमिला असें होतें. यासमयीं प्रमिला पांच वर्षांची होती. प्रमिला दिसण्यामध्यें सुंदर होती. ती रंगानें गोर असून नाकाडोळ्यांनीं ठसठशीत होती. तिचें नाक सरळ असून चेहऱ्याचा आकार गोल होता. डोळ्यामध्यें विलक्षण तऱ्हेचें पाणी लकाकत असून बुबुळें तुळतुळीत काळेभोरपणानें तळपत असत. तिचा बांधा, शरीरावयवाची एकंदर ठेवण व स्त्रीजातीचा साधारण आविर्भाव यांचा विचार पाहिला असतां ती आपल्या प्रौढावस्थेंत अनुपम-सौंदर्यानें झळकूं लागेल असा अजमास होण्यास हरकत नव्हती. तिच्या विचारास अद्यापपावेतों प्रागल्भ्य आलेलें नव्हतें; तथापि तिच्या मातापित्यांचा संस्कार, त्यांचें सानिध्य व दक्षता यांचा तिच्या मनावर बराचसा परिणाम झालेला स्पष्टपणें दिसून येत होता. तशा लहाणपणांतील बोलणें चालणें, आचारविचार, जिज्ञासा, तरतरी, उत्सुकता या सर्वांवरून तिच्या भविष्यकाळच्या उन्नतमसद्गुणांची पूर्वचिन्हें स्पष्टपणें नजरेस येत होती. बाल्यावस्था संपल्यानंतर ती कन्यका प्रमिला सद्भावनालोलुप कुलदीपिका निपजेल अशी कल्पना ठाम ठरविण्यास पुष्कळ प्रकारचे आधार होते.

खुद्द पौरव घराण्यांतील माणसें इतकींच होतीं. जवळच्या किंवा दूरच्या नात्यांतील आणखी दुसरीं पुष्कळ माणसें वसुप्रसादाचें शुभ इच्छणारीं होतीं. लोकप्रियता, दासदासींची प्रसन्नता, सरदारमंडळाचा पूज्यभाव, सत्कीर्तिघोष, धनधान्यविपुलता, आरोग्य अशा प्रकारच्या भाग्यानें संपन्न होऊन वसुप्रसाद आनंदानें राज्याचीं सूत्रें चालवीत होता. राज्यांत सर्वत्र शांतता नांदत होती. रोगराई, अवर्षण, दुष्काळ, इत्यादि दोषांपासून सिंधुदेश साधारणतः अलिप्तच होता. या कारणानें प्रजाजन सुखासमाधानानें आपापल्या व्यवसायांत रममाण होते. बाह्य दृष्टीनें निरीक्षण केलें असतां वसुप्रसादाला दुःख करण्यास कांहीं एक कारण नव्हतें. पण वस्तुतः त्याचें अंतःकरण अशीकडे

बरेंच व्यथित होऊं लागलें होतें. त्याचें चित्त अस्वस्थ झालें होतें. पुत्रसंततीच्या अभावानें तो आपल्या पत्नीसहवर्तमान अतिशय पीडित झाला होता. त्या दंपत्याला रात्रंदिवस चैन नव्हतें. मनुष्यमात्र सुखाच्या किंवा अप्राप्त वस्तूच्या प्राप्तीच्या भावी आशेवर बरेंचसें समाधान मानून राहतो. रोगानें धरणीला खिळलेला मनुष्य भावी आरोग्याच्या आशेवरच कटुतर औषधें सेवून कष्टतर हाल सोशीत असतो. भावी सुस्थितीच्या आशेवरच दारिद्र्यव्यालानें दंशित असा मनुष्य अंतर्वेदना सहन करीत असतो. सरांश, कोणताही मनुष्य भविष्यत् कालाच्या पोटांतील इच्छातृप्तिरूपी लोंबत्या पुलावर आंदोलायमान होऊनच साधारणतः शांततेनें आयुष्याचा काल कंठीत कार्यतत्पर झालेला दिसतो. या पुलाचा शेवटचा आशातंतू तुटेल तर सर्वशः आशा नष्ट होऊन मनुष्यप्राणी मरण पतकरण्यासही तयार होईल; निदान त्याचा सर्व धीर खचून तो पूर्ण निरुत्साही बनून कायमचाच व्यथित होऊन राहील. हीच स्थिति वसुप्रसाद आणि इंदुमति या जोडप्याची झाली होती. सरासरी चाळीस वर्षें उमरीच्या सुमारास राजाला प्रमिलारूपी कन्यारत्न प्राप्त झालें. बरेंच वर्षांनीं कां होईना निदान संतती होण्यास आरंभ झाला एवढयावरच भिस्त ठेवून त्या जोडप्यानें कन्याप्राप्तींतही मोठा आनंद मानून उत्साह केला. पण प्रमिलेच्या पाठीवर पांच वर्षांत पुनः संतती मुळींच झाली नाहीं तेव्हां त्यांची हिंमत खचली. आतां त्यांना पुत्रप्राप्तीबद्दल पूर्ण निराशाच वाटूं लागली होती. आशेचें कोरडें सुखही अल्पानंदकारक होऊं शकतें; पण एकदां का अंतःकरणांत निराशारूपी जखिणीची सर्वत्र व्याप्ती झाली ह्मणजे मानसिक यातनेच्या स्वरूपाची उपरणा विचारावयासच नको. सात्विकी वृत्तीची परमावधी होऊन ही निराशा ज्ञानतः स्वीकारलेली असेल तर संसारिक आशेमधील भासमान सुखाचा मेरुपर्वत निराशेंतील सत्य सुखाच्या पासंगालाही पुरणार नाहीं. पण वसुप्रसाद व इंदुमती यांची निराशा तशाप्रकारची नव्हती. या कारणानें त्या निराशेचें स्वरूप अत्यंत भयंकर होतें. निराशारूपी वणव्यामध्यें सांपडलेलें शलभच आपण आहों असें वाटून ते दोघेजण एकसारखे तडफडत होते. त्यांचें अंतरंग निराशेच्या तापानें परितप्त झालें असल्या कारणानें त्यांची बाह्य कांति करपून गेली होती. इंदुमतीचा लखलखीत वदनेंदु निराशेच्या राहूनें पूर्ण ग्रस्त झाला होता. वसुप्रसादाच्या देदीप्यमान मुखभास्कराचा

निराशेच्या केतूनें ग्रास केला होता. हीं म्हणणें सुटण्याची आशा नष्टप्राय झाली असल्या कारणानें त्या सत्वसंपन्न जोडप्याला सर्व जगत् अंधारमय भासूं लागलें होतें. फळावांचून वृक्षाला शोभा नसते तद्वतच पुत्रसंतती-वांचून आपल्या देहाला शोभा नाहीं असें त्यांस वाटत होतें. नासिक्य-रहित वदनाप्रमाणेंच पुत्रावांचून आपण विद्रूप आहों अशी त्यांची कल्पना झाली होती. दिव्यावांचून गृह जसें शून्य दिसतें त्याप्रमाणेंच पुत्राभावामुळें आपलें जिणें व्यर्थ होय अशी त्यांची भावना झाली होती. त्यांना सर्व संसार निःसार वाटावयास लागला होता.

आपल्या पश्चात् आपल्या गादीवर आरूढ होण्यास कोणी नाहीं अशा समजुतीनें पुत्रप्राप्तीकरतां हळहळ करण्याचें वसुप्रसादास मोठेंसें कारण नव्हतें. आपल्या पश्चात् पितरांचीं श्राद्धें कोण करील ? या भावनेनेंही पुत्रा-करितां खिन्न होण्याइतका वसुप्रसाद आकुंचित बुद्धीचा नव्हता. आपण निपुत्रिक असलों तर आपल्याला स्वर्गामध्यें स्थान मिळणार नाहीं या विचा-रानें पीडित होण्यास वसुप्रसाद क्षुद्रसौख्याच्या खातेऱ्यांत लोळत पडण्याची भावना दृढ करणारा कीटक नव्हता. पुत्रसंततीरहित अशा स्थितींतच आपण राहिलों तरी राज्याधिकार, पितृश्राद्धें, वंशविस्तार इत्यादि गोष्टीं-संबंधानें आपल्या दोन्ही पुतण्यांवर नजर देऊन समाधान मानण्याजोगी उदारता वसुप्रसादाच्या ठिकाणीं निःसंशय वास्तव्य करीत होती. आपण पुत्ररहित मेलों तर आठशें नऊशें वर्षें चालत आलेला आपल्या कुलाचा लौकिक नष्ट होण्यास आपल्या कारकीर्दींत प्रारंभ झाला या कल्पनेनेंच तो पराकाष्ठेचा व्यथित झाला होता. स्त्रीजात या नात्यानें इंदुमतीचे विचार कदाचित् इतके उदात्त नसतील असें मानलें तरी चालण्यासारखें आहे. पण वसुप्रसादाच्या दुःखाकुल स्थितीचें दृढ व मुख्य मूळ या वरील गोष्टींतच होतें हें निश्चित होय.

राजाराणीच्या मालवलेल्या प्रसन्नतेवरून त्यांच्या अंतःकरणावरील दुर्धर दडपणाची कल्पना हलके हलके सर्व सुहृदांच्या लक्षांत आली. शुभेच्छु व कळकळीच्या मनुष्यांनीं हलके हलके तलास काढतां काढतां राजदुःखाचें कारण स्पष्टपणें उघड झालें. राजाला पुत्रप्राप्त व्हावा या शुभेच्छेनें पुष्कळांनीं अनेक उपाय सुचविले. गणक, ज्योतिषी, पंचाक्षरी, चिकित्सक वगैरे लोक आपापल्या परी सुचेल तो उपाय सांगूं लागले. याज्ञिकी भटजींनीं व्रतवैकल्यें,

उपास, अनुष्ठानें, पाठ, होमहवन यांचें महात्म्य प्रतिपादण्यास सुरवात केली. राजाराणी अत्यंत गरजू झाले असल्या कारणानें सर्वांवर भरंवसा ठेवून तीं दोघें जो जें जें सांगेल तें तें करावयास लागलीं. पण कशाचाही कांहीं-एक उपयोग झाला नाहीं. सर्व उपाय थकले तेव्हां तर त्या जोडप्याची निराशा अधिकच दुणावली. एकंदर प्रयत्नांची निरर्थकता ध्यानांत आणून बहुप्रसादानें दुसऱ्या कोणावरही दोष ठेवला नाहीं. त्यानें त्या निष्फलतेचा सर्व दोष आपल्या प्रारब्धावरच लादला. तो आपल्या दैवाच्या नांवानेंच विलाप करीत राहिला. प्रयत्नाची निष्फलता लक्षांत येऊन त्यानें दैवाचा बलवत्तरपणा स्थापित केला. पण त्या योगानें त्याच्या दुःखद स्थितींत मात्र मोठासा पालट झाला नाहीं. सुखदुःखाच्या दैवाधीनतेमुळें त्याचे तत्संबंधी सर्व प्रयत्न मात्र शिथिल पडले. पण त्याची शोचनीय अवस्था बदलली नाहीं. प्रयत्नाच्या हालचालीमुळें जो थोडा आशेचा अंकुर दिसूं लागल्यासारखा होऊन शोकवेग हलका पडूं लागला होता तो त्या आगंतुक आशेचीही पुन्हां निराशा झाल्यामुळें उलट जास्तच जोरावला आणि सर्व प्रयत्न कुंठित होऊन अवजड झालेल्या दुःखमय उदासीनतेच्या असह्य भाराखालीं त्या नृपनृपांगनेच्या भाविक, सत्वसंपन्न व पवित्र अंतःकरणाचा चुराडा होतो कीं काय अशी सर्वत्र भीति पसरून राहिली.

---

## प्रकरण ३ रें.

### कुलपुरोहित.



तिघुनृपतीच्या शोचनीय अवस्थेची सर्वांना अतिशय कींव आली. त्या सर्वांमध्यें राजाच्या कुलपुरोहिताच्या मनावर त्या खेदनीय स्थितीचा मोठा विलक्षण पगडा बसला. त्याच्या मनाला एकसारखी हुरहुर वाटूं लागली. त्या पुरोहिताचें नांव दमन असें होतें. तो वयानें सरासरी राजाच्याच उमरीचा होता. त्याचें घराणेंही जुनाट असून राजपुरोहिताचें काम त्याच्या कुलांत पिढ्यानपिढ्या

चालत आलेलें होतें. दमनाचे वाडवडील विद्वान व श्रेष्ठगुणसंपन्न होते. दमनानेंही आपल्या धर्मनिष्ठेनें व कर्माचाराच्या योगानें वडिलांचा लौकिक अखंड राखला होता. आपल्या अमदानींतच राजवंशवल्लीची वाढ खुंटत आहे हें मनांत येऊन तो शुद्ध अंतःकरणाचा दमन पुरोहित मोठ्या चिंतेंत पडला. वंशावृद्धीच्या विषयासंबंधानें राजाची एकदां एकांतात भेट घ्यावी आणि त्याच्याशीं संभाषण करून त्याला कांहीं उपाय सुचवून त्याचें चित्त शांत झालें तर पहावें, असा दमनाचा इरादा होता. तो तशा प्रसंगाकरतां उत्सुक झाला होता. अखेर त्याला पाहिजे तशी योग्य संधी साहजिकच आली.

एके दिवशीं रात्रीं सर्वत्र सामसूम झाल्यानंतर राजा वसुप्रसाद आपल्या मंदिरांत एकटाच बसला होता. अलीकडे त्याला निद्रासुखाचा वानवाच झाला होता असें म्हटलें तरी चालेल. बसून बसून कंटाळा आला म्हणजे तो बिछान्यावर पडे. पण त्यास स्वस्थ झोप लागत नसे. मनुष्यप्राणी कितीही यातनेंत असला किंवा कष्टतर दुःखानें विवळत असला तरी त्याला केव्हां तरी थोडीशी झोंप ही लागावयाचीच असा साधारणतः नियम आहे. त्यास अनुसरून राजाला जी कांहींशी विश्रांति मिळत असेल तेवढीच; बाकी सर्व रात्र तो जागाच असे.

वसुप्रसाद शुद्ध मनाचा व धार्मिक बुद्धीचा असल्यानें अलीकडे त्याचें चित्त परमेश्वरचिंतनांत जास्तवेळ गढत असे. स्वतःच्या ज्ञानाची घमेंड मारणारे अहंभावी जनही टेकीस आले म्हणजे आपला ताठा, बेपर्वाई, माजुरीपणा व ज्ञान गुंडाळून ठेवून शेवटीं परमेश्वरचरणाच्याच भजनी लागतात ! मग वसुप्रसादासारखा पवित्र पुरुष त्या सर्वांतरसाक्षी पुराण-पुरुषाच्या ध्यानांत अधिकाधिक रत होऊं लागला होता यांत नवल तें काय ? परमेश्वराच्या भजनांत एकाग्रतेनें तल्लीन होऊन ईशचरणाची जोड करून घेणें ही गोष्ट दुरापास्त असली तरी ईशसेवा कधींही वाया जाणार नाहीं असा महानुभवी महात्म्यांनीं सिद्धांत सांगितलेला आहे. राजाच्या भक्तिभावजन्य हरिस्मरणाचें फळ म्हणूनच त्याला त्या रात्रीं कुलपुरोहित दमन याला बोलावून आणण्याची प्रेरणा झाली व त्याचवेळेस त्यानें दमनास बोलावणें पाठविलें.

आपल्या यजमानाकडून तशा अपरात्रीं पाचारण होतांच दमन किंचित साशंक झाला. त्यानें निरोप घेऊन येणारास तत्संबंधीं कांहीं प्रश्न केला,

पण त्या बिचाऱ्या चाकरास त्याचें काय उत्तर सांगता येणार ! तो त्या कामीं अगदीं अज्ञानी आहे असें पाहून दमनानें त्याच्याशीं कांहीं बाटाबाट न करतां तो त्याच्याच बरोबर राजवाड्याकडे जाण्यासाठीं निघाला.

राजमहालामध्यें राजाची भेट होतांच वसुप्रसादानें दमनाच्या पायावर नमस्कार घातला. दमनानें त्याला शुभप्रद आशिर्वाद दिला आणि आपल्या हातांनीं त्याला उठवून त्याच्या योग्य स्थलीं बसविलें. दमनही आसनस्थ झाल्यावर राजानें आपण होऊनच बोलण्यास सुरुवात केली.

" गुरुजी ! आपणाला आज अशा वेळीं मुद्दाम बोलावून आणण्याचें कारण असें आहे कीं, मला कांहीं महत्वाच्या कामीं आपलाच सल्ला पाहिजे आहे. माझी सर्व भिस्त हल्लीं तरी केवळ आपणावरच आहे. सरदार, अमीर-उमराव, राजमंत्री, प्रधानमंडळ, दिवाण, कारभारी यांचा सांप्रतच्या कार्यांत मुळींच उपयोग नाहीं. त्यांचा दरजा, चातुर्य, शहाणपण, पराक्रम मोठा आहे; पण मी मनांत योजलेल्या बेतांत त्यांची मसलत मला नको आहे, आणि त्यांच्या मसलतीनें भागणारही नाहीं. "

राजाचें हें भाषण ऐकून दमन कांहींसा आश्चर्यभरित झाला. आपल्याला पाहिजे तसा हा प्रसंग सुदैवानें प्राप्त झाला आहे तेव्हां आपलाही हेतू राजास कळवावा असें त्याच्या मनांत प्रथमपासूनच घोळूं लागलें. पण राजाचें अंतः-करण उघडें होऊन त्याची इच्छा स्पष्टपणें समजेपर्यंत त्यासंबंधीं भाषण करणें बरें नव्हे असें वाटून दमनानें विचारलें, " मी एक आपल्या पदरचा यःकश्चित् भटजी आहे. आपलें अन्न खाऊन सेवा करीत आहे. सरका-रच्या पदरीं मोठमोठे ज्ञानसंपन्न लोक आहेत, असें असतां कांहीं महत्वाच्या कार्यास माझ्यासारख्या ब्राह्मणाच्याच मसलतीची सरकारास अपेक्षा असावी हें जरा चमत्कारिक आहे. यामध्यें मला एवढा मान देण्यास मजसारख्या पुरुषार्थहीन भटाजवळ काय अधिकार आहे ? व आपला संकल्प तरी काय आहे ? "

दमनाचें हें विनयसंपन्न भाषण ऐकून राजाच्या मनांत त्याच्याविषयीं जास्तच आदरभाव उत्पन्न होऊन तो ह्मणाला, " स्तुति ही गोष्ट अशी दिसते कीं, तिला खरोखर पात्र असणारे पुरुष तिचा स्वीकारच करीत नाहींत व अपात्र माणसें तिच्याकरितां उगीच धादपलेलीं असतात. आपणास आपण स्तुत्य नाहीं असें वाटणें साहजिकच आहे. भटजी या नात्यानें

आपल्याला कमीपणा देणारे व तुच्छ लेखणारे जे कोणी असतील ते श्रेष्ठच होत; पण मी तसा श्रेष्ठ नाहीं. आपल्याच घमेंडीच्या भरांत व पोटभरू विद्वत्तेच्या घमेंडींत खऱ्या श्रेष्ठ असणाऱ्या आचारसंपन्न भटजींचा धिःकार करणें म्हणजे स्वतःची श्रेष्ठता गमावून स्वतःचा धिःकार करण्याची जगाला सूचनाच देणें होय. कसेंही असलें तरी मला आपण पूज्य आहां. माझ्या मनोदयाविषयीं म्हणाल तर मला आतां या राज्यकारभाराचा कंटाळा आला आहे असें मी तुम्हाला सांगतों. या सर्व व्यापाचा त्याग करून एखाद्या अरण्यांत जाऊन एकांतवास सेवावा असें मला वाटतें आहे. याकामींच मला आपलें मत हवें आहे."

राजाची ही इच्छा कशापासून जन्म पावली आहे हें ओळखण्याइतका दमनपुरोहित शाहणा होता. आपल्या मनांत घोळणारा विषय काढण्यास ही संधी उत्तम आहे असें जाणून तो बोलला, "आपली इच्छा उत्तम आहे. मनुष्यानें प्रापंचिक विषयांचा उपभोग घेत असतांना विषयनियमनाचें तत्व ध्यानांत ठेवावें; आणि हलके हलके विषयपराङ्मुखतेची संवय लावून घेऊन अखेर सर्वसंगपरित्याग करून एकांताचें सेवन करावें हेंच उचित होय. पण या सर्व गोष्टींचें ध्येय ईशप्राप्ति हें होय! भगवंताच्या प्राप्तीला चित्तशांति आणि चित्तशुद्धि यांचीच विशेष अवश्यकता आहे. आपल्याला एकांताचाही लौकरच कंटाळा येईल. कारण आत्तां एकांत हा व्यापराहित वाटत असल्यानें आपण त्याचा अंगिकार करण्यास उद्युक्त झाला आहां; पण एकांताचें नाविन्य नाहींसें झालें म्हणजे आपल्या हल्लींच्या एकांतनिर्धाराचा पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येईल. आणि दुसऱ्याच एखाद्या नवीन स्थितीचा अंगिकार करण्याची भावना उत्पन्न होईल. असाच क्रम चालूं राहिल्यानें आपण सारखें स्थितिवैचित्र्यांतच घोटाळत रहाल. व्यापराहित्याचा आपल्याला लाभ होणार नाहीं. किंवा चित्तशांति प्राप्त व्हावयाची नाहीं. मग एकांतसेवन किंवा वानप्रस्थाश्रमाचा उपयोग काय? अरण्यवासांतही आपल्या इच्छित वस्तूची प्राप्ति आपल्याला पीडा देत राहीलच. कारण आपली ही इच्छा तत्पीडाजन्य आहे. याकरतां माझें असें म्हणणें आहे कीं, आपण पुत्रप्राप्तीचाच प्रयत्न करीत असावं. मीहि आपला वंशपरंपरा कुलपुरोहित आहे. माझ्या अमदानींत आपली वंशलता कोमेजून जाऊं पहात आहे, याचें माझ्या मनालाही मोठें लांछन वाटतें.

तत्संबंधीं मीं एक विचार मनांत आणला आहे. आपलें मानस असेल तर इलाज करूं."

पुरोहित आपल्याच धीर देऊन केवळ आशेची ज्योत प्रकाशित राखण्यासाठींच असें उत्तेजनकारक भाषण करीत असावेत, असें कल्पून राजा ह्मणाला, "पण आतां इलाज काय उरला आहे? आजपर्यंत केलेले सर्व प्रयत्न आपल्या देखरेखीखालींच झालेना! आतां माझी तर अशी खात्री होऊन गेली आहे कीं, मनुष्य हा केवळ पराधीन प्राणी आहे. पशुपक्षी यांची स्थिति ध्यानांत आणून मनुष्यप्राणी आपल्याला स्वतंत्र समजतो पण तो दैवाचा केवळ बंदा गुलाम आहे. तो अगदीं दैवाच्या अधीन आहे. इच्छातृप्तीचें गूढ ध्यानांत न आणतां मनुष्यप्राणी ज्ञानाच्या जोरावर व प्रयत्नवादाच्या सामर्थ्यावर मोठमोठ्या सिद्धांताच्या गप्पा मारून आपल्या थोरवीची शेखी मिरवतो पण ती व्यर्थ होय. अनुभवाच्या कसोटीवर प्रयत्नवादाचा व्यर्थपणा निश्चित ठरला ह्मणजे मग मनुष्यप्राणी ताळ्यावर येतो. तोंपावेतों अहंमन्यतेनें त्याचे डोळे धुंद झालेले असतात. मी तर अनुभवानें असें स्पष्ट म्हणतों कीं, दैवबंधनाच्या असंख्य पाशांनीं मनुष्य सर्वस्वी बद्ध होऊन पडलेला निर्बल प्राणी होय. त्याला मुळींच इकडे तिकडे मनसोक्त हालण्याची सोय नाहीं. सर्वस्वी अव्यापाराच्या स्थितींत राहवणार नाहीं ह्मणूनच कांहींतरी त्याची हालचाल होत असते झालें! माझें तर मत अशा प्रकारचें बनलें आहे. मग आपलें ह्मणणें काय असेल तें निराळें!"

राजाच्या भाषणावरून त्याच्या अंतःकरणाची कल्पना करून वमन पुरोहित कांहीं वेळ स्तब्ध राहिला. राजाच्या बोलण्याचा तात्पुरता विचार करून त्यानें सांगितलें, "माझें मत ठामपणानें सांगण्यास मी तयार नाहीं. या गोष्टीचा निकाल लावण्यास मी तशा अधिकारानें संपन्न नाहीं. या विषयावर मीही कांहीं पांडित्य करीन; पण तें निव्वळ मी पदिक विद्वान आहे व मी मुका नाहीं एवढ्याच भावनेनें करीन. त्याचा तादृश उपयोग नाहीं. व त्या विवेचनास मी अधिकारसंपन्न, पात्र मनुष्य नव्हे. आपलें मन कसेंही बनलें असलें तरी आपण मी सुचवितों ती गोष्ट घडेपर्यंत आपला बेत अमलांत न आणण्याचें मला वचन द्यावें."

आपण वानप्रस्थ घेण्यास आतांच तयार होऊं नये असें त्या पुरोहितास वाटत आहे असें जाणून व त्यालाही आपल्याप्रमाणें स्वतःचा कार-

कोंहीं अवमानास्पद वाटत असल्यानें तो स्वतः आपल्या ईप्सितप्राप्तीच्या प्रयत्नांत असावा अशा धोरणानें राजा बोलला, " गुरुजी ! आपण या कामीं कांहीं अवघड अट घालणार नाहीं अशी मजला आशा आहे. आपला यत्न माझ्याच इच्छातृप्तीच्या उपयोगीं पडणारा आहे हें मी जाणतों. आपल्या ह्मणण्याप्रमाणें चालण्यास मी तयार आहें असें मी वचन देतों. वचनच कशाला; आपण माझ्या पसंतीचा विचार बाजूस ठेवून कुलपुरोहित या अधिकारानें मला जी काय आज्ञा कराल ती मला शिरसावंद्य आहे. बोला आपला काय विचार आहे तो ! "

राजाची ही नम्र व आदरणीय वाणी ऐकून पुरोहिताचें अंतःकरण प्रेमानें गहिंवरलें. तो प्रेमपूर्ण वाणीनें बोलला, " राजा ! तूं पुण्यपुरुष आहेस. तुझी भावना शुद्ध आहे. तूं विश्वासु, श्रद्धाळु व पवित्र आहेस. तूं गुणज्ञ व दीनबंधु आहेस. अशा माणसाला परमेश्वराच्या प्रसादाचा लाभ होऊन त्याचें सकामत्व साध्य झालेंच पाहिजे. माझ्यावर ज्या एका थोर विभूतीचा अनुग्रह आहे तिकडे आपण जाऊं. त्या ठिकाणीं दैव व प्रयत्न या वादाचा चांगला उलगडा होईल. त्या महात्म्याच्या कृपेनें तुझे व माझे हेतु पूर्ण होतील अशी माझी खात्री आहे. तसें न घडण्याचाच योग आला तर तूं वाटेल त्या स्थितीचा मनसोक्त आश्रय कर. "

असें बोलतां बोलतां दमनपुरोहित स्तब्ध झाला. राजाही आनंदभरित होऊन पुरोहिताच्या उपदेशास मान्य झाला व चार आठ दिवसांतच पुरोहितानें सांगितलेल्या विभूतीच्या दर्शनास जावयाचा बेत कायम ठरला.

---

## प्रकरण ४ थें.



### विधियत्नवाद.



रल्याप्रमाणें राजानें पुरोहिताबरोबर जाण्याची तयारी केली. त्यानें आपल्याबरोबर विशेष लवाजमा घेतला नाहीं. एक दोन हुजरे, एक शागीर्द, दोन चार शिपाई, आणि एक विश्वासू व मर्जीतला कारभारी इतकीच मंडळी बरोबर नेण्याचें ठरलें. अवश्य वस्तूंची वाण पडूं नये ह्मणून बरोबर दोन सामानाच्या गाड्या घेतल्या. राणी इंदुमतीला हा वृत्तांत राजाकडून लागलीच दुसऱ्या दिवशीं विदित झाला होता. तिनेंही पतिसंगतीं येण्याची उत्कट इच्छा दर्शविली. पण त्या कामीं पुरोहिताचा नकार पडल्यामुळें नाइलाज होऊन तिला राजवाड्यांतच राहावें लागलें. ते ज्या महात्म्याच्या दर्शनास जात आहेत त्यांचे दर्शनास आपण अंतरलों असें वाटून ती मनामध्यें कष्टी झाली. पण पतीची आज्ञा ह्मणजेच वेदाज्ञा असें मानणाऱ्या त्या कुलवंतीला आपला बेत हट्टानें सिद्धीस नेण्याचें धाडस होईना. राजाची ती साधुद्वाराची यात्रा सफल झाली तर त्यांत आपलें सौख्य साधणार आहे असा विचार करून तिनें आपल्या मनाचा हिरमोड नाहींसा करून टाकला आणि ती त्यांच्या कामांतील यशाबद्दलच आतुर होऊन राहिली.

प्रवासास जाणारी कांहीं मंडळी घोड्यावर स्वार झाली होती. कांहींजण सामानाच्या गाड्यांत बसले. स्वतः राजा वसुप्रसाद, पुरोहित दमन आणि राजनिष्ठ सुमंत इतकेजण एका छानदार गाडींत बसले आणि पुरोहिताच्या सूचनेप्रमाणें सर्व वाहनें चालूं लागलीं.

त्या साधूचें ठिकाण शिवावतीपासून सुमारें सव्वीस सत्तावीस कोस दूर होतें. त्या स्थलाचें नांव अलकनंदा असें होतें. हें गांव सरासरी पंधरा वीस हजार लोकवस्तीचें होतें. अलकनंदा गांवापासून त्या शहराच्या हद्दींतच सुमारें अडीच तीन कोसावर एक लहानसा डोंगर होता. त्याचें यशस्कार असें नांव होतें. त्या यशस्कर पर्वतावरच पुरोहिताच्या गुरुजींचें वास्तव्य

होतें. ते वर्षांतून सहासात महिने त्या ठिकाणीं वास करीत आणि पांच सहा महिने बाहेर कोठें तरी यात्रा करण्यास जात. हल्लीचे दिवस त्यांचे यशस्कारावर मुक्काम करण्याचेच होते. खेरीज पुरोहितानें अलकनंदा शहरामध्यें चौकशी करतांही तशीच बातमी समजली होती. एक दिवस अलकनंदा शहरांत मुक्काम करून दुसऱ्या दिवशीं पहाटेच्या वेळीं ती सर्व मंडळी यशस्काराच्या रोखानें चालूं लागली.

सूर्योदय होऊन सरासरी चार घटका दिवस होण्याच्या सुमारास ती सर्व मंडळी पर्वताच्या माथ्यावर पोंचली. पुरोहिताच्या गुरुमहाराजांचें नांव भारती असें होतें. राजानें त्याच्याकडून तें आधींच समजावून घेतलें होतें. त्यांचें दर्शन घेतल्यानंतर तेथें कसा वर्तनक्रम ठेवावयाचा व आपला संकल्प गुरुजींच्या कानावर कोणत्या तऱ्हेनें घालावयाचा हेंही पुरोहिताच्या मताप्रमाणें आगाऊच ठरलें होतें.

हा पवित्र पुरुष भारती सुमारें साठ वर्षांचा दिसत होता. त्याचे केश पांढरे झाले होते. तो शरीरानें वयपरत्वें थकित दिसे पण त्याची देहयष्टी अद्याप खंबीर असावी असें वाटत होते. तो सामान्य जनाप्रमाणेंच होता. त्यानें जटा, दाढी वगैरे राखलेली नव्हती. त्याच्या चेहऱ्यावर वयोवृद्धतेचीं चिन्हें स्पष्टपणें दिसत होतीं. विशेष गोष्ट एवढीच होती कीं, त्याचे नेत्र मोठाले असून ते दिव्य कांतीनें युक्त होते. त्यांची ठेवण अशा कांहीं विलक्षण प्रकारची होती कीं त्या मुळें त्यांचा सर्व चेहरा गंभीर व उदात्त दिसे. तें गांभीर्य व तें उदात्तपण यांच्यावर अपूर्व प्रसन्नपणाची झिलई दिलेली आहे असें वाटे. त्याच्यापुढें उभे राहिले असतां तो आपणास जी आज्ञा करील ती मोठ्या तत्परतेनें बजवावी अशीच कोणाही मुमुक्षूची भावना होण्यासारखी होती. त्याच्या अक्षद्वयांतील तेजोमय ज्योतीचे किरण पतिताचा पापमळ भस्मसात करण्यासच दीप्तिमान झाले आहेत असें भासे.

त्या ठिकाणीं एक लहानसें श्रीशंकराचें देऊळ होतें. त्याच्या दर्शनास कधीं कधीं कोणी शैव जात असत. क्वचित् प्रसंगीं कोणी प्रवासी, पांतस्थ, बैरागी वगैरेही जात. माघ महिन्यांत महाशिवरात्रीला त्या ठिकाणीं मोठा उत्साह होत असे. त्यावेळीं श्रीभारती हेच उत्सवाचा सर्व खर्च करीत. पर्वतावर येणाऱ्या किंवा तेथें कांहीं दिवस मुक्काम टाकणाऱ्या सर्वत्रांची भोजनाची वगैरे सोय जरूर असल्यास भारतीच आपल्या खर्चानें

करीत. श्रीभारतींची वृद्ध पत्नी हयात होती व ती कधीं कधीं या पर्वताकर त्यांच्या सन्निधही असे; व कधीं कधीं ती आपल्या घरींही असे. कारण श्री-भारती यांचें गांव अलकनंदा हें नव्हतें. ते तेथून बऱ्याच लांबच्या प्रदेशां-तील रहिवासी होते. त्या प्रदेशांत त्यांचें मालकीचें घरदार असून कांहीं वतनवाडीहि होती. ते प्रापंचिक होते; पण संसार चालविण्यास पात्र झालेल्या पुत्राच्या माथ्यावर प्रपंचभार टाकून ते या यशस्कारावर येऊन राहत. मध्यंतरीं देवालयें किंवा तीर्थे यांच्या यात्रा करीत. मधून आमधून ते कारणपरत्वें आपल्या गृहीदेखील गमन करीत.

हें राजमंडल त्या ठिकाणीं पोंचलें तेव्हां श्रीभारती यांचा नित्य प्रातर्विधी आटोपून ते पोथी वाचीत बसले होते. त्या वेळीं रामायणाचा पाठ चालला होता. रामायणांतील दशरथाच्या यागाबद्दलचा विषय निघाला होता. राजा व पुरोहित यांनीं भारतीला नमस्कार घातल्यानंतर भारतीनें त्यांना कल्याणप्रद आशिर्वाद दिला. ते दोघे उठून उभे राहिले तोंच भारतीनें त्यांना हातानें खूण करून बसावयास सांगितलें. पुरोहित दमनाच्या आग-मनाबद्दल भारतीनें प्रेमभाव व्यक्त केला. राजा वसुप्रसाद व श्रीभारती हे परस्पर अनोळखी होते. राजाच्या बाह्य पेशावरून भारतीनें त्याचा थोर दर्जा ओळखला. त्याच्या सूचनेनुसार ते दोघे खालीं बसल्यानंतर बाकीची सर्व मंडळीं भारतीस नमस्कार करून खालीं बसली. आपल्या भोंवतीं थोडक्या वेळांत बराच श्रोतृवृंद जमला आहे असें पाहून भारतीला पुरोहि-ताशीं तत्संबंधीं कांहीं जिज्ञासायुक्त भाषण करण्याची इच्छा उत्पन्न झाली. पण पोथी आटपेपर्यंत ती इच्छा तशीच दाबून भारती रामायणाचा श्लोक वाचूं लागले. एक दोन श्लोक वाचलेसे करून भारती पुरोहित व वसुप्रसाद यांच्याकडे पहात मोठ्यानें ह्मणाले, " या प्रकारें दशरथ-राजाला पुत्रप्राप्तीची जबरदस्त इच्छा उत्पन्न झाली. त्याला मोठी तळमळ लागली. शृंगीच्या कृपासामर्थ्यानें आपल्या पोटीं साक्षात् वैकुंठपीठ उत्पन्न होणार आहे हें त्या बिचाऱ्याला ठाऊक नसल्यानेंच त्या दशरथाची अगदीं व्याकुल स्थिति झाली होती. असो; अशींच गोष्ट सर्वत्रांची आहे. दुःख किंवा सुख याची भविष्यत् स्थिति समजत नसल्यामुळें मनुष्याच्या मागें केवढाल्या विवंचना लागतात याची कल्पनाही करवत नाहीं. "

असें सांगून बऱ्याच वेळानें भारतीनें श्लोकवाचन संपविलें.

वर सांगितलेल्या विवेचनांतून त्यानें अन्य कांहींएक स्पष्टीकरण केलें नाहीं. या त्याच्या निरूपणानें पुरोहित व विशेषतः राजा वसुप्रसाद यांचें मन आश्चर्य-तरंगांनीं व्याप्त झालें. त्यांच्या मनांत भारतीबद्दल पराकाष्ठेचा श्रद्धाभाव उत्पन्न होऊन ते त्यांच्या प्रसंगास बरोबर लागू पडणाऱ्या स्पष्टीकरणाच्या विचारांतच गर्क झाले. भारतीनें आपल्या मनांतील मुख्य भावास अनुसरूनच नेमकें विवेचन केलें: ही गोष्ट सहजासहजीं घडली नसून त्यानें तेवढ्याच मुद्याचें निरूपण मुद्दाम हेतुपूर्ण केलें अशी राजाची खालेखाल खात्री झाली. या प्रथमच्याच अनुभवानें राजा उत्तेजित झाला आणि त्याला आपल्या मनोरथप्राप्तीची पुन्हां आशा वाटूं लागली. भारतीशीं संभाषण सुरू करण्यास तो अतिशय उत्कंठित झाला.

भारतीची पोथी आटोपून त्यानें पुरोहिताशीं भाषण करून मंडळींची माहिती करून घेतली. पुरोहिताबरोबरचा थोर पुरुष वसुप्रसादराजा आहे हें समजताच त्यानें त्याच्यासह त्याच्या सर्व आश्रितांचें यथायोग्य स्वागत केलें. पुरोहित व राजा यांच्यापासून तों हुजरे, शिपाई यांपर्यंत भारतीची समभावना पाहून सर्वांना संतोष झाला. सर्वांचें जेवणखाण वगैरे सर्व गोष्टी आटोपून ती मंडळी दुपारीं विश्रांति घेण्यासाठीं स्वस्थ आराम करीत पडली. पुरोहित व राजा हे बराच वेळ भारतीशीं गप्पागोष्टी करीत बसले होते. पण त्या प्रसंगीं भारतीनें राजाच्या आगमनाचा उद्देश मुळींच विचारला नाहीं. व पुरोहिताची आगाऊ सूचना चांगली ध्यानांत असल्यानें राजानेंही त्याबद्दल अवाक्षर काढलें नाहीं.

संध्याकाळ होतांच श्रीभारती स्नान करून श्रीशंकराच्या पूजेस बसले. सायंपूजा आटोपून रात्रीचे फराळ झाल्यानंतर राजा व पुरोहित देवळाच्या बाहेर गप्पा मारीत बसले. श्रीभारती हे देवळाच्या गाभाऱ्यांत एक पांढरी घोंगडी अंथरून त्यावर स्वस्थ पडले. आता मारतां मारतां पुरोहित व राजा यांनीं दैववाद व प्रयत्नवाद या विषयांची वाटाघाट चालविली. राजानें दैववाद स्वीकारलेलाच होता. पुरोहितानें प्रयत्नवादाची बाजू उचलली.

दमनपुरोहित पहिल्यानें ह्मणाले, “ राजा; दैववाद हा तूं ह्मणतोस तितका खरा नसावा. मनुष्य जर सर्वथैव दैवाच्या बंधनानें बद्ध असेल तर सत्क्रिया किंवा दुष्क्रिया यांत कांहीं अर्थच उरणार नाहीं. मग पापपुण्य यामध्यें अंतर तें काय राहिलें. मग सदाचार, दुराचार, धर्म अधर्म, शुद्ध अशुद्ध या

सर्वांचें एकच मोल होईल. अशी ही जर आचारभ्रष्टता उत्पन्न होईल तर समाजाची धुळधाण उडेल. सुखदुःखावस्था जर सर्वस्वी दैवाधीन मानाव्या तर मनुष्याला कांहींएक कर्तव्यच न उरून तो हवातसा मनसोक्त वागूं लागेल. रोगपीडित मनुष्यें औषधी किंवा रसायणें यांचा प्रयत्न करून व्याधिरहित झाल्याचें जर आपण पाहतों तर दैववादच सत्य कसा मानावा. उद्योग, करामत, धोरण, दूरदर्शीपणा, चिकाटी, चळवळ, करारीपणा, दृढनिश्चय इत्यादि गुणांचा अंगिकार करून चालविलेल्या प्रयत्नास यश आल्याचें जर आपणास धडधडीत दिसते तर प्रयत्नवाद मान्य केल्यावांचून चालेल कसें ? दैववादी बनणें म्हणजे आळसामध्यें राहून निरुद्योगी राहण्याची सवड काढणें होय !

**राजा**— या कामीं यशस्कारक प्रयत्नांचेच तेवढे दाखले घेऊन चालावयाचें नाहीं. आपण वर्णन केलेल्या गुणांचा अंगिकार करून चालविलेले प्रयत्न पूर्णपणें निष्फळ होतात त्याचा विचार आपण पाहिला नाहीं. प्रयत्न करावा पण तो वाद तत्वतः खरा नव्हे. मनुष्याचें ध्येय खरें होय. तें साधणें हें त्याचें समाधान व सुख होय. सर्व तऱ्हेचें प्रयत्न जर ध्येय साधून देण्याच्या कामीं अपयशी ठरतात तर मग प्रयत्नवादाला किंमत कोठें राहिली ? अचाट चातुर्यानें व मोठ्या कळकळीनें औषधें पाजलेले रोगी जर कालवश झालेले दिसतात किंवा मरणकाल येईपर्यंत औषधींनीं रोगमुक्त न होतां तडफडतच राहतात तर प्रयत्नवादाची थोरवी राहते कोठें ?

**पुरो०**— अशा बाबतींत प्रयत्नवादाला शून्य ठरविण्यापेक्षां प्रयत्नाचा अपुरेपणा व अयोग्य दिशा यांसच महत्व देणें वाजवी होय ! विश्वामित्र ऋषि दैववादाला मिठी मारून बसते तर ते ब्रह्मर्षींच्या पदाला केव्हांच गेले नसते. प्रयत्नानें काय होणार नाहीं. योग्य प्रयत्नांच्या योगानेंच मनुष्यानें ज्ञान प्राप्त करून घेऊन असंख्य सौख्यसाधनें निर्माण करून ठेवली आहेत. पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश यांचे गुणधर्म निरीक्षण करून प्रयत्नवाद्यांनीं केवढाली आश्चर्यकारक कृत्यें करून ठेवलेली आहेत बरें ! नाना-प्रकारचे नवीन नवीन शोध, श्रम व दुःख कमी करण्यासाठीं ज्ञानवानांनीं काढलेल्या हजारों युक्त्या, व्यवहारांतील शेंकडों सोयी करणारीं साधनें, सौख्यप्रद अशा प्रपंचांतील लाखो उपभोग्य वस्तु या सर्वांचा लाभ प्रयत्नांच्या योगानेंच मनुष्याला झाला आहे. मनुष्यानें केवळ आपल्या

प्रयत्नानेंच आपलें सुख साधलें पाहिजे. दैवावर अवलंबून माशा मारीत बसणाराची या जगांत कधींहि धडगत असावयाची नाहीं.

राजा— आपलें हें सर्व म्हणणें मला मान्य आहे. पण आपण माझा मुद्दा मुळींच सोडून देत आहां आणि यशस्वी तेवढी एकच बाजू धरून विचार चालवितां. मी तर असें म्हणतों कीं, दोन्ही बाजूंचें निरीक्षण करणारास दैववादाचीच कास धरून देहव्यापार चालू ठेवण्याकरतां व मनाला कोठें तरी गुंतविण्यासाठींच कांहीं तरी हालचाल करावी लागेल. यावांचून प्रयत्नवादांत काडीचाही अर्थ नाहीं. एकाच कार्यांत एकाच तऱ्हेचा अगदीं समसमान यत्न करणाऱ्यांतून कांहीं यशस्वी होतात व कांहीं पूर्ण अपयशी होतात याचें कारण दैववादच नव्हे काय ?

पुरो०— हें ह्मणणें कांहींसें यथार्थ आहे. पण एवढ्यानेंच भागणार नाहीं. प्रत्येक गोष्टीचा कार्यकारणभाव ध्यानांत घेतला पाहिजे. कार्यकारणभावाचे धागे सूक्ष्मतर असतात. ते सहज कल्पनेला दिसत नाहींत; आणि सूक्ष्मतम कल्पनेच्या अभावामुळेंच दैववाद खरा वाटूं लागतो. कार्याच्या कारणांचा शोध लागला ह्मणजे अयोग्य कारणानें उत्पन्न झालेल्या दुःखद परिणामाचें निरसन करण्यास एक प्रयत्नवादच समर्थ आहे. दैवावर भरवसा ठेवून सर्पाच्या तोंडांत बोट घालणारा कोणता प्राणी जिवंत राहील ! घराला चोहोंकडून आग लागली असतां बाहेर पडण्याचा यत्न न करतां दैवावरच स्वसंरक्षणाचा हवाला देणाऱ्यांतून कितीजण होरपळून मरण्यापासून बचावतील ! विषप्राशन करणाऱ्या दैववाद्यांतून त्याचा अनुभव सांगण्यास कितीसे दैववादी सजीव स्थितींत दिसतील ! पोटांत दुखण्याचें कारण आदल्या दिवसाचें अजीर्ण होय असें कळतांच दुसऱ्या दिवशीं लंघन करणें व पाचक औषध सेवन करणें हा रोगनाशाचा प्रयत्नच होय. रात्रीच्या जागरणाची पीडा हरण करण्यास दुसऱ्या दिवशीं झोंपेचा यत्न करणेंच सुखदायक नाहीं काय ? दैववादांत अर्थ काय ?

राजा— पुन्हांही आपण सर्वथैव एकांगीच विचार करतां ! लंघनाच्या उपायानें जी वेदना राहत नाहीं व झोंपेच्या यत्नानें जी पीडा शमत नाहीं तिची वाट लावण्यास दैववादाची कास धरल्यावांचून गत्यंतरच नाहीं. मनुष्य अधीरपणानें व अनिश्चित अंतःकरणामुळें प्रयत्न करतो. पण दुःख निवारण ह्मणजे इच्छालाभ यांतील यश दैवाधीनच असतें. अशा

तऱ्हेच्या! कित्येक बाबती प्रयत्नांवाचून यशस्वी झाल्याचीं शेंकडों उदाहरणें सांपडूं शकतात. प्रत्येक बाप आपल्या पोरांना शहाणे व ज्ञानसंपन्न करण्याचा यत्न करीत असतां जगामध्यें शहाण्यांची व ज्ञान्यांची उणीव कां ? प्रत्येकजण दुःखनिवारण आणि सुखप्राप्ति या साठींच झटत असतां जगामध्यें दुःखाकुलांची गर्दी कां ? खेरीज जे जन्मतः सौख्यमय स्थितींत असतात त्यांनीं त्या सुखदस्थितीच्या प्राप्तीचा प्रयत्न केव्हां केलेला असतो ? सौख्यगिरीच्या शिखराकडे अतिव्यवस्थित धाव घेण्याचा यत्न करणारे वाटेंतच कोठेंतरी धूळ खात पडलेले कां दिसतात ? या सर्वांतील आद्य कारण दैवाधीनताच होय. तीच मनुष्याला बाहुल्याप्रमाणें नाचवीत असते. मनुष्यप्राणी अहंकारानें ताठून व गर्वमदानें धुंद होऊन मी मी ह्मणवितो, मोठमोठ्या बल्गना करतो, फुशारकी मिरवतो पण अखेर गोत्यांत पडल्यानंतर त्याला त्याच्या प्रयत्नवादाचा पश्चात्ताप होऊन विलाप करीतच बसावें लागतें.

पुरो०— अशी जर सर्वत्र दैवाधीनता कबूल केली तर मनुष्यानें सद्धर्म, सत्कर्म करण्याचें प्रयोजन काय ? धर्म, कर्म, आचार, नीति यांना रामराम ठोकला ह्मणजे जगामध्यें हरेक प्रकारची बंडाळी माजेल. समाजाचें स्वास्थ्य मोडेल आणि शिस्त व न्याय मोडून दीन, दुबळे, बापुडवाणे, निराधार, निराश्रित, पंगू व गरीब स्थितींतील शुद्रजन यांना अनंत अपेष्टा भोगण्याचा प्रसंग येईल. ह्मणजे एक दैववाद खरा धरून स्वस्थ बसण्यानें व बाकीचे धरबंध सोडून देण्यानें केवढी अनिष्टतर स्थिति प्राप्त होईल याची तुह्मांस कल्पना होत नाहीं काय ?

**राजा**— आपण ह्मणतां तशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. समाजाच्या शांतते करतांच राजसत्ता निर्माण झालेली आहे. न्याय-नीतिपासून च्युत होऊन जे कोणी अन्यायानें वर्तन करून आपल्या कपटक्रियेच्या किंवा सामर्थ्याच्या जोरावर असमर्थाला पीडा करतील किंवा आपलें सुख संक्रमण्याच्या आतुरतेमुळें दंडेलीपणानें परापहार करतील त्यास शासन करण्यासाठीं राजसत्ता सज्ज होऊन बसली आहे. समाजाचें जीवित-वित्त संरक्षण करण्याची जबाबदारी राजसत्तेनें स्वीकारली आहे. समाज विघातक, शांततामंग करणारे, दुसऱ्याला कोणत्याही तऱ्हेनें पीडा करणारे व [illegible]च्या हितासाठीं लोकांना अन्याय्य उपाधि लावणारे, या असल्या

अपायकारक हीन जनांना राजाच्या कायद्यांची भीति असल्यामुळें व अपराध्यास दंड होण्याविषयीं राजशासनपद्धतीवर लोकांचा विश्वास असल्याकारणानें समाजांत बंडाळी माजण्याचा किंवा माजलेली बंडाळी टिकण्याचा मुळींच संभव नाहीं.

पुरो०— ही गोष्ट व्यावहारीक स्थितीची झाली. यांत सुद्धां बराच दुबळेपणा आहे. कारण जाहीर झालेल्या अन्यायाला राजा शासन करील. पण गुप्तपणें होणाऱ्या अन्यायासंबंधानें राजसत्ता काय करूं शकणार ! जो अन्याय, जी अनीति, किंवा जें बेकायदेशीर वर्तन राजाच्या कायद्यांना मुळीं ज्ञातच होणार नाहीं त्याला शासन न झालें तर राजसत्ता दोषी ठरणार नाहीं आणि सर्वच अन्याय बाहेर पडतील असा संभव नाहीं. सत्याचें परिपालन करण्या करितां व असत्य क्रियांना शासन करण्याकरतां राजसत्ता तत्पर असते; पण कपटपटू लोक आपलें असत्कर्माचा स्फोट न होऊं देण्याबद्दल विशेष जपत असल्यामुळें कित्येक असत्कर्मे छपलींच जावयाचीं ! अशा प्रसंगीं तुमची राजसत्ता काय करूं शकेल ?

**राजा**— या अशा कामासाठीं धार्मिक सत्ता फार उपयोगी पडणारी आहे. धर्मानें ज्या गोष्टी पापमय ठरविल्या आहेत त्यांना शासन करण्याला धर्ममहात्मा अक्षय्य जागत आहे. कोणी कितीहि लबाड, कावेबाज, बदमाष सावध व पाताळयंत्री असला तरी त्याचीं पापकर्मे त्याला स्वतःला ज्ञात ही असणारच; आणि ती कितीहि गुप्तपणानें केली तरी ती ईश्वरास चोरून करतां येणें शक्य नाहीं. ईश्वरानें पापकर्मास दंड करण्याची प्रतिज्ञा केलेली आहे आणि धर्माज्ञा म्हणजे ईश्वरप्रणीत कायद्यांचा धर्मबंध होय. या कायद्यास न जुमानणारास ईश्वराच्या शिक्षेची भीति असल्यानें गुप्तपणें पातकें करण्यासही मनुष्यमात्र कचरेल असें अनुमान निघत नाहीं काय ?

पुरो०—अनुमान आणि अनुभव यांचा मेळ बसणें हें जरा अवघडच होय ! अनुमानानें ठाम केलेली कल्पना खरीच ठरेल असा सिद्धांत स्थापितां येणार नाहीं. राजसत्ता पुष्कळ लंगडी दिसत असली तरी ती धार्मिक सत्तेहून कितीतरी सामर्थ्यवान व परिणामकारक दिसते. ज्ञात झालेल्या अन्यायाला तात्कालिक शासनाची भीति असते. म्हणजे राजसत्तेची शासनपद्धती दृश्य फलदायी आहे. धार्मिक सत्तेचें फल दृश्य नाहीं. जें फल दृश्य

नाहीं तें सत्य मानण्याची थोडी पंचाईतच पडणार आहे. तशा फलदायी कर्माला महत्व न देतां तें उलट खोटें आहे असें मानण्याकडेच मनुष्याच्या मनाची प्रवृत्ति होण्याचा संभव आहे. कारण, धार्मिक वर्तनाचा योग्यायोग्यपणा आणि त्याच्या फलांतील सुखदुःखपणा यांचा मेळ बसल्याची उदाहरणें क्वचितच सांपडतात.

**राजा**— धार्मिक बंधनांचीं फलें अदृश्य असलीं तरी तीं सत्य आहेत यांत संशय नाहीं. इहलोकीं त्यांचा साक्षात्कार अल्प प्रमाणावर घडल्याचा भास होतो तरीपण तीं बंधनें झुगारून देऊन धर्माची पायमल्ली करणारास परलोकीं शासन होतें असा सिद्धांत आहे. सर्व पातकी किंवा दुष्ट यांना इहलोकीं दंड होतोच असें दिसत नाहीं व कित्येक आपादमस्तक पापानें लिप्त असतांही सौख्य स्थितींत दिसतात; त्या अर्थी जेथें त्यांच्या पापकर्मांचें प्रायश्चित्त भोगावें लागेल असा जो लोक तो परलोक मान्य केलाच पाहिजे. कारण पापपुण्य क्रियांचे योग्य मोबदले यांची अमलबजावणी झालीच पाहिजे असा जगच्चालकाचा दृढ व कायमचा प्रस्थापीत झालेला नियमच आहे.

**पुरो०**— श्रद्धाळू होऊन या गोष्टी अंगदीं सत्य मानल्या, तरी त्या तात्काल फलप्रद नाहींत असें दिसतें. परलोकांतील सुखदुःख किंवा पुढील जन्मांतील सुस्थिति-दुस्थिति यांविषयीं बेपर्वा करणारे किंवा बेफिकीर राहणारे लोकांनीं धार्मिक आचारास न जुमानले तर चालेलना? इहलोकीच्यां इहलोकीं जर धर्माचाराचा बराबाईट परिणाम ढळमळीतपणानें स्थापीत होणार तर परलोक किंवा पुढील जन्म या कल्पना सोडून देणारा धार्मिकबंधनाच्या आडकाठ्या किंवा त्यापासून उत्पन्न होणाऱ्या गैरसोयी जुमानून आपल्याला दुःखांत काय ह्मणून घालून घेईल? त्यानें तसें करण्यास हरकतच नाहीं!

**राजाः**— इहलोकचा ईश्वर ह्मणजे जी राजसत्ता तिला ज्ञात होऊं न देण्याची पूर्ण खबरदारी घेऊन आणि आत्मसंरक्षणाविषयीं सावध राहून गुन्हे जिरविण्याची तयारी करणाऱ्या गुन्हेगाराचें दुष्कृत्यं शासनरहित राहिलें तरी तें नीतिमान्य ह्मणतां येणार नाहीं; तद्वतच धार्मिक बंधनांची गोष्ट आहे. तरी पण ज्या धार्मिक क्रियांचें आचरण योग्य फलदायी होऊं शकत नाहीं त्या धार्मिक क्रिया– पारलौकिकफलाची कल्पना सोडून दिली

त्र- आचरण्याचें कारण दिसत नाहीं. मनुष्यानें धर्मभ्रष्ट आचरण करणें इष्ट नव्हे. पण त्याच्या मोबदला धर्मनिष्ठ क्रिया करून सुस्थिति किंवा समाधान प्राप्त करून घेण्याची इच्छा धरून तो कांहीं प्रयत्न करील तर तो व्यर्थ होय- कारण प्रयत्नाला फल येणारें असलें तरी प्रयत्नाला दैवावर प्राबल्य चालवितां येणार नाहीं. दैवापुढें प्रयत्नाची मात्रा चालणार नाहीं. उलट सुलट प्रय- त्नांचा विचार बाजूस ठेवून दैव हें स्वतंत्र रीतीनें मनुष्याच्या सुखदुःखाचें कारण होय. एतदर्थ प्रयत्नवाद कुचकामाचा होय !

राजाचें हें भाषण ऐकून दमनपुरोहित किंचित् गोंधळल्यासारखा दिसला. तो आतांपर्यंत चाललेल्या क्रमानुसार उत्तर करीत नाहींसें जाणून एकदम श्रीभारती बोलले, " असें कसें म्हणतां येईल ? हें पहा:- "

इतके शब्द ऐकतांच पुरोहित व राजा यांनीं एकाच वेळीं परस्परांकडे पाहून आनंद, आश्चर्य व तर्कसत्यता दर्शविण्यासाठीं कांहीं खुणा केल्या आणि ते एकदम उठून देवळाच्या दाराशीं गेले आणि आंत डोकावल्या- सारखें करून ते ह्मणाले, " महाराज, आमचा दोघांचाही घोटाळाच उडाला आहे. आपण कृपा करून चार शब्द सांगाल अशी आशा आहे. "

हें ऐकतांच भारती उठून बसले. उठतां उठतां ते ह्मणाले " मीं पडल्या पडल्या तुमचा संवाद ऐकला. मला तरी त्यांत विशेष काय समजतें आहे म्हणा ! पण आतां बरीच रात्र झाली आहे तुह्मी स्वस्थपणें झोंप घ्या. उद्- ईक या विषयाची वाटाघाट करूं. "

## प्रकरण ५ वें.



### श्रीभारतींचा प्रसाद.



भारतींच्या आज्ञेप्रमाणें राजा व पुरोहित हे आपापल्या अंथरुणावर निजले. आपण पूर्वी केलेलें अनुमान खरें ठरलें म्हणून त्या दोघांनाही आनंद झाला. उद्यांक आपल्याला भारतींच्या तोंडून कांहीं तरी अगाध ज्ञान श्रवण करण्यास सांपडेल या कल्पनेनें राजाला संतोष वाटला. भारतीनें भाषण सुरू केलें ह्मणजे मध्यंतरीं समय पाहून दमनपुरोहीत त्याला आपलें दुःख कळविणार असल्यानें त्यांच्या तोंडून जो फलदायक उपाय समजेल त्याच्या योगानें आपली इच्छा तृप्त होईल असें मानून राजा वसुप्रसाद भावी इच्छा पूर्तितेच्या आगाऊ आशेच्या सुखांत रममाण होत होत झोंपीं गेला. आपल्या गुरूजींना राजाचे क्लेश कोणत्या धोरणानें व शैलीनें कळवावेत याची योजना करीत करीत दमनपुरोहितही निद्रानंदांत गर्क झाला.

दुसरा दिवस उजाडतांच राजा अतिशय उत्सुक होऊन पुरोहिताच्या मध्यस्तीनें श्रीभारतींना विषयविवेचनाच्या वेळेसंबंधानें विचारूं लागला. भारतीनें तिसरा प्रहरचा वेळ मुकरर केला. दोनप्रहर उलटून कसें व केव्हां जातात याविषयीं राजा आपल्या मनांत अगदीं अधीर झाला. प्रातर्विधी, पूजा, अर्चा, नित्यकर्म, जेवणखाण यांमध्यें तो काळ सहज निघून जाऊन राजाला आनंददायक अशी ती तिसऱ्या प्रहरची वेळ प्राप्त झाली. श्रीशंकराच्या समोरील ऐसपैस जागेंत सर्वच मंडळी जमली. भारती स्वतः सांबाकडे तोंड करून बसले. राजा व पुरोहित त्यांच्या उजवे हातास तिरकस बसले. डाव्या हाताला. राजाचे सुमंत, हुजरे, शिपाई वगैरे उभे राहिले. भारतीनें त्यांनाही खालीं बसण्यास सांगून बोलावयास आरंभ केला. प्रथमतः त्यानें राजा व पुरोहित यांच्या पूर्वींच्या संवादांतील गोष्टींचा उल्लेख करून तो अमृतवाणीनें ह्मणाला, “ तुमचा मुख्य वाद दैव आणि प्रयत्न यांच्या सत्यासत्यतेबद्दलचा आहे. दैव व प्रयत्न या दोन्हीही गोष्टी सत्य आहेत. दैव ह्मणजेच प्रयत्न होय. आणि प्रयत्नालाच दैवदशा प्राप्त होत असते. ”

भारतीच्या या पहिल्याच भाषणांतील हा दैवप्रयत्नांचा घोटाळा पाहून दमन बोलला, “ आपल्या या भाषणाप्रमाणें दैव आणि प्रयत्न ही एकाच वस्तूचीं दोन नावें आहेत असें ठरतें. हें खरें मानलें ह्मणजे त्यांच्या तफावतीसंबंधानें वादच मिटतो. पण या दोन वस्तू निरनिराळ्या असणेंच इष्ट होय ! कार्यकारणभावाचा मुद्दा ध्यानांत घेतला ह्मणजे कारण हें कार्याच्या आधीं असलें पाहिजे. कार्य हें कारणाच्या नंतर घडून आलें पाहिजे. सृष्टि हें कार्य व ईश्वर हें कारण होय. ईश्वर व सृष्टि ही जर एक मानली तर कार्यकारणाचा भिलाफ होईल आणि आपत्ति गुदरेल. तोच प्रकार यत्न व दैव यांचा आहे. त्यांचें ऐक्य संभवतें कसें ? ”

पुरोहिताच्या चाणाक्षपणाचा प्रश्न जाणून भारती ह्मणाली, “ या दोन्ही गोष्टींची स्थिति भिन्न आहे पण तत्वतः त्या एकच आहेत. स्थितिभिन्नतेमुळें नामभिन्नता उत्पन्न होते. एखाद्याला पडशाचा विकार झाला ह्मणजे त्याला पीडा होते. त्या पडशाचें कारण थंडी किंवा शीत होय. व पडसें हें त्या थंडीचें कार्य होय. मग त्या कारणरूप थंडीला कार्यरूप थंडी असें नांव न देतां पडसें असें नांव दिलें तरी कारण व कार्य यांच्यांत तत्वतः भिन्नता राहते कोठें. जन्म व मरण या दोन गोष्टी भिन्न भासतात. मरण हें एखाद्या रोगाचें सामान्यतः कार्य होय; पण तत्वतः तसें नव्हे. कारण जन्म हें मरणाचें कारण होय. आणि मरण हें जन्माचें कारण होय ? कारण जन्मावांचून मृत्यु नाहीं आणि मृत्युवांचून जन्म नाहीं. मग या कारणकार्यवादांत तफावत राहते कोठें ? ”

भारतीच्या बोलण्याचा अगदीं बरोबर अर्थ राजाच्या मनांत उतरला नाहीं. तरी पण त्यांच्या भाषणांतून स्वतःच्या मुद्यास अनुकूल असा अर्थ काढण्याइतका तो सूज्ञ होता. तो ह्मणाला, “ तें ऐक्य तत्वतः शेवटीं सिद्ध होत असलें तरी कोणत्याही कार्यांत कारणत्वाची स्थिति असतेच हें उघड होत आहे. कार्यरूपानें व्यक्त होणारी थंडी कारणरूप थंडीच्या स्थितींत असते हें निर्विवाद आहे. तेव्हां पडसें किंवा थंडी याचें कारण जी थंडी तीच मुख्य होय. कारणरूप थंडी नसेल तर पडसें संभवनीय नाहीं. या वरून असें ह्मणण्यास मुळींच हरकत दिसत नाहीं कीं, सुखदुःखावस्थांचें कारण दैव होय ! ह्मणजे मनुष्य दैवानें प्रतिबद्ध झालेला आहे. त्याअर्थी प्रयत्नवाद शुष्क होय. ”

राजाला उत्तेजन देण्याच्या बुद्धीनें भारती ह्मणाले, " तुमचें भाषण यथार्थ नाहीं असें कोण ह्मणेल ? मनुष्य दैवानें जखडून गेला आहे इतकेंच काय, पण दैवांतील गोष्टींचा भोग भोगल्यावांचून त्यांची मुळींच सुटका व्हावयाची नाहीं. त्यानें कसेही यत्न केले तरी दैवाची गहनगती त्याला त्याच्या बऱ्यावाईट भोगाकडे खेचून घेऊन जाईल हें सत्य होय. "

भारतीनें राजाचा मुद्दाच मान्य केला हें पाहून पुरोहिताचा किंचित् हिरमोड झाला. पण भारतीसारख्यांचें बोलणें उथळ असावयाचें नाहीं असें पक्कें समजून तो ह्मणाला, " मनुष्याला दैवाचा गुलाम बनविलें म्हणजे पुरुषार्थाचें तत्व नामशेष होतें. सदाचार, धार्मिकक्रिया, पुण्यपाप यांमध्यें कांहींच अर्थ राहत नाहीं. दैवाच्या स्वाधीन होऊन राहिल्यावर मनुष्य अगदीं परतंत्र बनतो. त्याला स्वतंत्रतेनें कांहीं करावयाची सोयच राहत नाहीं. असें जर ठाम असेल तर धर्म-कर्मा-चार याचे एवढे धरबंध कशाला ? जोंपर्यंत सत्कर्म आणि असत्कर्म आणि त्यांचीं शुभाशुभ फळें कायम आहेत तोंपर्यंत प्रयत्नाला महत्व व सत्यता असलीच पाहिजे. एवढेंच नव्हे तर प्रयत्नाच्या अंगिकारावरच सुखदुःख अवलंबून असणें योग्य होय. माझ्या या ह्मणण्यांत कांहीं अर्थ असेल तर प्रयत्नवादच सत्य मानला पाहिजे. दैववाद व्यर्थ होय. "

पुरोहिताचें हें प्रतिपादन ऐकून भारती तें मान्य करण्याकरितां म्हणाले, " नाहीं कोण ह्मणतो ? सर्व कांहीं आपल्या प्रयत्नावरच अवलंबून आहे. क्षुधा शांत होण्यासाठीं अन्न खाणें हा प्रयत्न केलाच पाहिजे. प्रयत्नाच्या योगानेंच कित्येक महाजनांनीं चतुर्विध पुरुषार्थ साधले आहेत. "

भारतींनीं प्रयत्नवादही मान्य केला असें पाहतांच राजा ह्मणाला, " आपण या परस्परविरोधी दोन्ही गोष्टी मान्य करतां हें कसें ? या दोन्ही गोष्टी इतक्या विरोधी दिसतात कीं, एकीच्या सत्यतेंत दुसरीची असत्यता स्थापीत होते. मग अशापैकीं दोन्हींचीही सत्यता संभवते कशी ? दैव जर अबाधित व न टळणारे आहे तर प्रयत्न व्यर्थ होय आणि प्रयत्न जर सर्व सावक होय तर दैव हें व्यर्थ होय. दोहोंची सत्यता म्हणजे सर्व घोटाळा नव्हे काय ! "

राजाच्या या ह्मणण्यास पुरोहितानेंही पुष्टि दिली. तेव्हां भारती त्यांचा घोटाळा दूर करण्याच्या हेतूनें ज्ञानपूर्ण वाणीनें बोलूं लागले, " यांत

घोटाळा कांहींएक नाहीं. तुमच्या कल्पनांमध्यें निश्चितपणा नाहीं. मागील जन्मांतील प्रयत्न ह्मणजेच पुढील जन्मांतील दैव होय. हें दैव दोन प्रकारचें आहे. मागील दैवांतील दैवसंचयांतील जेवढा भाग भोगण्यासाठीं मनुष्याचा पुन्हां जन्म होतो तेवढा भाग ह्मणजेच त्याचें त्या जन्मांतील प्रारब्ध होय. शिल्लक राहिलेला दैवसंचय म्हणजे संचित होय. चालू जन्मांत मनुष्य जो कांहीं यत्न म्हणजे कर्म करीत तें त्याचें क्रियमाण होय. पूर्वजन्मांतील क्रियमाणाचा वाटा ह्मणजेच जर प्रारब्ध किंवा दैव होय तर या जन्मांतील क्रियमाणाचा वाटा ह्मणजे पुढील जन्मांतील दैव नव्हे काय ? ह्मणजे हें दैव निर्माण करणें मनुष्याच्या प्रयत्नाधीन आहे. सत्कर्मांनीं सुदैव आणि असत्कर्मांनीं दुर्दैव निर्माण होत असतें. त्याअर्थी सुदैव निर्माण करण्यासाठीं सत्कर्म किंवा सत्प्रयत्न करणें उचित व अवश्य नाहीं कां ? सुखदुःख दैवाधीन असतें हा ठाम सिद्धांत आहे. त्याअर्थी पुढील जन्मांतील यातना चुकवाव्या ह्मणून असत्कर्मांचा अवलंब करतांच कामा नये, या मुद्यास अनुसरून शास्त्रानें सदासत्कर्मांचें एवढें महत्व गायलें आहे. तात्पर्य आपलें पुढील जन्माचें सुख साधण्यासाठीं या जन्मीं सत्प्रयत्न करणेंच महत्वाचें व अत्यावश्य नाहीं कां ? ”

भारतींनीं केलेला हा उलगडा दोघांनाही पसंत पडला. पण दैवाच्या प्राबल्याचा प्रश्न तसाच अस्पष्ट राहिला असल्यानें राजा बोलला, “ ज्याला पुढील जन्माची वाटावाट करण्यापासून अलिप्त राहून या जन्मापुरताच विचार करावयाचा असेल त्याच्या दृष्टीनें असेंच ठरेल कीं, प्रारब्धभोग जर अनिवार्य आहे तर कोणताही प्रयत्न करण्यांत मतलब नाहीं. प्रयत्न करणें म्हणजे कोणीकडून तरी कंटाळवाणी स्थिति नाहींशी करण्याकरतां मनाला व देहाला कांहीं व्यापारांत ठेवणें इतकेंच कायतें ! कारण असत्कर्माचें फलही तात्कालीक दृष्टोत्पत्तीस येतेंच असें नाहीं. तीच गोष्ट सत्कर्मांची आहे. इहलोकांमध्यें या जन्मींचे प्रयत्न याच जन्मांतील सुखदुःख अवस्थेवर प्राबल्य चालवितील तरच त्यांची कास धरणें श्रेयस्कर होईल. नाहींतर याजन्मीं पूर्ण पराधीनपणा पतकरून पुढील जन्माकरितां वाटल्यास सत्कर्मांचा साठा करावा इतकाच कायतो सर्व शास्त्रांचा इत्यर्थ मानावा लागेल. ”

राजाची योग्य समजूत घालण्याकरितां भारती त्या मुद्यासंबंधानें सांगूं लागले, “ मनुष्यानें केलेलें कोणतेंही कर्म वांया जाणार नाहीं हा प्रस्थापित

नियम आहे. खोटें भाषण करणाराची जीभ तात्काळ तुटून पडत नाहीं व सत्य भाषण करणाराची जिव्हा लागलीच सुवर्णमय बनत नाहीं, ह्या दोन्ही गोष्टी सामान्यतः खऱ्या आहेत. पण याविषयीं मनुष्यानें हें पुरतेपणीं ध्यानांत वागवावें कीं, पापकर्मे कालपरिपाकाची मार्गप्रतिक्षा करीत असतात. कोणत्याही प्रकारच्या क्रियमाणानें प्रारब्धाला स्फुरण येत असतें. प्रारब्धाचा अनिवार्यपणा आणि प्रयत्नाची सफलता या दोन्ही परस्परविरोधी गोष्टी येथल्या येथें कशा सत्य ठरतात हें व्यावहारीक दाखल्यावरूनही समजणारें आहे. आकाशाची पोकळी सूर्याच्या प्रखर किरणांनीं व्याप्त झाली म्हणजे सर्व जनांनाच उष्णतेचा भयंकर ताप सोसावा लागणार! अशा प्रसंगीं एखाद्या शेतांत किंवा कोठें दुसऱ्या ठिकाणीं झोपडी अगर घर करणाराला उन्हाची पीडा पोंचणार नाहीं. त्यानें आच्छादित झोपडीचा आश्रय सोडला कीं, त्यास पोळण्यासाठीं चंडकिरणें सज्ज होऊन बसलेलींच आहेत. अशा मनुष्यानें गृहाचा आश्रय केला म्हणजे कांहीं सूर्यकिरणें नाहींशीं केलीं असें होत नाहीं. किरणरूपी प्रारब्ध कायम राहून त्याच्या गृहाश्रयाच्या प्रयत्नानें तो मात्र तापरहित अशा स्थितींत जाऊन बसला. असें जर स्पष्टपणें ठरतें तर प्रारब्धाच्या बरेंवाईटपणाचा विचार करीत न बसतां मनुष्यानें सत्संगती किंवा परमेशचरण यांचा आश्रय प्राप्त करून घेण्याच्याच मार्गांत असावें व सद्धर्म, सदाचार, सन्नीति यांच्यापासून रतिमात्र परावृत्त न होण्याचा यत्न करूनच आपलें सौख्य व समाधान साधावें हें मानवजातींतील प्राण्यांचें मुख्य कर्तव्य नव्हे काय? ”

भारतीच्या या ज्ञानमय भाषणानें राजा व पुरोहित यांचें पूर्ण समाधान झालें. बाकीच्या मंडळींनाही बराच आनंद वाटला. दमनपुरोहितानें गहिंवरून भारतीच्या चरणाला घट्ट मिठी मारली. त्याच्या पाठोपाठ राजा वसुप्रसादही सद्गदीत होऊन म्हणाला, “ दमनपुरोहितांना असा आश्रय प्राप्त झाला आहे. मी दुर्दैवी राजा मात्र पुत्रप्राप्तीच्या तापानें तळमळत आहे. आपण सांगितलेल्या मार्गांचा मीं शक्य तो अवलंब केलेला आहे. व येथून पुढें त्याचीच कास धरण्याचा निश्चय ठरविणें इष्ट होय अशी माझी खात्री समजून आहे. माझा अनर्थाचा ताप शमन करण्यास आपल्या चरणावांचून अन्य आश्रय आतां मी कोठें पाहूं! आपण या निराधार, अनाथ

पुरुषार्थहीन व मंदभागी वसुप्रसादाचा स्वीकार करा किंवा आपल्या लाथेनें त्याला बाजूला लोटा. मला आतां आपल्या चरणकमलावांचून अन्य सोय नाहीं. ”

इतकें भाषण करून राजानें श्रीभारतींना लोटांगण घातलें. त्याचा कंठ दाटून येऊन तो मृदुपणानें स्फुंदन करूं लागला.

वसुप्रसादाची ही विनीत अवस्था व विमलभाव पाहून भारतींचें चित्त द्रवलें. ते त्याला उठवून आपणही उभे राहिले आणि त्यांच्याबरोबर सर्व उभे राहिलेल्या मंडळी समक्ष ते बोलले, “ राजा, या गोष्टी दैवाधीन आहेत. दैवामध्यें फेरफार करण्याची अजब शक्ति व युक्ति एका सर्वशक्तिमान् परमेश्वराच्या ठिकाणीं वास्तव्य करते. तू विनयभावानें व शुद्ध मनानें श्रद्धाळू होऊन या भोलानाथास नमस्कार घालून त्याला आपलें इच्छित माग. ”

भारतींचें हें वाक्य संपलें तोंच दमनपुरोहित बोलला, “ महाराज, हा तरी ईशाच्या घरचा एक व्यवहारच आहे. भोलानाथास आमची करुणा येण्यास त्याला अत्यंत प्रिय अशा गोष्टींचें आह्मी दास बनलेलों आहों कोठें ! ईश्वराजवळ उत्तमप्रकारचा वशिला लागतो. ज्यांच्या शब्दाधीन होऊन ईश्वर वाटेल तें करतो, ज्यांच्या एकनिष्ठेस भुलूनच ईश्वर आपलें कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं असें सामर्थ्य प्रकट करून दाखवितो असे लोक ह्मणजे हरिप्रिय संतजन होत. आह्मी आपलीच कास धरणें इष्ट होय ! ”

आपला अनुग्रहीत, भाविक शिष्य दमन याच्या भाषणावरून त्याचीही इच्छा जाणून भारतींनीं राजाला हातांत धरून देवळांत नेलें. मागोमाग सर्व मंडळी देवद्वारापर्यंत गेली. भारतींच्या सांगण्यावरून राजानें शुचिर्भूत होऊन महेश्वरापुढें लोटांगण घातलें. भारतींच्या अनुज्ञेनें राजा उठून, हात जोडून उभा राहिला त्यासमयीं सांबापुढें सात आठ बदाम ठेवलेले होते. भारतींनीं ते उचलले आणि राजाच्या पुढें ते करून ते अमोघ वाणीनें ह्मणाले, “ राजा, तूं सतत हरिनाम जपीत रहा. तूं आपल्या मंदिरांत प्रवेश करून आपल्या भाग्यशाली पत्नीसह हीं फळें सेवन कर. ह्मणजे भोलानाथ श्रीगौरीहरीच्या प्रसादानें तुझें इच्छित पूर्ण होईल. ”

राजानें तात्काळीच ते बदाम स्वीकारले. प्रेमभाव दाटून येऊन त्यानें भारती व पुरोहीत यांच्या पायांवर नमस्कार घातला आणि ती छोटीशी सभा विसर्जन झाली. सर्वांना अत्यानंद होऊन एक प्रकारचा उल्हास वाटूं लागला.

---

## प्रकरण ६ वें.



### मनोभंग.



भारतींचा आशिर्वाद घेऊन राजा बरोबरच्या सर्व मंडळीसह यशस्कार सोडून तडक आपल्या राजधानीस सुखरूप पोंचला. राणी इंदुमती त्यांच्या आगमनाची उत्सुकतेनें वाटच पाहत होती. राजा व राजपुरोहित यांचें दर्शन होतांच इंदुमतीला आनंद वाटला. राजाचें मुखचंद्र प्रसन्न आहेसें पाहतांच तिच्याही मुखकमलावर टवटवीतपणा दिसूं लागला. त्या प्रफुल्लितपणावरून राजा यशसंपन्न होऊन आला असावा असा त्या साध्वीनें तर्क केला. तिनें दमनपुरोहिताला नमस्कार करतांच त्यानें तिला खुल्यास्वरानें ' सौभाग्यसंपन्न पुत्रवतीभव' असा आशिर्वाद दिला.

हा आशिर्वाद पोकळ नव्हता. तो श्रीभारतींच्या पवित्र व भाविक छात्रांच्या तोंडून निघाला होता. भारतींच्या कृपेचें मुळ अभिष्ठाम प्राप्त झालेलें असल्यामुळें आतां त्यांत अतुल सामर्थ्य वास्तव्य करूं लागलें होतें. आजपर्यंत दमनपुरोहीत नेहमीं आशिर्वाद देतांना नुसतें ' सौभाग्यवतीभव ' असें उच्चारीत, या गोष्टीची इंदुमतीला आठवण होती. आजच्या आशिर्वादाचीं अक्षरें कानीं पडतांच तिची जिज्ञासा अधिकच पुष्ट होऊन तिनें त्यांना साधुदर्शनाची हकीगत समजून घेण्याची इच्छा दर्शविली. दमनानें तिला सर्व मजकूर सारांशरूपानें विदित केला. तो ऐकतांच ती भावी सौख्याच्या मनोराज्यांत गर्क झाली.

दुसऱ्या दिवशीं गुरुवार होता. राणी इंदुमतीनें दासी करवीं आपलें मंदिर शृंगारयुक्त केलें. राजा आपणास प्रसादाचें बदाम देण्यास मंदिरांत केव्हां येईल अशी तिला मोठी उत्कंठा प्राप्त झाली. तिला सर्व दिवस कंटाळवाणा गेला.

राजानेंही रात्रीं मंदिरामध्यें इंदुमतीला प्रसाद देण्यास जावयाचा निश्चय केला. राजानें आपल्या पत्नीसहवर्तमान आपल्या मनानेंच मंगलस्नान केलें.

त्यानें इंदुमतीला हरिनाम स्मरण चालू ठेवण्याची सूचना दिली. त्याच्या-पुढें श्रीभारतींची मूर्ति दिसूं लागली. त्यांचे शब्द त्याच्या कानांत गुणगुणत आहेत असा त्याला सारखा भास होई. त्यांच्या शब्दावर भरंवसा ठेवून तोंही मनामध्यें नामस्मरण करीत राहिला.

तिसरा प्रहर होईपर्यंत राजाराणी भावी आनंदाच्या कल्पनेंत निमग्न होते. पण दुपार उलटल्यानंतर जेव्हां दमनपुरोहित राजवाड्यांत गेले तेव्हां त्या दंपत्याचा सर्व हिरमोड झाला. दमनपुरोहितांनीं राजाला कळविलें कीं, "श्रीभारतींचा प्रसाद भक्षण करण्यासाठीं मंदिरप्रवेश करण्यास आजचा दिवस बरा नाहीं. इतकेंच काय, पण राजा! आजपासून पांच महिने शुभ-प्रद व मंगलदायक असा मुहूर्तच उपलब्ध नाहीं. तेव्हां तोंपर्यंत तुम्हीं पत्नीसमवेत व्रतस्थ राहून श्रीभारतींच्या अनुज्ञेप्रमाणें ईश्वरचिंतनांतच काळ काढावा."

पुरोहिताचें हे शब्द म्हणजे वज्रासमानच होते. या दुःखप्रद अनुज्ञेनें राजाचा आनंदरवि लोपून गेला. त्याच्या स्वच्छ प्रकाश किरणाच्या आड हें शब्दरूपी पटलच पसरलें. पण करणार काय? एखादा [illegible], प्रापंचिकज्ञानी, शब्दपांडित्य निपुण, तर्कवादी मनुष्य राजाच्या ठिकाणीं असतां तर त्यानें लागलीच युक्ति लढवून पुरोहिताचें भाषण फोल करून दाखविलें असतें. पण राजा वसुप्रसाद मोठा श्रद्धाळु व वेदशास्त्रावर पूर्ण भर-वसा ठेवणारा होता. तशांत दमनपुरोहितासारख्या शुभेच्छु व शुद्ध-स्नेह-संपन्न सुहृदाच्या ठिकाणीं तर त्याचा अत्यंत विश्वास असून मोठा आदर भाव होता. आपला मनोभंग करणारी ती पुरोहितांची आज्ञासदृश सूचना त्यानें मोठ्या कष्टानें कां होईना पण मान्यच केली. पुरोहित आपलें मन पाहण्याकरतां कदाचित् ही आडकाठी उगीच सांगीत असतील अशी राजाला त्यांत थोडी आशा होती. त्याचा निकाल लावून घेण्याच्या बुद्धीनें राजा पुरोहितास म्हणाला, "आपली आज्ञा मला वंद्यच आहे. पण याकामीं चांगल्या ज्योति-षाचा किंवा एखादा त्रिखंडशास्त्रीबोवांचा सल्ला घेऊन कांहीं सवड निघाली तर पहावें."

राजाची पूर्ण खात्री करण्याकरतां पुरोहितानें सांगितलें, "मला हें सुचलें कां नाहीं! मी चारदोनांच्या सल्यानेंच सांगतों आहें. माझी त्यामध्यें विशेषशी गति नाहीं. शुभमुहूर्त पाहण्यासाठीं मी आपल्या मार्तंडाचार्यांचा

सल्ला घेण्यास गेलों. तेथेंच आपले नागपति ज्योतिषीबुवा होते. आतां या जोडीपेक्षां दुसरा त्रिखंडपंडीत कोण आहे. त्या दोघांचें मत अगदीं एक आहे. त्यांत सबब मुळींच निघण्यासारखी नाहीं. ''

या भाषणानें राजा सपशेल निराश झाला. राजानें पुरोहिताचें भाषण मान्य केलें. शुभमुहुर्त प्राप्त होईपर्यंत कोणत्या प्रकारें शुचिर्भूतपणानें बतावस्था राखावयाची हें त्यानें आपल्या मनाशीं ठरवून टाकलें. त्यासंबंधीं राणीला कांहीं सूचना देण्यासाठीं राजानें आपल्या मंदिरांत तिची भेट घेतली तेव्हां ती क्रोधाविष्ट झाली. दमनपुरोहित सन्निधच होते. इंदुमती अगदीं नाराज होऊन तिची मर्जी गेली आहे आणि आपल्या मनोत्सुक्यामध्यें घोटाळा उत्पन्न झाल्यामुळें ती संतापयुक्त झाली आहे असें पाहून पुरोहित म्हणाले, " राणीसाहेब ! उदासीन होण्याचें कारण नाहीं. आपण खट्टू होऊं नका. यांत आपण कोणावर रागावणार ? पराशर, मनु, भृगु यांच्यांतून तुमचा राग कोण जुमानणार ! आतां ते निर्भिड आहेत, समवर्ती व जगकल्याण आहेत, हाच त्यांचा अपराध समजून त्यांच्या नाकावर टिच्चून हवा तो आचार केलांत तर मात्र सबब आहे. बाकी त्यांच्या आज्ञांचा भंग केला म्हणून ते स्वतः कांहीं त्या अवज्ञेबद्दल जाब विचारण्यास येत नाहींत हें खास ! आपण राग करूं नका; दुःख मानूं नका ! ईश्वर सर्व कांहीं बरेंच करतो असें मानून रहा. ''

पुरोहितानें हें जरा अधिकच भाषण केलें. पण त्यावेळची राणीची स्थिति लक्षांत आणली म्हणजे पुरोहिताच्या बोलण्यांत असा कांहीं खमंगपणा पाहिजेच होता. पुरोहित आपल्याबद्दल थोडा गैरसमज करून बोलले असें समजून इंदुमती म्हणाली, " धर्माज्ञा झुगारून देणें हें आपल्या कुलाचें ब्रीद नाहीं. आपल्या या मुहुर्तानें आमच्या प्रसादभक्षणास व्यत्यय आला म्हणून आम्हाला दुःख वाटणें साहजीक आहे. आणि आम्ही तसे खट्टू होऊं कदाचित् पण त्या योगें धर्ममर्यादा उल्लंघन करण्यास प्रवृत्त होण्याइतके आम्ही विद्वान्, ज्ञानी किंवा उन्मत्त नाहीं. आपली अनुज्ञा आम्हास मान्य असावयाचीच. ''

राजाराणीनें सर्वशः मान्यता दाखविल्यानंतर दुसऱ्या कांहीं चार गोष्टी होऊन पुरोहित परत गेले.

कांहीं दिवस गेल्यानंतर इंदुमती आपल्या मनाशीं ज्योतिष व धर्म या

शास्त्रांचा विचार करूं लागले. आपल्याला शास्त्रसिद्धांत ठाम समजावेत ह्मणून तिनें राजाजवळ धर्मशास्त्र ऐकण्याची इच्छा दर्शविली. राजाच्या मनांतही ज्योतिषविद्या श्रवण करावयाचीच होती. इंदुमतीची इच्छा जाणून मार्तंडाचार्य व नागपति यांना दोन्हीं शास्त्रांच्या प्रवचनाकरितां बोलाविलें. आचार्य व शास्त्री दोघेजण आपापल्या शास्त्रविषयांचें निरूपण करूं लागले. प्रवचनास इतरही थोर बायका व पुरुष येत. हे दोघेजण जाडे पंडित असून ते आपापल्या विषयांत पारंगत होते. त्यांनीं मोठ्या गमतीनें सर्व विषय श्रोतृवृंदाला उत्तम समजावून दिला. इंदुमती तर आचारधर्म ऐकून आनंदित झाली. दायभाग, राजकर्म इत्यादि प्रकरणें ऐकून राजा बहुत संतोष पावला. आपल्या दर्जास अनुसरून राजानें दोन्हीही ब्राह्मणांची उत्तमप्रकारें बोळवण केली.

पुराण समाप्त होईपर्यंत चार साडेचार महिने संपले. महिना दीड महिनाच आवधी उरला. या एवढ्या मुदतींत मध्यंतरी कांहीं भलताच प्रकार सहजासहजीं घडला. मार्तंडाचार्य व नागशास्त्री या दोघांच्या कुटुंबांच्या ओट्या भरण्याकरितां इंदुमतीनें त्यांना वाड्यांत बोलावून आणवलें. यावेळीं मार्तंडाचार्यांचें कुटुंब जरा कोमेजलें होतें. हें त्यांचें द्वितीय कुटुंब होतें. त्यांचें नांव माई असें होतें. माईच्या अंगांत अगदीं त्राण राहिलेला दिसत नव्हता. त्या अगदीं रोड होत्या. इंदुमतीनें त्यांना कांहीं फलाहाराचे पदार्थ दिले तेव्हांही माईच्या तोंडाला आवढणच आल्यासारखें दिसत होतें. गोड, सुवासिक, सात्विक पदार्थ टाकून त्या कोठें तिखट, चटणी, खार, मिरच्या असेंच कांहीं मागत होत्या. त्या सर्व चिन्हांवरून इंदुमतीनें भीतभीतच कांहीं बोलून व कांहीं खुणवून शास्त्रिणबाईजवळ चौकशी केली.

राणीच्या जबाबास उत्तर देण्यासाठीं शास्त्रिणीनें कांहीं संमतिदर्शक खुणा करून असे उद्गार काढले, "हो! हो! माईसाहेब जरा मालवल्या आहेत. त्यांचे डोहाळे ह्मणजे दुसरा जन्मच तो त्यांचा! आणखी मेले किती तरी दिवस राहतात!"

हे शब्द ऐकतांच माई जरा लाजल्या. राणीनें लागलीच विचारलें, "दोन अडीच महिने झाले असतील? असें हें आणखी किती दिवस चालायचें? बाई फारच थकल्या आहेत."

यावर शास्त्रिणबाई बोलली, "महिने का! आतां बघा! मी चांगली

....नव्हते त्याला किती बरें दोन अडीच महिने झाले. याच्या पूर्वी दीड पावणे दोन महिने ह्या आंग धुतल्या होत्या. हं हं ! यांना हा चांगला चौथा महिना—पंधरावडा—अधिकच असेल."

शास्त्रिणीच्या भाषणानें इंदुमतीला त्या दोन्ही बायकांचें गरोदरपण समजून आलें. फराळ, ओटी भरणें वगैरे आटपून त्या निघून गेल्यावर इंदुमती आपल्या मनाशीं विचार करीत राहिली.

---

## प्रकरण ७ वें.

### आचार्यांची प्रतिज्ञा.



णी इंदुमती ही आपल्या महालांत एकटीच आपल्याशीं विचार करीत बसली होती. धर्मशास्त्र, ज्योतिषशास्त्र हे तिच्या विचाराचे विषय होते. या शास्त्रांचें विवेचन योग्य माणसांच्या तोंडून तिनें नुकतेंच ऐकलें होतें. धर्मशास्त्र पाळणें ही गोष्ट अत्यंत उपयोगी व कल्याणकारक आहे पण त्याप्रमाणें आचार करणें अति दुर्घट आहे, असें तिला वाटूं लागलें. मार्तंडाचार्य व नागशास्त्री यांचीं कुटुंबें गरोदर आहेत हें कळल्यापासून तिच्या मनांत तोच विषय सारखा घोळत होता. ती आचार्य व शास्त्री यांच्यावर बरीच क्रुद्ध झाली होती. ते दोघेजण नुसते बोलके विद्वान आहेत; त्यांच्याजवळ आचाराचें मुळींच अवसान नाहीं; ते नुसतें लोकांना ब्रह्मज्ञान सांगून आपण स्वतः कोरडे पाषाण आहेत अशी तिची ठाम समजूत झाली. त्यांनीं राजाला मंदिरप्रवेश करण्यास पांच महिने मुहूर्त नाहीं असें सांगितलें त्या मुदतींत त्यांना शुभमुहूर्त कसा सांपडला याबद्दल ती साशंक झाली. आचार्यीण व शास्त्रीण यांच्या डोहळ्याची हकीकत राजाच्या कानावर घालून त्याच्याकडून त्यांना दंड करवावा असें तिच्या मनांत आले व तिनें लागलींच राजाच्या कानावर ती बातमी घातली.

राजा वसुप्रसाद हा सद्गुणसंपन्न होता. धर्मशास्त्रावर त्याचा विश्वास असे. वैदिक, कर्मिष्ठ, शास्त्री, पंडित यांच्याविषयीं त्याच्या मनांत पूज्यभाव असे; तरी पण त्याला लबाडी मुळींच खपत नसे. दांभिक माणसाबद्दल त्याला अत्यंत तिटकारा वाटे. स्वकर्तव्यपराङ्मुख असतां लोकांना नुसता कर्तव्योपदेश करणारांवर त्याचा मोठा कटाक्ष असे. भोंदु साधु, फसवे संत, बोके संन्यासी वगैरे मनुष्यांविषयीं तो तिरस्कार करी. इंदुमतीकडून आचार्यीण व शास्त्रीण यांची हवाल कळतांच त्यानें दमनपुरोहितास तो मजकूर विदित केला. पुरोहितालाही त्या दोन्ही ब्राह्मणांच्या वर्तनाचें आश्चर्य वाटलें. तो मनांत थोडा क्रुद्ध झाला. राजानें त्याचा विचार घेऊन त्या मुहूर्त सांगणाऱ्या ब्राह्मणांना दरबारांत बोलावून आणून जाब विचारण्याचें ठरविलें.

एक दोन दिवसांतच राजानें त्यासंबंधानें एक लहानशी खाजगत सभा भरविली. त्यांत दहापांच मानकरी, चारदोन सरदार, शहरांतील दुसरे दहापांच विद्वान येवढीच कायती बाहेरची मंडळी बोलावली होती. राजाज्ञेस अनुसरून मार्तंडाचार्य व नागशास्त्री हे सभेला हजर राहिले. त्यांना किंवा इतरांनाही त्या सभेचा अंतस्थ उद्देश माहीत नव्हता. सर्वजण आपापल्या योग्य स्थानीं बसल्यानंतर दमनपुरोहितानें भाषण करण्यास आरंभ केला. " राजा वसुप्रसाद यांना कोणा अधिकारसंपन्न संतजनाकडून प्रसाद प्राप्त झाला आहे ही गोष्ट आतां सर्वांना विदित झाली आहेच. तो प्रसाद राजमंदिरांत राजाराणीनें मिळून भक्षण करावा अशी त्या हरिप्रिय सिद्धाची अनुज्ञा होती. त्याप्रमाणें तो भक्षण करण्यास शुभमुहूर्त असावा असें आम्हांस इष्ट वाटलें. त्याप्रसंगीं वे. मार्तंडाचार्य व नागशास्त्री यांनीं निश्चून सांगितलें कीं, पांच महिन्यांत मुळींच योग्य व मंगलदायक मुहूर्त नाहीं. या गोष्टीस आज चार साडेचार महिने झाले. राजांच्या मंदिरप्रवेशास जर या शब्दपांडित्यकुशल शास्त्रिद्वयांना शुभमुहूर्त सांपडला नाहीं तर त्यांना स्वतःच्या बाबतींत तो कसा सांपडला ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. शास्त्र हा विषय नुसता व्याख्यान करण्याकरितां नाहीं. शास्त्राच्या खोल तत्वांचा विचार समजून घेऊन तीं तत्वें आचारांत आणून दाखविणें हाच काय तो मुख्य मुद्दा आहे. याकामीं नागपति व मार्तंडाचार्य यांनीं जिव्हा व कृति यांची फारकत करून दाखविली असल्यानें ते राजेसाहेबांच्या रोषास पात्र झाले आहेत आणि यासंबंधानें ते काय खुलासा करतात

तो ऐकण्यासाठींच आज ही सभा भरविली आहे. हे शास्त्री, आचार्य व मी स्वत: समव्यवसायी आहों. अशा कांहीं लोकांच्या भलत्याच वर्तनानें तसल्या जातीच्या सर्व समाजावर उगीच दोषारोप होतो आणि मग तो सर्वांनाच निमुटपणें सहन करावा लागतो. याचा त्यांनीं विचार करावा."

हें सूचनात्मक भाषण आटोपतांच राजा बसुप्रसाद स्वत: ह्मणाला, "हें शास्त्रिद्वय आह्माला पूज्य आहे. यांनीं कांहीं कोणाचें घर लुटलें नाहीं किंवा कोणाचा जीव घेतला नाहीं. ते शास्त्रपारंगत असल्यामुळें सर्व लोक व आह्मी यांच्या शास्त्रार्थास अनुसरण्याला तयार असतो. पण तेवढ्यानेंच त्यांनीं चढून जातां कामा नये. त्यांच्यावर तर आचाराची मोठीच जबाबदारी आहे हें तें विसरतात हीच त्यांची महत्वाची चूक होय. ह्मातारपणापर्यंत जरी शास्त्रें नुसतीं पठण केलीं तरी त्याचा कांहीं उपयोग नाहीं. सर्व नद्यांचीं लांबी तोंडपाठ ह्मणून दाखवितां आलीं तरी तेवढ्यानें तृषार्ताची तहान भागावयाची नाहीं. श्रीमंतीच्या ऐसपैस बल्गनांनीं हातांत सलकडी पडावयाची नाहींत. कलाकौशल्याच्या तोंडी बातांनीं गरज भागावयाची नाहीं. छत्रीच्या रचनेवर व्याख्यानें देऊन ऊन्ह व पाऊस यांच्या पीडेपासून रक्षण व्हावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें विद्वत्ता, पंडितपणा, साधुत्व, वैदिकपणा, शास्त्रनिपुणता, ज्ञानसंपन्नता यांच्या अक्षराच्या पाट्या कपाळावर लटकावून कांहींएक उपयोग नाहीं. हे शास्त्री जर स्वत: नंदी राहिले आणि वाटेल तसा आचार ठेवूं लागले तर यांच्या तोंडच्या शास्त्रनिर्बंधास जुमानणार कोण ? यांनीं याबद्दल काय तो जाब द्यावा ! त्यांची अनुज्ञा आम्हीं आपलें कर्तव्य ह्मणून पाळली; पण त्यांच्या या विप्रीत आचरणाबद्दल ते काय प्रायश्चित्त करण्यास तयार असतील तेंच त्यांनीं करावें ! आह्मी निराळें शासन करूं इच्छित नाहीं."

राजाचें हें समग्र भाषण शास्त्री व आचार्य यांनीं लक्ष लावून ऐकलें. त्या दोघांनीं त्यांतील सार तेव्हांच जाणलें. आपला अपराध ध्यानांत आणून ते ओशाळले; पण त्यांच्या अंगीं प्रसंगावधान चांगलें होतें. शूर वीर ज्याप्रमाणें कारणाच्या वेळीं उपयोग व्हावा ह्मणून शस्त्राला कधींहि विसंबत नाहींत त्याचप्रमाणें निर्वाणीला उपयोगीं पडावी ह्मणून त्यांनीं शास्त्रें जवळ रक्षण करून ठेवलेलीं होतीं. ते चाणाक्ष, हुषार व धैर्यशील होते. त्यांनीं आपसांत विचार घेऊन आणि संगनमत करून दोघांच्या तर्फे ह्मणून मार्तंडाचार्य

बोलावयास उठले. " आमच्याकडून आचरणक्रमांत प्रमाद घडला आहे हें आमच्यानें नाकबूल करवत नाहीं. आतां राजा आह्मांस जाब मागतो. तर त्यावर आह्मी असें म्हणतों कीं, राजानें आम्हांस हा अपराध तूर्त माफ करावा. आजपासून सरासरी सहावर्षे दहा महिन्यांनीं आह्मी या गोष्टीचें उत्तर देऊं. त्यासमयीं राजाचें जर समाधान झालें नाहीं; त्याला आमचें उत्तर पटलें नाहीं तर आम्ही होऊनच विष प्राशन करूं. मग हें अपयशी मुख जगास दाखविण्याला आम्ही जिवंतच राहणार नाहीं. आतां या गोष्टीचा निकाल लागण्यास बराच कालावधी असल्यामुळें कोणालाहीं आमचें भाषण उडवाउडवीचें वाटण्याचा संभव आहे. मरण लांबवण्यासाठीं आम्ही ही शक्कल योजली असावी असाही कुतर्क निघण्याचा संभव आहे. पण तसें कोणी समजूं नये अशी आमची विनंति आहे. आमचें उत्तर पटलें नाहीं तर आम्हांस येणारें मरण आम्ही होऊनच स्वीकारलें आहे हें सर्वत्रांनीं ध्यानांत आणावें. आह्मी ईश्वराला साक्षी ठेवून प्रतिज्ञेनें सांगतों कीं, आमचें भाषण उघड व सत्य आहे. कोणीही अधीर होऊं नये. आम्हांस जबाब देण्यासाठीं इतकी मुदत मिळालीच पाहिजे. ईश्वरानें सगळ्यांना आयुष्य द्यावें आणि हीं सहावर्षे व दहा महिने चटकन् निघून जावेत अशी आम्ही त्या प्रभूजवळ प्रार्थना करतों. "

आचार्यांनीं या प्रकारें आपलें भाषण संपवितांच सर्व सभेला मोठें आश्चर्य वाटलें. अशी मुदत मागण्यांत त्यांचें खरें धोरण काय असावें हें कोणाच्याच ध्यानांत येईना ! राजा व दमनपुरोहित यांनीं कांहीं वेळ विचार करून ती मुदत मान्य केली आणि सभा बरखास्त झाली.



# प्रकरण ८ वें.



## दसऱ्याचा दरबार.





सभेच्या प्रकरणानंतर सरासरी एक पंधरवड्यानें पांच महिन्यांची मुदत संपली. नंतर लागलीच आचार्य व शास्त्री यांनीं जो शुभ मुहूर्त सांगितला त्यादिवशीं दमनपुरोहितानें राजाराणीला मंगलस्नान घातलें. त्या दोघांच्या आजपर्यंतच्या हरिनामस्मरणानें त्यांचीं अंतःकरणें शुद्ध झालीं होतीं. आज त्यांचें दोघांचें चित्त प्रसन्न झालें होतें. त्यादिवशीं रात्रीं राजानें इंदुमतीच्या मंदिरांत प्रवेश केला. सर्व मंदिर अतिशय सुशोभित दिसत होतें. त्याच्या चारी बाजूंस आरसे लावले होते. उत्कृष्ट तऱ्हेचा छप्परपलंग उभा केलेला असून त्यावर पुष्पशय्या सजविली होती. उदबत्या, अगरबत्या यांच्या सुवासानें मन समाधान पावत होतें. नानाप्रकारच्या सुगंधित द्रव्यानें चित्ताला आराम वाटत होता. अशा प्रकारच्या थाटामध्यें राजानें भारतीची मूर्ति डोळ्यापुढें आणून व श्रीशंकराला नमस्कार करून राणी इंदुमतीला ते बदाम खावयास दिले आणि आपणही भक्षण केले.

या गोष्टीस महिना दीड महिना लोटतांच इंदुमतीच्या स्थितींत पालट झाला. ती अंतर्वत्नी झाली. राजानें मोठ्या आनंदानें महिन्या महिन्यास अनुरूप असे तिचे सर्व सोहळे केले. धर्मशास्त्रास अनुसरून असा सर्व आचार राजानें यथास्थितपणें पाळला. श्रीभारतीच्या प्रसादांतील हें सामर्थ्य पाहून सर्वत्रांना त्या सत्पुरुषाबद्दल मोठा प्रेमभाव उत्पन्न झाला.

एकेक मास लोटतां लोटतां कालगतीनें इंदुमतीचें नवमास पूर्ण झाले. दहाव्या महिन्याचे नऊ दिवस भरतात न भरतात तोंच राणी इंदुमती प्रसूत होऊन तिच्या पोटीं एक पुत्ररत्न झालें. तो मुलगा दिव्य होता. तो तेजःपुंज कांतीनें झळकत होता. इंदुमती चांगली सावध होऊन मुलगा पाहूं लागली तों आपल्या सूतिकागृहांत स्वर्गलोकचा चंद्रच अवतीर्ण झाला आहे कीं काय असा तिला भास झाला. राजा वसुप्रसाद जेव्हां त्या बालकाच्या मुखाला मध लावण्यासाठीं प्रसूतीमंदिरांत गेला तेव्हां त्याला

वाटलें कीं, कवि, शुक्र, गुरु, यांनीं आपल्या तेजाचें अंश काढूनच तो बालक घडवला असावा. ती बातमी बाहेर पसरतांच दमनपुरोहितही तावडतोब तेथें प्राप्त झाले. त्यांनीं त्या बालकाची मनोहर कांति पाहतांच त्यांना एक प्रकारची धन्यता वाटली. त्यांना गहिंवर येऊन श्रीभारतींची आठवण झाली. त्याच्या नेत्रापुढें श्रीभारतींची मूर्ति साक्षात् दिसूं लागली. त्याचा कंठ दाटून येऊन त्यांनीं राजाला तेथेंच सांगितलें, "राजा ! तुला सद्गुरूचा प्रसाद फलद्रूप झाला हें तुझें केवढें भाग्य ! अरे, हा सामान्य पुत्र नव्हे ! तुझा सदाचार, राणी इंदुमतीचें प्रखर पातिव्रत्य, सद्गुरूची कृपा आणि ईशाचरणस्मरण यांच्या यशांतील तेजच या ठिकाणीं पुत्ररूपानें उत्पन्न झालें आहे हेंच खरें."

श्रीशंकरांच्या कृपेनें प्राप्त झालेल्या त्या बालकाला सर्व उपचार यथास्थित-पणें करण्यांत आले. बारा दिवस होतांच त्या मुलाचें बारसें मोठ्या थाटानें झालें. राजानें त्या दिवशीं गरीबगुरीबांस अन्नसंतर्पण करून योग्य विप्रांची उत्तम प्रकारें संभावना केली. इंदुमतीच्या हस्तें पुत्रसंपन्न स्त्रियांना लुगडीं चोळ्या देण्यांत आल्या व शेंकडों बाळलेणीं वाटलीं. राजधानीमध्येंही घरोघरीं आनं-दोत्सव झाले. लोकांनीं आनंद प्रदर्शित करण्याकरतां गुढ्या, तोरणें उभारलीं.

त्या शुभलक्षणसंपन्न अर्भकाचें नांव धर्मध्वज असें ठेवण्यांत आलें. शुक्ल-पक्षांतील चंद्राप्रमाणें धर्मध्वज हलके हलके वृद्धिंगत झाला. महिना, दोन महिने, चार महिने, सहा महिने, एक वर्ष, दोन वर्षे असें होतां होतां तो दिव्य पुत्र सहा वर्षांचा झाला. इंदुमतीसारखी पवित्र माता व वसुप्रसादा-सारखा सात्विक पिता यांच्या सहवासांत असल्यामुळें त्या बालकानें बाल-क्रीडा करीत असतां भावी मोठेपणाचीं अनेक लक्षणें दाखविलीं. तो जे जे खेळ खेळे त्यांत तो कांहीं तरी सद्गुणाचें बीज दाखवी. तो आपल्या बोबड्या बोलांनीं जे लाडके शब्द काढी त्यांमध्यें एक प्रकारचा भारदस्त-पणा असे. दमनपुरोहित त्याला आपल्याजवळ घेऊन तशा बाल्यावस्थेंतच पढवीत असत. तो तशा बालपणांतही पुरोहितांनीं सांगितलेल्या सुकथा व सात्विकगुणवर्णन यांचें आकलन करी. तो वसुप्रसादाबरोबर घोड्यावर बसून फिरावयासही जाई. अरण्यांत हिंडत असतां किंवा उपवनांत फिरतांना नानाप्रकारचे पशु, पक्षी, झाडें, वेली, पुष्पें यांच्याविषयीं राजाला चौकस प्रश्न करी. त्याच्या ठिकाणीं कोणत्याही कृत्याची अनुकरण इच्छा विशेष प्रकारें दिसून येई. तो आपल्या बरोबरीच्या खेळगड्यांना आपलें

सरदार करी; कोणास मंत्री, प्रधान, पुरोहित करी; व आपण राजा होई. त्यांतच कोणाला तरी शत्रू लेखून तो त्याच्यावर तुटून पडे. त्यांतल्यात्यांतच तो कोणाला दीन दुबळे बनवी; कोणाला दुष्टांचें सोंग आणण्यास सांगे. त्या दुष्टाकडून दीनावर जुलूम होत आहे असें कल्पून तो त्या दुष्टाला भूमीवर लोळवून दीनाला मुक्त करी. शिकार खेळण्याचें निमित्त करून तो कोणाला वाघ, सिंह, हरण, डुक्कर बनवी आणि त्यांना ठार मारण्यासाठीं त्यांच्यावर बाणाचा नेम धरी; किंवा तरवार फिरवून दाखवी. या प्रकारच्या बाल-लीलांनीं सर्व सुहृद आप्तइष्टांना कौतुक वाटे. राजाराणींना तर आनंदाचें भरतें येई. अशा रीतीनें राजपुत्र धर्मध्वजाचें सहावें वर्ष पुरें झालें. त्याला सातवें वर्ष लागून थोडे दिवस जातात तोंच विजयादशमीचा सण प्राप्त झाला. त्या दिवशीं राजवाड्यांत मोठा दरबार भरत असे. मार्तंडाचार्य व नागशास्त्री यांच्या तोंडचें उत्तरही त्या दरबारच्या प्रसंगींच ऐकावें असें राजा व पुरोहित यांचें संगनमत जमलें. पुरोहितांनीं त्या दोघा ब्राह्मणांना तसें दर्शवितांच त्यांनीं सांगितलें, " उत्तर तयार आहे. आह्मी आपली प्रतिज्ञा विसरलों नाहीं; आणि आमचें उत्तर राजाला व आपणाला पटून आह्मी यशसंपादन करूं असा भरंवसा धरण्यासही आह्माला पुष्कळ जागा आहे. या कामीं आतां आमची इतकीच नम्र विनंति आहे कीं, सालाबादचा दसऱ्याचा दरबार यंदा मोठ्या प्रमाणावर भरवावा. त्याला जास्त मंडळी जमतील अशी तजवीज मुद्दाम करवावी. बहुतेक जनांना आपापलीं चार, पांच, सहा, सात, आठ वर्षांचीं मुलें बरोबर घेऊन दरबारास हजर राहण्याची ताकीद द्यावी. राज्याच्या सर्व भागांतील सभ्य लोक या दरबाराला जमतात त्यांनाही आपापले मुलगे बरोबर घेऊन येण्याची आगाऊ अनुज्ञा असावी. ही विनंति मान्य झालीच पाहिजे. ही आमची सूचना किरकोळ समजून तिची हयगय होणार नाहीं अशी तजवीज अवश्य व्हावयास हवी. कारण या गोष्टीचा व आमच्या उत्तराचा फार निकट संबंध आहे. "

शास्त्रिद्वयाचें ह्मणणें पुरोहितानें मान्य केलें व राजाचीही मान्यता मिळवून तशी तजवीज करण्याचें त्यानें त्यांस वचन दिलें.

दमनपुरोहितानें राजाला तो सर्व वृत्तांत कळविला. राजानें त्याचें म्हणणें मान्य करून आपल्या आश्रित, सरदार, मानकरी वगैरे मंडळीस पत्रें रवाना

केली. दमनपुरोहित व सुमंताकरवीं ठिकठिकाणच्या विद्वान ब्राह्मणांची व इनामदार, उत्पन्नदार, शेटसावकार यांची निवड करून त्यांनाहि दरबारास पाचारण करण्यांत आलें.

दरबाराकरतां त्यावर्षी एक निराळाच भव्य मंडप उभारला होता. पडदे, छतें, हंड्या, झुंबरें, झालरी यांनीं तो सुशोभित करण्यांत आला होता. त्याला एकंदर आठ दरवाजे ठेवण्यांत आले होते. प्रत्येक दरवाजाला केळी लावून त्यांच्यावर आंब्याच्या डहाळ्या लटकावलेल्या होत्या. राजाकरितां तेथें एका उभारलेल्या चतुष्कोण जागेवर सिंहासन सजविलें होतें. त्याच्या दोन्ही बाजूंस थोर लोकांना बसण्यासाठीं उत्तम प्रकारची जागा तयार केली होती. सर्व मंडपभर सतरंजा, चादरी पसरून वर गालिचे घातले होते.

अशा त्या श्रृंगारलेल्या दरबारमंडपांत दसऱ्याच्या दिवशीं संध्याकाळीं सात वाजण्याच्या सुमारास गर्दी उसळून राहिली. पाहुणे मंडळी व राजधानींतील पौरजनांची एकच दाटी उडाली. भालदार, चोपदारांच्या ललकाऱ्या ऐकूं येऊं लागल्या. मंगलकारक वाद्यांच्या ध्वनीनें आकाश दुमदुमून गेलें. सर्व मंडपांत दिव्यांचा चकचकाट उडाला होता. सौगंधिक द्रव्यांच्या परिमळानें तें स्थान दरवळत होतें.

सर्वजण आपापल्या जागीं स्थिर झाल्यावर अर्धघटकेनें राजा वसुप्रसाद प्रधान, मंत्री, सुमंत, सेनापति यांसहवर्तमान मंडपामध्यें प्राप्त झाला. राजाची स्वारी येतांच तुताऱ्या, शिंगें वाजूं लागलीं. सर्व लोक उठून उभे राहिले. त्यांना खालीं बसण्याची नम्रपणें सूचना करून राजा आपल्या राजासनावर आरूढ झाला. नंतर कांहीं मानकरी खालीं बसले व कांहीं तसेच उभे राहिले. दमनपुरोहित राजाच्या उजवे हातास उभे राहिले. सालाबादप्रमाणें राजा, प्रधान, मंत्री, फडणीस, सुरनीस, डबीर, कुलगुरू यांचीं भाषणें झालीं. नंतर दमनपुरोहित राजाज्ञेवरून पुढें झाले. त्यांनीं सहा वर्षां पूर्वीच्या आचार्य व शास्त्री यांच्या हकीकतीचा उल्लेख केला आणि त्या शास्त्रीद्वयास उत्तरार्थ भाषण करण्याची सूचना दिली.

पुरोहितांकडून आज्ञा होतांच आचार्य उठून उभे राहिले आणि हात जोडून नम्रपूर्वक भारदस्तपणानें बोलले, "आमची प्रतिज्ञा काय आहे ती सर्वश्रुतच आहे. आमचीं उत्तरें चोख तयार आहेत. पण हा एवढा दरबार भरला आहे, याठिकाणीं अपूर्व थाट केला आहे, सर्वत्र मोठी शोभा दिसत आहे,

पण एका उणीवीमुळें आम्हांस हा दरबार फिका दिसत आहे. परमेश्वराच्या महत्कृपेनें सरकारांना जो दिव्य पुत्र प्राप्त झाला आहे त्या राजपुत्र धर्मध्वजाला या दरबारांत आणवण्याची कृपा व्हावी. हा दरबार जसा थोर मंडळींनीं भरून गेला आहे त्याचप्रमाणें जवळजवळ राजपुत्राच्या वयाचींही अनेक बालकें या ठिकाणीं राजाज्ञेनें प्राप्त झालीं आहेत. त्यांनाही आपले भावी प्रभु पाहून आनंद वाटेल. ”

मार्तंडाचार्यांची ही सूचना सर्वांनाच मान्य झाली. लागलींच सुमंत कांहीं सेवकांसह राजवाडयांत गेले. सभासदांची प्रेमळ इच्छा समजतांच इंदुमतीला बहुत हर्ष झाला. तिनें धर्मध्वजाला योग्य तऱ्हेनें सजविलें आणि ईश्वराचें स्मरण करून त्याला सुमंतांच्या हवालीं केलें.

राजपुत्र धर्मध्वज मोठ्या ऐटीनें सभेच्या मुख्य द्वाराशीं येतांच बाळयुवराजाच्या आगमनाप्रीत्यर्थ पुन्हां एकदां वाद्यनादांचा ध्वनी उसळला. वेत्रपाण्यांच्या ललकाऱ्या ऐकूं येऊं लागल्या. सर्व सभा पुन्हां एकदां उभी राहिली. राजपुत्र आपल्या सोबतच्या मंडळीसह सभेमधून मोठ्या अदबीनें चालत जाऊन योजलेल्या स्थळीं उभा राहिला. एखादा साधा, मेषपात्र मुलगा असता तर तो त्या भव्य समाजास पाहून घाबरला असता. ज्या ठिकाणीं थोर थोर, ज्ञानसंपन्न, विद्वान, पराक्रमी, शूर मंडळी असंख्य जमली आहेत, राजेरजवाडे थाटानें उभे आहेत. अशा सभारंगांत निर्भयपणानें भाषण करण्याची मोठमोठ्याना पंचाइत पडते; पण धर्मध्वजाची गोष्ट तशी नव्हती. तो सामान्य मुलगा नव्हता. तो वरदीपुत्र होता. तें शुद्ध बीजाचें रसाळ व गोमटें फळ होतें. वसुप्रसाद व इंदुमती या धर्मतत्पर जोडप्याच्या उदरीं त्याचा जन्म झाला होता. श्रीभारतींचा कृपारवीच त्याच्या रूपानें उदय पावला होता. तें अस्सल क्षात्रतेज होतें. खऱ्या क्षत्रियाचें शुद्ध रक्त त्याच्या अंगांत खेळत होतें. दमनपुरोहिताच्या पवित्र वाणींतून निघालेल्या ज्ञानधर्म-मय वाक्यामृतानें तें स्नात झालेलें मूल होतें. गंभीरपणानें सभावृंद अवलोकन करून तो धर्मध्वज धैर्यानें बोलला, “ या ठिकाणीं जमलेल्या माझ्या बाबांच्या प्रजाजनांत जे कोणी पवित्र व धर्मसंरक्षक ब्राह्मण असतील त्या सर्वांना या बालकाचा साष्टांग प्रणिपात असो. त्यांच्या सेवेला हा देह मीं अर्पण केला आहे. त्यांच्या शुभप्रद आशिर्वादानें माझें कल्याणच होईल. असा मला भरंवसा आहे. या सभाजनांत जर कोणी वयोवृद्ध गृहस्थ असतील

तर ते सर्व माझे मातापिता होत. त्यांनीं मजवर मी त्यांचा पुत्र या नात्यानें कृपादृष्टि ठेवावी. "

असें बोलून तो राजकीय समाजाकडे वळला. राजाला नमस्कार करून तो ह्मणाला, " राजे वसुप्रसाद यांनीं मला अशा वेळीं काय कारणासाठीं पाचारण केलें तें समजावें. बाबांच्या प्रजाजनांमध्यें जर कोणी दुष्ट मनुष्य आपल्या गर्वमदाच्या जोरावर दीनाला पीडा करीत असेल तर त्याला शासन करण्यासाठीं या बालकाचा देह खर्चीं पडला तरी बेहत्तर आहे. अनाथाचें संरक्षण करण्यास या बालकाची ही समशेर सदैव सज्ज होऊन राहिलेली आहे. प्रजाजनांना सुख होण्यासाठीं जें काय कार्य उत्पन्न झालें असेल तें बजावण्याची मला तात्काल आज्ञा व्हावी. शुद्ध ब्राम्हण, सात्विकी प्रजाजन, परमेशस्वरूप मातापिता, गुरुसमान पवित्र दमनपुरोहित यांच्या आशिर्वादानें व बाबांच्या शूर व राजनिष्ट सरदारांच्या साहाय्यानें मी सर्वत्र जयशालीच होईन यांत संशय नाहीं. सरकारांनीं काय तो हुकूम करावा. "

याप्रमाणें बाणेदार व प्रेमोत्पादक भाषण करून तो राजापुढें हात जोडून उभा राहिला. हें भाषण ऐकून कोणाचें मन गहिंवरणार नाहीं ! सातव्या वर्षाच्या वयांत अशीं थोर व पवित्र वाक्यें उच्चारणाऱ्या बालकाबद्दल कोणाचें अंतःकरण प्रेमानें व्यापून जाणार नाहीं. अशा शुभलक्षणसंपन्न अर्भकाला पाहून कोणाचें चित्त प्रसन्न होणार नाहीं ! त्या बत्तीस लक्षणी राजपुत्राकडे सर्वांचीं मनें वेधलीं. सर्वजण त्याच्याकडे धादपलेल्या प्रेमी नजरेनें पाहत राहिले. दमनपुरोहितांना तर आपल्या छात्राच्या सुज्ञपणाबद्दल अत्यंत चोज वाटून अभिमान उत्पन्न झाला. राजाची अवस्था तर विचारावयासच नको. त्याला आपला जन्म धन्य वाटूं लागला. प्रेमाच्या भरांत येऊन तो सिंहासनाचा त्याग करून खालीं उतरला आणि पुत्राला घट्ट मिठी मारण्यासाठीं त्यानें त्याला उचलून घेतलें.

पितापुत्रांचा हा प्रेमालिंगनविधि होत आहे तोंच नागशास्त्री व मार्तंडाचार्य हात उभारून मोकळ्या स्वरानें ह्मणाले, " राजा, तुझा आमच्यावर कोप झाला होता. तुला आमच्याकडून जबाब पाहिजे होता. तुझ्या प्रश्नाचें उत्तर तुला पटलें काय ? या उत्तरानें तुझ्या मनाचें समाधान होत नाहीं काय ? दमनपुरोहितांना हें उत्तर योग्य व पुरेसें वाटत असेल,

यांत संशयच नाहीं. या ठिकाणीं जमलेल्या गृहस्थांचीही मुलें येथें आलेलीं आहेत. त्यांनीं या सभेंत काय लीला चालविल्या आहेत त्या समक्ष निरीक्षण कराव्या. कोणी कोणी येथून चलण्यासाठीं बापाला चिमटे घेत आहेत. कोणी कान ओढीत आहेत. कोणी तोंडावर चपराका मारीत आहेत. कोणी मिशा ओढीत आहेत. कोणी आ पसरलेले आहेत. शास्त्रीबुवांचा मुलगा व त्याचप्रमाणें माझा स्वतःचाही मुलगा येथें आलेला आहे. त्या दोघांनीं आम्हांला मघांपासून भंडावून सोडलें आहे. माझा मुलगा या झुंबरांचीं भिंगें मजजवळ मागत आहे. शास्त्रीबोवांच्या मुलानें तर शास्त्रीबोवांनीं लवकर परत घरीं चालण्याबद्दल सारखा धोसरा धरला आहे! कोणा कोणाला तर या ठिकाणीं मुलांच्या खरजा, आगपेटीच खाजवीत बसावें लागत आहे. ही स्थिति व राजपुत्राची स्थिति ध्यानांत आणली असतां आमचें उत्तर व्यवस्थितपणें सरकारच्या व पुरोहितांच्या मनांत उतरेल असा आमचा भरंवसा आहे. आमच्या दुर्दैवानें तसें न होईल तर प्रतिज्ञेप्रमाणें जीवघात करण्यासाठीं हें विष आम्हीं बरोबर आणलेंच आहे!"

असें बोलून त्यांनीं विषांनीं भरलेलीं भांडीं हातांत उचलून धरलीं. तो प्रकार पाहतांच राजा वसुप्रसाद स्वतःच त्यांच्याकडे धावत जाण्याचा यत्न करूं लागला. तेव्हां त्यास तसदी न देतां दुसऱ्याच लोकांनीं त्या शास्त्री-आचार्यांस राजाकडे नेलें. राजानें त्यांच्या हातांतील भांडीं फेकून देऊन त्यांच्या पायांवर धर्मध्वजास घातलें व आपण स्वतःही त्यांच्यापुढें लोटांगण घातलें.

राजाचा तो भाव पाहून त्या दोघा ब्राह्मणांनीं राजास व राजपुत्राला आपल्या हातांनीं उठविलें आणि शुभदायक आशिर्वचन दिलें. त्यांनीं राजपुत्राच्या मुखावरून हात फिरविला आणि त्यांनीं राजास राजपुत्राला मांडीवर घेऊन सिंहासनस्थ होण्यास सांगितलें. नंतर दमनपुरोहितांनीं राजा व सर्व सभासद यांना उद्देशून भाषण केलें, "आचार्य व शास्त्री यांच्या उत्तराचें धोरण काय असावें हें त्यावेळीं माझ्याही ध्यानांत आलें नाहीं. त्या दोघांचें उत्तरांतील मर्म सर्वत्रांनीं विचार करण्यासारखें आहे. धर्म ही गोष्ट ज्यानें त्यानें आपल्यापुरती पहावयाची आहे. धर्म हा सकल कल्याणकर्ता असल्यामुळें त्याचा उपदेश कोणीही कोणास करावा. अगदीं अज्ञान बालक किंवा एखादा अंत्यज यांच्या तोंडूनही सद्धर्माचा बोध निघेल तर तो स्वीकारणीयच होय. आतां उपदेशकांच्या पात्रतेच्या मानावर

उपदेशाच्या परिणामाचें मान राहील हें खरें ! तरीपण ज्यानें त्यानें स्वकर्तव्यावरच नजर ठेवून वागावयाचा निश्चय कायम ठेवला म्हणजे उपदेशकाच्या पात्रतेचा मोठासा विचार करावयाचें कारण नाहीं."

पुरोहिताचें हें भाषण ऐकून सरदार मंडळींतून एकजण पुढें झाला. तो मनुष्य कांहीं वेगळ्या विचारांचा होता. तो महापराक्रमी असल्याकारणानें त्याचें राजाजवळ चांगलें वजन होतें. त्याला पुरोहिताचें भाषण मोठेंसें पसंत पडलें नाहीं. त्याचें नांव जयसेन असें होतें. तो जसा सरदारी बाण्याचा व वीर्यशाली होता तसा तो विद्याव्यासंगीही होता. त्यानें अनेक शास्त्री, भटजी, पंडीत यांच्याकडून धर्मग्रंथ समजावून घेतले होते. तो बुद्धिमान्, चतुर, धोरणी, कल्पक असून कोणत्याही कामांत त्याची बुद्धि चांगली चालत असे. विद्याव्यासंग, शास्त्राभ्यास यांच्या योगानें त्याच्या मनाला सुसंस्कृतपणा येण्याच्या ऐवजीं त्याचें मन विकल्प आणि कुकल्पना यांनीं भरलें होतें. तो मोठा महत्वाकांक्षी असे. आपली महत्वाकांक्षा तृप्त करण्यासाठीं तो वाटेल तें धाडसाचें; अयोग्य, अवघड कृत्य करण्यास सरसावत असे. या दुर्गुणानें त्याचें डोकें, त्याच्या मतानें उच्च पण वस्तुतः वेडगळ कल्पनांनीं भरून गेलें होतें. तो मोठा दुराग्रही व हेकड बनला होता. त्याला धर्मतत्वांचें खरें महत्व समजत नव्हतें. त्याच्या अंगीं महत्वाकांक्षेचा दुर्गुण खिळून राहिला असल्याकारणानें त्याला दुसऱ्याचा उत्कर्ष सहन होत नसे. आपला हा परहित असहिष्णुतेचा दुर्गुण दुसऱ्यांच्या ध्यानांत येऊं न देण्याबद्दल तो फार सावध असे. तो जीं जीं थोर व उदारपणाचीं कृत्यें करी, सौजन्य व दयायुक्त भाषा वापरी व लोकांकरतां शरीर झिजविण्याची तत्परता दाखवी त्या सर्वांच्या मुळाशीं कीर्ति, धन, मान, थोरवी, श्रेष्ठता यांची जबरदस्त हाव वास्तव्य करीत होती. अशा मनुष्याची मत्सराशीं पूर्ण मैत्री असावयाचीच. जयसेनाचेंही अंतःकरण मत्सराच्या जालीम विषानें माखलेलें होतें. चातुर्य, दूरदर्शीपणा, निरीक्षण व विचार यांचें त्याच्या दुर्गुणास सहाय्य असल्यामुळें तो कोणतीही गोष्ट अविचारानें करीत नसे; आणि तेणेंकरून त्याच्या कृत्यांचा गुप्त मुळवा काय असावा किंवा कोणत्याही हालचालींतील त्याचें खरें ध्येय कोणतें असावें हें जगाला पुरतेपणीं लवकर समजून येण्याची मोठी मारामार पडे.

अशा प्रकारचा तो जयसेन सरदार पुढें झाला आणि पुरोहित व आचार्य, शास्त्री यांच्या भाषणाविरुद्ध कांहीं पांडित्य करण्यास राजाची परवानगी मागूं लागला. राजा त्याला काय उत्तर करावें या विचारांत घोटाळला आहे असें पाहतांच दमनपुरोहित बोलले, " या ठिकाणीं वाद करण्याचें कांहींच कारण नाहीं. माझें भाषण कोणाला नापसंत वाटत असेल तर तो त्याचा असमंजसपणा होय ! आजचा हा आनंदाचा दिवस आहे. राजपुत्र धर्मध्वजाविषयींच्या प्रेमरसानें या बहुतेक सर्व सभासदांचें मन आर्द्र झालें आहे. अशा वेळीं भलतेंच पांडित्य करून अस्वस्थता उत्पन्न करण्याचें कारण नाहीं. आणि तसें करण्यास सरकारचीही परवानगी मिळणार नाहीं, अशी सर्व सभासदांच्या तर्फे मी आशा प्रदर्शित करतों.

इतर सरदार, शास्त्री, विद्वान व सभ्य यांनींही पुरोहिताच्या भाषणासच पुष्टी दिली. हा प्रकार पाहतांच राजाच्या तोंडून काय भाषण निघतें त्याची वाट न बघतां सरदार जयसेन सभारंगाचा त्याग करून तोऱ्यानें निघून गेला. त्याच्याबरोबर त्याच्या अधीन असलेले लहान मोठे लोकही चालते झाले. या प्रकारांतील अर्थ काय तो बहुतेकांच्या लक्षांत आला. राजा, प्रधान, मंत्री, सुमंत वगैरेंना याबद्दल थोडेसें वाईट वाटलें पण त्यांनीं त्यावेळीं त्याचा फारसा विचार केला नाहीं. नेहमींच्या रिवाजास अनुसरून लोकांना देणग्या वाटण्यांत आल्या. राजानें शेवटीं प्रजावात्सल्यपूर्ण असें भाषण केलें आणि सर्वत्रांची योग्य बोळवण करण्याचा प्रधानास हुकूम देऊन राजा आपल्या राजपरिवारासह राजवाड्याकडे निघून गेला.

---

# प्रकरण ९ वें.



## छद्मी शांभवी.




वळ्या गवताच्या योगानें हरिणाची तृप्ति होते. आपल्या क्षुधानिवारणार्थ तें कोणालाही उपाधी देत नाहीं. ईश्वरनिर्मित जलसंचयामध्यें राहून आपलें आयुष्य कंठणारे मासे कोणालाही उपाधि लावीत नाहींत. उलट पाण्यांतील मल भक्षण करून ते पाणी स्वच्छ राखण्याचेंच लोकोपयोगी कार्य करितात. साधुजन किंवा सदाचारी मनुष्यें प्रारब्धगतीनें किंवा शुद्ध प्रयत्नानें प्राप्त होणाऱ्या उपभोग्य पदार्थावर संतोष मानून आनंदानें निरुपद्रवी राहून आपल्या आयुष्याचा सद्व्यय करीत असतात. यांतून कोणाशींही वैर करण्याचें कारण नाहीं. तरीपण पारधी हरणें मारतात, कोळी लोक मासे पकडतात आणि दुर्जन सज्जनांना संकटांत लोटण्याकरतां हर प्रयत्न करतात ही केवढी दुर्दैवाची गोष्ट बरें !

सूर्याच्या लखलखीत प्रकाशामुळें लोकांचे व्यवहार चालतात, अंधकार नाहींसा होतो, सृष्टिसौंदर्य दृग्गोचर होतें; लोकांच्या दृष्टीचें सार्थक होतें ! मनुष्य, उद्भिज जीव यांचें आरोग्य-पोषण होतें; त्याच्या किरणांतील तप्ततेनें शीतनिवारण होतें; पाण्याची वाफ बनून ती मेघोदकाला कारणीभूत होते ! एकंदरींत सूर्यप्रकाशाचें असंख्य फायदे लक्षांत घेतां कोणासही तो आदरणीय वाटणें साहजिक आहे. पण बिचाऱ्या उलुकास त्याचें काय चीज ! सूर्यप्रकाश पाहतांच त्याचें पित्त खवळतें ! व्याघ्र, सिंह यांसारख्या क्रूर व घातकी पशूंचें डोकें उठतें. शुक्लपक्षांत ज्याच्या शुभ्रकांतियुक्त किरण-प्रकाशानें असंख्य जनांचीं मनें प्रसन्न होतात, ज्याच्या अमृतमय रुपेरी ज्योत्स्नेमुळें ओषधींचें पोषण होतें; ज्याच्या शांत, मृदु, शीतल गुणांनीं युक्त अशा प्रकाशमान कलांनीं पृथ्वीदेवीला पयस्नानच मिळत आहे असा भास होतो, सर्वत्रांना जो केवळ अत्यंत आल्हादकारक असा आकाशदीपच भासतो त्या शीतभानूचा चौर्यकर्मलोलुप नीच माणसांना द्वेष वाटतो. याचप्रमाणें दुर्जनांची स्थिति असते. त्यांना सज्जनांचें नांवही खपत

नाहीं; मग सज्जनांचा उत्कर्ष, लौकिक, कीर्ति, संपत्ती, आरोग्य, आदर या गोष्टींचा तर विचारच करावयास नको. आपल्या फायद्यासाठीं, निदान लोकांच्या तोटयासाठीं रात्रंदिवस खटपट करणारे दुर्जन दुसऱ्याच्या घातांत आपलें सुख आहे असें मानून राहण्यासही कबूल असतात. मग तशांत जर स्वार्थ साधत असला किंवा कांहीं हित होण्याचा संभव दिसला तर मग कांहीं सांगावयासच नको. आधींच उल्हास त्यांत फाल्गुन मास ! असाच कांहीं प्रकार वसुप्रसादाच्या घराण्यांत घडला होता.

वसुप्रसादाचे दोन्ही पुतणे भोगपाल आणि मोहसंघ हे आपल्या चुलत्याच्या आज्ञेंत होते. पितृव्याविषयीं त्यांच्या मनांत प्रेम होतें. इंदुमतीला ते आपल्या मातेच्या ठिकाणींच मानीत. तीही त्यांच्यावर पुत्राप्रमाणें प्रेम करी. माधवी व शांभवी या दोन्ही सुनाही कांहीं दिवस इंदुमतीला सासू समजून वचकत. पण हा सर्व प्रकार पालटून गेला. त्या दोघी सुनांना इंदुमतीचा वरचढपणा सहन होईनासा झाला. माधवी ही केवळ सुखलोलुप असल्यामुळें तिला कांहीं उपभोग्य पदार्थांची वाण पडली कीं खपत नसे. तिच्या तैनातींत कमी झालें कीं, तिच्या मनांत इंदुमतीबद्दल भलता भाव उत्पन्न होई. तिचा पती भोगपालही चैनी गडी होता. आपल्या मनाप्रमाणें आपली चैन चालली ह्मणजे मग त्याला कोणत्याही गोष्टीची फिकीर वाटत नसे.

पण दुसरें जोडपें जें मोहसंघ आणि शांभवी हें मात्र फार निराळें होतें. मोहसंघाला महत्वाकांक्षा होती. खाणेंपिणें, वस्त्रपात्र, दागदागिना, गाडीघोडे, पैसाअडका या विलासाच्या वस्तूंपेक्षां त्याच्या मनाला अधिकाराची जास्त आवड होती. शांभवी ही देखील तशाच भावनेची स्त्री होती. किंबहुना त्याबद्दल ती नवऱ्याच्या वर ताण करणारी होती. तिला इंदुमतीचा शिरजोरपणा मुळींच सहन होईनासा झाला. तिला सर्व गोष्टींत मुखत्यारी असावी अशी दृढ भावना झाली.

कसेंही असलें तरी शांभवी स्त्री पडली. करंगळी सुजली तरी किती फुगणार ! ती कांहीं डोंगराएवढी होत नाहीं. त्याचप्रमाणें स्त्रीजात शहाणी असली, ज्ञानसंपन्न बनली, कलाकौशल्य पारंगत झाली, स्वतःचें हिताहित समजण्यास योग्य झाली, उद्योगशील बनून प्रपंचाचा गाडा चालविण्यास द्रव्यार्जनाच्या दृष्टीनेंही समर्थ बनली तरी पत्नी या नात्यानें तिला पतीच्या अधीन राहणें भाग आहे याच नियमास अनुसरून

शांभवी आपल्या पतीच्या मनाच्या धोरणानुसार आपले दुष्ट विचार मनो-मनांत दाबून ठेवून होती. आपल्या अंत:करणांतील विष पतीच्या कर्णद्वारें त्याच्या हृदयांत ओतण्यासाठीं ती फक्त परिस्थितीची वाट पाहत होती. आतां तिच्या सुदैवानें किंवा इंदुमतीच्या दुर्दैवानें शांभवीला पाहिजे तशी संधी प्राप्त झाली.

वसुप्रसादास पुत्रप्राप्ती नव्हती तोंपावेतों दोन्ही पुतणे आज्ञाधारक होते. चुलत्याशीं त्यांचें जें वर्तन घडे त्यावरून ते मोठे विनयी, नम्र व शांतता-प्रिय, ऐकणारे भोळे, समंजस व प्रेमभावसंपन्न असें वाटत. चुलत्याच्या पश्चात् भोगपालास राज्याधिकार प्राप्त होणार असल्यामुळें तो आपल्या भावी चैनीच्या मनोराज्यांत दंग होता. मोहसंग हा कनिष्ठ पुतण्या असल्यामुळें त्याला सुधेपणानें गादीची प्राप्ती होणारी नव्हती हें तो जाणून होता. तरीपण भोगपालाला फसवून आपण सिंहासन पटकावूं किंवा तसें नच झालें तरी चैनी भोगपालाला चैन व विलास यांतच गढवून टाकून आपण अभिषिक्त राजे नसलों तरी खरी राजसत्ता आपल्या मुठींत आणूं शकूं अशा कल्पनेनें तोही स्वस्थच होता.

चकाकतें तेवढें सोनें असतेंच असें नाहीं. त्याचप्रमाणें मनुष्य दिसतो तसा असतोच असें नाहीं व तो असतो तसा तो दिसतो असेंही नाहीं. कुत्रा, मांजर, वाघ, सिंह यांसारखे दुष्ट प्राणी माणसाळले म्हणजे त्यांचीं नखें पंजामध्यें दडलेलीं असतात. तरी पण तेवढयावरून जर कोणी त्यांच्या-वर शुद्ध भरंवसा टाकील तर त्याची प्रसंगीं फसगतच होईल. वाघाचीं पिलें आपल्या स्वभावानुसार नखें बाहेर काढणारच. प्रसंग नाहीं तोंपर्यंत सर्वच स्नेही उदार, सात्विक व कनवाळू असतात ! पण प्रसंग उत्पन्न होऊन अनुभवाची वेळ आली म्हणजेच कोणत्याही गुणाची कसोटी लागते.

राजा वसुप्रसादास पुत्रप्राप्ती होतांच दोन्ही पुतण्यांचें मन अस्वस्थ झालें. मुलाची शैशवावस्था निघून जाईपर्यंत ते दोघे त्या मुलाच्या गंडांतरावर, रोगराई, अपघात, अपमृत्यु यांवर भिस्त देऊन कसेतरी शांत होते. धर्मध्वजास सातवें वर्ष लागलें तेव्हां त्याचें आरोग्य, सदृढपणा, कांति पाहून त्यांच्या मनाची एक चतुर्थांश स्वस्थता भंग पावली. दसऱ्याचा दरबार भरून त्यामध्यें धर्मध्वजाच्या सद्गुणांची वाहवा झाली आणि तो भाग्यवान राजपुत्र बहुलोकांचा प्रियजन बनला तेव्हां त्यांच्या स्वास्थ्याचा नायनाट झाला.

त्यांच्या अंतःकरणांत धांदल उडून त्यांच्या मानसिक कल्पना हव्यातशा भडकूं लागल्या आणि ते आपापल्या मनांतील प्रेरणेनुसार दुष्ट विचारांचे दास बनले.

भोगपाल आणि माधवी यांचा एकांत विचार होऊन त्यांनीं असें ठरविलें कीं, वसुप्रसादाजवळ वाटणीची गोष्ट काढून राज्याचा तिसरा हिस्सा स्वतंत्र मागून घ्यावा. वारशी हक्कासंबंधानें विचार करतां राज्याचा असा वाटा करतां येण्यासारखा नसला तरी वसुप्रसादाच्या सत्ववृत्तीमुळें तो आपली तशी कांहीं तजवीज करील असा त्यांना भरंसा होता. या आपल्या बेताचा आपणच प्रथमतः स्पष्टोच्चार करणें बरें नव्हे असें वाटून भोगपालानें माधवी-करवीं तो हेतु सहजासहजी प्रथमतः शांभवीच्या कानावर घालवावा असें ठरविलें; आणि त्यानें आपल्या पत्नीला तशी सूचना दिली. शांभवीला ती गोष्ट विदित झाली ह्मणजे हलकेंहलकें त्या गोष्टीचा बायकांतून स्फोट होऊन वसुप्रसादाच्या कानांपर्यंत आयतीच ती बातमी पोहोंचेल आणि राज्यविभागासंबंधानें मोहसंघाचाही मतलब आपणास कळेल असा त्यांत भोगपालाचा कावा होता.

पतीच्या सूचनेप्रमाणें माधवीनें आपल्या जावेशीं एकांत केला. ती ह्मणाली, " कां आतांशा घरांत काय काय चाललें आहे तें तुह्माला खपतें ना ? अशा या अंकित स्थितींत रहावयाचें तरी किती दिवस ! "

माधवीच्या बोलण्यावरून तिच्या विचारांची दिशा सहजच स्पष्ट होणारी होती. तिचे विचार आपल्या विचाराशीं जमणारे आहेत असें वाटून शांभवी ह्मणाली, " किती दिवस ? दिवस किती ते आतां तुह्मीच पहा ! आजपर्यंत कांहीं आशा तरी होती. आह्माला वाटलें होतें कीं, आमच्या डोक्यावर दोन दडपणें आहेत त्यांतलें एक तरी निदान कमी होईल. आह्मी मनांत मांडे खात होतों कीं, तुम्हाला राणीपण येऊन आमचें ओझें हलकें होईल. पण आतां तें विसरा ! सासुबाईंना पुत्र झाला तेव्हांच मीं खूणगाठ बांधून टाकली. आतां तुमच्या काय आणि आमच्या काय कोणाच्याच जिवावरची ही पराधीनतेची धोंड कांहीं दूर होत नाहीं. आतां काडीइतकी देखील आशा उरली नाहीं बरें ! "

शांभवीच्याही मनांत तेच विचार खेळत आहेत असें जाणून माधवीनें विचारलें, " कां बरें ? बाई, ! असें कां ह्मणता ! याला कांहींच कां तोड निघायची नाहीं ? मी ह्मणतें ! जळलं राज्य नाहीं तर नाहीं ! तें

राणीपण राहिलं ! पण मेलं मोकळेपण न मिळायला काय झालें ? गाडी कांहीं कोणाची एकट्याची नाहीं. चाललें होतें तोंवर एकत्र चाललेंच होतें. आतां दिवसंदिवस तसं कांहीं जमायचं नाहीं हें मामंजींना कांहीं समजायचं का नाहीं ? प्रत्येक कामांत आपलं लोकांच्या तोंडाकडे पहायचं हें बाई नाहीं निभायचं. ह्मणून मी ह्मणतें कीं, आपलं बोलणं काढून आपला हिस्सा निराळा करून घ्यावा. आन् तसं न व्हायला काय झालं ? "

माधवीच्या या विचाराला तिच्या नवऱ्याची मान्यता कितपत आहे हें समजून घेण्याच्या मतलबानें शांभवीनें तिला परत प्रश्न केला, " मामंजींना हें कितपत रुचेल आणि ते काय करतील तें पुढेंच आहे ह्मणा ! पण भोगपाल भावजींना हा तुमचा विचार मुळींच पसंत पडायचा नाहीं. त्यांना एवढी जबाबदारी घ्यायचं आवडायचंही नाहीं आणि तें होऊन मामंजी-जवळ उघड कांहीं बोलायचेही पण नाहींत ! त्यांचा स्वभाव तुह्माला कांहीं सांगायला का हवा ? त्यांच्या चैनींत कांहीं कमी पडलं नाहीं ह्मणजे ते राजेच आहेत. खरं ना पण असं ? "

आपण जे विचार प्रगट केले ते केवळ आपलेच मनचे आहेत अशी शांभवीची कल्पना झाली असावी असें वाटून आणि तिच्या बोलण्यांतील मुद्दाम योजलेला लाघवीपणा ध्यानांत न येऊन माधवीनें उत्तर केलें, " तसं खरं ! पण मला तरी जास्त काय पाहिजे आहे ? सासूबाईप्रमाणं आप-ल्यालाही श्रेष्ठपणा मिळावा अशी माझी देखील इच्छा नाहीं. आह्मांला आमच्या मनाप्रमाणें वागण्याला कोणाचीही आडकाठी किंवा वचक किंवा भीड नको आहे इतकंच ! आन् हें मी कांहीं उगीच मी आपल्या मनांतलं सांगतें आहे असं नाहीं. तिकडचेच विचार असे झाले आहेत. आतांशा वरचे-वर असंच बोलायचं असतं. "

माधवी आपल्या नवऱ्याचे विचार व्यक्त करीत आहे हें कळून येतांच शांभवी लागलीच आश्चर्यानें ह्मणाली, " बाई ! भावजीच कां असं हें ह्मणतात ? मोठं नवलंच आहे हो हें ! त्यांनीं तसा कांहीं आग्रह धरला तर कांहीं तरी होईल त्याची तरतूद. पण हें भावजींच्या मनांत यायला कारण काय ? "

यावर माधवी आपण लांबविण्यास कंटाळून आपल्या मुख्य मुद्यावर येण्यासाठीं चटकन् बोलली, " तें कांहीं माझ्याच तोंडून निघायला पाहिजे

असं नाहीं. मामंजींचं मन तरी अलीकडे पहिल्यासारखं कुठें राहिलं आहे ? तें असो; पण आपण काय योजलं आहेत ? आमच्या ह्मणण्याला मोहसंघ भावजींचाही पाठिंबा पाहिजे. नाहींतर आह्मी एक ह्मणावं आणि तुह्मी भलतंच ह्मणावं ! म्हणून म्हणतें, तुह्मी भावजींच्या कानावर खुबीनं व धोरणानं हा वृत्तांत घाला आणि त्यांचं मत काय आहे तें अगोदर काढून घ्या. ”

माधवीचें हें भाषण सरळ होतें. शांभवीला असें कांहीं पाहिजेच होतें. पण ती माधवीप्रमाणें अल्पसंतोषी राहणारी नव्हती. तिला तिच्या माहेरचाही थोडा जोर होता आणि ती माधवीपेक्षां जास्त निर्दय, क्रूर, आपमतलबी, मानधनलोलुप, मत्सरी, कपटी व घातकी असल्यानें तिला माधवी किंवा तिचा नवरा यांच्याप्रमाणें नुसती मिळमिळीत चैन नको होती. माधवीचें मन भलत्याच कल्पनेला बळी पाडावें आणि तिच्या करवीं भोगपालाचे विचार जास्त भ्रष्ट करावेत आणि आपल्या कार्याला मदत झाली तर पहावें असा संकल्प करून ती कौटिल्यपारंगत शांभवी जावेला ह्मणाली, “ आमच्या इकडच्या कानावर हे विचार घालायचं कारणच नाहीं. सासूबाईंना मुलगा झाल्यापासूनच त्यांचं वर्तन बदललं आहे हें ध्यानांत यायला आमच्या इकडे विलंब लागला नाहीं; पण आम्हाला तुमच्यासारखा नुसता हिस्सा नको आहे. राजपद तर आह्माला कधींच शक्य नव्हतं आणि आतां तर त्याचं नांवही काढायला नको ; पण मी म्हणतें, तुम्हांला काय किंवा आम्हाला काय प्रभुपणाची इच्छा नाहीं असं का आहे ! भावजींना एक तसं नको असेल. नको तर त्यांनीं आपण राजा होण्याकरतां कांहीं करूं नये. पण तुह्माला राणीच्या मानाला चढविण्याची खटपट करायला मागं का घ्यावं ! मी तुह्माला सांगतें, हें अशानं कांहीं निभायचं नाहीं. वस्तुतः तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणं राज्याचा हिस्सा पाडता येत नाहीं. वडील पुत्राचाच वंश गादीचा अधिकारी होय ! मामंजींनीं कदाचित् चांगुलपणानें आपल्या तोंडावर दोन तुकडे टाकले तरी ते आपल्याला पचून कोण देणार ? आतां तुह्माला त्याचं कांहीं दिसून यायचं नाहीं. पण पुढें हवें तसं कारभार होऊन आपल्याला स्वतंत्र असें कांहीं राहणार नाहीं. आपल्याला घातलेलें अन्न खाऊनच सांगितलेलें काम केलें पाहिजे. मग तशी तुमची इच्छा आहे का ? मी ह्मणतें, आपल्याला जर पट्टराणी होतां आलें तर का

होऊं नये ? मनुष्यानें आपल्या सौख्याकरतां वाटेल त्या कामास उद्युक्त झालें पाहिजे. हा धर्मध्वज आतां लहान दिसतो, पण पुढें हाच जाचक होईल ! हा झाला नसता ह्मणजे गादी तुमचीच होतीना ? "

शांभवीच्या या भाषणाचा माधवीस चटका लागला. तिच्या मनांतही राजपाटच्या ठिणगीनें पेट घेण्यास सुरुवात केली. पण त्या कामीं जरूर लागणारा शांभवीच्या विचारांतील भयंकरपणा मात्र माधवीला पसंत पडेना. तेव्हां ती स्पष्टपणें बोलली, " पण हें असं करणं बरं नव्हे; आणि हें साधेल तरी कसं ! आपल्या बोलण्यावरून भावजींचा संकल्प काय आहे याची कल्पना होते ! बाई, तसं कांहीं जमण्यासारखं असलं तर कसं तें मला सांगून ठेवा. पण आपलं कांहीं भलतंच कृत्य योजणं ठीक नव्हे. "

आपल्या भाषणाला आपल्या पतीची संमती असूनच आपण सर्व कांहीं बोलत आहों अशी माधवीची आपल्याबद्दल समजूत झाली असावी असा शांभवीनें तिच्या भाषणाच्या ओघावरून सहज तर्क केला. त्याचप्रमाणें धर्मध्वजाच्या जीवाला अपाय करण्यासंबंधानें तिचें मन कचरण्यासारखें दिसलें. तेव्हां या दोन्ही गोष्टींबद्दल तिची कांहीं तरी समजूत घालावी म्हणून ती कपटी शांभवी तिला म्हणाली, " बाई ! तुम्हाला माणसाचं बोलणं नीट कळत नाहीं. माझ्या मनांतल्या गोष्टी तिकडे पसंत पडतीलच असं नाहीं. पण बायकोनें नवऱ्याचं मन वळवलं पाहिजे. त्याला प्रत्येक कामांत सल्लामसलत दिली पाहिजे. नुसती मसलतच कसली ! त्याची चूक त्याच्या नजरेस आणून देऊन त्याला वाटेल त्या कामास प्रवृत्त केलें पाहिजे; तरच ती बायको ! पती सांगेल तेंच खरं आणि तो बोलेल तीच आज्ञा असं मानणारी ती नेभळी, मेषपात्री सामर्थ्यहीन अबला होय ! बायकोनें पतीला दाबांतच राखला पाहिजे. बायको ही पुरुषाची वेसण होय असं मी तरी म्हणतें. तुह्मी देखील भोगपालभावजींचं मन आपल्या ताब्यांत घ्या. माझ्या सल्ल्यानं चालण्याचं मला वचन द्या. ह्मणजे मी तुह्माला गादीवर बसवतें कीं नाहीं बघा. आणि तुमच्या मनांत राजपुत्राबद्दल माझ्यासंबंधानें जी कांहीं कल्पना आली आहे ती टाकून द्या. माझ्या म्हणण्याचा भावार्थ नीट ध्यानांत आणा. धर्मपाल अस्तित्वांत नव्हता तेव्हां भोगपाल व तुह्मीच राजाराणी झाला असतात. आणि तुम्हाला तशी इच्छा नाहीं; तेव्हां तुमच्या खुषीनें आम्ही त्या पदावर बसलों असतों हें

खरं ना. झालं तर मग ! धर्मपालाचं अस्तित्व नाहींसं करणं म्हणजेच आपले हेतु पुरविणं नाहींका ? आतां तशा भयंकर गोष्टीला तुमचं काय आणि माझं काय कोणाचं झालं तरी मन भिणारच; तेव्हां तो राज्योपभोगास नालायक होईल अशी त्याची स्थिति केली म्हणजे आटपलं. हें आहेना तुह्माला कबूल ? तुह्मी भावजींना वळविण्यांत कचरूं नका. ”

हें भाषण खरें आहे असें वाटून माधवीही थोडी जात्याभिमानानें फुगावयास लागली. तिलाही पतीवर सत्ता असण्यांत कांहीं तथ्य वाटू लागलें. ती आपल्या जावेला ह्मणाली, “ तें काम मलाही मान्य आहे. ज्या त्या कामांत पतीच्याच शब्दास मान वाकविणं अपमानकारक आहे हें आपलं ह्मणणं मलाही बरं दिसतं. आपलं एकंदर बोलणं आमच्या हिताचं आहे. आमच्या कल्याणांतच आपण आपलं कल्याण साधणार तर आह्माला नापसंत कसं होईल. आपण कांहीं ठरवा ! मी आपची आपल्याला अनुकूल आहे. ”

माधवीच्या मनावर आपल्या भाषणाचा बराच परिणाम झाला असें पाहून शांभवीनें सांगितलें, “ तुह्मी अगदीं निश्चित असा. तुमच्या मदतीची आह्माला मोठीशी जरूर आहेसं नाहीं. तुह्मी फक्त प्रतिकुल नसला ह्मणजे पुरे. भोगपाल भावजी आमच्या बेताच्या आड येणार नाहींत असं करण्याचं धोरण ठेवण्यास जपा ह्मणजे त्यांत तुमचा व तुमच्याबरोबर आमचा फायदा आहे. ती सर्व योजना आमची आह्मी पाहूं. तुह्मी आपला निर्धार राखा आणि सर्व कांहीं गुप्तपणें चालविण्याची काळजी घ्या. ”

माधवीनें शांभवीची सूचना मान्य केली. तिच्या मोहजालांत अडकून ती तिच्या कृत्रिमास भुलली आणि शेवटपर्यंत आपल्या हितास जपणाऱ्या आपल्या जावेच्या धोरणानें चालण्याबद्दल तिचा निर्धार ठरल्यासारखा झाला.

---

# प्रकरण १० वें.

## भोळी माधवी.



सहवासाचें सामर्थ्य विलक्षण आहे. मनुष्याच्या मनाला चांगलें किंवा वाईट वळण लागणें या गोष्टी बहुतेक-अंशीं बऱ्या वाईट संगतीवर अवलंबून असतात. वाईट संगत व चांगली संगत यांचा सुपरिणाम किंवा दुष्परिणाम घडणें साधारणतः अपरिहार्यच होय. तरीपण साधूंच्या सहवासाला व बोधाला उपेक्षणारा पुरुष सज्जन बनत नाहीं. त्याचप्रमाणें दुर्जनांच्या सहवासानें किंवा असद्बोधानेंही दुर्जन बनत नाहीं असा मनुष्यही सांपडूं शकतो. ह्मणजे सुसंगती किंवा कुसंगती यांचें निरीक्षण करून कुसंगतीच्या भलत्याच परिणामापासून अलिप्त राहणें हें ज्याच्या त्याच्या विचारावर अवलंबून राहतें असें ह्मणणें भाग आहे. तेव्हां संगत व त्या संगतीच्या सांन्निध्याला असणाऱ्या व्यक्तीची विचारशक्ति यांच्या घर्षणापासूनच कोणता तो परिणाम उत्पन्न होत असतो हें मात्र खरें दिसतें.

शांभवीला गुरुस्थानीं मानून माधवी परत गेली. तिनें लागलीच भोगपालाची भेट घेऊन त्याला आपल्या जावेचे व दिराचे विचार कळविले. शांभवी आतां मोहसेनाला ते विचार कळवील व बायकांच्या तोंडून आपल्या हेतूचा फैलाव होऊन तो स्वनीं राजाच्या कानापर्यंत पाहोंचेल आणि आपलें काम भागेल; अशा समजुतीनें भोगपालाला बरें वाटलें. पण शांभवीचें अंशतः भयंकर विचार ऐकतांच भोगपाल बराच विचारांत पडला. त्याला तसले घाणेरडे विचार गैर वाटले. धर्मध्वजाला दुःस्थितींत लोटण्याला आपण मुळींच तयार नाहीं असें त्यानें ध्वनित केलें. तेव्हां त्याला भोंदण्याकरतां माधवी त्याच्याशीं त्याच्या विचाराविरुद्ध भाषण करूं लागली. तिनें त्याच्या मनांत राजपुत्राबद्दल वैषम्य व वैर उत्पन्न करण्याचा प्रयत्न चालविला. राज्यविभागाच्या अल्प इच्छानुर्मीवर संतुष्ट राहणें हें कांहीं पुरुषार्थाचें काम नव्हे आणि तो विभागही सुरक्षित राहील असें नाहीं असा विषय काढून माधवी भोगपालाला चेतवूं लागली. त्यांतदार

त्यांत तिनें स्त्रीच्या अधिकारसमतेचेंही महत्व वर्णन केलें. पतिपत्नीच्या हक्कांची समानता, त्यांचें परस्पर भावनासाम्य व परस्परावलंबन यांवरही थोडेंसें बोलण्यास तिनें कमी केलें नाहीं. भोगपालानें आपलें ह्मणणें अमान्य करूं नये ह्मणून तिनें त्याच्या राज्यप्राप्तीपासून मिळणाऱ्या सुखांचाही विचार सांगितला.

भोगपाल हा प्रापंचिकसौख्यलोलुप होता. त्याचा विद्याव्यासंग, त्याचें ज्ञानार्जन व त्याच्या मनावरील संस्कार यांचा विचार केला तर त्यानें आपल्या पत्नीचे विचार योग्य व प्रशंसनीय मानून त्यांचा स्वीकारच करावयास पाहिजे होता. पण तो तसल्या कुत्सित विचारांस हार गेला नाहीं. मनावरील भ्रष्ट संस्कारांत दुष्ट भावनांची पडावी तशी भर पडलेली नसल्यामुळें त्याच्या विचारभ्रष्टतेस घातकी भयंकरपणाचें स्वरूप प्राप्त झालें नव्हतें. तो फक्त सौख्यासक्त होता. आपल्या सौख्यप्राप्तीकरतांच प्रयत्न करण्यास तो केव्हांही तत्पर असे. आपल्या सुखाला जर कोणाकडून आडकाठी उत्पन्न होत असेल तर आडकाठी करणाराच्या नाशापेक्षां अन्य तऱ्हेनें तें सुख पदरांत पाडून घेण्याच्याच प्रयत्नाकडे त्याचा जास्त ओढा असे. माधवी आज कांहीं तरी भलतेंच बोलत आहे; हा शांभवीच्या गुप्त भेटीचा परिणाम असावा असें समजून आणि तिच्यावर आपण अत्यंत प्रेम करीत असलों तरी तिच्या हव्यातसल्या कल्पनेला हार जाऊन आपण तिचे दास बनणार नाहीं अशी तिची कल्पना करून द्यावी ह्मणून भोगपालानें तिला जरा धमकावलें, आणि तसल्या कल्पना टाकून देऊन केवळ आपल्या सौख्यावर, आरामावर, चैनीवर, विलासावर नजर देऊनच आपण आपला विचार पाहवा असा तिला उपदेश केला. पत्नी या नात्यानें सामाजिकदृष्ट्या तिला किती सवलत मिळणें शक्य आहे याचेंही त्यानें दिग्दर्शन केलें. हें भाषण करीत असतां त्यानें तिला बरेंच तुसडें, तिचा उपहास केला, आणि तिचें मूर्खत्व तिच्या पदरांत घातलें.

नवऱ्याचें भाषण ऐकून माधवी कांहीं बोलली नाहीं. पण तिला तें पटलें मात्र नाहीं. त्याच्या योगानें ती आपल्या मनांत आपल्याच विचारांचा योग्यपणा ठरविण्यांत गर्क झाली. तो प्रकार शांभवीला कळवून ती काय सल्ला देते तो पाहवा आणि नंतर काय तें करावें असा बेत तिनें आपल्या मनाशीं ठरवून ठेवला.

शांभवीनें माधवीच्या भेटीचा मजकूर मोहसंघाला विदित केला. मोहसंघाच्या मनांत वस्तुतः राज्यतृष्णा उद्भवलेलीच होती. राजपुत्र धर्मध्वज याच्या उत्पत्तीनें त्याच्या हेतुसाध्यतेंत दुहेरी अडचण उत्पन्न झाली. तेव्हां त्या कामीं भोगपालाला अनुकूल करून घ्यावें. आणि त्याच्या मदतीनें राजपुत्राची अडचण दूर करावी असे विचार त्याच्या मनांत चालू झाले होते. आपल्या पत्नीनें माधवीच्या द्वारें भोगपालाचें मन मोहण्याची खटपट चालविली आहे हें ऐकतांच त्याला जोर आला. तथापि त्या मुद्यासंबंधानें आपण स्वतः भोगपालाशीं समक्षच कारस्थान करावें अशी त्यानें योजना केली. शांभवीच्या शिकवणीस अनुसरून माधवीनें आपल्या कामांत किती यश संपादन केलें हें कळल्यानंतर आपण आपल्या बंधूच्या एकांत भेटीचा योग जमवावा असा मोहसंघानें संकल्प ठरविला; आणि शांभवीला त्याबद्दल सूचना केली.

भोगपालाशीं जें बोलणें झालें तें माधवीनें शांभवीला कळविलें आणि आपण आपल्या पतीवर रुष्ट झालों आहों असेंही तिनें जावेच्या निदर्शनास आणून दिलें.

तिच्या अंतरंगाची स्थिति जाणून शांभवी तिला ह्मणाली, " भावजींच्या दैवीं वैभव भोगायचें दिसत नाहीं ! पण बाई, त्याबद्दल तुह्मी कां खंत मानतां ? "

माधवीनें निराशेनें उत्तर केलें, " कां खंत मानतां ! बाई ! देव देतों अन् कर्म नेतं ह्मणतात ना ? तें कांहीं खोटं नाहीं. आणखी मेलं आपलं बायकांचं जिणं खोटं आहे हेंच खरं. "

तिच्या मनांत अबलांच्या निर्बलपणाबद्दलच विचार आला असावा असें वाटून तोच खरा ठरवून घेण्यासाठीं शांभवी बोलली, " कां बरं ! बायका तरी मनुष्यकोटींतीलच आहेतना ? त्यांचं जिणं खोटं ह्मणायला त्यांनीं काय कुणाचं घोडं मारलं आहे ! "

जावेच्या ह्मणण्यास कबुली देऊन आपली तक्रार कळविण्यासाठीं ती म्हणाली, " घोडं कशाला मारायला हवं तें ? दोन्हीही माणसंच, पण एक यजमान आणि दुसरा चाकर ! एक अधिकारसंपन्न आणि दुसरा अधिकार चालविण्याचं स्थान ! एक आज्ञा करणारा आणि दुसरा आज्ञा पाळणारा ! अशी स्थिति आहे त्याला काय करायचं ? नवराबायकोंचीं

कर्मे परस्पर निगडित झालेली असतात हें नाहीं कां तुम्हाला ठाऊक ? "

माधवीला मोंगपाळाचें भाषण बरेंच झोंबलें असावें आणि नवऱ्याच्या शिरजोरपणांतून मुक्त होण्याच्या कामीं तिची तयारी झालेली असावी असें तिच्या उद्गारावरून कल्पून शांभवीनें तिला उत्तेजन देण्याची संधी साधली आणि ती विद्यासंपन्न, शहाणी शांभवी बोलली, " बाई ! तुम्ही कां कोणी अडाणी कां बायको आहां ! तुमच्या शिकण्यासवरण्याचा उपयोग काय ? तुम्ही सुशिक्षित आहां. शिक्षणाचा उपयोग आपल्या सौख्यार्जनाकडे न होईल तर अशिक्षित आणि सुशिक्षित यांत भेद तो काय राहिला ? नवराबायकोचीं कर्मबंधनें ही एक कल्पना आहे. ते इतर खऱ्या बंधाप्रमाणें दृश्यबंध का आहेत ? पतिपत्नीला परस्पर सौख्य प्राप्त व्हावें; त्यांच्यांत शांतता नांदावी; संसार व्यवस्थित चालावा आणि अशा तऱ्हेनें समाज सुरळीत व स्वस्थ असावा एवढ्यासाठींच ह्या कर्मबंधाच्या कल्पना रूढ झालेल्या आहेत. यापेक्षां जास्त तथ्य त्यांमध्यें नाहीं ! "

शांभवीचें भाषण साधारणतः बरोबर आहे असें माधवीला वाटलें. पण त्याविषयीं सर्व शंका निरसन करून घेण्याकरितां तिनें शांभवीस प्रश्न केला, " बाई ! तुमचं ह्मणणं योग्य असावंसं वाटतं ? पण एवढाच त्या कर्मबंधाचा अर्थ असेल तर कित्येक बायका दुःख सोसून, अपमान सहन करून, भावना दाबून ठेवून, इच्छाभंग पतकरून पतीच्याच चरणीं राबत असतांना दिसतात त्या काय मूर्खच कां सगळ्या ? "

या प्रश्नास मुळींच थारा मिळूं नये ह्मणून शांभवीनें लागलीच प्रश्नरूपानेंच उत्तर केलें, " मग यांत कांहीं संशय आहे कीं काय ? ज्यांना आपलें सुख समजत नाहीं; व दुःखविमोचनाचे उपाय सुचूनही ज्या त्याचा अंगिकार करीत नाहींत त्या मूर्ख नाहींत तर काय शहाण्या ह्मणावयाच्या ? बाई, हें एक औषधच होय. एखादा रोगी आपल्या रोगाच्या निवारणार्थ एक औषध घेतो. त्या औषधाचें यथायोग्य पथ्य सांभाळतो. त्याचा कडवटपणा सहन करतो. हें सगळं कां ? तर पुढें रोगहरण होऊन सौख्य लागावें ह्मणून. पण असे कष्ट सोसून जर तें उत्तम असलेलें औषध गुण न करील इतकेंच नव्हे तर उलट रोगदुःखाच्या वाढीसच कारण होईल तर तें बदलण्यास किंवा निदान बंद करण्यास तरी पाहिजेना ? वैद्यकपारंगत राजवैद्य तें तसें पालटतोही. जे वैद्यकींत नुसते नांवाचे किंवा नाकाडोळ्याचे वैद्य असतात ते मात्र

अविचारानें तेंच निरुपयोगी औषध रोग्याच्या तोंडांत ओतण्याचें काम सतत चालूं ठेवतात; आणि त्याच्या मनाला नुसतें उत्तेजन वाटावें म्हणून त्याच औषधाचें विनाकारण शाब्दिक महत्व गाऊन गुणाची मुदत हवी तितकी लांबवीत असतात. अडाणी, अज्ञानी, अजाण व अशिक्षित रोगी नाइलाज म्हणून तें घेण्याचा मूर्खपणा चालू ठेवून यातनामय स्थितींत दिवस कंठीत असतो. पण अशा रोग्याच्या विचारास कोणी आत्मनिर्धार असें नांव देईल काय ? व तसें नांव त्याला शोभेल कां ? त्या तसल्या आत्मनिर्धारास स्तुत्य समजून, कोणी त्याला अनुकरणीय समजून तें उदाहरण असें मानील काय? आतां माझ्या बोलण्याचा इत्यर्थ तुमच्या ध्यानांत आलाच असेल ? कर्मबंधनाच्या धार्मिक स्वरूपांत यापेक्षां जास्त अर्थ नाहीं. "

या भाषणानें माधवी बरीच निःशंक झाली. आपले सौख्य साधण्याच्या कामीं आपल्याला जाऊबाईच उपयोगी पडतील असें वाटून ती म्हणाली, " बायकांना पतीपासून त्रास होऊं लागला; पतीचा छळ सोसण्याचा प्रसंग पडला म्हणजे आपल्या दुःखनिवारणाकरितां त्यांना माहेरची आठवण होते. सासरच्या दुःस्थितीपासून कांहीं काळ तरी मुक्त होण्याची जागा म्हणजे एक काय तें माहेर ! पण त्याकामीं माझी निराशाच आहे. माझें माहेर काय आहे तें तुम्हाला ठाऊकच आहे. तुमच्यावर हा प्रसंग असतां तर तुमचें ठीक होतें. तुम्ही आपल्या खुशाल माहेरी जाऊन बसला असतां, आणि भावजींना पश्चात्ताप होऊन ते नरम येईपर्यंत परत आला नसतात ! पण त्याकामीं मी किती पंगु आहे हें आहेना माहीत ? "

असें म्हणून माधवी रडूं लागली. ती डोळ्याला पदर लावीत आहे तों शांभवीनें तिच्या डोळ्याला हात लावून ती म्हणाली, " वाई, हें काय ? तुम्ही अशा कष्टी होऊं नका. अहो, सगळ्यांनाच कां माहेरचं बळ असतं. तुम्ही म्हणतां तसें माझें माहेर आज आहे; नाहीं असें नाहीं. पण मी कांहीं माहेरच्या आधारावरच एवढी अवलंबून रहाणयाची नाहीं. माझें माहेर तुमच्यासारखेंच झालें किंवा आज तसेंच आहे असें धरलें आणि मजवर जर तुमच्यासारखा प्रसंग आला तर मला वाईट वाटायचं नाहीं असं नाहीं. वाईट वाटेल; पण मी अशी रडायची नाहीं. रडावं कुणी ? अशिक्षित, नेभळ्या, व परावलंबनीय बायकांनीं. तुम्ही काय, किंवा मी काय ! आपण तशा आहों का ? नाहीं ! झालं तर मग ? "

शांभवीनें एकंदर वर्णन छानदार केलें; धीर देण्यासाठीं उपायांची प्रस्तावनाही बरी केली, पण पुढें काय मार्ग स्वीकारावा तो संदिग्धच ठेवला हें पाहून माधवी रडण्याची उबाळी थांबवून बोलली, " बाई ! मी जरी तुमच्यासारखीच शहाणी आहे तरी आज मजवर प्रसंग आहे. प्रसंगांतल्या माणसाला अक्कल, ज्ञान, शहाणपण, शिक्षण असलें तरी त्याला कांहीं सुचत नाहीं. मला आतां या घरांत राहण्याचा वीट आला आहे. आज माझ्यावर रागवायचं झालं, किंवा मला अगदीं झिडकारून माझं मन दुखवायचं झालं ह्मणूनच मी बोलते असें नाहीं. आज हें एक निमित्त झालं. नेहमींचा प्रकार असाच आहे. आह्मींच पडतं घ्यायचं ? आम्हींच शरण जायचं ! आह्मींच नम्र व्हायचं ? आम्हींच अवमान गिळा-यचा आणि आह्मींच कशाही स्थितींत सुख मानून राहायचं ! आतां मला याचा वीट आला आहे. तुम्ही ठरवाल तें मला कबूल आहे. पण तुम्हीतरी शेवटपर्यंत मला सोडूं नका ! एकदां तिकडली खोड मोडलीच पाहिजे ! मग कांहींही होवो ! ज्याचें त्यानें आपापलें सुख पाहिलें पाहिजे हें तुमचें म्हणणें मला सर्वस्वी पटलें. "

माधवी बरीचशी आटोक्यांत आली असें जाणून ती शब्दपांडित्य-कुशल शांभवी बोलली, " बाई, तुम्ही स्वस्थ असा ! मी आतां तिकडला सल्ला घेऊन सर्व तजवीज करतें. तूर्त पहिलें काम म्हटलें म्हणजे कांहीं दिवस तुम्हाला दडवून कोठें ठेवावयाच्या हेंच ठरविलें पाहिजे. "

शांभवीच्या या भाषणावरून आपण गृहत्याग करून पळून जाण्यास तयार झालें पाहिजे ही गोष्ट माधवीच्या ध्यानांत सहजच आली. कौटिल्य, दंभ, जिव्हाचापल्य यांनीं संयुक्त अशा शांभवीच्या छद्मी भाषणास बळी पडल्यानें केवळ सौख्य-स्वास्थ्य-शांति-विलास यांच्या पोकळ, व धर्मविरुद्ध भ्रष्ट सिद्धांतास मोहलेली ती सुशिक्षित माधवी पळून जाण्यास— सासरचा त्याग करण्यास, माहेरचा लौकिक विसरण्यास, आईबापांचीं तोंडें काळीं करण्यास, सासू सासऱ्यांच्या उज्वल कीर्तीस कलंकित करण्यास, कुलाचा लौकिक सोडण्यास आणि अखेर ज्याच्या शुद्ध व पवित्र सेवेपासून त्रिजग-चालक परमात्माही पतिव्रतेचा दास बनतो त्या पतिरूपी मंगलकारक आद्य दैवत अशा अमृतमय दैवताचा अव्हेर करण्यास कशी सरसावली यांत कथा व सत्वसंपन्न सुज्ञाला मोठेंसें आश्चर्य व गूढ वाटण्याचें कारणच नाहीं.

# प्रकरण ११ वें.




## अंतर्निरीक्षण.




भवी आणि माधवी यांचा संवाद मोहसंघाला विदित झाला. शांभवीनें माधवीला सर्वस्वी आपल्या हातांत आणून ठेविलें आहे हें जाणून मोहसंघाला आपलें एक मोठेंच कार्य झालेंसें वाटलें. चतुर पत्नी ह्मणजे नवऱ्याच्या कार्यांतील मुख्य मंत्री होय हें वाक्य मोहसंघाला सार्थ वाटलें. त्यानें शांभवीला धन्यवाद दिले. आतां माधवीच्या मोहानें आपण भोगपालाला हवातसा अनुकूल करून घेऊं अशी त्याची कल्पना वाहूं लागली. तो आपला गादीवरील वारसा सोडण्यास तयार न होईल तर माधवीला आपण पळवून न्यावें आणि भोगपालाची दशा उडवूं असाही त्यानें संकल्प केला. माधवी नाहींशी झाली ह्मणजे भोगपाल विरह-व्यथेनें व पत्नीच्या मोहानें व्याकूळ होईल आणि मग माधवीची भेट करून देण्याच्या अटीवर तो आपला वडीलपणाचा हक्क सोडून देऊन आपल्याला हवी तशी मदत करण्यास तयार होईल असा मोहसंघानें आपल्या मनाशीं कयास केला आणि त्याच्याशीं एकांत करून त्याचें मन अजमावण्याचा घाट जमवून आणला. भोगपालास राज्याच्या तिसऱ्या विभागाहून जास्त कांहींच नको होतें. तो त्याचा हेतु जाणून मोहसंघ म्हणाला, " परमेश्वराच्या कृपेनें जर सबंध राज्यच आपल्या हातीं आलें व तुमची सर्व चैन यथास्थित चालविण्याची आह्मीं हमी घेतली तर तुह्मी आपला वडीलपणाचा हक्क सोडून देण्यास तयार आहांत कां ? "

भोगपाल जसा चैनी होता तसा जातीनें शूर होता. फक्त चैन आणि सौख्याधीनता यांमुळें त्याचें शूरत्व बोजड झालें होतें इतकेंच काय तें. मनाच्या उपभोगसौख्याच्या समाधानापेक्षां त्याला शौर्याची किंमत अधिक वाटत नसे. ह्मणून त्याला तंटाबखेडा व कोणताही उपद्व्याप नकोसा वाटे. मोहसंघाचा भलताच प्रश्न ऐकून भोगपाल थोडासा आश्चर्यभरित झाला. त्यानें मोहसंघास विचारलें, " तुमच्या प्रश्नाचा अर्थच मला समजत नाहीं.

सबंध राज्य आपल्या हातीं यावयाचें म्हणजे काय ! ही गोष्ट आधीं शक्य कशी ? सिंधुदेशाला अपाय करणारा कोणी जबरदस्त शत्रु उद्भवल्याचें तुमच्या कानीं आलें आहे कीं काय ? तसें असेल तर मला काय व तुम्हाला काय सिंधुपौरवांच्या सत्तेकरतां समशेरींच सज्ज ठेवल्या पाहिजेत. पण तुमच्या बोलण्याच्या भावार्थावरून तसा प्रकार दिसत नाहीं राज्याला कांहीं अपाय होणारा असेल तर त्याचें जन्मस्थान आपणच स्वतः असावयास पाहिजे ! मला काय तें स्पष्ट विचारा. ”

आपल्या प्रश्नानें भोगपालाची शौर्यवृत्ति खवळून त्याचे सिंधावतीच्या गादीबद्दलचे अभिमानपर विचार व्यक्त झाले. तेव्हां किंचित् वचकून मोहसंत्र सर्व धोरण पालटून म्हणाला, “ आपल्याला भलतीच शंका आली तरी कशी ? वसुप्रसादाच्या अधिकाराचा मत्सर करून जर कोणी दुष्ट पौरवसिंहासनाकडे वांकड्या नजरेनें पाहील तर त्याचे डोळे फोडण्यास आपण व मी यांच्यासह अनेक वीरमहावीरांच्या समशेरी तयार आहेत हें न ओळखणारा मूर्ख कोण असणार ? आपण उगीच कल्पनाप्रवाहांत हवेतसे वाहूं नका. घटकाभर असें धरून चाला कीं, वसुप्रसादास राज्याची दगदग होत नाहीं. तो आतां सर्व भार टाकून अरण्यसेवन करून हरिहरि म्हणून जन्माचें सार्थक करण्याच्या नादांत आहे. राजपुत्र धर्मध्वज हा राज्याचा उपभोग घेऊं इच्छित नाहीं आणि वसुप्रसाद मला राज्याभिषेक करण्यास सिद्ध झाला आहे तर तुमची या गोष्टीस मान्यता आहे कां ? असें मी विचारतों ! ”

हाही प्रश्न पुन्हां चमत्कारिकच आहे असें समजून भोगपालानें परत प्रश्न केला, “ उगीच वाटेल तें धरून चालून कसें भागेल ? गृहीतच धरावयाचें तर मी म्हणतों सर्व स्थिति उलट धरा आणि तुम्ही आपल्या हिश्शापुरता तरी अधिकार सोडून देऊन मी घातलेल्या अन्नाचें आणि सांगितलेल्या कामाचे इसम होऊन रहाल कां ? ”

भोगपालानें आपला प्रश्न आपल्याच गळ्यांत अडकविला हें पाहून मोहसंत्र पुन्हां बोलला, “ या वादांत अर्थ कांहींच नाहीं. पण कोणत्या-तरी कारणानें तो चालू झाला आहे तेव्हां मी आतां वेगळाच प्रश्न करतों कीं, तुमचा तिसरा हिस्सा तुम्हाला लखलाभ करून दिला तर राहिलेल्या इन्ही दिशांची मालकी आणि पौरवांची राजसिंहासनसत्ता ही आम्हाला

मिळवून देण्याच्या मार्गांत तुम्ही आडकाठी तरी करणार नाहीं असें पतकराल कां ? ”

मोहसंघाच्या मनांत कांहीं तरी दुष्टकारस्थान चालूं असावें आणि त्याच्या धोरणानेंच तो आपलें मन छानण्याकरितां असे प्रश्न करीत आहे असें ओळखून भोगपालानें सांगितलें, “ हीं असलीं भलतीं व नसतीं प्रश्नोत्तरें करण्यांत अर्थ काय ? तुमचा काय हेतु असेल तो असो. माझा खरा हेतु मी तुह्मास कळविला आहे. वसुप्रसाद जर माझा हेतु सफल करणार नाहीं तर मी त्याच्याशीं भांडेन व त्याला त्रस्त करून सोडीन. पण त्यानें माझा हेतु सफल केला किंवा न केला तरी पौरवसिंहासनाचीं छकलें करण्यास मी केव्हांही तयार होणार नाहीं. सिंधावतीच्या राजसत्तेस अपाय करण्याचें जर कोणी मनांत आणील तर मी शक्य तेवढी अडकाठी करीन ! मग त्या कामीं मला माझ्या सर्वस्वास मुकावें लागलें तरी चालेल. तुमच्या अशा तऱ्हेच्या प्रश्नास उत्तर ह्मणजे तशाच तऱ्हेचा माझा प्रश्न आहे असेंच तुह्मी सारखें धरून चाला. ”

भोगपालाचें हें उमदें भाषण ऐकून मोहसंघ मनामध्यें बराच वचकला. पण तो मोठा वस्ताद होता. त्यानें लागलींच आपलें धोरण पार बदलून तो भोगपालास आनंदानें म्हणाला, “ शाबास ! वीरा शाबास ! तूं स्वभावतः मोठा चैनी, विलासी व सौख्यलोलुप आहेस, तेव्हां तुझ्यामध्यें वीरश्रीचें पाणी मुळींच खेळत नाहीं असें कोणाकोणाचें ह्मणणें असतें. मी त्यांच्या विरुद्धच होतों. पण खरोखरीच तुझें मन कसें आहे तें एकदां बघावें असा संकल्प करून मी तुझ्याशीं हें असें भाषण केलें. माधवीवहिनींकडून आह्मांला तुझा राज्यविभागाबद्दलचा विचार ध्वनित झाला. तेव्हां याचवेळीं तुला कांहींतरी बोलावयास लावून तुझी परीक्षा करावी अशी मी योजना केली. पण तुझे शुद्ध विचार, वीर्यशाली औदार्य, तेजस्विता आणि शौर्यगुणाबद्दलचें निःसीम प्रेम पाहून मला मोठा संतोष वाटतो. असे विचार कायम राखून तूं जरी आळशी, सुस्त, निरुद्योगी राहून नुसती मनाची करमणूक करण्यांतच तल्लीन होऊन राहिलास तरी कांहींएक हरकत नाहीं. तुझ्या संबंधानें जनतेचे तर्क कसेही असोत ! मला काय पाहिजे होतें तें समजलें. तुझे विचार ऐकून मला मोठा संतोष वाटतो. मी आतां एवढेंच सांगतों कीं, तूं आपली महत्वाकांक्षा हवी तितकी वाढीव पण राज्याचे हिस्से करण्याची भावना टाकून दे. ”

मोहसंघाच्या भाषणानें भोगपाल स्वस्थ व शांत होण्यास हरकत नव्हती. पण त्याला मोहसंघाचें भाषण सत्य वाटेना. त्यानें जरी कोणत्याही तऱ्हेचा अविर्भाव आणून आपले पहिले मुद्दे उडविण्याचा यत्न केला तरी त्या योगानें भोगपालाचें मन शुद्ध होईना. तो त्याच्याविषयीं जो एकदा साशंक झाला तो कायमचाच झाला. असो; अखेर मोहसंघानें जें धोरण पाळलें त्यांतही लबाडीच असली पाहिजे अशीच त्याची दृढ समजूत झाली. मोहसंघाच्या मनांत कांहींतरी काळें येऊन तो कांहींतरी भयंकर, कपटमय कारस्थानांत असावा आणि त्यानें केवळ आपलें अंतःकरण निरीक्षण करण्याच्या बुद्धीनेंच आपणास प्रश्न केले अशी भोगपालाची खात्री झाली. त्यासंबंधानें आपणही बारकाईनें छडा काढावा आणि वसुप्रसादाच्या कानावर ती बातमी गुप्ततेनें घालून ठेवावी असा भोगपालाचा स्वतःचा विचार ठरला.

## प्रकरण १२ वें.



### जयसिंगाचें हृद्गत.



सरदार जयसिंग हा दुसऱ्याच्या दरबारांतून उठून गेला हें वाचकास स्मरतच असेल. दरबारांतून निघून जाण्याचें खरें कारण काय तें कोणाच्याही लक्षांत येणें कठीण होतें. पुरोहितांच्या भाषणाविरुद्ध कांहीं प्रतिपादन करण्यास त्याला राजानें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष हरकत केली म्हणूनच त्यानें सभारंगाचा त्याग केला असें सर्वत्रांना वाटणें साहजिक होतें आणि वरकरणी तें खरेंही होतें. पण दमनपुरोहितांच्या विरुद्ध कांहीं ग विषयविवेचन करण्याची अवश्यकता काय होती ? मार्तंडाचार्य, नागशास्त्री यांच्या भाषणांत त्याला राग येण्यासारखें काय होतें ? वरकांती विचार करणारास यांत कांहीं दिसण्यासारखें नव्हतें. पण जयसिंगाचें धोरण फार खोल होतें. त्याला पुरोहितांचें धर्मपर भाषण रुचलें नाहीं. आचार्यांचा

शास्त्रीय मुद्दा त्याला मानवला नाहीं. धर्मतत्वासंबंधानें त्याचीं मतें व त्यास अनुसरून त्याचा आचार फार निराळा होता. खेरीज पुरोहितांच्या प्रतिपादनाचा राजाच्या मनावर दाब पडूं देणें हें त्याला श्रेयस्कर वाटलें नाहीं. कारण जयसिंगाच्या मनांत वसुप्रसादाकडून एक मोठी गोष्ट साधून घ्यावयाची होती. दमनपुरोहित, आचार्य किंवा शास्त्री यांच्या प्रतिपादनाकडेच राजाचें चित्त वेधेल तर त्याच्या योजलेल्या गोष्टींत बिघाड होण्याचा संभव होता. त्या कारणानेंच तो पुरोहिताचे मुद्दे खोडून काढ-ण्याच्या उद्देशानें सभेमध्यें बोलावयास उठला होता.

सरदार जयसिंग याला कामसेन या नांवाचा एक पुत्र होता. हा कामसेन शरीरानें धष्टपुष्ट होता. त्याच्या चेहऱ्याची ठेवण अशी कांहीं विलक्षण होती कीं त्याच्याकडे पाहणारास त्याच्याविषयीं मोह पडे. त्याचें मर्दानी सौंदर्य दिमाखदार होतें. त्याच्या नेत्रांमध्यें जी लख-लखीत तेजस्विता वास्तव्य करीत होती ती दिसण्यामध्यें एखाद्या नागि-णीच्या तुळतुळीतपणासारखी दिसे. पण ती नागिणीच्याच दुष्टपणानें व नीचतेनें रंगलेली होती. त्याची बाह्य छाती ऐटदार व वीरास साजेल अशी होती. पण तिच्या अंतर्भागामध्यें नानातऱ्हेच्या दुष्ट व भ्रष्ट विचारांच्या लाटा वहात असत. त्याचें अंतःकरण ह्मणजे बाह्यतः स्वच्छ व लखलखीत वाटे पण परिणामीं विषमय व रोगोत्पादक अशा जलाचा तो एक डोहच होता. त्या डोहांत यमुनेंतील कालियाप्रमाणें कामव्याल अक्षय्य क्रीडा करीत असे. त्याच्या दृष्टिरूपी नागिणीच्या फुशीनें तो विशाल सर्प अनेकांना आपल्या फूत्काराची पीडा भोगण्यास लावीत असे. त्याचें डोकें मोठें होतें. परंतु, तें जर चातुर्य, सूज्ञपणा, सुविचार, दूरदर्शीपणा, सत्कर्म, सदाचार इत्यादि शुद्ध कल्पनांनीं भरलेलें असतें तर त्याच्या मोठे-पणाचें चीज झालें असतें. पण तें डोकें किड्यांनीं भरलेल्या उत्तम भासोली नारळाप्रमाणें होतें. त्यामध्यें असंख्य घातकी विचार एकसारखे वळवळ करीत होते. तो कामसेन गुणवान् आहे असें जयसिंग नेहमीं ह्मणे. हें ह्मणणें खरेंही होतें. तो धैर्यशील होता; पण लोकांना उपद्रव करण्याच्या कामांतच त्याच्या धैर्याचा उपयोग होत असे. त्याच्या ठिकाणीं औदार्य वसत होतें; पण व्यभिचार कर्मामध्येंच तें विशेषतः प्रगट झालेलें दिसे. तो शौर्ययुक्त होता. पण अनाथांना आपल्या मनाच्या लहरीप्रमाणें वागणें भाग पाडण्यासच

त्या शौर्याचा व्यय होत असे. त्याच्या अंगीं पराकाष्ठेचा निर्भयपणा वसत होता. पण दुसऱ्याचें नुकसान करण्याच्या कामींच तो दृष्टोत्पत्तीस येत असे. त्याच्या ठिकाणीं वक्तृत्वाची शैली होती. पण भलत्या कामाला एखाद्याला प्रवृत्त करण्याकडेच तिची योजना होत असे. दृढनिश्चय, करारीपणा, चिकाटी या गुणांनींही त्याला सोडलें नव्हतें. पण या सर्वांचें प्रकटीकरण फक्त छांदिष्टपणा, व्यसनपरायणता व भोंदणूक अशा कुकर्मांत जय मिळविण्यांतच होत असे.

कामसेन चार पांच वर्षांचा असतांना त्याची आई मरण पावली. वस्तुतः लहान मुलाचा खरा शिक्षक ह्मणजे त्याची माताच होय. मुलाचें शिक्षण, विद्या, गुण, आचार, आरोग्य यांविषयीं त्याचा बाप काळजी वाहतो, त्या संबंधानें खटपट करतो, जरूर पडल्यास पैका खरचतो; पण आईच्या सहवासाचा व उपदेशाचा मुलावर जो परिणाम घडतो तो विशेष महत्वाचा असतो. खेरीज मुलाचा ओढा बापापेक्षां आईकडे सामान्यतः जास्त असतो. तिच्याच सहवासांत त्याला लहानपणीं जास्त काळ काढावयाचा असतो. त्याचा कोणताही हट्ट पुरविण्यास बापापेक्षां आईवरच त्याची जास्त भिस्त असते. आई त्याचे लाड करते त्याप्रमाणें प्रसंगोपात त्याला मारही देते. तिच्या हस्तें मिळालेल्या शिक्षेचें त्या मुलाला दुःखही होतें. पण तशा दुःखनिवारणास तो बापाकडे तक्रार करीत नाहीं. मात्र बापानें केलेल्या शिक्षेबद्दल तो आपल्या मातेकडे दाद मागतो. तात्पर्य, मुलाचें आईविषयीं कांहीं विलक्षण प्रेम असतें. आहार, विहार, हासणें, खेळणें, राग, लोभ, सेवा, संगोपन, कैवार, गुण, शहाणपण, विद्या या सर्व कामांत आईच्या अंतःकरणांतच मुलाबद्दल खरी काळजी वसत असते. तिचें प्रेम निष्कलंक व निरपेक्ष असतें. ह्मणूनच महाजनांनीं बापापेक्षां आईला पराकाष्ठेचें महत्त्व देऊन ठेविलें आहे.

अशा प्रकारचा शिक्षक कामसेनाला अकालीं व जरूरीच्या प्रसंगीं सोडून गेला असल्यामुळें त्याची अनास्था झाली होती. तो स्थितिसंपन्न असल्याकारणानें त्याला खायला, प्यायला, वस्त्रापात्राला कांहीं कमी पडे असें नाहीं. पण खऱ्या, शुद्ध प्रेमाचा व स्वाभाविक कळकळीचा अभाव झाल्या कारणानें कामसेनाला भलत्याच संवयी लागल्या. मातारहित बालक या दृष्टीनें त्याचें हवें तें हट्ट पुरविणें हेंच सेवक मंडळींना त्यांचें कर्तव्य वाटे. जयसिंगानेंही

त्याचें वाटेल तसें लाड करण्यांत मोठेपणा मानल्याकारणानें तो पोर दुराग्रही व नाठाळ बनला. त्याच्या कोणत्याही कृतीचें, कोणत्याही बोलण्याचें, कोणत्याही विचाराचें जयसिंगानें कौतूकच केल्या कारणानें तो मुलगा दुर्गुणी व नादान निपजला. त्याला जयसिंगानें मर्यादेच्या बाहेर स्वातंत्र्य दिल्यामुळें तो स्वच्छंदी व स्वेच्छाचारी बनला. अशा प्रकारें भ्रष्ट कल्पना-परिपूर्ण जयसिंगाच्या शिक्षेंत कामसेनाचा बालपणचा काल गेल्यानें त्यानें आचारविचार, सद्गुण, पावित्र्य, धर्मकल्पना या बाबतींत बापाचेंच अनुकरण केलें असल्यास त्यांत नवल तें काय !

हा जयसिंगपुत्र कामसेन राजाचा जामात होण्यास योग्य आहे असें जयसिंगाला वाटत होतें. राजकन्या प्रमिला ही आपली सून होईल असा योग जनून यावा अशी जयसिंगाची प्रबळ इच्छा होती. प्रमिला लहान असतांनाच तिचा व कामसेनाचा जोडा छानदार दिसतो अशी भाषा त्यानें आपल्या हाताखालच्या माणसांकडून राजाच्या कानावर घालविली होती. जयसिंगाच्या या इच्छेस रुकार किंवा नकार देण्याचें वसुप्रसादास त्यावेळीं कांहींच कारण नव्हतें. राजकन्या मोठी होत चालली व कामसेनही जाणता होऊं लागला तेव्हां कांहीं तरी निमित्तानें जयसिंग राजाजवळ त्यांच्या लग्नाचा विषय अर्धवट काढी. अशा रीतीनें वसुप्रसादाचें मन पाहण्यासाठीं खडा टाकतां टाकतां एकदां राजाच्या सहज बोलण्यावरून जयसिंगाला अशी कल्पना करण्यास जागा झाली कीं, राजकन्या व कामसेन यांचा विवाहयोग जमून येणार.

आपली मुलगी थोराच्या घरीं पडावी आणि आपल्याला संपन्न घराण्यांतील सून मिळावी अशी मुलामुलींच्या आईबापांस इच्छा असणें साहजिकच आहे. जयसिंगाच्या या विवाहविचारांच्या मुळाशीं येवढीच सामान्य इच्छा वास करीत होती असें नाहीं. महत्वाकांक्षेच्या प्रेरणेनें त्याला वसुप्रसादासारखा व्याही असण्यांत भूषण वाटत होतें. पण त्या महत्वप्राप्तीच्या वासनेला द्रव्यमोह, वैभवलोभ आणि हांव यांची फाजील जोड मिळालेली असल्याकारणानें त्याला असें वाटत होतें कीं, वसुप्रसाद हा निपुत्रिक आहे आणि तो तसाच निपुत्रिक राहील ! मग अर्थातच राजकन्या प्रमिला हीच राजाची वारसदारीण ठरेल आणि त्या हक्कानें

आपला मुलगा कामसेन यास पौरवांचें सिंहासन प्राप्त होईल. राजाचे दोन्ही पुतणे भोगपाल व मोहसंग हे वारशी हक्काची कांहीं गडबड करतील तर त्यांच्या तोंडावर दोन तुकडे टाकूं व त्यांनीं तसें नच ऐकलें तर आपल्या सामर्थ्याच्या जोरावर आपण त्यांना आपलें ह्मणणें ऐकावयास लावूं ? अशाप्रकारचा जयसिंगाचा अंतस्थ मतलब होता. भोगपाल, मोहसंग किंवा त्यांच्या तर्फेचा कोणी सरदार यांच्याशीं झगडण्याचा प्रसंग आलाच तर आपली बाजू अजिंक्य असावी ह्मणून त्यानें तेव्हांपासूनच आपलें सामर्थ्य वाढविण्याची तजवीज करून ठेवली होती. त्यानें वसुप्रसादास अनेक वेळां आपलें सामर्थ्य दाखविलें असून त्याचा राज्यहिताच्या कामींच उपयोग करण्याबद्दल तत्परता व विश्वास दाखविला असल्यामुळें राजाला किंवा कोणा अन्य राजहितदक्ष मनुष्याला त्याच्या वाढत्या सामर्थ्याविषयीं संशय किंवा भय वाटण्याचें प्रयोजन नव्हतें.

राजा वसुप्रसाद व राणी इंदुमती या भाग्यशील जोडप्याच्या पोटीं धर्मपालाचा जन्म होईपर्यंत जयसिंगाचें मन अशांत होण्याचें मोठेसें कारण नव्हतें. दमनपुरोहित राजाला बरोबर घेऊन पुत्रप्राप्तीचा प्रसाद मिळविण्यासाठीं कोणी साधूकडे गेला त्यावेळीं व ते दोघे प्रसाद घेऊन परत आले तेव्हांही जयसिंगाच्या मनाची शांतता ढळली नाहीं. कारण साधु, ऋषि, मुनि, अनुष्ठानें, धर्मक्रियासंपन्न महंत, यांच्या सामर्थ्यासंबंधानें त्याचा मुळींच विश्वास नव्हता. त्याला त्या सर्व गोष्टी थोतांडाच्या वाटत. पुढें इंदुमती खरोखरच अंतर्वत्नी झाली तेव्हां त्याचें मन थोडें चलबिचल झालें; पण तेव्हां त्यानें राणीला कदाचित् दुसरी कन्याच होणार नाहीं कशावरून अशी कल्पना करून आपल्या मनाची समजूत करून घेतली. पण ईश्वराच्या कृपेनें व श्रीभारतीच्या प्रसादानें जेव्हां धर्मपालरूपी दिव्य, तेजःपुंज रवी वसुप्रसादाच्या राजलक्ष्मीला प्रकाशित करण्यासाठीं प्रकाशमान झाला तेव्हां जयसिंगरूपी नक्षत्रमणी निस्तेज दिसूं लागला. त्याच्या चेहऱ्यावरील कालिमा मोठ्या वेगानें त्याच्या हृदयांत शिरली. तें हृदय आधींच भ्रष्ट विचारांच्या कपटमय कालिमेनें व्यापलेलें होतें. त्यांत ही कालिमा मिसळतांच जयसिंगाचा हृदयरूपी करंडक काळ्याकुट्ट काजळानें भरून गेला आणि राजपुत्र धर्मपालाला कोणीकडून तरी दुनियेंतून नाहींसा करून टाकण्याविषयीं त्यानें आपल्या पदराला खूण गांठ बांधली. कदाचित् आपला दुष्ट हेतु

साध्य होईल न होईल या कल्पनेनें निदान राजकन्या कामसेनाच्या पदरीं पडावी ह्मणूनही त्यानें तशा धोरणाचे प्रयत्न सुरू ठेवले.

अलीकडे प्रमिलेच्या विवाहाबद्दल गोष्टी निघत त्यावेळीं जयसिंग व कामसेन यांच्याबद्दलही राजवाड्यांत बाटाघाट चाले. त्या प्रसंगीं राजा किंवा राणी यांतून कोणीही त्यांच्याविषयीं अनुकूल किंवा प्रतिकूल उद्गार काढीत नसत. तरीपण राजा वसुप्रसाद आणि सरदार जयसिंग या दोन घराण्यांचा शरीरसंबंध जमून येणें श्रेयस्कर नाहीं असें दमनपुरोहित बोलत असे. तो नेहमीं राजाला धार्मिक तत्वांचें बीज सांगे, जयसिंग व कामसेन यांच्या धर्मपराङ्मुख आचारावर टीका करी आणि अशा रीतीनें तो दूरदर्शी व चाणाक्ष पुरोहित राजाराणीच्या अंतःकरणांत जयसिंग व कामसेन यांच्याविषयीं तिरस्कार व अनादर उत्पन्न करण्याचा शक्य तो प्रयत्न करी. पुत्रप्राप्ती होण्याच्या कार्यामुळें राजा व राणी स्वतःला पुरोहिताचे ऋणी समजत. त्या दोघांचा पुरोहिताच्या शब्दावर अलीकडे जास्तच विश्वास बसत असे. हा सर्व वृत्तांत जयसिंगाच्या कानावर गेला होता. त्यासंबंधानें तो दमनपुरोहितावर क्रुद्ध झाला होता. संधी सांपडतांच दमनपुरोहिताचीं मतें किती फोल आहेत हें सिद्ध करून त्याला हीन ठरविण्यासाठीं तो टपून बसला होता. कोणाही शास्त्री पंडित, आचार्य इत्यादिकांपुढें धर्माच्या, शास्त्राच्या मुद्यांत हार जाण्याचा प्रसंग पडूं नये ह्मणून त्यानें बरीच खटपट केली होती. मार्तंडाचार्य, नागशास्त्री, दमनपुरोहित यांचें भाषण राजा व त्याचे कांहीं सरदार यांना पटलें असें पाहतांच जयसिंग खवळला. त्यांचें भाषण चुकीचें, स्वार्थी व परिणामीं हानिकारक आहे असें स्थापून राजा, सरदार, मंत्री, सुमंत व प्रधान यांना आपले मतानुयायी बनविण्याच्या हेतूनें त्यानें सभेमध्यें बोलण्याची इच्छा दर्शविली. राजाला भारून टाकणाऱ्या भटांची जेथल्या तेथेंच टर उडविली, वेडेवाकडे प्रश्न विचारून त्यांना नडविलें आणि आपल्या चातुर्यगुणाची वाहवा होईल असें केलें ह्मणजे राजाच्या मनांतील आपणाविषयींचा आदर जास्त वाढेल आणि कामसेनास प्रमिला मिळण्याचे बाबतीत अडचण पडणार नाहीं असा त्याचा त्या वेळचा कावा होता. पण पुरोहिताचें उत्तर आणि त्याला राजाची मुग्ध अनुमति यांमुळें सरदाराचा कावा फसला आणि त्या अपमानामुळेंच तो सभेंतून चालता झाला.

## प्रकरण १३ वें.

### व्यसनसाम्यता.



जकन्या प्रमिला चंद्रकलेप्रमाणें वाढतां वाढतां आपल्या पणांत येऊं लागली. तिच्या वयमानानुसार तिच्या सौंदर्यांतही ज्यास्त वेधकशक्ती उत्पन्न होऊं लागली. तेव्हां तिला कामसेनाच्या दृष्टीस पाडावें आणि आपल्या भावी पत्नीबद्दल त्याच्याही मनांत मोह व प्रेम उत्पन्न होईल असें करावें या हेतूनें जयसिंग त्या दोघांच्या परस्पर दर्शनाचा योग जमवून आणी. कामसेनाच्या दिमाखदार देखणेपणानें प्रमिला त्याला भुलेल अशी जयसिंगाला आशा होती.

जयसिंग सभेचा त्याग करून गेला ती गोष्ट राजाच्या मनांत डांचत होती. राजा वसुप्रसाद हा स्वतः पराक्रमी व बाणेदार होता. तो जयसिंगासारख्या रणमस्त व सेवानिष्ठसरदाराच्या रोषाला भिणारा नव्हता. पण तो मनाचा थोर, न्यायी व अस्सल क्षात्रियत्वाच्या गुणांनीं संपन्न असल्या कारणानें त्याला एखाद्याचें मन उगींच बिघडविणें प्रशस्त वाटत नसे. सरदार जयसिंगाचें मन कार्यानिष्ट होण्याचें कारण समजावून घ्यावें आणि त्याची समजूत घालून त्याचा उद्वेग नाहींसा करावा या हेतूनें राजानें त्याला भेटीस बोलावलें. त्या समयीं राजाशीं भाषण करतांना सरदारानें आपलें खरें अंतरंग दडवून ठेवून गैरसमजुतीनें आपला मलतांच समज झाला ह्मणून आपण कांहीं विरुद्ध भाषण करण्याची परवानगी मागितली आणि ती मिळण्यास हरकत दिसल्यावरून अविचारानें आपण सभेंतून उठून गेलों ही आपली चूक झाली असें कबूल केलें. उद्वेगाची उचल शमल्यानंतर आपण शांत झालों. त्याविषयीं आतां आपल्या मनांत काडीचेंही किल्मिष नाहीं असें त्यानें राजाजवळ शुद्धभावपूर्वक सांगितलें. आणि त्याची सत्यता पटवण्याकरितां त्यानें आपल्या नेहमींच्या वर्तनक्रमांत यत्किंचितही फरक पडूं दिला नाहीं.

हा सर्व प्रकार ठीकच झाला. पण जयसिंगाच्या अंतरंगांतील द्वेष व दुर्भाव जास्तच चेतला होता. वसुप्रसादाला भोळ्या स्वभावामुळें किंवा बेफि-

किरीमुळें जयसिंगाबद्दल संशय वाटत नव्हता. पण मोहसंघाला मात्र ती शुद्धता खरी वाटत नव्हती. जयसिंगाला छेडण्याकरतां मोहसंघ त्याच्याशीं तसें चौकस व उपरोधिक भाषण करी. जयसिंग त्याच्याशीं राजाबरोबर केलेल्या भाषणाप्रमाणें स्पष्ट भाषण करी असें नाहीं. तो सरळ व साफ उत्तर न देतां आणि आपला हेतूही उघड न करतां मोहसंघाच्या बोलण्यावर उडवाउडवीचीं उत्तरें करी. त्यावरून किंवा चोराचीं पावलें चोरासच ओळखावयाचीं या म्हणीस अनुसरून मोहसंघाला जयसिंगाच्या मनशुद्धतेविषयीं शंका होती. तेव्हांपासून मोहसंघ गुप्तपणें जयसिंगाच्या प्रत्येक हालचालीच्या पाळतीवर असे. असें करतां करतां मोहसंघाला जयसिंगाच्या मनांतील राजकन्येविषयींचा हेतु विदित झाल्यानें त्याविषयीं खात्री करून घेण्याकरतां त्यानें कामसेनाशीं जास्त स्नेह पाडून आपला संशय फेडून घेतला. जयसिंगाला राजकन्या स्नुषा करून दिली तर तो आपल्याला अनकूळ होईल असा मोहसंघानें तर्क बांधला. राजा वसुप्रसादास गोता देणें, धर्मध्वजाचा काटा काढून टाकणें, भोगपालाची अडगळ दूर सारणें या गोष्टी कांहीं सामान्य नव्हत्या. त्या सर्व पार पाडून आपल्या स्वतःच्या डोक्यावर पौरवाधिपतीचा किरीट चढविण्यास आणि त्या योगें आपल्या प्रिय शांभवीला महिषीपदावर आरूढ करण्यास जयसिंगासारख्या प्रबल सरदाराच्या मदतीची अत्यंत अवश्यकता आहे; इतकेंच नव्हे तर त्याच्या अनुकूलतेवांचून किंवा मदतीखेरीज आपलें इच्छित साधावयाचें नाहीं अशी त्याच्या मनाची खात्री होती.

जयसिंगालाही आपल्या हेतुसिद्धीप्रीत्यर्थ कोणा तरी बड्या मनुष्याची मदत पाहिजेच होती. राजघराण्यांतील मंडळींतून जर कोणी कांहीं मोहानें किंवा लालुचीनें आपल्या मसलतींत सामील होईल तर मोठी बहार उडेल असें वाटून तो त्या धोरणानेंच चालला होता. तोही आपल्या परीनें भोगपाल व मोहसंघ यांचा आचार, विचार व उच्चार यांचें बारकाईनें निरीक्षण करीत होता. त्यांत त्याच्या मनानें असें ठरविलें कीं, मोहसंघ हा कांहीं तरी वेगळ्याच मसलतींत असावा. या संशयामुळें तो मोहसंघाला कोणत्याही भाषणप्रसंगीं स्पष्ट उत्तर न देतां संदिग्ध व उडवाउडवीच्या उत्तरांनीं अस्पष्टपणेंच कां होईना पण आपल्या मनांतील आशयाची दिशा कळविण्याचा यत्न करी. कामसेनाची माता मृत झाल्यानंतर जयसिंगानें दुसरी बायको करावी असा त्याच्या इष्टमित्रांनीं त्यास उपदेश केला होता. पण काम-

सेनाला सावत्र आई नसणें बरें असें वाटून त्यानें त्यावेळीं तो बेत रहित ठेवला होता. पण आतां कामसेन प्रौढ झाला आहे, सावत्र आईपासून कोणत्याही तऱ्हेच्या सेवाचाकरीची त्यास अपेक्षा राहिलेली नाहीं, तिच्यापासून प्रसंगोपात उत्पन्न होणाऱ्या जाचाचीही त्यास भीति राहिली नाहीं असें पाहून जयसिंग स्वतःचें लग्न करण्यासाठीं उत्सुक झाला. तो त्याच विचारांत गढून जाई. वस्तुतः आतां कामसेनाचें लग्न करण्याची खरी अवश्यकता होती. घरामध्यें सून येऊन ती प्रपंच चालवूं लागली आणि मुलानें संसाराचा भार आपल्या डोक्यावर घेतला ह्मणजे सासऱ्यानें व्याप-रहित स्थितींत आनंदानें काळ काढावयाचा. फार तर आपल्या अनुभव-ज्ञानाचा मुलाला फायदा मिळावा ह्मणून त्याला हरेक बाबतींत सल्ला द्यावा! पण जयसिंगाची भावना कांहीं विचित्रच बनली. त्याला मुलापेक्षां स्वतःच्याच लग्नाची विशेष जरूर वाटली. बालविवाह करणें ही गोष्ट अनिष्ट-कारक आहे अशा मताचा तो असल्यानें कामसेन जितका प्रौढ होईल तितका चांगला असें त्याचें मत होतें.

बालविवाहप्रतिबंध आणि प्रौढविवाहोत्तेजन हीं दोन्हीं सूत्रें किती आनंदकारक व कल्याणदायक भासतात! बालविवाहापासून उत्पन्न होणारे अनिष्ट लक्ष्यांत आणलें ह्मणजे तशा विवाहाच्या प्रतिबंधाच्या चळव-ळींत पुढाकार घेऊन ती यशस्वी करणें किती तरी श्रेयस्कर आहेसें वाटतें. अनिष्ट निवारणाची खटपट या नात्यानें तो उद्योग स्तुत्यच होय. त्यामध्यें लोककल्याण, समाजहित, स्त्रीजातीबद्दल आस्था वगैरे झगझगीत तत्वें स्थापतां येत असल्याकारणानें त्यांच्या पुरस्कर्त्यांना मान व कीर्ति यांचा लाभ होतो ही दुसरी गोष्ट! खेरीज त्या चळवळीच्या शाब्दिक प्रतिपादनानें व तसे प्रसंग प्रत्यक्ष घडवून आणण्याच्या उठावाणीनें प्राचीन ऋषीमुनींचा पाडाव करून आधुनिक शहाणपणाचा विजय संपादल्याचेंही श्रेय पदरांत पडतें तें निराळेंच. हें सर्व ठीकच दिसतें! पण या गोष्टींतील मुख्य मुद्यांचा जर विचार केला तर तो मात्र तत्वतः सिद्ध झाल्याचा दाखला क्वचितच सांपडतो. या चळवळींच्या पुरस्कर्त्यांची स्थिति आंधळेपणाची असते. एका वाक्-पटूनें त्या गोष्टींचा अवलंब केला ह्मणजे तसल्याच जातीचे विद्वान किंवा ज्ञानी ह्मणविणारे त्याच्या मागें उड्या घेतात पाहून त्यामध्यें कांहीं तत्वतः तथ्य दिसत नाहीं. ह्मणजे ही स्थितीही मेंढाराप्रमाणेंच नव्हे काय? यामधील

मुख्य मुद्दा जें ब्रह्मचर्य त्याच्याकडे कोणी ढुंकूनही पाहत नाहीं. स्त्री काय किंवा पुरुष काय ! नवराबायको प्रौढ होऊन प्रपंच करावयास लागे-पर्यंत त्यांचें ब्रह्मचर्य अढळ असलें पाहिजे हा आमच्या धर्मशास्त्रकारांचा मुख्य मुद्दा आहे. हा मुद्दा ज्या ठिकाणीं फार सावधगिरीनें संरक्षण केलेला आहे त्या ठिकाणीं बालविवाह करणें धर्म्य मानलें असलें तरी तशा बाल-विवाहित जोडप्याच्या अनिष्टोत्पत्तीचा संभव तरी आहे काय ? अशा शुद्ध जोडप्याच्या कल्याणाची जबाबदारी धर्मानें स्वीकारलेली आहे. जयसिंगा-सारखे कुशल महाजन जो या तत्वांचा अंगिकार करतात तो निव्वळ हौस, कीर्ति, मान, लहर व बेदर्दपणा आणि शहाणपणाची घमेंड एवढयाच मुद्यावर करतातसें दिसतें. त्यांनीं त्यांतील मुख्य मुद्दा आणि शास्त्राचें दूरद-र्शित्व यांचा विचार केलेला नसतो.

याप्रकारें जयसिंग हा बालविवाहाच्या विरुद्ध व प्रौढविवाहाला अनु-कूल असा असल्यानें कामसेनाच्या बाबतींत त्याचें तसें मत झालें होतें. ह्मणूनच तो अविवाहित स्थितींत इतका प्रौढ झाला होता. त्याला विवाहित पत्नी नव्हती ह्मणून तो अविवाहित या सदराखालीं मोडत असे. बाकी तो व्यसनबद्ध व पराकाष्ठेचा व्यभिचारी बनलेला होता.

स्वतःचें लग्न करण्याच्या बाबतींतही जयसिंगाची इच्छा मोठी पवित्र होती असें नाहीं. स्वतःला पुत्रप्राप्ती होऊन वंश चालूं रहावा अशी त्याची भावना होती ह्मणावें तर त्याला कामसेन हा पुत्र होता. आपण पुरुष असल्याकारणानें आपण कोणत्या तरी स्त्रीचा परिग्रह करून दंपत्यघट-नेच्या प्रवाहास मदत करून प्रपंचाचा ओघ चालू ठेवलाच पाहिजे अशा कर्तव्यपरायणतेमुळें तो लग्नाची इच्छा करीत होता असें मानावें तर त्याची प्रपंचप्रवाह खुंटण्याबद्दलची तक्रार सार्वजनिक रीतीनें जाहीर झालेली नव्हती; किंवा त्याच्या तसल्या कर्तव्यविन्मुखतेबद्दल स्त्रीजातीच्या सभेनें त्याच्या मदतीची अपेक्षाही दर्शविली नव्हती ! बालविवाहास प्रतिबंध करण्याच्या तत्वास टेका देणारा जयसिंग पन्नाशीच्या घरात आला असतां बेलाशक एखाद्या तरुणीच्या स्वीकारास उद्युक्त झाला आहे हें पाहून जनाचा लांछना-स्पद अपवाद येण्याचा संभव आहे असें जाणून तो धर्मशास्त्राची डागडुजी करूं पाहणारा महर्षि जयसिंग एखादी प्रौढ व आपल्या वयाला शोभणारी गतभर्तृकाही अंगिकारण्यास तयार होता. तशी विगतधवा न आढळेल

तर तशाच वयाच्या एखाद्या समंजस व स्त्रीपुरुषांच्या हक्कांची समानता ओळखणाऱ्या पहिल्या पतीला काडी मोडून देणाऱ्या स्त्रीचें पाणिग्रहण करण्यासही तो धीरोदात्त जयसिंग सिद्ध होता. ह्मणजे अन्नाचें महत्व स्थापण्याच्या भावनेनें कुतऱ्यानें तोंड लावल्यामुळें विटाळलेली भाकरी वाया जाते आहे असें पाहून तिला चव आणण्याकारतां ती कांद्याशी खात बसण्याचा विधि एकादशीला करून भगवान विष्णूंची खोड मोडण्यांतलाच हा प्रकार नव्हे काय ? आपल्याला ह्मातारपणीं जपण्यास कोणी तरी कळकळीचें मनुष्य असावें ह्मणून त्याला भार्या पाहिजे होती अशी कल्पना करावी तर त्याची सेवा करण्यास त्याला ज्ञानसंपन्न पुत्र कामसेन नव्हता कां ! त्या बाबतींत त्याचा तसा भरंवसा धरतां येत नव्हता असें मानणें योग्य दिसेल काय ? पुत्राला वागविण्याचें प्राचीन शास्त्रीय प्रकार हवेतसे दुरस्त करून ज्याला शिक्षण मिळालें, प्राचीन आचारनिर्बंधांतील मूढपणा काढून टाकून अधुनिक तत्वावरच ज्याच्या आचाराची उभारणी झाली, धार्मिक अनुज्ञांतील भ्रामक व वेडगळ कल्पना झुगारून देऊन ज्याला अर्वाचीन तऱ्हेनें गाळून घेतलेल्या ज्ञानाचा आस्वाद मिळाला तो ज्ञानी, पंडित, थोर, मान्य, कर्तव्यपर पुत्र अशा कामीं पित्याच्या निराशेस कारणीभूत होईल हें शक्य तरी आहे काय ? मग जयसिंगाला लग्न करावयाची कोणत्याही तऱ्हेच्या, कशाही स्थितींतल्या, केवढयाही वयाच्या स्त्रीशीं लग्न लावण्यास तो कां तयार झाला या गोष्टींतील कारण चाणाक्ष, सामान्य व्यवहार व ऐहिक सौख्यास मोक्ष मानणाऱ्या मनुष्यांच्या ध्यानांत येण्यास विशेष अडचण पडणार नाहीं.

जयसिंगानें मोहसंवाशीं कांहीं खलबत करण्याची इच्छा दर्शविली. मोहसंवालाही तेंच पाहिजे होतें. त्यानेंही आपण तशीच इच्छा धरून बसलों आहों असें ध्वनित केलें. दोघेही परस्पर गरजू होते. एकमेकांनीं एकमेकांची उणीव भरून काढण्यास व अंतस्थ मतलब सिद्धीस नेण्यास मनापासून सहाय्य केलें तर परस्परांचीं कार्यें सिद्धीस जातील असा त्यांना भरंवसा वाटत होता. दोघेही गुप्तसंवाद करण्यास उत्सुक झालेले होते. समानशील आणि व्यसनसाम्यता यांचा पाठिंबा व नेट असला ह्मणजे अन्योन्यसख्य, प्रेम, मैत्री जमण्यास उशीर काय !

---

# प्रकरण १४ वें.

## घातकी विचार.



ते दोघे समानमनोवृत्तीनें संपन्न व आत्महितदक्ष जयसिंग व मोहसेन मसलत करण्याच्या इच्छेनें अरण्यांत फिरावयास गेले. त्यांच्या भाषणाचें किंवा हेतूचें स्वरूप अद्याप एकमेकांस व्यक्त झालें नव्हतें. तरी त्यांतील स्वरूपाविषयीं त्या दोघांनाही बरोबर कल्पना होती. आपलें कारस्थान जमविण्यासाठीं कांहीं बेत ठरविण्यास अत्यंत सुरक्षित एकांताची जागा पाहिजे असें त्या दोघांनाही अवश्य वाटलें. त्यांनीं शिपाई, प्यादा, हुजऱ्या, स्नेही, सोबती, गाडी, घोडे वगैरे कांहीं एक बरोबर घेतलें नाहीं. त्यांनीं जागा व वेळ मुकरर करून ते निरनिराळ्या वेळीं व निरनिराळ्या मिषानें आपापल्या घरांतून आपल्या इच्छित स्थळीं जाण्यासाठीं बाहेर पडले. आपला परस्परांचा स्नेह जमला आहे, आपण परस्पर कांहीं कामाकरितां एकाच ठिकाणीं गेलों आहों, आपल्याला एकमतानें कांहीं खाजगत भाषण करावयाचें आहे वगैरे गोष्टी शंकेच्या पार असाव्यात या बुद्धीनें याबद्दल त्या दोघांही धूर्तांनीं शक्य तेवढी आगाऊ खबरदारी घेतली होती. दहा पांच दिवसांच्या अंतरानें ते दोघे कांहीं कामाच्या निमित्तानें राजधानींतून बाहेर पडले आणि ठरविलेल्या वेळीं आपल्या इच्छित स्थळीं येऊन दाखल झाले.

हें एकांत स्थान ह्मणजे एक निर्जन वन होतें. त्या ठिकाणीं अत्यंत दाट झाडी होती. ठिकठिकाणीं काटेरी झुडपांच्या जाळ्या बनलेल्या होत्या. नाना प्रकारच्या रानटी वृक्षांनीं तें वन गजबजलेलें होतें. तें वृक्षपर्णांनीं आच्छादित असल्या कारणानें त्या अरण्यांत नेहमींच सावली असे. दाट छायेनें तेथें सर्वत्र अंधाराचें साम्राज्य पसरलें होतें. वृक्षांचीं दाट पानें व फांद्यांचा व डाहळ्यांचा दाट विस्तार यांच्यामधील फटींतून जो काय उजेड आंत येण्यास सवड होती तेवढाच काय तो प्रकाश त्या ठिकाणीं पडत असे. वृक्षांचीं खोडें ह्मणजे त्या भयंकर वनांत वास्तव्य करणारे हिंस्र

राक्षसच भासत. अशा भयानक अरण्यांत हिंस्र पशू, घातकी पक्षी, विषारी भुजंग यांच्याशिवाय दुसरें कोणाचें वास्तव्य असणार !

हें महाअरण्य अशा भीषणतेनें संपन्न होतें तरी पण तें सर्वशः तसें होतें असें नाहीं. अधमांच्या अंतःकरणाप्रमाणें त्याची स्थिति नव्हती. या वनामधूनच व्यापारी, सारवान, फेरीवाले यांना प्रवास करण्याचा वरचेवर प्रसंग पडे. या कारणास्तव लोकांनीं व त्याच्या मालकानें मुशाफरांच्या प्रवासाची शक्य ती सोय करण्याची व्यवस्था केलेली होती. त्यांतून प्रवास करावयाचे रस्ते कायमचे आखून टाकलेले होते. त्या रस्त्यानें प्रवास करीत असतां दगा फटका होण्याची मोठीशी भीति वाटत नसे. तरी पण त्या मार्गानें एकट्या दुकट्यानें प्रवास करणें धोक्याचें असे. तेथें राबत्यांतील वाटच्या लगत विश्रांतिसाठीं आरामस्थळें तयार केलेलीं होतीं. त्यांच्या नजीकच जलप्राशनाची तजवीज केली होती. ज्या ठिकाणीं पाण्याचे ओहोळ वाहत होते तीं स्थळें हा मार्ग तयार करतांना साधून घेतलीं होतीं.

हें अरण्य शिवावतीपासून सरासरी पंचवीस कोस तरी दूर होतें. कांतर या नांवानेंच तें सर्वत्र प्रसिद्ध होतें. या कांताराच्या अंतरंगांत कांहीं जपी, तपी, योगी लोकांचीं स्थानें आहेत अशी बोलवा होती. त्याच्या निबिडतर भागांत कांहीं देवळेंही बांधलेलीं होतीं. कोणी वाटसरू किंवा धाडसी प्रवासी यांच्या तोंडून त्यांपैकीं कांहीं देवालयांचें वर्णन ऐकूं येत असे. एखादेवेळेस कांहीं शोकी मंडळी जमावानें त्या ठिकाणच्या देवस्थानाकडे जात असत. त्यांच्या सांगण्यावरून तीं देवालयें अति प्राचीनकाळच्या पद्धतीनें बांधलेलीं असून अगदीं मोडकळीच्या स्थितींत आहेत अशी माहिती लागे. चुकलेल्या प्रवाशाला तेथील एखाद्या अवलियाच्या भेटीचा योग घडून अन्न, पाणी मिळाल्याचाही बोभाटा ऐकूं येत असे. कोणी वैतागलेला, संसारोपाधीनें गांजलेला, रोगग्रस्त, किंवा कांहीं इष्टसिद्धिलोलुप अशांतून कांहीं लोक त्या ठिकाणीं जाऊन राहण्याचाही प्रयत्न करीत. कोणी केवळ जिज्ञासातृप्तीच्या इच्छेनेंही तेथें जात.

अशा प्रकारच्या त्या कांतारांत जयसिंग आणि मोहसेन हे दोघे आपलें हृद्गत एकमेकाजवळ उघडें करण्याकरितां गेले. त्या अरण्यांत त्या दोघांनीं जेथें मुक्काम केला होता तेथें देऊळ वगैरे कांहीं एक नव्हतें. ती जागा रहदारीच्या मार्गापासून बहुत दूर होती हें सांगावयास नकोच. तेथें दाट झाडी असून

काटेरी झुडपांच्या निबिड जाळ्या होत्या. तेथें एक लहानसें मैदान होतें. तें मैदान स्वच्छ दिसत होतें. तेथील जागा साफ केलेली दिसत होती. त्या स्वच्छतेवरून त्यांना आरंभीं थोडी शंका आली. तशा अरण्यांत साफसफाई करण्यास तेथें कोणातरी माणसांचें वास्तव्य असण्याची जरूर आहे असें त्यांना वाटलें. पण आपल्यासारख्या कोणातरी मनुष्यांचा तेथें तळ पडण्याचा प्रसंग येऊन ती जागा तात्पुरती सोईची केलेली असावी अशी समजूत करून घेऊन ते संशयातीत झाले. तेथून जवळच एक पाण्याचा प्रवाह वाहत होता. तो प्रवाह शेवाळ, लोहाळा, भोंस अशाप्रकारच्या झुडपांनीं ठिकठिकाणीं अडलेला होता. ओलसर जागेंत उगवलेल्या झुडपांची त्याच्या कांठावर दाटी होती. त्या प्रवाहाच्या आजू-बाजूस मुद्दाम तयार केलेले झरे दिसत होते. ते झरेही मनुष्यांच्या वास्तव्याची तेथें शंका उत्पन्न करीत. त्यावरून त्यांचें मन पुन्हां जरा घोटाळ्यांत पडे. पण थोडासा कांहींतरी विचार करून ते स्वस्थ होत. अशाप्रकारें शंकोत्पत्ती व शंकानिरसन यांमध्यें झोके खातां खातां त्यांचें मन स्वस्थ होऊन त्या मैदानांतच त्यांनीं आपला तळ दिला.

त्यांनीं आपल्याबरोबर फराळाचें आणलें होतें. दोघांनीं आपापले घोडे झाडांच्या खोडाला बांधून टाकले आणि एका दाट व अती गुंतागुंतीच्या गुल्मानजीक त्यांनीं आपली बैठक टाकली. प्रवाहानजीकच्या झऱ्याकडे जाऊन त्यांनीं हातपाय धुतले. तोंड स्वच्छ करून ते पाण्याचीं दोन भांडीं भरून घेऊन आपल्या आसनाकडे आले. दोघांनींही फराळ केला. नंतर पान खाऊन ते दोघे आपापल्या आगमनाच्या हेतूसंबंधानें बोलावयास लागले.

पहिल्या प्रथम मोहसंघ आपल्या मनांतील कळकळ व्यक्त करण्याच्या उद्देशानें बोलला, " मला वाटलें होतें कीं, आपण शूर, पराक्रमी, बडे सरदार! राजाला हरेक कामीं आपली जरूर! आपणही राजाला एकनिष्ठपणें हवी तितकी व हवी तेव्हां मदत करण्यास तयार! तेव्हां राजाजवळ आपलें बहुत वजन असेल. राजाच्या मनांत आपणाबद्दल पूज्यभाव व आदरबुद्धि वसत असेल; पण तसें कांहीं दिसत नाहीं. आपण जरी शुद्ध भावानें एकाद्याच्या हितास जपलें आणि एखाद्याला सहाय्य केलें तरी तो म्हणजे आपल्या हितास जपेलच किंवा आपणास सहाय्य करील असें कांहीं निश्चयानें सांगतां येणार नाहीं हेंच खरें. "

मोहसंधाचें हें बोलणें ऐकून जयसिंगानें विचारलें, " सर्वच लोक कृतज्ञ किंवा कृतघ्न असतात असें आपणास वाटतें काय ? सर्वजण आपापल्या कार्यावर नजर देऊनच प्रसंगीं चांगले वाईट बनतात. आणि मनुष्यानें परिस्थितीला अनुसरून आपलें आचरण किंवा विचार पालटले पाहिजेत हें न्यायास धरून आहे. ज्याला आपण मित्र मानलें तो जर शत्रूसारखा वागूं लागेल तर त्याला आपण शत्रू समजावयास लागावें हें योग्यच आहे. पण आपण राजासंबंधानें जो दोष व्यक्त करतां तो कशावरून ?

**मोहसंध:**— त्याला अनेक कारणें आहेत. माझें राजाशीं तुमच्यापेक्षां जास्त सान्निध्य असल्याकारणानें मला कित्येक गोष्टी ऐकावयास सांपडतात. त्या तुह्माला ठाऊक असणें शक्य नसतें. तुह्माला एक मुख्य गोष्ट सांगतों ! उगीच भारुडाचा उपयोग नाहीं. राजकन्या प्रमिला ही वयांत आली असल्याकारणानें अलीकडे तिच्या विवाहाच्या बराचवेळ गोष्टी निवतात. इतर ठिकाणचे राजपुत्र, संस्थानिक, जहागीरदार वगैरेकडूनही प्रमिलेला मागण्या येतात. राजाही आपल्यापरी उत्तम वर शोधण्याच्या खटपटींत आहे. तरी अद्याप कोठें जमलेलें नाहीं. या बाबतींत राजानें सर्व भिस्त दमनपुरोहितावरच टाकलेली दिसते. कांहीं राजपुत्र बरे आहेत असें इतरांच्या मतानें साधारणतः ठरलें तरी दमनपुरोहितांची अनुकूलता नसेल तर ते सर्व नापसंत होतात. दमनपुरोहितही वराच्या शोधांत आहेत. मग त्यांना कसला वर पाहिजे आहे कोणाला ठाऊक ?

**जयसिंग:**—हा प्रकार माझ्याही कानावर आला आहे; पण यांत माझा संबंध कोठें येतो ! वर पसंत किंवा नापसंत करण्याच्या विचारावरून राजाच्या मनांतील माझ्याविषयींचा अनादरभाव कसा जाणावयाचा ?

**मोहसंध:**—माझें ह्मणणें पुढें ऐका. आपला पुत्र कामसेन याच्याशीं अलीकडे माझा बराच स्नेह जमला आहे. त्याला आमची प्रमिला पसंत पडली असावी असें त्याच्या उद्गारावरून वाटतें. कामसेन हा शहाणा, हुशार, सुंदर, तरुण व शूर आहे. खेरीज आपलें कुळही थोर आहे. आपण राजाचे हितचिंतक व राजाचे आधारस्तंभ आहां. या सर्व दृष्टींनीं प्रमिला कामसेनास देण्यास हरकत असण्याचें वस्तुतः कारण नाहीं. याच हेतूनें मीं राजा राणीला तशी सूचना केली. राजाच्या मनांत पुष्कळ

कल्याणप्रद गोष्टी भरवून दिल्या तर राजकन्या आपली स्नुषा होईल असा योग येण्याचा संभवही दिसला. पण राजा सर्वस्वी दमनपुरोहितांच्या अधीन ! दमनपुरोहितांचा शब्द झेलण्यास राजा सदैव तत्पर असतो आणि त्या पुरोहिताला आपला कामसेन मुळींच पसंत नाहीं.

**जयसिंग**—कां बरें ? त्या भटाला कामसेन कां पसंत नाहीं. त्यानें कामसेनाच्या ठिकाणीं काय न्यून काढलें. परोपकार, शिक्षण, भेदाभेदाबद्दलच्या भावनेचा अभाव, लोककल्याणाची हाव, स्त्रीजातीच्या सुखाची कळकळ, स्त्रीजातीचे हक्कासंबंधानें उदार बुद्धि, ज्ञान, धैर्य, सौंदर्य इत्यादि उच्च गुणांत कामसेनाच्या तोडीचा राजपुत्र किंवा कोणीही अन्य वर सांपडणें मुष्किलीचें आहे असें तुम्हाला नाहीं कां वाटत ! तुमचा त्याच्याशीं बराच परिचय झाला आहेना ?

**मोहसंघ**— हें काय विचारावें ! मुष्किलीचें कसलें पण मी म्हणतों, कामसेनाच्या तोडीचा वर मिळणें साधारणतः अशक्य होय ! शारीरिक आरोग्य, सदृढता यांमध्येंही कामसेन कसा अवसानबाज आहे. आतां तो टाकाऊ धर्मातल्या गोष्टींना जुमानणारा नाहीं हा भाग निराळा ! पण त्याच्याशीं लग्नाच्या कामांत कर्तव्य काय ? तो वाटेल तें खाद्य खात असेल, पेय पीत असेल, तो वाटेल त्याच्या हस्तें अन्नव्यवहार करीत असेल. या सर्व गोष्टी खऱ्याच असतील असा नियम नाहीं. मी म्हणतों, खऱ्या अगदीं खऱ्या आहेत असें धरलें तरी त्यायोगें त्याच्या गुणांत हीनपणा येतो कोठें ? मी तर ह्मणतो कीं, धर्मबंधनाच्या नीरस, नेभळया, अर्थरहित अशा गोष्टींचा त्याग करण्याला जें धैर्य लागतें तें कांहीं सामान्य नव्हे. तो एक अप्रतिम सद्गुण होय ! ज्याच्या मनांत भेदाभेद नाहीं, ज्याच्या भावना सम आहेत, ज्याला अद्वैत तत्वें समजलीं आहेत त्या उच्च विचारसंपन्न मनुष्याला धार्मिक आचाराच्या मूढपणाचा तिटकारा येणें ही गोष्ट योग्यच होय ! मी म्हणतों, तें कसेंही असलें; आणि त्या मूढ दमनपुरोहिताची धर्मशास्त्रावर केवढीही मदार असली तरी राजाला या गोष्टी समजूं नयेत काय ?

**जयसिंग**—या दमनपुरोहिताचें धोरण मीहि जाणतों आहे. राजपुत्र धर्मध्वज हें पुरोहिताच्या कृपेचें फळ आहे अशा वेडगळ समजुतीनें राजा सर्वस्वी त्या भटाच्या चरणीं लागला आहे हें मी ओळखून आहे !

**मोह०**— आपण ओळखणार नाहीं असें कसें होईल ! दमनाचा दरबार

आपल्याला आठवतो ना ! काय तो अपमान ! तुम्ही चिम्मे म्हणूनच तो सहन केला. आमच्यासारखा चंचल मनाचा व उतावीळ मनुष्य असतां तर तेथें कांहीं तरी रणच माजवितां. आपली प्रकृति शांत म्हणूनच तो प्रसंग निभावला.

**जयसिंग**—निभावला ! बरें आहे म्हणावें ? हा जयसिंग कुडीत प्राण आहे तोंपर्यंत अपमान विसरत नसतो. या जयसिंगाचा बाह्य देह व बाह्य आचरण कितीही सौम्य दिसलें तरी त्याचें अंतरंग नेहमीं स्वतःच्या मानभावानेंच भरलेलें असतें. मी तसा शांत व चिम्मा नाहीं. मी विचारी आहे. कोणतेंही कार्य दुरदर्शित्वानेंच पार पाडावें लागतें. दमनपुरोहिताच्या आडकाठीनेंच मला त्यावेळीं अपमान सहन करावा लागला. तेव्हांपासून मी राजाविषयींचा सर्व शुद्धभाव निःशेष टाकून दिला. मी अगदीं स्वस्थ आहे असें समजूं नका. मी अंतस्थ तयारीनेंच आहे. राजाला पेंचांत आणून त्या पुरोहिताला माझा खरा अवतार दाखविल्यावांचून मी सोडणार नाहीं. पुरोहिताच्या सल्ल्याप्रमाणें चालणें व त्याची मर्जी संभाळीत राहणें या गोष्टी राजाला आज सहज दिसताहेत. पण आमच्यासारख्या सरदारांनीं कुलंगडी आरंभलीं व राजाला संकटांत लोटण्याचा प्रसंग आणला म्हणजे या भिकार भटाच्या सलुचानें भागावयाचें नाहीं हें राजाला समजत नाहीं कां ?

**मोहसंघ**—समजतें आणि न समजतें ! उपयोग काय ? तुम्ही जोंपर्यंत स्वस्थ आहां तोंपर्यंत त्यांस कोणतीही गोष्ट समजण्याला मार्ग काय ? आपण जरा नरसिंहस्वरूप दाखवायला लागा म्हणजे सगळें कांहीं ताळ्यावर येतें आहे. ती एक दरबारची जुनी गोष्ट जाऊं द्या. पण आतां प्रमिला कामसेनाला देण्यास अडचण काय ? मी देखील तशी सूचना दिली. सूचनाच काय पण मी आपलें तेंच मत स्पष्टपणें सांगून टाकलें. पण आम्हाला तरी विचारतो कोण ! धर्मध्वज होण्याच्या पूर्वीची आणि आतांची स्थिति पालटली आहे. तें कारटें देखील आम्हाला शहाणपणाच्या गोष्टी सांगतें. आणि राजाराणी त्याचें कौतुक करतात !

**जयसिंग**—तें पोरही आपला असा अपमान करतें ना ? मग बसतां कां नाहीं गप्प ! असो, वेळ येईपर्यंत तसें गप्प राहिलेंच पाहिजे. तें पोर अद्याप काय काय करील हें तुम्हाला कळतें आहे कोठें ? हा धर्मध्वज झालाच नसतां तर वसुप्रसादाचे राज्याचा मालक कोण होता ? आतां तुम्हाला

तैनातींतूंचून अन्य काय लाभणार ! बाकी त्याच्या कारकीर्दीत तुह्माला अन्नवस्त्राला कमी पडणार नाहीं. कसेंही झालें तरी तो तुमचा बंधूचना ?

**मोहसंघः**— बंधू-बंधूच-वाहवारे बंधु ! जयसिंगमहाराज ! तुह्मी या मोहसंघाला ओळखलें नाहींत ! सोन्याची सुरी असली तरी उरांत खुपसावयाची नाहीं. ती जर आपल्या शरीराला कापूं लागेल तर ती आटवूनच टाकली पाहिजे ! धर्मध्वजाचा दास बनून पोटभर अन्न आणि अंगभर वस्त्र स्वीकारण्यास कबूल होणारा हा मोहसंघ नव्हे ! तें काम त्या बावळ्या भोगपालाचें आहे !

**जयसिंगः**— ह्मणजे ! तुमचा बंधू भोगपाल हा तुमच्या मताचा नाहीं वाटतें ? तो तुमच्याशीं विरुद्ध दिसतो हें कसें ?

**मोहसंघः**— कसें आणि काय ! तुह्मीच पहा ! भोगपाल आमचा बंधूच ! अहो, कसला बंधू आणि कसलें काय ! बरें आहे ह्मणावें ! सर्वांच्या हातावर तुरी देऊन मी आपलें इच्छित साधीनहा माझा बाणा आहे. या भोगपालाची तर त्रेधाच उडवून देतों !

**जयसिंगः**— एकंदरींत तुह्माला धर्मध्वज व भोगपाल हे जरा जाचकच झाले आहेत ! भोगपालापासून आह्माला अद्याप कांहीं तसदी पोंचली नाहीं. पण हा राजपुत्र मात्र आह्मालाही जाचक झाला आहे. आतां तुमच्याजवळ कसें बोलावें ? तुम्ही जर—

**मोहसंघः**— आपण असें अडखळूं नका. आंतबाहेर ठेवण्याचें कारण नाहीं. आपलीं परस्परांचीं अंतःकरणें एकमेकांजवळ उघडीं करावीं आणि परस्परांच्या महत्वाकांक्षा पूर्ण होण्याचा मार्ग एकमतानें कायम करावा या उद्देशानें आपण अशा या एकांत स्थळीं मुद्दाम आलों आहों हें आपण जाणतांना ! मग असें कां ?

**जयसिंगः**—भोगपालाची आम्हाला पीडा नाहीं असें जें मी ह्मटलें तें तसें खरें नव्हे. त्याची आम्हाला धर्मध्वज होण्याच्या पूर्वी पीडाच होती. कारण राजा वसुप्रसादाच्या पश्चात् संततीच्या अभावीं गादीचा वारसा भोगपालाकडेच येण्याचा संभव होता. आमच्या हेतुसिद्धीला राजकन्या प्रमिला ही वारसदारीण होणें इष्ट होतें. प्रमिला कन्यावारस ठरली ह्मणजे अर्थातच प्रमिलेचा पती सिंहासनाचा मालक झाला. आणि या गुप्त मतलबानेंच प्रमिला कामसेनाच्या पदरांत पडण्याबद्दल आमची सर्व लालसा. नाहींतर कामसेनाला

कांहीं थोड्या थोडक्या कन्या आलेल्या नाहींत. कलिंगनृपति सुबाहू हा तर आपली कन्या दीक्षा ही कामसेनाला देण्यास उत्सुक झाला होता. कामसेन हा देखील दीक्षेच्या मोहांत पडला होता. पण कोणी चांडाळानें सुबाहूराजाला विश्वासघातानें मारलें आणि मीही या प्रमिलेच्या नादानें तो बेत तसाच टाकून दिला. तरीपण कामसेन हा अद्याप त्या दीक्षेच्या नादांत आहेच. दीक्षेला आपली पत्नी करावयाची असा कामसेनाच्या मनाचा दृढ निर्धार झाला आहे. तरी पण माझ्या आग्रहावरून व प्रमिलेच्या सौंदर्यामुळें कामसेनाला प्रमिला प्राप्त व्हावी अशी उत्सुकता वाटत आहे. तात्पर्य, माझ्या या हेतूस राजपुत्र धर्मध्वज हा विघ्न झाला आहे. विवाहाच्या कामीं व्यत्यय आणणारा दमनपुरोहित हें पहिलें विघ्न आणि प्रमिला माझी स्नुषा झाली म्हणजे कामसेनास राजपद प्राप्त होण्यास व्यत्यय आणणारा राजपुत्र हें दुसरें विघ्न ! हीं दोन्हीं विघ्नें नाहींशीं करणें हें माझें पहिलें काम आहे. हाच माझा मुख्य उद्देश आहे. तिसरें विघ्न म्हटलें म्हणजे भोगपालाचें; आणि चौथें विघ्न म्हटलें म्हणजे स्वतः तुम्ही मोहसंघ—

**मोहसंघः**—अद्याप मी स्वतः तुम्हाला विघ्नरूपच भासतों कां ?

**जयसिंगः**—भासत होता पण आतां नाहीं. तुमचें हें चौथें विघ्न आज शकुनरूपी झालें आहे. तुमच्या सहाय्यानें मीं पहिलीं दोन्हीं विघ्नें नाहींशीं करीन अशी मला उमेद आहे. तिसरें विघ्न दोन विघ्ननाशामुळें आपोआपच नाश पावेल असा अंदाज आहे. या विघ्नविनाशासाठीं मला तुमची मदत जरूर पाहिजे.

**मोहसंघः**—परमेश्वरानें कसा हा सुयोग जमवून आणला आहे पहा ! माझ्या मनामध्यें जो हेतू तोच आपल्या मनाचा उद्देश. ज्यांच्या नाशाची मला अवश्यकता त्यांच्याच हानीची आपल्या हेतुसिद्धीस अवश्यकता. असा हा योग जमून आल्यावर मी तुम्हाला किंवा तुम्ही मला मदतीची याचना का करावयास पाहिजे ? राजधानींत परत गेल्यापासून आतां आपल्याच कार्याला लागावयाचें. प्रथमतः आपण उघडपणें राजकन्येला मागणी करावी. मी आपल्या मागणीस पुष्टी देतो. राजा, दमनपुरोहित व आणखी कोणी भटुर्डे यांचीं सर्व शास्त्रीय मतें मी खोडून टाकतों. त्या योगानें राजाचे डोळे उघडले तर उत्तमच झालें. सरदार

जयसिंगासारख्या पुरुषाचें मन दुखविण्यापासून अनिष्टोत्पत्ती उद्भवण्याचा संभव दाखवूनही राजा सावध झाला नाहीं तर राजकन्या प्रमिला हिला जबरदस्तीनें पळवून नेऊन तिचें कामसेनाबरोबर लग्न लावून टाकावयाचें ही मी प्रतिज्ञा करतों.

**जयसिंगः**— या प्रतिज्ञेस सिद्धि प्राप्त होण्यासाठीं मी आपलें सर्व बलाबल खर्ची घालण्यास तयार आहें. आतां या कामीं वसुप्रसादाच्या जीवास अपाय घडण्याचा संभव आहे हें मात्र ध्यानांत ठेवा.

**मोहसंघः**— मी मोहसंघ आहे! मी कोणी नेभळट, बावळट, रडका भागुबाई नव्हे. माझें शूरत्व जातिवंत आहे. तुह्मी तर एक वसुप्रसादच घेऊन बसला आहां. मी ह्मणतों आपलीं सर्व कार्यें चोख तऱ्हेनें पार पाडण्यास आपणास वसुप्रसादाच्या जोडीला किंवा मागें पुढें धर्मध्वज, दमनपुरोहित व भोगपाल यांना देखील कंठस्नानें घालावीं लागतील.

**जयसिंगः**—एकदां आपला क्रोधाग्नि पेटला, त्याला आपल्या व माझ्या हेतूंच्या उत्कंठेचें आज्य व वारा मिळाला ह्मणजे त्या भडक्यांत कोणाकोणाच्या आहुत्या पडतील तें कोणीं सांगावें. आतां मला एक गोष्ट मुख्य पाहिली पाहिजे कीं, या सर्व ब्यादी नाहींशा झाल्या ह्मणजे आपल्या हक्काचा विचार करून मला अर्ध्या तरी फायद्यास मुकलें पाहिजे आणि तें रास्त व न्याय्यही आहे. कारण हीं सर्व कामें आपल्या दोघांच्या मिलाफावांचून मुळींच उरकावयाचीं नाहींत.

**मोहसंघः**— कन्येच्या वारशी हक्काच्या आधारावर किंवा आपल्या कर्तबगारीवर लक्ष देऊन तुह्माला अर्ध राज्य विभाग देण्यास माझी केव्हांहीं खुषी आहे. इतकेंच नव्हे, तर अर्ध्याहून थोडा जास्त भाग आपल्याला देऊन मी आपला निम्यापेक्षां कमी भागही स्वीकारीन. पण पौरवांच्या गादीचा मालकीहक्क तुमच्या घराण्यांत जाऊन पुरुकुलाच्या ऐवजीं तुमचें कुल सिंधावर्तीच्या गादीवर स्थापण्यास मात्र आमची मान्यता नाहीं व याकामीं आपणासारखे थोर व उदार मनाचे सरदार असला भलताच हट्ट धरणार नाहींत असा मला भरंवसा व आशा आहे.

**जयसिंगः**—ही आशा निरर्थक होणार नाहीं. हा भरंवसा वृथा व्हावयाचा नाहीं असें मीं वचन देतों. माझ्या औदार्याची आपणास कल्पना आहेच.

**मोहसंघः**— या औदार्याबद्दल मी आपणास आणखीही एक अत्यंत

मौल्यवान व किमतीचा मोबदला देण्याची योजना करून ठेवली आहे. पण त्यासंबंधानें मला कांहीं गोष्टी आपल्या तोंडून स्पष्ट कळणें इष्ट आहे. त्याकामीं माझा तर्क बरोबर जमेल व मला कळलेली बातमी जर कांहीं तथ्याची असेल तरच माझ्या योजनेचें महत्व आहे.

**जयसिंगः**—आपण काय असेल तें बेलाशक उघड विचारा. आपल्या कानावर काय बातमी आली आहे ?

**मोहसंघः**—आपणही भार्याप्राप्ती इच्छित आहां अशी गुप्त बोलवा आहे. नुसती भार्याच नव्हे तर मन थोर करून, धैर्यगुणाचा पूर्ण अवलंब करून, स्त्रीजातीचें हित व समानहक्काचें तत्व स्वीकारून आपण एखादी गत-भर्तृकाही स्वीकारण्यास तयार आहां हें खरें काय ? इतकेंच नव्हे तर पतीशीं जमत नाहीं ह्मणून परस्परांचें सुख साधण्यासाठीं पतीला काडी मोडून देणाऱ्या सौंदर्यसंपन्न अशा स्त्रीचाही भार्या या नात्यानें अंगिकार करण्यास आपण तयार आहां या वार्तेंत कांहीं हशील आहे कां ?

**जयसिंगः**—समजा; या दोन्हीही गोष्टी खऱ्या आहेत. पण तशी सौंदर्य-संपन्न विगतधवा वैधव्यपंकांत रुतलेली आपल्या आढळण्यांत आहे कां ? तसें असेल तर तशा दीन, अनाथ अबलेला सनाथ करण्यास मी एका पायावर तयार आहें. तशा निराधार स्त्रीच्या उद्धारापेक्षां जास्त दरजाचा कोणता परोपकार आहे ! आणि परोपकार ह्मटला कीं, आमची केव्हांही तत्परताच असावयाची. मात्र ती अबला सौंदर्यसंपन्न व आमच्या वयाला शोभणारी असावी. आमच्यापेक्षां तरुण चालेल पण ह्मातारी मात्र नलगे ! मग ती काडी मोडून दिलेली असली तरी हरकत नाहीं. एवढेंच काय; पण तिला तिच्या नवऱ्याच्या जाचांतून मुक्त होण्याकरतां पैका पाहिजे असला तरीही तो आपण वाटेल तितका देऊं. दुःखमग्न झालेल्या अबलेच्या दुःख-विमोचनापेक्षां दुसरें कोणतें कार्य अधिक पुण्यप्रद आहे ? मुख्य मुद्दा हा कीं, ती स्त्री स्वरूपानं देखणी पाहिजे.

**मोहसंघः**—आपलें मनौदार्य व विचाराचा उदात्तपणा काय वर्णन करावा. आपल्याला पूर्ण पसंत होईल अशीच मीं निवड केली आहे. भोग-पाल व त्याची पत्नी माधवी यांचा बेबनाव झाला आहे. माधवीला राजयोग पाहिजे आहे. त्या सुखलोलुप व रंगेल स्त्रीला स्वातंत्र्यतऱ्हेनें विलास भोगण्याची दृढ वासना आहे. नवऱ्याचें मत तिच्याहून भिन्न आहे. भोगपालाच्या

शिरजोरपणाचा तिला कंटाळा आला आहे. पण त्याकामीं नाइलाज ह्मणूनच ती आपल्या मनांत झुरत राहिली आहे. तिचें व माझें कांहीं मोडून देण्याबद्दल भाषण वगैरे झालें नाहीं; तरीपण भोगपालाची खोड मोडण्यासाठीं ती पळून जाण्यास तयार होण्यास अडचण पडणार नाहीं. माधवी नाहींशी झाली ह्मणजे भोगपाल भांबावेल. पत्नीप्राप्तीच्या आशेनें तो आपलें वाटेल तें ह्मणणें कबूल करील. तसें न झालें तर माधवीला आपण त्याचा मुळींच त्याग करण्याचा उपदेश करूं. द्रव्य, सुख, वैभव, विलास व स्वातंत्र्य यांच्या मोहानें ती आपला उपदेश मान्य करील. भोगपालानें आपल्या अटी कबूल केल्या तर आपण त्याला माधवी मिळवून देण्याच्या नादांतच अखेरपर्यंत ठेवूं. पुढें त्याला जरी माधवीचें दर्शन घडलें किंवा तिचा पूर्ण तपास लागला तरी बहुत दिवस परक्याच्या घरात गुप्ततेनें तिच्या वास्तव्याचा विचार मनांत आणून भोगपाल तिला स्वीकारणार नाहीं. तात्पर्य, कसेंही असलें तरी आपलें कार्य साधेल यांत संशयच नाहीं. तसा प्रसंग येण्याच्या आंत आपण तिला गुप्ततेनें संभाळावी, तिला लोभ दाखवावा, मोह घालावा, ह्मणजे ती भोगपालाचा त्याग करून आपल्याशीं विवाह करण्यास तयार होईल. कशी काय आहे ही योजना ?

**जयसिंगः**— आपल्या योजनेचें महत्व कोणी गावें ? ती बिनमोल असा-वयाचीच. माधवीसारखी स्वरूपसुंदर स्त्री हजारांत सांपडायची नाहीं. अशा स्त्रीच्या दुःख देणाऱ्या नवऱ्याला चांगलेंच दुःख भोगण्यास लावलें पाहिजे. माधवीसारख्या पत्नीची मर्जी मोडणाऱ्या पतीला पश्चात्ताप करण्याचा प्रसंग आणलाच पाहिजे. अशा शिरजोर मनुष्याला त्याचा अधिकार कळण्याकरतां तरी निदान चांगलेंच अंजन घातलें पाहिजे. त्या माधवीला मी जीव कीं प्राण करीन. तिचें मन यत्किंचितही मी दुखविणार नाहीं. मी आजपर्यंत पुन्हां लग्न न करतां राहिलों त्याचें सार्थक होणारसें दिसतें. या कृत्याबद्दल मी तुम्हाला सिंधुदेशाचे तीन हिस्से देण्यासही कबूल आहे. मला चौथा भाग पुरे. पाव हिस्सा ह्मणजे माधवीच्या सौंदर्यावरून ओंवाळून टाकण्यासारखा आहे; पण हें सर्व जमून येईलना ?

**मोहसंधः**—आपण अगदीं निश्चिंत असा. आतां आपण सर्वतोपरी एक झालों आहों. आपले शत्रु तेच माझे शत्रु व माझे शत्रु तेच आपले शत्रु! आपले मित्र तेच माझे मित्र आणि माझे मित्र तेच आपले मित्र, तात्पर्य आपलें

परस्परांचे हेतु, साध्य, साधन, वांच्छा, आकांक्षा, आवड, तिटकारा या सर्व गोष्टींचा मिलाफ झाल्यावर आपणांतून कोणाही एकाला कोणत्याही गोष्टीची काळजी असणें शक्यच नाहीं.

**जयसिंग**:—आतां जास्त कांहीं बोलण्याचें कारण उरलें नाहीं. राजपुत्र धर्मध्वज याला प्रथमतः नाहींसा करण्याचा घाट जमवून आणावयाचा. त्याची साधारण मिती मुकरर करावी असें मी ह्मणतों.

**मोहसंग**:—तसें करतां येणार नाहीं. प्रथमतः तें काम गुप्ततेनें उरकण्याचा घाट घातला पाहिजे आधींच उघड प्रयत्न करून वैरभाव जाहीर करणें बरें नाहीं. ही सर्व तजवीज मी आपल्या पत्नीच्या द्वारें उरकण्याचा बेत जमवितों. सर्व कार्यांत माझी पत्नी शांभवी ही मला अनुकूल असणारच ! शांभवी ह्मणजे पतिमानसानुकूल अशी कल्पलताच आहे.

इतका प्रकार होऊन व आणखी कांहीं अशाच मासल्याचें किरकोळ भाषण करून त्यांनीं तो गुप्त संवाद आटोपला. त्यांचें सर्व गुप्त बेत जमवून आणण्याचा उहापोह संपला. हेतुप्राप्तीचें सर्व मार्ग स्थापित झाल्यामुळें त्यांचें चित्त प्रसन्न झालें. आपले परस्पर हेतु सिद्ध झालेच असें मानून ते आत्तांच यशप्राप्तीच्या आनंदांतील आस्वाद घेताहेतसें दिसलें; नंतर त्यांनीं आनंदानें पुन्हां फराळ केला. दोन दोन पेले पाणी झोंकून ते घोडयावर स्वार झाले, आणि त्या शूर ह्मणविणाऱ्या पण शूरत्व व वीर्यवृत्तीला अत्यंत शोभादायक अशा सत्य, विश्वास, नेकी, शुद्धता, पावित्र्य, सत्व इत्यादि उज्ज्वलगुणरहित अशा नरवीरांनीं— द्विपाद हिंस्रपशूंनीं, चांडालांनीं आपापलें वारू चौखुरी उडविले.

---

## प्रकरण १५ वें.

### खुलतेपुतणे.




चें डोकें भ्रमलेलें नाहीं, जो वेडा नाहीं, जो भकलेला नाहीं अशा प्रत्येक माणसाला सुख हें हवेंच असतें. त्याचप्रमाणें त्याला आपल्या शहाणपणाची महती विशेष वाटत असते. दुसऱ्यापेक्षां आपण चतुर, हुशार व अक्कलवान् आहों असें ठरविण्याकडे बहुतेकांची प्रवृत्ति असते. साधारण जनतेची भावनाही अशी असते मग विद्वान व ज्ञानी ह्मणविणाऱ्यांची हवाल तर विचारावयासच नको. शंभर पुरुष एके ठिकाणीं खपतील पण चार बायका एके ठिकाणीं खपणार नाहींत, अशी ह्मण सामान्यतः प्रचारांत आहे स्त्रीजातीच्या साधारण अज्ञानाचा विचार केला ह्मणजे त्यांच्या बाबतींत ही ह्मण लागूं करण्यास बरें पडतें व लज्जाविनयसंपन्न स्त्रीजनांना ती निमुटपणें सहन करावी लागते. परंतु ज्ञानवान्, शहाण्या व सुशिक्षित ह्मणविणारांनाच अशा प्रकारची ह्मण लागूं पडण्यास हरकत दिसत नाहीं. शंभर अजाण बायका एके ठिकाणीं खपतील, दोन आचारीही स्वयंपाक न बिघडविता तो उत्तमप्रकारें पार पाडतील, पण सुशिक्षित ह्मणविणाऱ्या दोन ज्ञानाढयांचें कोणत्याही बाबतींत जमणार नाहीं, ही म्हण सार्थ होणें कोणत्याही प्रकारें दुर्घट नाहीं. ज्यांच्या बाबतींत ही ह्मण अस्थानी होण्याचा संभव आहे ते या नियमास केवळ अपवादक होत. याचें कारण पाहूं गेलें असतां ते पंडितमन्य मूढ असतात असें नाहीं. तर आपली जाणीव, चातुर्य, ज्ञान, बुद्धिमत्ता, विद्वत्ता, कौशल्य यांचें प्राबल्य स्थापण्याची दृढ भावना त्यांना मूढ बनविते. ज्ञानाच्या भरांत त्यांचा मूढपणा त्यांनां समजत नाहीं. त्यांच्या विद्वत्तेवर व वाक्चापल्यावर नजर देऊन कोणी त्यांना तसें ह्मणण्याला धजत नाहीं इतकेंच. ज्ञान, शहाणपणा, घमेंड यांच्या जोरावर ते कोणतेंही कृत्य करण्याची खबरदारी घेण्यांतच ज्ञानाची महति समजतात. आपलीं कारस्थानें यशस्वी करण्याबद्दल त्यांची स्वतःच्या चातुर्यावर मदार असते. महत्वाकांक्षेच्या अमर्यादपणानें हवीं तीं घातकीं कृत्यें करण्यास सरसावणाऱ्या जनांचा विचार तर मनांतच

आणावयास नको. आपलीं कृष्णकारस्थानें गुप्ततेनें करण्याची ते अत्यंत दक्षता बाळगतात. मोठ्या काळजीनें, सावधगिरीनें, चाणाक्षपणानें व दूरदर्शित्वानें ते एकांताविषयीं जपतात; व आपला एकांत पूर्णपणें साधल्याबद्दल स्वतःच्या चातुर्याचा व कर्तृत्वाचा विचार मनांत आणून आनंदातिशयानें तल्लिन होतात. पण बिचाऱ्यांना ईश्वराच्या घरचा नियम समजत नाहीं. माणसापासून आपलीं भ्रष्ट कृत्यें लपविण्याकरतां किंवा आपले भ्रष्ट विचार लपविण्यासाठीं ते ज्या एकांताची खबरदारी घेतात त्या एकांतांतही आपले घातकी विचार ईश्वर ऐकतो व आपलीं राक्षसी कृत्यें देव पाहतो हें बिचाऱ्यांच्या ध्यानीं मनींही नसतें. आपण अगदीं सुरक्षित आहों अशी त्यांची मानवी कल्पना असते. पण मानवी कल्पनेला ज्याच्या लीलांचा पत्ताही लागावयाचा नाहीं तो शुद्ध-सत्वाभिमानी, सर्वसाक्षी परमात्मा सात्विक व शुद्ध जनांच्या संरक्षणाची तजवीज करण्यास चुकत नाहीं हें तत्व त्यांना अनुभव पटून पश्चात्ताप झाल्यावांचून नीटसें समजत नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय !

जयसिंग व मोहसंव या दोघां गर्वोन्मत्तांची तशीच स्थिति झाली. आपले विचार स्पष्ट झाले; आपण एकमेकांचे स्नेही बनलों, आपले दुष्ट हेतु सफल होण्याची तजवीज झाली आणि या सर्व गोष्टी एकांतांत पार पडल्या या कल्पनांत दंग होऊन त्यांनीं राजधानीकडे आपले घोडे पिटाळले; पण सात्विक, दीन, भोळे व निरपराधी जनांच्या विरुद्ध रचलेलीं गुप्त कृष्णकारस्थानें ऐकण्यास ईश्वरानें त्यांच्या एकांताच्या जागीं आधींच दोन मनुष्यें आणून ठेविलीं असतील ही त्यांना कल्पनाही नव्हती ! ते दोघे दुष्ट ज्या गुल्मासमोरच्या स्वच्छ मैदानांत आपले दुष्ट विचार प्रकट करीत होते त्याच निबिड वृक्ष–गुल्मांत हीं दोन मनुष्यें वास्तव्य करीत होतीं. त्यांनीं त्या दुष्टांचें सर्व भाषण अथपासून इतिपर्यंत ऐकलें. त्यांच्या परस्परांच्या उघड भाषणावरून ते दोघे कोण, कोठले व त्यांचा घातकी विचार कोणा-बद्दल चालला आहे वगैरे गोष्टी त्या जाळींतील माणसांना बसल्या जागीं यथासांग समजून चुकल्या.

ते त्या गुल्मांतील गृहस्थ कोण असावेत बरें ? त्या दोन चांडाळकर्मी नरपशूंच्या हालचालींवर अति गुप्तपणें नजर राखून आधींच त्या ठिकाणीं येऊन दडून बसलेले त्यांच्यासारखेच ते कोणी घोरणी गृहस्थ असावेत काय?

नाहीं, अशांपैकीं ते कोणीही नव्हते. वाचकांना ते या ठिकाणीं प्रथमच माहीत व्हावयाचे आहेत. त्यांच्यापैकीं एक इसम वयानें सरासरी चाळिशीच्या सुमाराचा होता. त्याचा वेष एखाद्या तपी किंवा व्रतस्थ माणसाप्रमाणें होता. त्याच्या डोक्यावर जटासारखे केस होते. त्यांचा क्वचित् प्रसंगीं जूट बांधलेला असे. बाकी बहुतेक ते मोकळेच सोडलेले असत. त्याची दाढी साधारणतः लांब असून दोन्ही कानापासून हनुवटीसह सर्व वर्तुळरेषा तिनें व्यापलेली होती. तिला अनुरूप अशा त्या गृहस्थाच्या मिशा होत्या. त्या सर्व केशामुळें त्याचें नाक, दोन्ही डोळे व मिशांच्या दरम्यानचा कांहीं भाग व मिशा व दाढी यांच्या मधील क्वचित् भाग यावांचून त्याचा सर्व चेहरा केशाच्छादित दिसे. त्याचे ओठ लालसर असून डोळे तांबूसवर्णानें युक्त दिसत. तो कोणी बैरागी किंवा भिक्षा मागणारा गोसावी नव्हता. तो अंमल वगैरे करणारा नव्हता. तरीपण त्याचे डोळे नेहमीं धुंद असल्यासारखे वाटत. त्याच्या ओठांची ठेवण आणि भुंवयांची खालींवर होणारी हालचाल यावरून त्याची चर्या गंभीर किंवा विचारार्त दिसे.

त्याचा जोडीदार हा अगदीं तरुण मनुष्य होता. त्याचें वय तेरा किंवा चौदा वर्षांचें असावेसें वाटे. हा तरुण सौंदर्यसंपन्न असून त्याचा चेहरा मोठा मोहक व तरतरीत दिसे. त्याच्या चेहऱ्यावर तारुण्याची छाया पसरत चालली असल्यामुळें त्याचे जात्याच उत्कृष्ट असलेले नाक, डोळे, ओठ, गाल, हनुवटी इत्यादि अवयव मोठे खुलून दिसावयास लागले होते. त्याला अद्याप मिसरूटही फुटावयास लागलेलें दिसत नव्हतें. त्याचे केश काळे कुळकुळीत असून त्यांचा भांग राखलेला होता. ते दोन्ही अंगास मोकळेच सोडलेले असत. त्याचें एकंदर सौंदर्य मृदु व वेधक दिसे. त्यावरून असें वाटे कीं, तो लहानपणापासून श्रीमंत स्थितींतल्या आईबापांचा अत्यंत लाडका व अतिशय जपलेला मुलगा असावा. वडील मनुष्याचें नांव भद्रपती असें असून धाकट्याचें नांव नित्यंक असें होतें. हा भद्रपती त्या नित्यंकाला आपला पुतण्या असें म्हणवी.

हे दोन्ही चुलते पुतणे कांहीं आपत्काळामुळें विदेशामध्यें असे भणंगाप्रमाणें भटकत होते. जयसिंग व मोहसंघ यांचें भाषण चाललें असतां जयसिंगानें ज्या दीक्षादेवीचा उल्लेख केला तिचा हा भद्रपति मामा होय.

जयसिंगानें मोहसंघास सुबाहू व त्याची कन्या दीक्षा यांच्याविषयीं जी हवाल सांगितली ती वस्तुतः खरी नव्हती. कलिंगाधिपती राजा सुबाहू हा कांहीं कोणी मोठा बलवान किंवा विख्यात राजेश्वर नव्हता. कलिंगनांवाच्या विख्यात व विस्तृत देशाच्या नांवाशीं साम्य असणारें हें कलिंगनांवाचें एक छोटेखानी संस्थान होतें. फार पुरातन काळीं येथील अधिपतींनीं आपल्या पराक्रमानें मोठा नांवलौकिक कमवून ठेविला होता. पुढें काळाची अवकृपा होऊन कलिंगाच्या वैभवाचा लोप झाला. ऱ्हासस्थिति येतां येतां ते हल्लींच्या दीन स्थितीला येऊन पोंचलेलें संस्थान होतें. तरीपण तेथील संस्थानाधिपांना आपल्या पूर्वजांचा अत्यंत अभिमान असे. सुंभ जळला तरी पीळ जळत नाहीं अशांतलीच कलिंगाधीशाची अवस्था होती. सांप्रतकाळीं येथील अधिकारी पुरुष सुबाहु या नांवानें संपन्न होता. त्याला दीक्षा या नांवाची एकुलती एक कन्या होती. ती आपल्या आईबापांची फारच लाडकी असे. सुबाहूला मुलगा नव्हता तरी तो या कन्येवर दृष्टि देऊन समाधान मानी. सुपात्र पुत्राच्या ठिकाणींच तो आपल्या कन्येला समजून आनंदांत असे. तिला तो व त्याची सद्गुणी कांता दाक्षायणी हे दोघे दीक्षादेवी असें ह्मणत. ही दीक्षादेवी स्वरुपसुंदर, नाजुक, वळणशुद्ध अवयवांनीं युक्त व बहुगुणसंपन्न होती. सुबाहूला दोन तीन सावत्र बंधु होते. त्याची सापत्न माता अद्याप हयात होती. दीक्षादेवी मोठी झाली तेव्हां तिचें लग्न करून टाकावें असें सुबाहूच्या मनांत आलें. ती त्याची एकुलतीएक व लाडकी मुलगी असल्यानें त्याला तिच्या लहानपणींच तिचा लग्नसोहळा करावा अशी हौस उत्पन्न झाली. एकुलती एक मुलगी बालवयांत सासरी जाऊं लागली ह्मणजे आपणास तिचें वियोगजन्य दुःख असह्य होईल अशा कल्पनेनें तिला वाटेल तितकी प्रौढ करावी असें त्याच्या मनांत आलें नाहीं. कोणा वराकडून मागणी येण्याच्या पूर्वी तो आपण होऊन कन्येकरितां वराचा शोध करूं लागला. त्याला बहुगुणसंपन्न वर पाहिजे होता. संपत्ति, वैभव, विद्वत्ता, ज्ञानसंपन्नता, सौंदर्य यापेक्षां सदाचार, कर्तव्यपरायणता, शुद्धता, कुल, शील, सत्व, धर्मप्रेम इत्यादि गुणांवरच सुबाहु, व दाक्षायणी यांची विशेष भिस्त होती. दीक्षादेवी वयानें विशेषशी प्रौढ नव्हती तरी तेवढया वयांतच तिला सर्व गोष्टी समजत असत. लहानपणापासून तिला धार्मिक विषयांची गोडी असे. सत्वमय

चरित्रें, शुद्धवर्तनी माणसांच्या गोष्टी, भक्तजनांच्या दिव्य हकीगती आणि सद्गुणी स्त्रीपुरुषांचीं कथानकें यांतच ती तरुण बाला तन्मय झालेली दिसे. त्यावरून ती सद्गुणलोलुप पोरगी पुढें दोन्ही कुलांना भूषणभूत होऊन राहील अशा आशेनें व कल्पनेनें तिचे आईबाप व इतर लोभांतलीं माणसें अतिशय आनंद पावत.

सुबाहु तशा गुणसंपन्न राजपुत्राचा शोध करीत आहे ही वार्ता चोहोंकडे जाहीर झाली. पुष्कळ राजपुत्र त्याच्या आढळांत आले पण त्याच्या मनाप्रमाणें त्यांतील एकही त्याला पसंत झाला नाहीं. त्याच्या सावत्रभावांनींही लौकिकार्थ तरी निदान राजपुत्र किंवा सधनस्थितींतील अविवाहित पुत्रांचा तपास चालविला. त्यांतील एका भावाची व जयसिंग सरदाराची कांहीं कारणानें मुलाखत होऊन स्नेह जडला. गोष्टी निघतां निघतां जयसिंगाच्या कामसेनाची गोष्ट निघून जयसिंगानें त्या सावत्र भावाजवळ दीक्षादेवीची मागणी केली. सावत्रभावानें सुबाहूला तो वृत्तांत कळवून विचार करण्यास सांगितलें. सुबाहु ते वेळीं सहज बोलून गेला कीं, "तो कामसेन खरोखरच सद्गुणसंपन्न व कुलशीलवान असेल तर त्याला जांवई करण्यास हरकत नाहीं." एवढयाच वाक्याचा आधार घेऊन दीक्षेच्या सावत्र चुलत्यानें जयसिंगास बेलाशक रुकार दिला. आतां कांहीं दिवसांत लग्ननिश्चय करावयाचा तेवढयांत सुबाहूला कामसेनाचें खरें वर्णन कळून चुकलें. तो स्वतः त्यास पाहण्यासाठीं जाणार होता; पण खात्रिलायक व विश्वसनीय माहितीवरून कामसेनाचें खरें स्वरूप कळून येतांच त्यानें त्या स्थळाचें पुन्हां कधीं नांवही काढलें नाहीं. जयसिंगाची तर त्या सावत्र भावास सारखी निकड लागली. सरदार जयसिंगाचा अभिमानी स्वभाव, शौर्य, पराक्रम व रोष या गोष्टींचा विचार करतां तो सावत्र काका मोठ्या पंचायतींत पडला. त्याला स्पष्टपणें नाहीं म्हणवेना. नकार द्यावा तर नकाराचें खरें कारण व्यक्त करण्याचें धाडस त्याच्यानें होईना. त्यानें जयसिंगाला सारखी थापाथापी चालवून तसाच नादांत ठेवला. अखेर जयसिंग निर्वाणीला आला आणि त्यानें स्वतः समक्ष कलिंगराजाला भेटावयास येण्याचा निश्चय कळविला. तेव्हां त्या सावत्र भावानें त्याच्याशीं नम्र बोलणें करून कांहीं मुदत मागून घेतली. तेवढ्या अवधींत त्यानें कपट करून गुप्तपणें सुबाहूला विषप्रयोग केला. वस्तुतः त्याचा बेत सुबाहु

मरावा असा नव्हता. सुबाहु विगलित होऊन धरणीला खिळून पडला म्हणजे तो नादान बनून आपल्या आधीन होईल आणि मगआपण करूं ती पूर्व दिशा; अशा समजुतीनें त्यानें तसें धाडस केलें. पण दुर्दैवानें विषाचा जोर होऊन तो सुबाहूच्या प्रकृतीला सहन झाला नाहीं आणि त्यांतच त्याचें प्राणोत्क्रमण झालें.

सुबाहूच्या अकस्मिक मृत्यूचा सर्वांना संशय आला पण मृत्यूच्या कारणाचा विचार करीत न बसतां दाक्षायणी त्या पतिमृत्यूनें व्याकूळ होऊन पडली. तिनें सती जाण्याची इच्छा दर्शविली. इतर कळकळीच्या माणसांनीं तिचें मन तशा भयंकर गोष्टीपासून परावृत्त करण्याचा बहुत यत्न केला. त्या योगानें तिचें सती जाणें तहकूब राहिलें. पण त्या पातिव्रत्यसंपन्न साध्वीला तेव्हांपासून प्राणाचें ओझें वाटूं लागलें. ती मानसिक अस्वस्थतेनें गांजून गेली. तिला अन्नपाणी गोड लागेना. पति हेंच दैवत, पति हीच स्त्रीची शोभा, पति हेंच स्त्रीचें सौभाग्य, पति हाच स्त्रीचा अलंकार, पति हाच स्त्रीचा आत्मा या भावनेनें संपन्न अशा केवळ सनातनधर्मीय उज्वल पतिव्रतांना पतीच्या पश्चात् सर्व जगत् शून्य भासावें आणि निराशेच्या परमावधीनें त्यांना हृद्रोग लागून त्यांचा अंत व्हावा यांत आश्चर्य कसलें! सुबाहूच्या पाठीमागें थोडयाच कालांत दाक्षायणीनें पतिलोकीं गमन केलें. पण ती स्त्री फार धोरणी होती. तिनें आपल्या पतीची इच्छा ध्यानांत बागविली. आपली कन्या दीक्षादेवी ही मातापित्यांच्या आज्ञेस व आशिर्वादास पुण्यप्रद मानणारी आहे असें जाणून तिनें अंतसमयीं आपल्या भावास बोलावणें पाठवून त्याला दीक्षेच्या विवाहासंबंधाची सुबाहूची इच्छाही कळवून दीक्षादेवीला आपल्या घरीं घेऊन जाण्याबद्दल निरोप पाठविला. पण तिचा भाऊ तेथें दाखल होण्याच्या पूर्वीच दाक्षायणीनें देह ठेवला. आपला मामा समयाला दाखल झाला नाहीं हें पाहून दीक्षादेवी घाबरली. आतां आपण स्वस्थ राहिलों तर आपण आपल्या सावत्र चुलत्याच्या हातांत सांपडूं व तो आपल्याला कामसेनाच्या हवालीं करील असें वाटून त्या चाणाक्ष, नम्र व विनयशील पोरीनें पळून जाण्याचें धाडस केलें. तिनें अर्थातच आपल्या मामाच्या घराचा रस्ता धरला. पण पुढें तिचें काय झालें याची कोणासच वार्ता लागली नाहीं. तिचा मामा बहिणीच्या निरोपाप्रमाणें कलिंगास येण्यासाठीं निघाला; पण वाटेंत त्याला नसत्याच संकटांत पडावें

लागून कलिंगास येण्यास उशीर लागला. तो जेव्हां कलिंगास दाखल झाला तेव्हां दीक्षादेवी एकाएकीं नाहींशी झाली अशी वार्ता त्याला समजली. तेव्हां त्याला अत्यंत कष्ट वाटले. तो वेड्यासारखा होऊन निमुटपणें आपल्या देशाला परतला. आपल्या भाचीनें कदाचित् आत्मघात करून घेतला असेल, अगर तिच्या सावत्र चुलत्यांनीं तिला ठार केलें असेल किंवा गुप्तपणानें सरदार जयसिंगाच्याही हवालीं केलें असेल असे त्याचे अनेक तर्क वाहूं लागले. त्या विचारांत तो कांहींतरी निश्चय ठरवून तिच्या शोधाचा एखादा मार्ग काढण्यांत गुंग होऊन राहिला.

दीक्षादेवीचा कांहींच पत्ता नाहीं ह्मणून तिच्या चुलत्यांनीं तिचा फार बारकाईनें शोध केला. तिचा कांहींच थांग लागत नाहीं असें पाहून त्यांना तिनें आत्महत्या केली असावी असा संशय आला. पण तिच्या मामानें मुद्दाम कपटाचा अवलंब करून आपणास फसविण्यासाठींच दीक्षेच्या शोधाकरतां आपल्याकडे येण्याचा बहाणा केला असावा अशी त्यांची कल्पना झाली. कांहीं बातमीदारांच्या माहितीनें त्यांच्या कल्पनेस पुष्टी मिळून त्यांनीं तिच्या मामाच्या घरावर अकस्मात् छापा घातला. आतां आपली धडगत नाहीं असें पाहून त्या मामानें आपल्या पुतण्याला घेऊन घरांतून पलायन केलें. या मामाला पत्नी वगैरे नव्हती. त्याच्या घरामध्यें बहुतेक परकीं माणसेंच भरलीं होतीं. तो स्वभावाचा उदार व मनमिळाऊ होता. तो स्थितिसंपन्न होता. त्याला मूलबाळ कांहींएक राहिलेलें नव्हतें. वैतागानें किंवा ज्ञानजन्य शांततेनें ती धर्मकर्म करण्यांत गढलेला असे. त्यानें आपली स्थितिसंपन्नता जाणून सर्व परकी माणसांनीं आपलें घर सजविलें होतें. तीं माणसें त्याचा उदारपणा ध्यानांत आणून अगदीं घरच्या माणसाप्रमाणें त्याला धरून होतीं. एखाद्या गैरमाहीत तिऱ्हाइताला त्याच्या घरांतील माणसांच्या परकेपणाचा थोडासुद्धा संशय येत नसे. त्याला सख्खा असा कायतो एक पुतण्या होता असा लोकांचा समज होता. घरावर अकस्मात् छापा पडला आणि तो दीक्षादेवीच्या हरणार्थ पडला आहे अशी त्यांनल्यात्यांत वार्ता समजून त्या बहादरानें तशा बिकट समयीं घरदार, पैसाअडका, वस्त्रपात्र, जडजवाहीर यां सर्वांवर पाणी सोडून प्राणाच्या किंवा हालअपेष्टेच्या भयानें चोरवाटेनें पलायन केलें. त्यावेळीं त्यानें आपला पुतण्यामात्र बरोबर घेतला असा बोभाटा झाला. कलिंगाधिपतीनें

त्याच्या घराची, शेतवाडीची, वतनाची, जिनगानीची वाट लावली. त्यांनी त्याचें सर्व कांहीं लुबाडलें. पण अखेर आपलें इच्छित कार्य साधलें नाहीं म्हणून निराश होऊन ते आपल्या देशाला हात हालवीत परत गेले.

देश आणि गृह यांचा त्याग करून यात्रेच्या मिषानें पृथ्वीवर हिंडतां हिंडतां आपलें इच्छित कार्य झालें तर पहावें असा दृढनिश्चय करून ते चुलते पुतणे संचारार्थ प्रवासास निघाले. ते त्यांना योग्य वाटेल त्या स्थलीं मन मानेल तितके दिवस रहात आणि मर्जी लागेल तेव्हां पुन्हां मुक्काम हालवीत. असा क्रम चालू असतां कालेंकरून ते दोघे कांतार या नांवाच्या महारण्यांत प्राप्त झाले होते. त्या अरण्यांतील एखाद्या अवलियाचें दर्शन व्हावें म्हणूनही कदाचित् त्यांनीं भयंकर अरण्यप्रवेशाचें धाडस केलें असावें. त्यांचा खरा उद्देश काय होता व जो सत्य उद्देश होता तो कितपत साध्य झाला होता याविषयींची सर्व कल्पना सोडून दिली तरी ते यासमयीं त्या वनाचे रहिवासी झाले होते. त्यांनीं निर्भयपणासाठीं त्या निबिड गुल्माचा आश्रय केला होता. त्यामध्यें वास्तव्य असतांना त्यांना जयसिंग व मोहसंघ यांचा दुष्ट व घातकी संवाद श्रुत झाला. आतां या सर्व हकीकतीवरून त्या गुल्मांतील रहिवासी जे भद्रपति आणि नित्यंक तेच इतका वेळ वर्णन केलेले चुलते पुतणे होत आणि भद्रपति हाच दीक्षादेवीचा मामा होय हें कांहीं आणखी स्पष्ट तऱ्हेनें सांगण्याचें प्रयोजन नाहीं.

---

## प्रकरण १६ वें.



### अरण्यत्याग.



राजपुत्र धर्मध्वज याला कांहींतरी अपाय होणार ही गोष्ट ऐकून नित्यंकाचें चित्त अतिशय व्याकुळ झालें. भद्रपतीला त्या दोन दुष्टांचा घातकी संकल्प ऐकून वाईट वाटलें नाहीं असें नाहीं. भूतदया या भावनेनें भद्रपतीचें चित्तही कळवळलें. आपल्याला तो दुष्ट बेत विदित झाल्याचा शक्य तो फायदा धर्मध्वजाच्या संकटनिवारणार्थ उपयोगीं पडावा अशी त्याची सामान्य भावना झाली. कामसेन व सरदार

जयसिंग यांचा दीक्षादेवीसंबंधाचा कृतसंकल्प ऐकल्या कारणानें त्याविषयींही फार सावधगिरी राखली पाहिजे असें त्यानें आपल्या मनाशीं ठरवून ठेविलें. पण नित्यंकाच्या मनाला ती गोष्ट विशेषच डाचत राहिली. त्याची ती स्थिति मनांत आणून भद्रपतीनें नित्यंकाला विचारलें, " कामसेन दीक्षादेवी-वर घाला घालणार आहे यासंबंधानें आपल्याला फार जपलें पाहिजे. कारण, दीक्षादेवी तसल्या बदकर्मी व भ्रष्ट मनुष्याच्या स्वाधीन झाली तर तिचे फार हाल होतील. ती त्या हीनवर्तनी माणसाला कधींही माळ घालणार नाहीं. कामसेन व सरदार जयसिंग हे नीच आहेत हें आतां सिद्ध करावयाचें कारण नाहीं. आणि नीच मनुष्यांची मर्जी मोडण्याइतकें भयंकर कांहीं नाहीं. तेव्हां अशा यातनासमुद्रांत उडी टाकण्याचें धाडस करण्यापेक्षां दीक्षादेवीनें कामसेनाचाच स्वीकार करावा म्हणजे कांहींएक धोका राहणार नाहीं. "

भद्रपतीचें हें भाषण ऐकतांच नित्यंक जरासा व्यग्र झाला. तो किंचित् कष्टी होऊन म्हणाला, " काका ! आपण असें कसें म्हणतां ? दीक्षादेवीचें हृद्गत मला पूर्णपणें माहीत आहे याबद्दल तर आपल्याला शंका असणें संभवनीय नाहीं. राजा सुबाहूनें कामसेनाला तसें वचन दिलें असतें तर केवळ पित्राज्ञा मान्य करण्याकरतां दीक्षेला त्या पापमय कामसेनाला वरणें भाग होतें; पण सुबाहु किंवा त्याची पत्नी दाक्षायणी या पवित्र जोडप्याची इच्छा काय होती ती तुम्हाला ठाऊकच आहे; मग दीक्षेनें त्या नीचास स्वीकारावें असें आपणास बोलवतें तरी कसें ! "

नित्यंकाचा हा प्रश्न ऐकून भद्रपती बोलला, " लहानपणीं तूं व दीक्षा अगदीं एकजीवानें राहत होता हें मी जाणतों. तुझें म्हणणें योग्य आहे. सुबाहु व दाक्षायणी यांची इच्छाही मला ठाऊक आहे. सर्व कांहीं खरें आहे पण उपयोग काय ! आज प्रसंग काय आहे तें आपण पाहिलें पाहिजे. आईबापांना इच्छा करण्यास अवघड कांहीं नव्हतें. त्याचा वाईट परिणाम मागें उरलेल्या माणसांना कसा भोगावा लागत आहे हें आपण ध्यानांत आणलें पाहिजे. आपल्या घरादाराचें वाटोळें होऊन आपल्याला भणंगाप्रमाणें परागंदा होऊन भटकावें लागत आहे याचें कारण काय ? तर दीक्षेच्या मनांतील कामसेनाविषयींचा तिटकारा आणि तिचें मातृपितृ-चरणावरील प्रेम हेंच होय ! मी म्हणतों, आजच्या स्थितीला सुबाहु जिवंत

असतां तरी त्यानें देखील आपला हट्ट सोडून आपल्या हातानें दीक्षेचें कामसेनालाच दान केलें असतें. ''

भद्रपतीची कल्पना चूक आहे असें जाणून नित्यंकानें सांगितलें, '' हा तुमचा भ्रम आहे. संकटांना भिऊन शुद्धमार्गप्रिय जन शुद्ध कल्पनांचा त्याग करण्यास तयार होत नसतात. धर्मगामी मनुष्यें विमल यशाला प्राणापलीकडे जपतात. सद्गुणाच्या संगतीनें उत्पन्न होणाऱ्या संकटासच ते दुर्गुणाच्या सहवासानें प्राप्त होणाऱ्या सुखापेक्षां जास्त आनंदकारक मानतात. सुबाहु-संबंधानें आपण अशी भलती कल्पना करणें योग्य नव्हे. ''

यावर भद्रपतीनें सुबाहूचा मुद्दा सोडून दिला. तो कामसेनाचा थोडासा कैवार घेऊन म्हणाला, '' कामसेनाच्या अंगांत येवढे दुर्गुण तरी काय भरले आहेत ! तो सद्गुणी नाहीं हें मला कबूल आहे. पण इतर राजपुत्र किंवा सरदारपुत्र यांच्यांत जसें कांहीं दुर्गुण सांपडणें साहजिक आहे तसेच दुर्गुण कामसेनांत सांपडतील ! सर्वसद्गुणी कोणीहि नाहीं तसा सर्वदुर्गुणी तरी कोण सांपडणार ? मी ह्मणतों, प्रसंगावर नजर देऊन कामसेनाचे दुर्गुण क्षम्य समजून असतील त्या गुणांवरच ध्यान ठेवावें ह्मणजे झालें. ''

चुलत्याचा हा झोक नित्यंकानें ओळखला. आपण त्याच्या तसल्या मताला कितपत अनुकूल होतों हें पाहण्याच्या मतलबानेंही तो मुद्दाम तसें बोलत असेल असा त्याला संशय उत्पन्न झाला. कसेंही असलें तरी तो वाद आटपणें बरें असें ठरवून आपल्या मनाचा निर्धार व्यक्त करण्याकरितां नित्यंक निक्षून बोलला, '' जयसिंगासारखा श्वशुर आणि त्याच्या कामसेन पुत्राप्रमाणें पति यांचा लाभ करण्यापेक्षां दीक्षेसारख्या कन्येनें आमरणांत अविवाहित राहणेंच जास्त चांगलें. ''

त्याचा हा दृढ निर्धार ऐकून भद्रपती बोलला, '' तुझें ह्मणणें वावगें आहे असें माझें मुळींच मत नाहीं. मीं आपला एक सुचलेला विचार तुला कळवून पाहिला. असो, तुझ्या या शुद्धभावनेचा मला आनंदच वाटतो. पण धर्मध्वजाला अपाय होणार या भावनेनें तूं विशेष व्यथित झाल्यासारखा दिसतोस हें काय ? तूं तो राजपुत्र पाहिलाही नसशील एवढेंच नव्हे तर त्याविषयीं कांहीं वार्ताही तुझ्या कानावर असणें शक्य नाहीं. ! ''

हा प्रश्न मोठा धोरणाचा होता. त्यांतील धोरण ओळखून नित्यंक ह्मणाला, '' माझ्या नेत्रास त्या राजपुत्राच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ अद्याप

झाला नाहीं. पण त्यांच्या सद्गुणाची कीर्ति माझ्या कानांत अद्याप एकसारखी गुणगुणत आहे. आपणाजवळ आजपावेतों मी त्या बाबतींतील एक चकार शब्दही काढला नाहीं हें निराळें! पण त्या राजपुत्रासंबंधानें बरीच हकीकत मला विदित आहे."

नित्यंकाच्या कानावर धर्मध्वजाचा वृत्तांत जाण्याचें कारण कळण्यासाठीं भद्रपती ह्मणाला, "हें कसें काय ? आह्माला त्याच्या जन्माचा वृत्तांत विदित आहे. भारती नांवाच्या कोणा महात्म्याच्या कृपेनें तो वसुप्रसादास प्राप्त झाला आहे अशी हकीगत ऐकल्याचें मला स्मरतें. पण तुला त्याची इतकी बारिक माहिती लागण्याचा संभव दिसत नाहीं."

भद्रपतीच्या मनाचा घोटाळा दूर करण्याकरतां नित्यंक सांगूं लागला, "राजा सुबाहु दीक्षादेवीकरतां वराची निवड करीत असतां त्यांच्या वाड्यांत एक भटजी पाहुणा म्हणून आला होता. त्या भटजींचें नांव दमन असें होतें. तो मोठा विद्वान, शुद्ध व पवित्र ब्राह्मण आहे. तो राजा वसुप्रसादाचा पुरोहित आहे. तो आज पिढ्यानपिढ्या सिंधावतीस रहात आहे; तरी पण त्याचे अगदीं प्राचीन पूर्वज कलिंगनगरीचें रहिवासी होते. कलिंगापासून पांच चार कोसांवर जें एक पद्मावती नांवाचें देवीचें स्थान आहे, तें आपणासही कदाचित् माहीत असेल. तें त्या पुरोहितांच्या घराण्याचें आद्यदैवत होय. कितीही पिढ्या झाल्या तरी त्या घराण्यांतील मंडळी या दैवताला विसरलेली नाहींत. त्यांच्या देव्हाऱ्यांतही पद्मावतीची मूर्तीच मुख्य असते. शिवाय हा राजपुत्र उत्पन्न होण्याच्यापूर्वी दमनपुरोहितांनीं पद्मावतीला राजपुत्राच्या जन्मासंबंधानें नवस केला होता. पुरातन आद्य, आदिमायेच्या मूलपीठाचें दर्शन आणि नवसाची फेड अशा उद्देशांनीं ते दमनपुरोहित कलिंगनगरीस येऊन सुबाहूच्या वाड्यांत उतरले होते. त्यांच्या बरोबर आणखीही कोणी माणसें होतीं. पण तीं कांहीं माझ्या लक्षांत नाहींत. मी त्यासमयीं सुबाहूच्या सन्निध होतो हें आपणास सांगणें नलगेच. त्यासमयीं दमनपुरोहितांना दीक्षादेवी फारच पसंत पडली. त्यांनीं तिला चार प्रश्नही विचारून पाहिले. तिची मातृपितृभक्ति, कुलशीलाभिमान, वाडवडीलांविषयींची आदरबुद्धि, धर्मप्रेम, विनयलज्जासंपन्नता, इत्यादि गोष्टी पाहून त्यांना ती अतिशय पसंत पडली. त्यावेळीं त्यांनीं त्या राजपुत्राच्या नांवाचा उच्चार करून त्याचें समग्र गुणवर्णन केलें आणि दीक्षादेवी व तो राजपुत्र यांचा जोडा अपूर्व

दिसेल असें त्यांनीं आपलें सत्य मत सांगितलें. राजा सुबाहूनेंही त्यावेळीं आपल्या मनाचा संकल्प करून दीक्षादेवी त्या राजपुत्राला दिली असे उद्गार काढले. दमनपुरोहितांनीं मात्र त्या संबंधानें अभिवचन दिलें नाहीं तरी तो योग जमवून आणण्याचा शक्य तो यत्न करण्याचें त्यांनीं पत्करलें. हा सर्व प्रकार पाहण्यास, दमनपुरोहित व राजा सुबाहु यांचें परस्पर भाषण ऐकण्यास दीक्षादेवी तेथेंच होती. तिचेंही चित्त राजपुत्राच्या सद्गुणांकडे वेधून राहिलें. त्या दिवसापासून दीक्षादेवी त्या राजपुत्राच्या दर्शनार्थ उत्सुक झालेली आहे. तिनें आपल्या मनानें व बापाच्या अनुज्ञेनें त्या राजपुत्रासच माळ घातली आहे. राजपुत्राच्या आईबापांच्या मतानें किंवा खुद्द त्या राजपुत्राच्या मनानें कोणी अन्य वधू पसंत होऊन त्यांचा विवाह झाला तरीही त्या राजपुत्रालाच माळ घालावयाची असा दीक्षेच्या मनाचा निर्धार झाला आहे. असा हा प्रकार असल्यानें धर्मध्वजराजपुत्राच्या जिवाला अपाय होण्याचा संभव माझ्या मनाला होरपळून टाकीत आहे. ”

नित्यंकाच्या या हकीगतीनें भद्रपतीचें चित्त वेधून राहिलें. त्याच्या तोंडांतील दीक्षेच्या वरपसंतीचीं अक्षरें त्याला विशेष संतोषदायक झालीं. तो आनंदित होऊन मोकळ्या मनानें म्हणाला, “ दीक्षादेवीचें हें हृद्गत ऐकून मला समाधान वाटत आहे. कारण मला त्या राजपुत्र धर्मध्वजाची इत्थंभूत हकीगत मुळापासून ठाऊक आहे. ज्याच्या प्रसादानें वसुप्रसादाला हा धर्मध्वज मिळाला तो महात्मा भारती माझा गुरु आहे. त्या पुरुषाचें महात्म्य कांहीं विलक्षण आहे. तो मनुष्य अगदीं साधा संसारी दिसतो तरी तो विश्वकुटुंबी, महाभाग्यवान् माहात्मा आहे. राजपुत्र धर्मध्वज आणि दीक्षादेवी यांचा विवाह घडवून आणावा म्हणजे परस्पर उच्च गुणांचें संमेलन झाल्याचा परमानंद भोगावयास सांपडेल. धर्मध्वज आणि दीक्षा या पतिपत्नींच्या पवित्र भावना व उच्चतम सदाचार यांचें सार्थक होईल आणि जयसिंग, कामसेन, वीरबाहु ( सुबाहूचा बंधु ) यांसारख्या द्विपाद पशूंच्या दुष्ट किंवा डरकाळ्या यांची भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं असा माझा ठाम बेत ठरल्यासारखाच होता व आहे. हा विवाहयोग घडवून आणण्याच्या कामीं भारती व दमनपुरोहित यांचें पूर्ण सहाय्य मिळून सर्व हेतु सफल होण्याचा मला भरंवसा आहे. पण कोणतीही गोष्ट प्रत्यक्ष घडेपर्यंत मनुष्याचें मन स्वस्थ नसतें. ”

याप्रमाणें त्या दोघांचें भाषण होऊन ते दोघे त्या जाळींतून बाहेर पडले. दोन तीन दिवसांत पुढील बेताची जुळणी बसवून त्यांनीं तें ठिकाण सोडण्याचा निश्चय केला. भद्रपती आतांपर्यंत आपल्या त्या पुतण्यासह जो लपत छपत या कांतारांत येऊन राहिला होता त्यांत तरी त्याचा हेतु यशस्कारावरील श्रीभारतीची भेट घेणें हाच होता. त्यानें हा काळपर्यंत नित्यंकाला फक्त यशस्कार पर्वताचेंच नांव कळविलें होतें; पण तेथील पूज्य विभूती भारती किंवा त्याचें श्रेष्ठत्व यांविषयीं त्यानें चकार-शब्दही काढला नव्हता. श्रीभारती त्या पर्वतावर येऊन राहण्याच्या काळास थोडा अवकाश असल्यामुळें तो त्या गुल्मांत छपून राहिला होता. आतां योग्य संधि प्राप्त होतांच तो नित्यंकासह यशस्काराकडे जाण्यासाठीं तयार झाला. त्याचे गुप्त विचार कळल्यामुळें नित्यंकही उल्हासयुक्त झाला आणि ईश्वरतुल्य श्रीभारतीच्या दर्शनाकरतां ते दोघे आतुर होऊन ठर-विलेल्या समयीं त्या भयानक, घोर, निबिड, अंधारमय पण त्यांना हितकर झालेल्या अरण्याचा त्याग करून अलकनंदेच्या रस्त्यास लागले.

---

## प्रकरण १७ वें.

### भुयारांतील बैठक.




पापल्या वचनास अनुसरून मोहसंघ व जयसिंग मोठ्या नेटानें उद्योगास लागले. जयसिंग आपल्या पदरीं अनेक लोक ठेवून आपलें सामर्थ्य वाढवूं लागला. वीरबाहूची नेमलेली मुदत टळतांच जयसिंग व कामसेन या पिता-पुत्रांनीं कांहीं निमित्त योजून वीरबाहूवर स्वारी करण्याचें ठरविलें. त्यासंबंधानें वसुप्रसादाची परवानगी मिळविण्यास काय कृत्रिम योजावें या विचारामध्यें ते दोघे घोटाळत आहेत तों सुबाहूचा बंधु वीरबाहू हा समक्ष त्यांच्या भेटीस आला. त्यानें आतांपर्यंत त्यांना फक्त सुबाहूची मरणवार्ता कळवून दीक्षेच्या विवाहाबद्दलची मुदत लांबवून घेतली होती. वर जी मुदत टळल्याचा उल्लेख आला आहे ती ही दुसरीच मुदत

होय. या मुलाखतींत वीरबाहूनें जयसिंग व कामसेन यांना दीक्षेचें पलायन, तिचा मामा भद्रपती व त्याचा पुतण्या नित्यंक यांच्यावरील छापा व त्यांची वाताहात यांविषयींचा मजकूर सांगितला. ती हकीगत ऐकून जयसिंगास नवल वाटलें. तो कांहींसा खिन्न झाला. पण कामसेन मात्र निराशेनें व्याकूळ झाला. त्याला प्रमिलेप्रमाणेंच दीक्षादेवीचाही अति दृढ लोभ उत्पन्न झालेला असल्याकारणानें त्याच्या निराशेमध्यें आशेचें कोंब निर्माण झाले. दीक्षादेवी बहुतेक आपल्या मामासंगतीं असली पाहिजे असा त्यानें तर्क केला. त्याचा तर्क कसा चुकीचा आहे याविषयीं वीरबाहु त्याची समजूत घालूं लागला पण त्याचें समाधान होईना. सुबाहूचा मेहुणा भद्रपती याच्या घरांत जर दीक्षादेवी नव्हती, त्याला जर दीक्षादेवीची कांहींच वार्ता ठाऊक नव्हती, उलट तो स्वतःच आपल्या भाचीच्या शोधार्थ हिंडत होता तर त्याला छाप्याला भिऊन पळून जाण्याचें कारणच नव्हतें. वीरबाहूला त्याचें वतन, घर, संपत्ती, जवाहीर कांहींएक नको होतें. त्याच्या जिवास अपाय करणें या गोष्टीचा त्याच्यावरील हल्ल्यांत गंधही नव्हता हें त्याला कळून चुकलें होतें. असें असतांना ज्याअर्थी तो गृहत्याग करून पळून गेला त्याअर्थी केवळ आपल्या भाचीच्या संरक्षणार्थच त्यानें तो पंथ स्वीकारला हें निश्चित असलें पाहिजे. अशा प्रकारच्या विचारसरणीनें कामसेनानेंच उलट वीरबाहूचें मन आपल्याप्रमाणें बनविलें. वीरबाहूला कामसेनाचा तर्क खरा वाटूं लागला. आतांपर्यंत तो कोणत्यानाकोणत्या तरी प्रकारानें जयसिंगाच्या अपरवादांतून मुक्त होण्यास झटत होता. पण कामसेनाच्या शंकेस संमति देण्याचा थोरपणा दाखविण्यांत त्यानें आपल्याला जास्तच भानगडींत गोवून घेतलें. भद्रपती व दीक्षादेवी यांचा शोध लागेपर्यंत वीरबाहु आपल्या जबाबदारींतून सुटत नाहीं असा जयसिंगाचाही अभिप्राय पडला. त्यानें त्याला भद्रपतीकडून अपाय होण्याची शक्यता दाखविली. भद्रपती हा पळून गेला आहे. तरीपण त्यानें दीक्षादेवीच्या अर्पणानें वसुप्रसाद किंवा तसाच कोणी दुसरा नृपति यांच्याशीं नातें जमविलें आणि आपला सूड उगवला तर आपल्याला सर्वस्वास मुकावें लागेल अशा दहशतीनें वीरबाहु घाबरा झाला. त्यानें आत्मरक्षणार्थ जयसिंगापुढें हात जोडले. त्याच्याकडून आपल्या हितसंरक्षणाची हमी घेऊन तो आत्महित गेला, वंधुवात ती वीरबाहु त्या पितापुत्रांचें वाटेल

तें ऐकण्यास तयार झाला. तेव्हां प्रमिलेच्या मागणीचा पूर्ण निकाल लागेपर्यंत दीक्षादेवीला हुडकून काढावयाची, भद्रपतीला ठार करावयाचें आणि दीक्षेशीं कामसेनाचा जबरीनें विवाह लावावयाचा असा त्यांचा निश्चय कायम ठरला.

मोहसंघानें वसुप्रसादाजवळ बोलणें काढतां काढतां रंग पाहून प्रमिले-विषयीं जयसिंगाच्या स्पष्ट मागणीचा उल्लेख केला. सरदार जयसिंगानें भलती हाव धरणें इष्ट नव्हे अशी त्याच्यावर उलट टीका करून त्यानें आपला शुद्धभाव दर्शविण्याकरतां जयसिंगाला दोष दिला. राजाला या मागणीचें मोठें आश्चर्य वाटलें. आमच्या मनाला बरें वाटून जर आम्ही जयसिंगा-सारख्या आश्रिताच्या मुलावर राजकन्येचा अनुग्रह करण्यास तयार होऊं तर तो प्रश्न स्वतंत्र आहे. पण आमची मर्जी नसतांना जयसिंगानें आपल्या पुत्रा-करतां राजकन्येला मागणी घालावी याबद्दल राजानें सरदाराला अत्यंत दोष दिला. तो त्याच्या धारिष्टाबद्दल क्रुद्ध होऊन त्याची निर्भर्त्सना करूं लागला. त्यानें त्यांतल्यात्यांत विचार करून शांततेचा अवलंब केला आणि दमनपुरोहित, सुमंत, इतर सल्लागार, भोगपाल या सर्वांचा विचार घेऊन काय तो जबाब देऊं असें जयसिंगास तूर्त कळवावें असा राजानें मोहसंघाला हुकुम सोडला; मोहसंघानें बाह्यतः तो हुकुम शिरसा मान्य केला आणि त्या सैन्यसेवक भावाची अदलाबदल होईल तो सुदिन लवकर प्राप्त होण्यासाठीं त्यानें मनांतल्या मनांत देवाची—आपल्या कपटमयक्रूरतेची प्रार्थना केली.

आपल्या मागणीचा राजाच्या मनावर विपरीत परिणाम झाला आणि राजानें आपली अतिशय निंदा केली हें मोहसंघाकडून समजतांच जयसिंग संतापानें लाल झाला. पण मोहसंघानें त्याला राजाकडून अखेरचा जबाब येईपर्यंत शांत राहण्याचा उपदेश केला. त्या योगानें जयसिंग कांहींसा तात्पुरता स्वस्थ राहिला. पण अखेर आपल्याला आपल्या कपट, क्रोध, शौर्य व समशेर यांच्या द्वारेंच आपलें समाधान जिंकून घ्यावें लागेल अशी त्याची खात्री पटली. त्यानें मोठमोठ्या पराक्रमाच्या वल्गना करून राजाला शेवटचा जबाब देण्याची निकड लावण्यास मोहसंघाला सांगितलें. वीरबाहु आणि कामसेन यांचाही मजकूर त्यास विदित केला. कामसेन दीक्षादेवीचा शोध लावून येण्याच्या आंत प्रमिलेचा निकाल लागला पाहिजे असा जय-सिंगानें आग्रह धरिला. अशा कामीं इतकी वाई कामाची नाहीं असा मोहसंघानें सल्ला देऊन शक्य ती तत्परता दाखविण्याची तयारी

दाखविली. नंतर ते दोघे माधवीचें पलायन आणि धर्मध्वजाचा घात यां-विषयीं कोठवर मजल आली आहे याची वाटाघाट करण्याकरितां वाड्यांतील अति बंदोबस्ताच्या अशा गुप्त जागीं निघून गेले.

ती गुप्त जागा ह्मणजे जयसिंगाच्या वारांतील तळघर होय. त्या ठिकाणीं सर्व प्रकारच्या अवश्य वस्तूंची तजवीज केलेली होती. जयसिंगाची खाजगत ठेव याच जागीं असे. तेथें उजेड येण्यासाठीं भिंतीला तिरपीं छिद्रें ठेविलीं होतीं व तशाच प्रकारच्या नळीवजा मार्गानें आंतील अंगास हवा खेळविली होती. हें ठिकाण, कामसेन जयसिंग किंवा तशाच किंमतीच्या घरांतील मुख्य माणसांना तेवढें माहीत असे.

त्या तळघररूपी बिळामध्यें ते दोन कृष्णसर्प आपापल्या विषारी दांतांच्या प्रभावाचें गुणवर्णन करीत बसले. जयसिंगाच्या घरांतल्या घरांतच ही निबिड अरण्यांतील गुप्त एकांत करण्याची सोय असतांना तो मागें मोहसंवाशीं खलबत करण्याकरितां कांतारामध्यें काय ह्मणून गेला बरें ? असा या भुयारावरून प्रश्न उत्पन्न होण्यासारखा आहे. पण कपटकर्मपारंगत, अविश्वासासच दैवत मानणारे, बुद्धिभ्रष्टतेस वश झालेले, कावेबाज अशा लोकांच्या नीचतम मनोवृत्तीसंबंधानें ज्यांनीं विचार केलेला असेल त्यांना या प्रश्नाचें उत्तर समजून येण्यास अडचण पडणार नाहीं.

त्या भुयारांत त्यांचें बोलणें सुरू झालें तेव्हां मोहसंवानें सांगितलें, " माधवीचें प्रकरण मीं बरेच जमवीत आणलें आहे. धर्मध्वजासंबंधानें सर्व भिस्त मीं आपल्या पत्नीवर टाकली आहे. त्याप्रमाणें तिनेंही पण त्या कामीं बरेंचसें यश मिळविलें आहे. अखेरचें यश बिनबोभाट मिळालें तर आपलें आयतेंच काम झालें; पण तसें न घडलें आणि आपल्या कपट-क्रियेचा मध्येंच स्फोट झाला तरी आपलें कोणाचेंही नांव बद्दु ठरणार नाहीं व तशा प्रसंगीं तिसराच माणूस फासांत सापडून आपण सर्वजण शुद्ध राहून पुन्हां आपल्या कार्याची जुळणी बसविण्यास मोकळे व स्वतंत्र राहूं अशीच युक्ति माझ्या चतुर व धूर्त पत्नीनें योजली आहे. आपल्या या नगरांत कोणीएक बैरागी आला आहे. तो गोसावी असावासें दिसतें; तरी पण तो कोणी अडाणी भिक्षेकरी नसावा. तो दाढीजटाधारी कोणी मुनि दिसतो; पण त्याची चंचल दृष्टि व अंतःकरणप्रवृत्ति यांवरून तो मोठा सत्व-संपन्न साधु असेलसें वाटत नाहीं. त्याच्यावरील कांहीं बदमाषगिरींचा आरोप

किंवा एखादा भयंकर गुन्हा लपवण्यासाठीं तो लफंगा या अशा साधुवेषानें हिंडत आहे म्हणावें तर तो जें भाषण बोलतो तें नम्र असून ज्ञानपूर्ण असतें. तो कोणी वैतागलेला मनुष्य असावा आणि दुःखातिशयानें डोकें भ्रमून तो बैरागी झाला असावा असा तर्क करावा तर तो बरेच प्रसंगीं सारासार विचारयुक्त आणि तर्कसंपन्न असे सिद्धांत सांगतो. कसेंही असो; तो आपल्या उपयोगीं पडणार हें खास. मीं त्यास पाहिलें आहे. माझें व त्याचें बोलणें झालें आहे. तो मोठा हुषार, धोरणी, कावेबाज असून कांहीं तरी सामर्थ्यानें संपन्न असला पाहिजे असें मला तरी निदान वाटतें. ''

मोहसंघाचें हें भाषण ऐकून तो ज्ञानानुभवी सरदार बोलला, " हें सर्व खरें धरलें तरी आपलें काम त्याच्या मार्फत कसें साधणार ? त्याचा गुप्ततेनें राजवाड्यांत शिरकाव कसा होणार ? तो असल्या धाडसी कृत्यास कबूल कसा होणार ! खेरीज हे असले साधु मोठे लफंगे असतात. ते वाटेल तें कृत्य सफल करून देण्याचा नाद लावतात. त्यांच्याजवळ कांहीं भुलीचे पदार्थ असतात. थोडा जादूटोणा असतो. प्रथमतः ते त्या तंत्रानें मनुष्याचें मन वेधतात. चकभूल पडून चांगले शहाणे देखील त्यांच्या कृत्रिमास भाळून वेडे होतात. अशा प्रकारें मनुष्याला नादावून ते नेहमीं आपली तुंबडी भरण्याच्या विचारांत असतात. त्यांना भलभलतेच छंद लागलेले असतात. त्यांना कोणत्याही गोष्टीची दिक्कत वाटत नसल्यानें ते बायाबापड्यांना फसवितात आणि अखेर त्यांना आपल्या बरोबर पळवून नेऊन त्यांच्या जन्माचें मातेरें करतात. ते नीच असतात; त्यांच्या ठिकाणीं धैर्य, शूरत्व वगैरे गुण असतात असें नाहीं. त्यांच्याशीं फार जपून वागलें पाहिजे; नाहींतर त्यांचे प्रयोग तुह्मालाच जाचावयाचे. "

सरदाराच्या विचारांचें धोरण ओळखून मोहसंघानें सांगितलें, " आपण त्याविषयीं बेफिकीर असावें. माझी पत्नी शांभवी ही त्यालाही चकविणारी आहे. तिनें त्यालाच उलट आपल्या नादीं लावलें आहे. त्या गोसाव्या-बरोबर दुसरा एक मनुष्य आहे. तो साधु स्वतः मध्यम वयाचा दिसतो; पण त्याच्याबरोबरचा मनुष्य तारुण्यसंपन्न आहे. तो दिसण्यांत अति सुंदर आहे. तो त्याचा शिष्य असावासें वाटतें. तो तरुण अगदीं क्वचित् मौन-भंग करतो. तो इतका देखणा आहे कीं, आपण किंवा आपणासारख्या कोणीही त्याच्याशीं चार दोन घटका सहवास केला तर त्याच्याविषयीं

आदरभाव व प्रेम उत्पन्न होऊन चित्त प्रसन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. अशा या लफंग्यांना पैक्याचा फार मोह असतो हे मलाही कबूल आहे. शांभवीनें हें जाणूनच त्याला पैक्याचा मोह घातला आहे. कनकाच्या मोहाला कांतेच्या मोहाची जोड मिळाली ह्मणजे मोठमोठे तपीही लटपटतात मग इतरांची कथा काय ! माझ्या शांभवीनें त्याला असाच घेरला आहे. त्या गोसाव्याला द्रव्यमोहानें व त्याच्या बरोबरच्या तरुणाला आपल्या स्वतःच्या सौंदर्यमोहानें तिनें घेरलें आहे. तो तरुण शांभवीवर भाळला आहे. ते दोघे आपापल्या उद्दिष्टप्राप्तीच्या आशेनें शांभवीचे दास बनले आहेत. अद्याप त्यांचा आमच्या वाड्यांत प्रवेश झाला नाहीं; पण थोडक्यांत ते तेथें रहावयास येतील. शांभवी माझ्या परवानगीनें कांहीं बतावणी करून त्या दोघांना घरामध्यें रहावयास आणणार आहे. मग काय विचारतां ! इतकें सांनिध्य प्राप्त झालें ह्मणजे त्या गोसाव्याला राजपुत्राचा निकाल लावण्यास काय उशीर ? कदाचित् हा बेत फसला तर आपण सर्वच निराळे राहून ती गुरुशिष्याची जोडी तोफेच्या तोंडीं जाईल हवीतर ! "

ही सर्व तजवीज ऐकतांच सरदार बोलला, " याला ह्मणावें काम ! हें खरें धोरण ! आपल्याला अशी शाहणी बायको मिळाली हें आपलें भाग्यच होय. "

यावर मोहसंघ ह्मणाला, " माधवी कांहीं कमी नाहीं. थोडक्यांतच योग येणार आहे. अनुभवांतीं माधवीच्या चातुर्यामुळें आपलेंही भाग्य प्रस्थापित होणार आहे. "

याप्रमाणें त्यांचें बोलणें झाल्यावर ते दोघे तळघरांतून वर आले. त्यांनीं वर येतांना हवा व उजेड येण्याचे मार्ग नेहमींच्या तऱ्हेनें बंद केले. बाहेर येतांच त्या भुयाराचें द्वार बेमालुम बंद झालें.

---

# प्रकरण १८ वें.

## निर्वाणीचा जबाब.



हसंघानें राजा वसुप्रसादास प्रमिलेबद्दलच्या उत्तरासंबंधानें वरचेवर टोंचणी लावली तेव्हां राजा मोठ्या विचारांत पडला. मोहसंघाच्या रागरंगावरून त्याचें मत सरदारास अनुकूल आहेसें दिसलें. राजानें त्या प्रकरणाचा निकाल लावण्यासाठीं सभा भरविली. सभेला अगदीं शेलकी तेवढीच मंडळी बोलावली होती. सर्वत्रांना सभेचें कारण समजावून देऊन राजानें प्रत्येक मनुष्याला आपापलें मत स्पष्टपणें कळविण्याची विनंति केली. प्रथमतः सुमंत उभे राहिले आणि बोलले, "राजकन्या प्रमिला हिच्या विवाहासंबंधानें वाटेल तशी तजवीज लावण्यास सरकारस्वारी मुखत्यारच आहे ! सरकारच्या मनांत जर सरदाराचें स्थळ पसंत नसेल तर त्या कामीं अन्य विचार करण्याचें कारण नाहीं. राजकन्या प्रमिला ही आज्ञाधारक आहे. मातापित्यांच्या आपल्याविषयींच्या कल्याणबुद्धीवर पूर्ण भरंवसा ठेवणारी विनयसंपन्न अशी ती कन्यका आहे. खेरीज तिला कामसेन आवडत नसावासें दिसतें. आतां सरकारस्वारी सौजन्यानें आमचा विचार घेत आहे त्याअर्थीं मी स्पष्टपणें असें ह्मणतों कीं, सरदार जयसिंग हा राजघराण्याशीं शरीरसंबंध होण्यास योग्य नाहीं. त्यानें मागणी करण्यापूर्वीं आपला दरजा जाणला नाहीं. !"

सुमंताचें भाषण ऐकतांच मोहसंघ बोलला, "या ठिकाणीं मुद्याचा प्रश्न आहे. मी मुद्याकडे लक्ष ठेवून बोलणारा मनुष्य आहें. माझ्या भाषणाचा भलताच अर्थ करून कोणीही आपला गैरसमज होऊं देऊं नये. मी ह्मणतों यांत कमीजास्त दरजाचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. यांत मुख्य गोष्ट सौख्यप्राप्तीची आहे. प्रमिलेचा संसार सुखमय होणें हीच एक गोष्ट ध्यानांत घ्यावयाची आहे. कामसेनावर प्रमिलेचा लोभ आहे कीं नाहीं, तिला तो आवडतो किंवा नाहीं हें तिलाच स्पष्टपणें विचारणें बरें."

यावर दमनपुरोहितांनीं सांगितलें, "राजकन्येनें आपला आपणच पति पसंत करणें योग्य नाहीं असें नाहीं. पण तिला तसें करण्याची पित्राज्ञा पाहिजे. निदान ज्या कन्येचा पित्यावर भरंवसा आहे, जी मातापिता-

सेवादक्ष आहे, जी कुलशीलसंपन्न आहे, जी विनययुक्त आहे ती पित्याच्या सूचनेवांचून वरपसंतीच्या कामांत आपला विचार चालवीलसें वाटत नाहीं. राजकन्या प्रमिला हिला कामसेन आवडतो कीं न आवडतो हा प्रश्न अजाणपणाचा होय ! त्याचा येथेंच निकाल लागतो आहे. तिला प्रत्यक्ष विचारण्याची जरूर नाहीं. ती आपल्या पित्याचें वचन व आवड यांचाच सर्वस्वी स्वीकार करणारी आहे हें कबूल केलें ह्मणजे ती बाबतच संपली असें होत नाहीं काय ? ''

पुरोहिताला त्या कामीं आडवावें या हेतूनें मोहसंघ पुन्हां भाषण करावयास उठला, " विवाह ह्मणजे स्त्री आणि पुरुष यांचा सुखस्नेह होय ! यांत धर्म, पुण्य, कर्म, मोक्ष, मुक्ति वगैरे गोष्टींचा संबंधच येत नाहीं. सुखप्राप्तीला मुख्य कारण ह्मणजे एक प्रेम होय. प्रेमावांचून सुख नाहीं. प्रेम विकत मिळत नाहीं. प्रेम जबरदस्तीनें उत्पन्न होत नाहीं. या गोष्टी जर खऱ्या आहेत तर स्त्रीपुरुषांचा विवाह होण्याच्या कामीं ज्यांचा विवाह व्हावयाचा त्यांच्यावांचून इतर व्यक्तींच्या मतामतांचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. माता, पिता, बंधु, भगिनी, कुल इत्यादि सर्व गोष्टी बाजूस ठेवून स्त्री व पुरुष यांनीं आपापल्या मनाप्रमाणेंच पति व पत्नी पसंत करणें इष्ट होय. स्वयंवराची चाल तर केवळ बालिशपणाचीच नाहीं काय ? स्वयंवराचा थाटमाट, उत्सव, नाच रंग या गोष्टी करमणुकीला ठीक आहेत पण त्यांच्या योगानें स्त्रीपुरुषांच्या सुखाला मदत होणार नाहीं. नाच, रंग, तमाशे, वाद्यें, प्रयोजनें यांनीं इतर जनांना संतोष होईल. पण पतिपत्नींना संसारसुख साधण्यास त्यांची मदत होणें शक्य नाहीं. कारण संसारसुख पतिपत्नींच्या परस्पर प्रेमावर अवलंबून आहे. ज्या स्त्रीला व पुरुषाला पुढें सारा जन्म एकमेकांच्या सहवासांत काढावयाचा त्यांच्या आवडीचा, पसंतीचा, मानसिक विचाराचा मुद्दा अजिबात सोडून देऊन हत्तिणीला वरपसंतीच्या कामीं सर्व मुखत्यारी द्यावयाची हा मूर्खपणा अनुपमेय नाहीं कां ? ह्मणजे एका पशूच्या पसंतीवर राजकन्यांनीं आपल्या पतींचा स्वीकार करावयाचा हा धर्म कां हें सोंग ? दानयोग्य कन्यकांनीं आपले पति आपल्याच पसंतीनें पसंत केले पाहिजेत. पतीची निवड करणें हें काम सोपें नाहीं. एका क्षणांत किंवा चार घटकेंत मनुष्याची पारख होत नसते. सहवासावांचून मनुष्याची आवड, विचार, मनोवृत्ति कळणें दुर्घट आहे. याकरतां विवाहेच्छु स्त्रीपुरुषांनीं आपापल्या संघट्टनांतील

मनुष्यांची स्वतः पारख करून आपापले जोडीदार पसंत करावे, त्यांच्याकडून योग्य त्या अटी परस्पर कबूल करून घ्याव्या, दूरवर विचार करून आपल्या सुखाच्या व संसारस्वास्थाच्या मर्यादा ठरवाव्या, आपलें सांसारिक ध्येय कायम करावें आणि त्या सर्व गोष्टी साध्य होण्यास योग्य व्यक्तीचा स्वीकार करावा. अशा प्रकारें विवाहानें संलग्न झालेल्या जोडप्याचाच प्रपंच सुखाचा होईल. चिट्या टाकून पतिपत्नींचा जोडा जमविणें आणि आई-बाप, भाऊबहीण, चुलता काका, मामा किंवा अशा कोणाही अन्य माण-सांच्या पसंतीनें वर किंवा नवरी पसंत करणें; अगर अंधश्रद्धेनें धर्माज्ञा किंवा मूढपणाच्या रूढी मान्य करून पतिपत्नीची निवड होणें या गोष्टी अज्ञानपणाच्या आहेत. ''

मोहसंघाच्या या भाषणानें बहुतेकांचीं मनें अस्वस्थ झालीं. त्याला धर्माज्ञांचा अर्थच कळत नाहीं आणि तो भ्रमित होऊन कांहीतरी भकत आहे हें त्याच्या ध्यानांत आणून देण्याकरितां दमनपुरोहित ह्मणाले, " तुह्माला धर्मातील मुख्य भावार्थ समजला आहेसें दिसत नाहीं. तुम्हीं धर्म वाचला आहे. तुह्मी शास्त्रांचें अवलोकन केलें आहे. पण तुह्माला त्यांतील हृद्गत समजलेलें नाहीं. तुमच्या म्हणण्याप्रमाणें जमलेल्या स्त्रीपुरु-षांच्या जोडप्यांत मतभिन्नतेमुळें कलह माजण्याचा संभव नाहीं अशी तुह्मी हमी घेतां काय ? मुलगा किंवा मुलगी हें लग्नापूर्वी कितीही प्रौढ असले तरी त्यांचा प्रौढपणा मर्यादितच असणार. त्यांच्या वयाचाच काय तो प्रौढपणा साधता येणार ! बालविवाह मोडून अगदीं प्रौढांत प्रौढविवाह अमलांत आणावयाचा विचार ठरविला तरी त्याची वयमर्यादा अठरा, वीस वर्षांच्या आंतच ठरवावी लागणार ! तीस, पसतीस वर्षांची मुलगी आणि चाळीस पन्नास वर्षांचा मुलगा यांचा प्रौढविवाह तुह्माला तरी पसंत होईल काय ? अठरा वीस वर्षांच्या प्रौढ स्त्रीपुरुषांना अनुभवज्ञान तें काय असणार? मनोवृत्तींच्या उच्छृंखलपणानें ते पतिपत्नी यांची निवड करणार हें उघड आहे. मग मनाची चंचलवृत्ति पालटली, अनुभवानें जगत व प्रपंच यांचें खरें स्वरूप ज्ञात झालें, इंद्रियांचा थिल्लरपणा नष्ट होऊन मनाला शांतता प्राप्त झाली ह्मणजे मग मनुष्याच्या प्रेमाच्या, सुखाच्या, स्वास्थ्याच्या व्याख्या पालटतात. मग अशा स्थितींत त्या स्त्रीपुरुषांना आपापल्या पूर्वीच्या चुका समजून आल्या ह्मणजे त्यांच्यांत प्रेम कसें

राहणार ? आणि केवळ प्रेमसुखाच्या मुद्यावर नजर ठेवून, प्रापंचिक प्रेमास च आद्य स्थान देऊन, एक प्रेमदेवतेसच मुख्य दैवत कल्पून ज्यांनीं परस्परांस पति व पत्नी या नात्यानें स्वीकारलें त्यांचें ऐक्य कसें रहाणार ? ”

पुरोहितांचें हें व्याख्यान ऐकून राजा वसुप्रसाद अगदीं एकाग्र झाला. मोहसंघही बराच घोटाळ्यांत पडला. पण त्यानें आपल्या ज्ञानमय डोक्यांतील सर्व सूत्रें बाहेर काढण्याचा संकल्प करून तो पुरोहितास अडविण्याकरतां बोलला, “ एकदां ज्या ठिकाणीं मनापासून प्रेम जडलें तें प्रेम अभंगच होय. प्रेमदेवतेचे बंध किती बलवत्तर असतात हें तुम्हाला ठाऊक नाहीं असें दिसतें. प्रेमदेवतेच्या पाशांनीं बद्ध झालेलें जोडपें परस्परापासून विलग होणें शक्य नाहीं. मनाचें स्थित्यंतर, विचारक्रांति, मतभिन्नता, आवडींतील बदल, इत्यादि गोष्टींच्या उपदेशानें तें जोडपें परस्पराला कंटाळण्याचा संभव असला तरी महासामर्थ्यसंपन्न प्रेमदेवतेचें पाश त्यांना खेचून परस्परांना ऐक्य स्थितींत जखडून ठेवतील हें निःसंशय आहे. ”

मोहसंघाच्या या भाषणानें भोगपाल, सुमंत, प्रधान वगैरे मंडळी मोहल्यासारखी झाली. राजा वसुप्रसादही भुलल्यासा दिसला. पण तो त्या भुलीच्या स्वाधीन होईना. दमनपुरोहिताच्या विद्वत्ताज्ञानावर त्याचा निर्भर होता, दमनपुरोहिताचा मुद्दा डळमळींत नसावयाचा असा त्याला भरंवसा वाटत असल्यानें तो मोहसंघाचे मुद्दे खोडून टाकील अशा समजुतीनें अधीर व उत्सुक होऊन राजा पुरोहितास ह्मणाला, “ ऐकलेना ! आमच्या मोहसंघानें तुह्माला चप्पच केलें ह्मणावयाचें ! कारण त्याचें प्रेमाचें व्याख्यान व प्रतिपादन यथार्थ दिसतें. ”

राजाचें उपरोधिक भाषण ओळखून दमनपुरोहितानें विषयप्रतिपादन चालविलें. ते ह्मणाले, “ प्रेमदेवतेच्या सामर्थ्याचें अगाधत्व तेवढें मोहसंघानें जाणलें आहे. पण त्या प्रीतिदेवतेच्या अंगांतील चांचल्य मात्र त्यांनीं ओळखलें नाहीं. प्रेमाचें प्रकार मुख्यतः दोन आहेत, एक शुद्ध व दुसरें अशुद्ध. शुद्ध प्रेम स्वाभाविक असून त्यामध्यें कोणत्याही तऱ्हेची अपेक्षा नसते. तें निरपेक्ष असतें. अशुद्ध प्रेम कारणपरत्वें उत्पन्न झालेलें असून तें कांहीं तरी हेतुजन्य असतें. आईच्या अंतःकरणांतील पुत्राविषयींचें प्रेम जसें निरपेक्ष, हेतुरहित असतें तसें पतिपत्नीचें नातें जरी [illegible] स्त्रीपुरुषांच्या मनांतील नसतें. त्या अपेक्षाजन्य प्रेमाची

वृत्ति चवचालच असावयाची. नूतन वस्तूच्या मोहकपणामुळें तिच्या प्राप्ती-विषयीं कोणालाही प्रेम उत्पन्न होतें; पण ती वस्तु प्राप्त होऊन जुनी झाली ह्मणजे लागलींच तिच्यांतील मोहकपणा नष्ट झालासें वाटूं लागणें हा स्वभावधर्मच होय. त्या प्राप्त झालेल्या वस्तूचें मोहकत्व नष्ट होतें असें ह्मणावें तर तिच्याच प्राप्तीकरतां दुसरे कित्येक लोक तळमळत असतात. तात्पर्य, अपेक्षेमुळें कारणपरत्वें उत्पन्न झालेलें प्रेम अपेक्षा संपतांच लुप्त होणें स्वाभाविक आहे. सौख्य, समाधान, इंद्रियांची ओढ, विषयलोलुपता या गोष्टींची तृप्ती झाली ह्मणजे प्रेमाभाव हा व्हावयाचाच! मग कोणत्याही वस्तूच्या नाविन्याच्या लयाबरोबर त्याच्याविषयींच्या प्रेमाचाही लोपच होऊं लागावयाचा ही गोष्ट निश्चित आहे. केवळ प्रापंचिक, क्षुद्र सुखावर नजर देऊन स्त्रीपुरुषांनीं पतिपत्नी पसंत करणें, आणि त्याच स्थितीच्या संरक्षणार्थ करारमदार करणें ह्मणजे सुखाची ओढ कमी झाली असतां एकमेकापासून अलिप्त होण्यास आगाऊ परवानगी देऊन ठेवणें होय. अशा पति-पत्नीला एकमेकांपासून कोणताही व्यावहारिक त्रास होऊं लागला, मत-भिन्नतेमुळें अस्वस्थता सतावूं लागली; मनोभंगामुळें चित्तउदासीनता प्राप्त झाली आणि प्रकृतिधर्मानुसार किंवा शारीरिक आरोग्याच्या प्रमाणानें कोणत्याही गोष्टींत हिरमोड होण्याचें प्रसंग उद्भवूं लागले ह्मणजे ते दोघेही परस्परांचा त्याग करून आपलें सुख साधण्यास पुन्हां वेगळी पसंती करूं लागणें साह-जिक व ओघाचें आहे. हा आचार व विचार अश्लाघ्य आहे ह्मणून हा आमच्या धर्माला पसंत नाहीं. विवाहाचें बंधन हें शुद्ध व निरपेक्ष असणेंच इष्ट होय. त्या बंधनास प्रीतीच्या जोरावर कर्तव्याचा नेट असणें अवश्य आहे. कर्तव्य ह्मटलें ह्मणजे मग प्रीति अप्रीति, आवड नावड, सुखदुःख, स्वास्थ्य अस्वास्थ्य असल्या परस्परविरोधी कोणत्याही भावनेचा प्रश्नच उरत नाहीं. पतीनें पत्नीला गृहलक्ष्मी, सहधर्मचारिणी, सुखदुःखसांगातीण समजून आपल्या पवित्र विचारानें व कर्तव्यपर आचारानें पतीचा उद्धार करणारी इहपरत्र कल्याण साधून देणारी देवता मानावें, त्याचप्रमाणें पत्नीनें आपल्या पती-वांचून प्रत्येक पुरुषाला स्त्रीजात समजून एका पतिसेवेलाच तन, मन, धन, अर्पावें आणि इहपरत्रीं आपलें परमहित करणारा ईश्वर ह्मणजेच आपला पती होय असें समजून त्याच्या हयातींत किंवा दुर्दैवानें त्याच्या पश्चात् राहण्याचा प्रसंग ओढवला तर त्या वियोगस्थितींतही विहित कर्तव्याला

जाणूनच पतिसेवादक्ष रहावें. याप्रकारें आमच्या शास्त्रानें निर्बंध केलेले असल्याकारणानें त्याच्या कासेला लागणारांचें अनहित होण्याचें कोणी स्वप्नींही आणूं नये. विवाहाच्या कामीं हीं शास्त्रतत्वेंच विचारणीय आहेत."

पुरोहिताचें गहन विचारपूर्ण, शास्त्रसंमत भाषण ऐकून सर्वांच्या अंतःकरणावरील मोहपटल दूर झालें. मोहसंघही मनांतल्या मनांत चूर झाला; तरी पण तो मुद्दा बाजूला टाकून मोहसंघ बोलला, "तुमचे शास्त्रनिर्बंध खुशाल पाळा. प्रमिलेचा कोणताच विचार घेऊं नका. तिला जर गुर्वाज्ञा मान्य आहे तर गुरुजन करतील तें तिनेंच केल्यासारखें आहे; ह्मणजे त्यांची पसंती किंवा निवड ती तिचीच निवड असेंही मी कबूल करतों. पण पुन्हां मी असें विचारतों कीं, सरदाराच्या मागणीप्रमाणें तुम्ही सर्वांनीं विशेषतः राजेसाहेब व पुरोहित यांनीं कामसेनाला वर नेमस्त केलें म्हणजे सर्व जमलें. पतिपत्नींच्या विहित कर्तव्यानुसार कर्तव्यपरायण राहून त्यांचाही संसार सुखाचा होईलच. मग कामसेनाच्या बाबतींत नकार कां ?"

या प्रश्नावर दमनपुरोहितांनीं उत्तर केलें, "कामसेनाशीं आमचें वैर नाहीं किंवा त्याच्याबद्दल आम्हाला स्वाभाविक तिरस्कार असण्याचेंही कारण नाहीं. पण पतिपत्नींच्या गुणावगुणासंबंधानें विचार करणें अवश्य आहे. कामसेन देखणा आहे, आरोग्यसंपन्न आहे, श्रीमान आहे, सरकारच्या कुलाप्रमाणें त्याचें कुल थोर नसलें तरी तो कुलज आहे हें आम्ही कबूल करतों; पण त्याच्या गुणावगुणांचा विचार केला, त्याचा आचार ध्यानांत घेतला, त्याचा संस्कार मनांत आणला व त्याची मानसिक उन्नति निरीक्षण केली म्हणजे तो प्रमिलेचा पति होण्यास अयोग्य ठरतो. मुलगी केवढीही झाली, तिनें आपली प्रौढदशा ओलांडली किंवा इतर प्रकारची कोणतीही अन्य अडचण उद्भवली तरी भ्रष्ट विचारसंपन्न, आचारहीन, दुर्गुणी, धर्मापहारी, सद्गुणपराङ्मुख व ईश्वरद्वेष्टा असा पुरुष पति म्हणून तिनें स्वीकारणें इष्ट नाहीं. या गोष्टी विचारांत घेऊनही कामसेनाला वर नेमस्त करण्याचा आग्रह किंवा सूचना करणारास काय नांव द्यावें त्याचा उच्चार मी करूं शकत नाहीं !"

हें भाषण आटपतांच वसुप्रसाद इतर सभासदांच्या संमतीनें मोहसंघाला उद्देशून बोलला, "झालें ! तुह्माला आतां निराळें उत्तर नकोच आहे. पण तुमचा सरदाराकडे विशेष ओढा कां असावा हें सुद्धां एक मोठें गूढच आहे !"

राजाच्या या भाषणावर भोगपाल म्हणाला, " हें गूढ थोड्क्यांतच उलगडेल. केवळ परोपकारार्थ झटणारे प्राणी कोणी नसतील असें नाहीं. पण सामान्यतः बहुतेकांचा परोपकार स्वार्थमिश्रित असतो. मोहसंघ या सामान्य नियमास अपवाद असण्याचा संभव नाहीं. राजकन्येच्या केवळ हितावर दृष्टि देवून किंवा तिच्या भविष्यत भाग्याची कळकळ बाळगून मोहसंघ तिला कामसेनाला देण्याची शिफारस करीत असेल असें कोणी मानूं नये. जयसिंग सरदाराची बाजू घेण्यांत मोहसंघाचा खोल डाव असावा असा माझा तर्क आहे. कारण आतांशा मोहसंघ, जयसिंग व वीरबाहू यांचीं बरींच गुप्त खलबतें चालतात असें माझ्या कानावर आलें आहे. या त्रिकूटाचा अंतस्थ विचार काय आहे तो उघडपणें समजत नाहीं. तरीपण त्यांचे विचार व कारस्थानें शुद्ध नसावींत असें म्हणण्यास पुष्कळ जागा आहे. वीरबाहूच्या कलिंग राजधानींत सैन्याचीही बरीच जमवाजमव झाल्याचा बोभाटा आहे. "

भोगपालानें आपल्यावर भलताच दोष लागू करण्याची खटपट चालविलेली पाहून त्याला व वसुप्रसादालाही थोडीशी दहशत घालण्याच्या बुद्धीनें मोहसंघ बोलला, " तुम्हाला ज्या काय बातम्या कळल्या असतील त्या खऱ्या ! पण मला विनाकारण कोणत्याही दोषांत ओढण्यापूर्वी ज्याचा त्यानें आपल्या शुद्धपणाविषयीं विचार करणें जास्त बरें ! आपल्याला स्वतंत्रतेनें चैन-विलास भोगावयाला सापडावेत या हेतूनें राज्याचा तिसरा हिस्सा अलग करून मिळावा अशी इच्छा ज्या अंतःकरणांत वावरत आहे तें अंतःकरण या मोहसंघाचें मात्र नव्हे. मोहसंघ स्पष्ट भाषण करणारा आहे. मनांतल्या मनांत कुढणारा नव्हे ! माझा निस्पृहपणा दोषास्पद ठरवून कोणी माझ्यावर भलता आरोप केला तर त्याला त्याचें प्रायश्चित्त भोगावें लागेल हें त्यानें पुरतेपणीं ओळखून काय ती भाषा वापरावी ! "

मोहसंघ स्वतःला निर्दोषी व निष्कपटी ठरविण्याच्या उद्देशानें आपले गुप्त विचार उघड बोलून गेला असें पाहून भोगपाल थोडासा विरमला. त्यानें आपल्याला भिवविण्यासाठीं जे दरडावणीचे उद्गार काढले त्या योगानेंही भोगपाल कांहींसा चरकला. पण तो भ्याड नव्हता. तो विलासी होता तरी विलासाची कल्पना क्षणभर बाजूला ठेविली असतां तो पराकाष्ठेच्या क्षात्रतेजानें लकाकणारा होता. मोहसंघाच्या दरडावणीनें उत्पन्न झालेली क्षणिक भीति

नाहींशी होऊन त्याची क्षात्रतेजाची ज्योत प्रज्वलित झाली. तिनें त्याचें विलास-प्रेम भस्मसात् होऊन तो स्पष्टपणानें ह्मणाला, " मोहसंव ह्मणतो ती गोष्ट सत्य आहे. राजा वसुप्रसादानें मला राज्याचा तिसरा भाग तोडून द्यावा अशी माझी इच्छा होती. पण राजाच्या मनांत माझी इच्छा पुरविण्याचें नसेल तर त्यासाठीं मी राज्याला अपाय करण्यास मात्र तयार नव्हतो व नाहीं. त्यासाठीं स्वतः राजाला व्यक्तिदृष्ट्या सतावून सोडावयाचें व आपली मनीषा तृप्त झाली तर पहावयाचें असाच माझा संकल्प होता. कायदा किंवा शास्त्र या दृष्टीनें तसा हिस्सा तोडून देतां येणार नाहीं असें कायम ठरलें तर राजेच्छेप्रमाणें स्वतंत्र तैनात करून घेण्यासही मी खुषी होतों. अशाच प्रकारचे माझे विचार मी मोहसंवाजवळ स्पष्टपणें बोलून दाखविलेले आहेत. त्यास उद्देशून त्यानें मला मघाच्या भाषणांत टोमणा दिला. हे माझे विचार कदाचित् बावगे असतील असें धरून चाललें तरी ते घातकी व भ्रष्ट आहेत असें मात्र कोणी म्हणूं शकणार नाहीं. पण या मोहसंवाची गोष्ट तशी नाहीं. त्याचे दाखवावयाचे दात व खावयाचे दात निरनिराळे आहेत. त्याचा गुप्त विचार विलक्षण दिसतो. राजपुत्र धर्मध्वज हा त्याच्या दृष्टीनें जाचक झाला आहे. धर्मध्वजाच्या वारशीहक्कामुळें त्याच्या हक्कांत विघ्न आलें आहे अशी त्याची मनोदेवता त्याला सांगत आहे. त्याच्या त्या राज्यतृष्णेस मी अनुकूल व्हावें ह्मणून त्यानें आपली पत्नी शाम्भवी हिच्याद्वारें माझ्या पत्नीचेंही कान फुंकले आहेत. तिच्याद्वारें त्याच भ्रष्टकल्पनेचा प्रयोग माझ्या अंतःकरणावर कर-ण्याचा खटाटोपही या जोडप्यानें करून पाहिला. बायकोच्या बुद्धिभ्रष्ट कल्पनेला मी हार जात नाहींसें पाहून स्वतः मोहसंवानें माझ्यावर जादू चालविण्याचा उपक्रम केला. मी जेव्हां त्याची जादू त्याच्यावरच फिरवूं लागलों तेव्हां त्यानें आपल्या भाषणाचें स्वरूप बदलून आपला हेतु पालट-ण्याची शकल केली. ती मला समजली नाहीं अशी त्याची समजूत होती. त्यावेळीं मी त्याची ती समजूत तशीच कायम राहूं दिली. त्या योगानें फसून त्यानें या प्रसंगीं मला दोषास्पद ठरवून राजाची मर्जी संपादण्याचा यत्न केला, पण तो अखेर फसला. आपल्या दोषाचें निराकरण करण्या-करतां मोहसंवानें मला जी प्रायःश्चित्ताची धमकी दिली तिला मात्र मी जुमानणार नाहीं. जो भ्याड असेल, नीचकर्माच्या जाणीवीनें ज्याच्या अंतः-करणांतील धैर्याचा लय झाला असेल त्यालाच भिवविण्याचा कोणीही

प्रयत्न करावा. मी भीतिला जुमानण्यास तसा लेचापेचा नाहीं. नीच कर्माच्या टोचणीनें माझें धैर्य खचलें नाहीं. मला शासन करण्याची घमेंड दाखविणाऱ्या आढ्यतखोराचा समाचार घेण्यास या भोगपालाची समशेर सदैव तयार आहे. ”

ही अभिमानोक्ती ऐकतांच मोहसंघ खवळला. भोगपालानें आपलें इंगित फोडून आपल्याला अविश्वासी ठरविण्याचें धाडस केलेलें जाणून तो अतिशय चिडला. त्वेष आणि चीड यांच्या भरांत तो मोठी गर्जना करून बोलला, “ माझ्यावरील तुफानांची निष्कृति करण्यास माझीही समशेर तयार आहे. राजेसाहेब व येथील सर्व सभासद यांना मी एक गोष्ट बजावून सांगतों कीं, भोगपालानें केलेले मजवरील सर्व आरोप व हकीगत बनावट आहे. दमनपुरोहिताचें भाषण कितीही धर्म्य असलें तरी त्याचा कांहींएक विचार न करणेंच बरें. कामसेनाला प्रमिला हीच पत्नी पाहिजे आहे. तिला पत्नी करण्याविषयीं त्याचा अचल निश्चय झाला आहे. सरदार जयसिंग हा मानप्रिय आहे. प्रमिलेचा विवाह इतर कोणाशीं झाला तरी त्याला वस्तुतः त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नव्हते. पण ती गोष्ट कामसेनाचा प्रश्न निघण्यापूर्वीची होती. राजे वसुप्रसाद यांनीं जयसिंगाच्या मागणीला रुकार दिला नसला तरीपण प्रतिकार तरी दर्शविलेला नाहीं. खेरीज प्रमिलेचा पति होण्यास कामसेन नालायख आहे असें धडधडीतपणें राजमंत्री व पुरोहित बोलून दाखवितात ही गोष्ट सरदारास अपमानकारक वाटत आहे. या योगानें सरदार पराकाष्ठेचा खवळला आहे. सरदार जयसिंग हा सामान्य पुरुष नाहीं. त्यानें अनेक प्रसंगीं आपला पराक्रम व्यक्त केला आहे. त्यानें आपल्या शौर्यानें सर्वत्र दरारा बसविला आहे. तो मानप्रिय, करारी, धाडसी व निश्चयी आहे. आपल्या कायमच्या नकारानें सरदाराचें बिथरलेलें चित्त क्रोधग्रस्त होईल. जयसिंगासारख्या अलौकिक योद्ध्याचा क्रोध व संताप राजा वसुप्रसादाला हानिकारक होईल याचा सर्वत्रांनीं पूर्ण विचार करावा. ”

मोहसंघाच्या मनांत धर्मध्वजाविषयीं वैर वसत असून तो त्याच्यासंबंधीं कृष्णकारस्थानांत गुंतला असावा अशाबद्दल भोगपालाच्या भाषणांत जो उल्लेख आला त्यामुळें सर्वच मंडळींचें मन त्वेषपूर्ण झालें होतें. राजपुत्र धर्मध्वज हा सर्वत्रांचा आवडता होता. त्याच्या सद्गुणानें सर्वांच्या मनांत त्याच्याविषयीं अत्यादर व कळकळ उत्पन्न केलेली होती. मोहसंघाच्या

दर्पोक्तीनें इतर सभासदांची वृत्ति खवळली. त्यांतल्या त्यांत वसुप्रसादाला अपाय करूं इच्छिणाऱ्या सरदाराविषयीं अत्यंत तिटकारा येऊन भोगपालाची वीरवृत्ति फोंफावली. तो शूरत्वाच्या वाऱ्यानें कंपित होऊन गंभीरपणानें ह्मणाला, " काय ! हे दरडावणीचे शब्द कोणाच्या तोंडून निघत आहेत ! पुरुवंशोत्पन्न पौरवाधिपतीच्या सख्ख्या पुतण्याच्या मुखांतून असे शब्द निघणें ही मोठ्या शरमेची गोष्ट आहे. आमच्यासारखे जवानमर्द वीर हयात असतांना वसुप्रसादाच्या वैभवश्रीकडे वाकडी नजर करणाऱ्यांचे नेत्र बाहेर काढण्याला आमचे जंबिये अक्षय सरसावलेलेच आहेत, हें कुलघातकी जनांनीं पूर्णपणें ध्यानांत वागवावें. सरदार जयसिंगाची किंमत काय ? वसुप्रसादाच्या कृपाछत्रामुळेंच जयसिंगाच्या पराक्रमाचा टेंभा पाझळलेला आहे याची त्याला आठवण असावयास पाहिजे. अमर्याद महत्वाकांक्षेमुळें जयसिंगासारखे हरामखोर राजाशीं अविश्वास करण्यास प्रवृत्त झालेच तर त्यांचा समाचार घेण्यास स्वामिभक्त वीरांचीं मनगटें चांगलीं खंबीर आहेत. पण या असल्या गोतास काळ होणाऱ्या कुऱ्हाडीच्या दांडयांना, बायकोच्या नादानें स्वकुलाच्या लौकिकास काजळ फासणाऱ्या स्त्रैणांना, द्रव्यतृष्णेमुळें खुनास प्रवृत्त होऊं पाहणाऱ्या दगलबाजांना—ह्मणजे या मोहसंघासारख्या असल्या—"

भोगपाल पुढील दूषणांचा उच्चार करणार तोंच मोहसंघानें गडगडाट उडवून दिला. त्यानें आपली समशेर एकदम उपसली आणि आपल्या बलाबलाचा विचार न करतां "भरसभेमध्यें जिव्हेला स्वैर सोडणाऱ्या विलासी निर्लज्जांचे दांत घशांत घातलेच पाहिजेत !" असें ओरडून तो बेभान झालेला मोहसंघ भोगपालाच्या अंगावर धावला. त्याच्या समशेरीचा स्पर्श होणार तोंच भोगपालानें चटकन् आपली तरवार उपसली आणि मोहसंघाच्या शस्त्राला प्रतिकार केला. दोघे बंधु आपलें बंधुत्वाचें नातें विसरले आणि सर्व कौशल्य खर्च करून एकमेकांना वार करण्याकरतां तरवारी चमकावूं लागले. तो प्रकार पाहतांच प्रधान, सुमंत, सेनापती यांनीं आपल्या समशेरी बाहेर काढल्या. त्या झगडाझगडींत आतां रक्तपात झाल्यावांचून रहात नाहीं असें पाहतांच राजा वसुप्रसादानें आपलें शस्त्र उपसलें आणि त्या सर्व वीरांच्या सन्निध जाऊन तो अधिकारयुक्त वाणीनें बोलला, " पौरवाधिपति, सिंघावतीचा अभिषिक्त राजा मी वसुप्रसाद सर्व वीरांना आपलीं शस्त्रें म्यानांत घालण्याचा हुकुम फर्मावितों. जो कोणी आपल्या सामर्थ्यमदाच्या तोऱ्यानें ही राजाज्ञा भंग करील त्याला बंडखोर समजलें जाईल. ! "

नृपमुखांतून या शब्दांचा उच्चार होतांच सर्व वीरांनीं आपापलीं शस्त्रें खालीं टाकलीं. मोहसंघाच्या अंगांत बहुत आवेश भरला होता; पण तेथील सर्वजण आपल्या विरुद्ध आहेत असें जाणून त्यानेंही आपलं शस्त्र म्यानांत घातलें आणि राजनिष्ठा दर्शविण्याकरितां तो राजापुढें हात जोडून उभा राहिला.

ज्या कारणाकरितां राजानें सभा भरविली होती त्या कारणाचा निकाल लागलाच होता; पण शब्दानें शब्द वाढून गोष्ट भलत्याच थरावर गेली याबद्दल दमनपुरोहितांनीं खेद प्रदर्शित केला. द्वेषाच्या भरांत मोहसंघ व भोगपाल यांनीं परस्परांचे जे गुप्त विचार बाहेर फोडले ते सर्वांचीं मनें खिन्न करण्यासारखे होते. त्याबद्दल सर्वांचें सांत्वन करावें आणि भोगपाल व मोहसंघ यांनींही समंजसपणा धरावा ह्मणून पुरोहित म्हणाले, " रागाच्या व द्वेषाच्या भरांत मोहसंघ व भोगपाल यांनीं एकमेकांना फजित करण्यासाठीं जे गुप्त हेतु बोलून दाखविले ते सत्यच असतील असें वाटत नाहीं. यदाकदाचित् ते खरे आहेत असें धरून चाललें तरी सरकारांनीं त्याबद्दल आपल्या पुतण्यांना क्षमा करावी हेंच उचित् होय. " असें बोलून ते त्या दोन्ही चुलत भावांना उद्देशून ह्मणाले, " तुह्मी दोघेही शूर आहां. दोघांच्या अंगांत शहाणपणा व समंजसपणा आहे. कांहीं कारणांनीं मनुष्याच्या अंतःकरणांतील नीचमनोवृत्ति खवळणें साहजिक असते. जगांतील अनेक पदार्थ व स्थिति यांचा मोह मनुष्याचें मन आकर्षण करीत असतो. पण शहाणे लोक विचार व दूरदर्शीपणा यांची कास धरून मोहाला बळी पडत नाहींत. तुह्मी दोघेजण आपली कुलपरंपरा, वाडवडिलांचा लौकिक, घराण्याची अब्रू व सन्मान्य लोकांचा आचारक्रम ध्यानांत आणून दुर्भावनेपासून परावृत्त व्हाल अशी आशा आहे. ऐक्यामध्यें पराकाष्ठेचें सामर्थ्य वास्तव्य करतें. ऐक्य ही एक जबरदस्त शक्ति आहे; या गोष्टी तुह्माला समजावयास पाहिजेत. तुह्मी जोंपर्यंत ऐक्यभावानें वागाल तोंपावेतों तुमच्यापुढें कोणाचीही मात्रा चालणार नाहीं. तुह्मी भलताच हव्यास धरून ऐक्याचा नाटनाट कराल तर तुमच्यांत फाटाफूट होऊन ती तुमचा नाश केल्यावांचून राहणार नाहीं. चुका सर्वांच्याच हातून होतात. सर्वांच्याच मनावर विपरीत कल्पना आपला शह बसवू पाहतात. पण थोर व बुद्धिवान लोक त्यांना हार जात नाहींत. दुष्ट विचार सर्वांना दास बनविण्याची पराकाष्ठा करतात; पण समंजस व वीर्यशाली जन त्यांनाच आपले दास बन-

वितात. तुह्मी थोर आहां. तुमचें कुल मोठें आहे. तुमच्या वाडवडिलांनीं विमल यशाचे ध्वज फडकावले आहेत. तुह्मी राजहंसाचीं बालकें आहां. मोतीं भक्षण करणें हाच तुमचा धर्म होय. मल किंवा इतर घाणेरडे अमंगल पदार्थ हा कावळ्यांचा आहार होय. यासाठीं तुह्मी आपल्या कुलकीर्तीस वंद्य मानून एकमतानें चाला. घरांतल्या घरांत कलह उत्पन्न करूं नका. गृहकलहानें कोणाचेंही कल्याण झालेलें नाहीं. ज्यांनीं भलत्याच भावना धरून आपल्या हातांनीं कलीला घरांत घेतलें त्यांचा सर्वस्वी नाश होऊन त्यांना अखेर पूर्ण पश्चात्तापांत पडावें लागलें आहे. वृक्षाला अनेक पानें असतात. तीं जों-पर्यंत वृक्षाला चिकटून आहेत तोंपावेतों प्रखर उन्हाच्या तडाक्यानें सुकूं शकत नाहींत. पण त्यांतून जीं पानें वृक्षापासून अलग होऊन खालीं पड-तात त्यांचा उन्हाच्या एका तिरपसिरशीं पाचोळा बनतो. तुम्हीही आपल्या शुद्ध, सनातन, पवित्र, अनुदार, विमलकीर्तिसंपन्न वंशवृक्षाला धरून असा. ह्मणजे मग कसल्याही संकटांचें तुमच्यापुढें कांहींएक चालणार नाहीं. शुद्ध भावनेची कास धरणाऱ्यांवर त्याची प्रतीति कसास लावण्यासाठीं संकटें तुटून पडतील; पण अखेर तींच संकटें कल्याणकारक होतील हा सिद्धांत सर्वांनीं अक्षय ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. तुह्मी मूढपणानें भलत्याच विचा-रांस हार जाऊन प्रसंगोपात थिल्लरपणा केल्यास तुम्हाला क्षमा करून तुम-च्यावर कृपा करणें आणि तुमचें कल्याण इच्छिणें हाच वडलांचा धर्म होय. हा धर्म राजा वसुप्रसाद कधीही विसरणार नाहीं. तुह्मीही आपली चूक दुरुस्त करून वडलांजवळ क्षमा मागणें आणि वडलांची आज्ञा शिरसा वंद्य मानणें यांतच तुमचें खरें कल्याण आहे. ”

हा उपदेश ऐकून सभाजन तटस्थ झाले. राजा वसुप्रसादानें दमनपुरो-हितांचा गौरव करून आणि आपले पुतणे त्या उपदेशाप्रमाणें चालण्याचा निश्चय करतील अशी आशा दर्शवून सभा विसर्जन करण्याची आज्ञा केली.

---

# प्रकरण १९ वें.



## पश्चात्ताप.




राजपुत्र धर्मध्वजामुळें मोहसेन व जयसिंग, यांसारख्या नीचांची अंतःकरणें जळत होतीं, ज्याचा चावा काढण्याकरतां त्या कालसर्पाचे विषदंत शिवशिवत होते, ज्याला खग्रास करण्याकरतां कामसेनरूपी केतु टपून बसला होता, ज्याचा बळी घेण्याच्या आकांक्षेनें शांभवीरूपी जखीण आ पसरून बसली होती; त्या सद्गुणसंपन्न धर्मध्वजाची चित्तवृत्ती कांहीं वेगळीच बनली होती. बाल्य, कौमार, पौगंड, किशोर या अवस्था संपून धर्मध्वज आतां चांगला प्रौढ झाला होता. तो तारुण्यानें रसरसला होता. तें स्वभावतः क्षत्रिय तेज होतें. त्यांतच अनेक गुरुजन, अनुभवी पंडित, क्षात्रकर्मकुशल योद्धे, धर्मशास्त्रवेत्ते, विद्वान, सदाचारतत्वज्ञ, आचार्य यांच्यापासून प्राप्त झालेल्या ज्ञान किरणांचा त्याच्या भोंवतीं मिलाफ झाला असल्यानें तो राजपुत्र विद्या-कला-ज्ञान यांच्या दीप्तीनें झळकूं लागला होता. तारुण्य आणि शहाणपण यांच्यामध्यें एकी नसावयाची या नियमास तो अपवाद होता. त्याचें मन उदात्त व प्रगल्भ झालें होतें. ज्ञानाच्या शुद्ध संस्कारामुळें त्याचें चित्त अत्युच्च तत्वांत निगडित झालें होतें. राज्यामध्यें काय काय गोष्टी घडत होत्या त्या त्याला समजत नव्हत्या असें नाहीं. आपला पिता राजा वसुप्रसाद सर्व गोष्टींची व्यवस्था पाहण्यास उभा असतांना त्याची आज्ञा पाळण्यावांचून तूर्त आपणास तत्संबंधीं कांहींच कर्तव्य नाहीं असें समजून तो आत्मविचारांत गर्क असे. जयसिंगाच्या निर्वाणीच्या मागणीस अखेरचा जबाब देण्यासाठीं जो दरबार भरला होता त्याला राजपुत्र स्वतः हजर नव्हता तरी त्याला तेथील सर्व प्रकार विदित झाला. तो समग्र वृत्तांत ऐकून त्याचें अंतःकरण विषण्ण झालें. त्याला त्या प्रकारासंबंधानें महदाश्चर्य वाटून तो त्या विषयांतील मुद्यांचें मनन करूं लागला. त्याची ती विचारमग्न वृत्ति ध्यानांत आणून राजा वसुप्रसाद व दमनपुरोहित त्याच्याशीं कांहीं भाषण करण्याकरतां त्याला घेऊन राजमहालांत बसले होते. राजा व पुरोहित दोन्ही पुतण्यांच्या वर्तनक्रमाबद्दल वाटाघाट करून राजपुत्राची संमती घेत होते. हा प्रकार चालला आहे तों एक चपराशी महालाच्या

दाराशीं येऊन मुजरा करून उभा राहिला. त्याच्या येण्याचें कारण विचारतांच त्यानें सांगितलें, " भोगपालमहाराज यावेळीं अशा एकांतांत राजा व पुरोहित यांच्या भेटी घेण्याच्या हेतूनें येथें येण्यास परवानगी मागत आहेत. "

चपराशाचें भाषण ऐकून राजा किंवा पुरोहित कांहीं बोलणार तोंच धर्मध्वज चपराशाकडे बघत बघत राजा व पुरोहित यांना उद्देशून ह्मणाला, " भोगपालमहाराजांना या राजमहालांत येण्याला परवानगी काढण्याची अवश्यकता आहे कीं काय ? "

या प्रश्नावर पुरोहितांनीं सांगितलें, " हा प्रसंग आज पहिलाच आहे. राजेसाहेबांनीं असा हुकूम फर्माविल्याचें कधींही ऐकिवांत नाहीं. परवांच्या सभेमध्यें ज्या गोष्टी घडल्या त्याबद्दल शरम वाटून किंवा शंका उत्पन्न होऊनच त्यांच्या मनांत हा परवानगीचा प्रश्न उद्भवला असावा. "

हें भाषण होत आहे तोंच राजानें चपराशास सांगितलें, " जा, भोगपालास तावडतोब येथें घेऊन ये. सभेनंतर त्याच्या व आमच्या खाजगत मुलाखतीचा हा पहिलाच योग आहे. तेव्हां त्याला कदाचित् परवानगीची जरूर वाटणें साहजिक आहे. "

राजाज्ञेप्रमाणें राजदूत मुजरा करून निघून गेला. ते तिघेजण आपलें भाषण बंद करून भोगपालाची वाट पहात बसले. भोगपालाचा अंतस्थ विचार काय असावा आणि तो काय उद्देशानें या ठिकाणीं येत असावा याविषयीं तर्क करण्यांत ते तिघेजण गुंतले आहेत तोंच त्या ठिकाणीं भोगपाल दाखल झाला. पुरोहित व पितृव्यचरणास वंदन करून तो पस्तावलेला वीर त्यांच्याकडून कांहीं प्रश्न होण्याची वाट न पाहतां राजपुत्रापुढें हात जोडून उभा राहिला. तो राजपुत्रास उद्देशून कांहीं शब्द काढणार तोंच धर्मध्वज प्रथमतः उठून उभा राहिला. भोगपालाच्या बद्दांजुलीबद्दल पूर्ण नाखुषी दाखवून त्यानें त्याच्या चरणापुढें नमस्कार घातला आणि पुन्हां उठून राजा व पुरोहित यांच्याकडे दृष्टि टाकून तो भोगपालास म्हणाला, " आपला असा अधिकार नाहीं. मी आपला कनिष्ठ बंधु आहे. आपण कसेंही असला तरी मला आपण वंद्यच आहां. कर्तव्याच्या शुद्ध बंधनानुसार मी आपली सेवा करणें उचित् होय. तुमच्या मनांत माझ्यासंबंधानें जो दुजाभाव उत्पन्न झाला असेल तो व्यर्थ आहे. तुह्माला राज्याचा तिसरा भाग अलग करून घेण्याची जी भावना झाली ती योग्यच होय ! पण त्यासंबंधानें तुह्मीं नीट विचार केला नाहीं.

आपण आपल्या मनाच्या विकल्पजाळ्यांत गुरफटून राहूनच आपल्याला त्रास करून घेतला. सांप्रतकाळीं राजा वसुप्रसाद हेंच आपणासर्वांचें दैवत होय. त्यांची आज्ञा मानणें व त्यांच्या मनाला संतोष देणें हेंच आपलें कर्तव्य होय. माझ्या हक्कासंबंधानें आपण निश्चित असा. कायदा किंवा शास्त्र कसेंही असलें तरी मला या राज्याधिकाराची मुळींच गरज नाहीं. आपण व मोहसंब यांनीं मिळून सर्व राज्यसूत्रें संभाळलीं तरी मला आनंद आहे. मी आपला धाकटा भाऊ या नात्यानें आपल्या सेवेला आमरणांत दक्ष राहीन. माझ्या बांधवांना, सुहृदांना, गुरुजनांना असंतोषकारक असें कोणतेंही कृत्य करण्यास तयार होणारा मी नव्हे. राजा व पुरोहित यांच्या समक्ष मी आपणास असें स्पष्टपणें कळवितों कीं, मला प्राप्त होणारा सर्व अधिकार मीं आपल्या स्वतःच्या खुषीनें तुमच्या चरणीं अर्पण केला आहे."

राजपुत्राची उदात्त व औदार्यपूर्ण वाणी ऐकून पुरोहितांना प्रेमाचें भरतें आलें. वसुप्रसादासही गहिंवर दाटला. त्या दोघांनीं राजपुत्रास पोटाशीं धरलें. तो प्रकार पाहून भोगपाल सद्गदित होऊन म्हणाला, "जळो तो पापी द्रव्यमोह ! धिःकार धिःकार असो त्या विलासी जनांच्या विलासी लीलांना ! प्रिय बंधो, तूं महान् पुण्यशील आहेस. तुझ्यावरून माझा तिसरा हिस्साच काय पण असले हजार हिस्से ओवाळून टाकावे असा तुझा अधिकार आहे. दमन पुरोहितांनीं सभेमध्यें मला जो उपदेश केला त्यानें माझें चित्त साफ झालें आहे. पुरोहितांच्या अमृतमय वाणीनें माझी मेलेली शुद्ध बुद्धि जिवंत झाली आहे. त्यांच्या मंत्रसदृश व बोधपर वाक्यांनीं माझ्या मनावरील दुष्ट वासनारूपी वेताळ बद्ध होऊन पडला आहे. मला राज्य नको, हिस्सा नको ! राजा वसुप्रसादानें माझ्या अपराधांची क्षमा करून मजकडे करुण दृष्टीनें पहावें. माझ्यावरील कोप व कोपजन्य अस्वस्थता टाकून देऊन मला सर्व अपराधांची क्षमा करावी. पितृव्य आणि राज्याधिपती या नात्यानें मला होईल ती आज्ञा वंद्य मानून गुरुजनसेवेला हा दास आजपासून विकलेला आहे. धर्मध्वजासारख्या राजपुत्राचे हक्क संरक्षण करण्याचें भूषण मिळविण्याकरतां देह अर्पण करावयाचा टाकून भलत्याच लालसेनें घरामध्यें कलह लावून स्वसौख्य प्राप्त करून घ्यावयाची दुष्कीर्ति जोडणें याहून भयंकर पातक तें कोणतें."

असें बोलून भोगपालानें पुन्हा राजा व पुरोहित यांच्या पायांवर लोळण

मारली. त्याची ती विनीत व पश्चात्तापपूर्ण अवस्था पाहून पुरोहितांनी त्यास उठविलें. त्या दोघांनीं त्याला पोटाशीं धरून सांत्वनाच्या चार गोष्टी सांगितल्या. पुरोहितांनीं त्याच्या अनुतापाबद्दल वाहवा करून त्याला शाबासकी दिली. त्याच्या शुद्ध विचारांची तारीफ करून त्यांनीं त्याला कल्याणकारक उपदेश केला. राजा व पुरोहित यांच्या तोंडून निघालेले धन्यवाद ऐकून आणि त्यांच्या मनाची शुद्ध-संतोषकारक वृत्ति पाहून भोगपाल आनंदित झाला. राजपुत्र धर्मध्वजासही प्रेम दाटून आलें. त्या दोन्ही बंधूंनीं एकमेकांस आलिंगन दिलें आणि परमेश्वराच्या प्रेरणेनें घडून आलेल्या त्या शुभ प्रसंगीं ते स्वस्थ बसले.

---

## प्रकरण २० वें.

### विवाहमान्यता.



सुप्रसाद, दमनपुरोहित, इंदुमती, यांची वृत्ति लक्षांत घेतली असतां ते कोणत्याही कल्याणकारक गोष्टींतील मुख्य मुद्दा विसरणारे नव्हते. ज्यांच्या प्रसादानें त्यांना धर्मध्वजासारखें रत्न प्राप्त झालें त्या रत्नाच्या लाभसौख्यांत दंग होऊन ते श्रीभारतीला विसरण्या इतके अनुदार नव्हते. धर्मध्वज लहान असतांना त्यांनीं श्रीभारतीला आपल्या घरीं आणण्याचा यत्न केला होता. पण त्या वेळीं भारतीनें कांहीं नड दाखवून त्यांची विनंति नाकारली. पुढें बरेच दिवस तो यात्रा करण्यास गेला. यात्रेहून नेहमींपेक्षां बऱ्याच कालावधीनें परत आल्यानंतर त्यांनीं पुन्हां भारतीच्या आगमनाची इच्छा दर्शविली. तेव्हां भारतीनें आपलें स्थान सोडण्यास कांहीं धार्मिक हरकत दर्शविली व राजपुत्रासच तिकडे आणण्याचा हेतु प्रगट केला. गुर्वाज्ञेप्रमाणें त्यावेळीं राजपुत्रास भारतीच्या दर्शनास नेऊन त्याच्या पायावर घातलें. पण त्यावेळीं धर्मध्वज लहान होता. पुढें तो मोठा झाला तेव्हां त्याला स्वतःलाच भारतीच्या दर्शनाची इच्छा झाली. राजपुत्राला भारतीच्या तोंडून उपदेश प्राप्त व्हावा अशी राजाराणींची उत्कट इच्छा होती.

खेरीज ते सर्वजण कृतज्ञता व कृतघ्नता यांच्या सूक्ष्मतर मूलतत्वास जागणारे असल्यानें त्यांना श्रीभारतीची आठवण हरप्रसंगीं होई. गुरुमुखांतून आपल्याला बोधामृत मिळावें ह्मणून धर्मध्वजानें भारतीकडे जाण्याची उत्कंठा धरली. पण तेव्हांपासून भारतीनें यशस्काराचा त्याग केल्यासारखें केलें. आजमितीपर्यंत सुमारें एक तप किंवा पाऊण तप त्यांचा कांहींच तपास नव्हता. स्वतःच्या मानसिक स्थितींतील अपूर्व अस्वस्थता, अनिश्चित सिद्धांत, प्रापंचिक व व्यावहारिक डळमळीत तत्वें, जगांतील सुखदुःखादि अवस्था, कारणपरत्वें उद्भवणाऱ्या अनेकविध स्थिति, धार्मिक, सामाजिक, ईश्वरविषयक मुद्दे या प्रकारच्या अनेक व्यवधानांनीं धर्मध्वजाचें चित्त जसजसें अधिक व्यापत चाललें तसतशी त्याची भारतीच्या भेटीची उत्कंठा वृद्धिंगत होत चालली, पण उपयोग काय! भारतीचा कांहींच पत्ता लागेना. त्याच्याविषयीं त्याच्या मनांत अनेक कल्पना उत्पन्न होऊं लागल्या. राजा, राणी, पुरोहितही त्या गुरूच्या अंतर्धानानें अत्यंत कष्टी झाले. धर्मध्वज तर त्याच्या पुनर्भेटीविषयीं आशा व निराशा यांच्या प्रवाहांत गटंगळ्या खात राहिला.

अशा स्थितींत राजानें उपाधिरहित होण्याचा विचार मनांत आणला. आपल्या डोळ्यादेखत धर्मध्वजाला गादीवर बसवावें, त्याला सर्व कारभार समजावून देऊन त्याच्याकडून सर्व व्यवहार आपल्या देखरेखीखालीं करवून घ्यावा आणि हलके हलके प्रपंचपराङ्मुख होऊन पत्नीसह स्वस्थ कोठें तरी पुण्याश्रमीं जाऊन देहाचें सार्थक करावें असा राजानें संकल्प केला. त्यानें लागलीच आपली इच्छा प्रथमतः दमनपुरोहिताला विदित केली. त्यांनीं राजाच्या इच्छेची वाखाणणी केली. तें पाहतांच इतर राजपरिवार व राजघटक यांना तो वृत्तांत कळविण्यांत आला. सर्वांचें अनुमत मिळाल्यावर धर्मध्वजाला अभिषेक करण्याचा विचार कायम झाला. त्या पूर्वीं प्रमिलेचा विवाह उरकावा असें राजाच्या मनांत होतें. पण तो योग जुळून येणें अडचणीचें झालें आहे अशा समजुतीनें सर्वांच्या विचारें आधीं धर्मध्वजाचाच विवाह करण्याची खटपट करणें अवश्य वाटलें. प्रमिलेकरतां वर शोधण्याचें काम चालूंच ठेविलें. पण धर्मध्वजाकरतां त्याला अनुरूप अशी कुलशील, सत्वसंपन्न दानयोग्य कन्यका शोधण्याचा प्रयत्न विशेष जोरानें चालू झाला. ही बातमी जाहीर होतांच कित्येक राजकन्यांच्या वतीनें बोट

करण्याकरतां ठिकठिकाणचे वकील, मंत्री, उपाध्ये वसुप्रसादाच्या दर-बारीं येऊं लागले. जे कोणी लोक नवऱ्यामुलीच्या तजबिरा घेऊन येत ते राजपुत्राचेंही बारकाईनें निरीक्षण करून संतुष्टचित्त होऊन जात. दमन-पुरोहित व राजाराणी त्या तजबिरांची तपासणी करून वाटावाट करीत आणि त्यांना बऱ्याशा वाटतील त्या तजबिरा ते मुद्दाम धर्मध्वजाच्या पसंती-करतां त्याच्याकडे पाठवीत. राणी इंदुमती त्याच्याजवळ बसून व तजबिरा पुढें पसरून ठेवून त्यांत निवड करी व त्या निवडीला धर्मध्वजाची पसंती मागे. धर्मध्वज त्यासंबंधानें बरें वाईट कांहींच मत देत नसे. तो त्या विष-यींचा निकाल मुळींच लांबणीवर टाकून ती वेळ मारून नेई. हा प्रकार राजा व पुरोहित यांना कळला तेव्हां त्यांनीं धर्मध्वजाला विचारलें, " तुला यांतून कोणतीही नवरी पसंत नसेल तर तुझ्या पसंतीची व्याख्या तरी आम्हांला कळूं दे. या तजबिरांमध्यें कित्येक मुली अनुपम सौंदर्यानें युक्त दिसतात. "

बापाचें हें बोलणें ऐकून धर्मध्वज आश्चर्यभरित झाला. त्यानें मोठ्या अदबीनें बापाला व पुरोहिताला हात जोडून विनंति केली, " आपणाला कांहीं सांगावें असा माझा अधिकार नाहीं. पण आपल्या परवानगीनें माझ्या अल्पबुद्धीला वाटतें तें मी बोलतों. माझ्यापुढें ज्या राजकन्यांचीं चित्रें पसरलीं आहेत तीं सुंदर दिसतात हें खरें; पण तो त्या राजकन्यांचा गुण आहे कीं चितार्‍याचें कौशल्य आहे याची शंका येते. कारण मनुष्यानें असावें तसें दिसावें अशी भावना धरून फारच थोडीं चित्रें रेखाटलेलीं असतात. "

राजपुत्राच्या या उद्गाराची खोली न समजून पुरोहित म्हणाले, " राजपुत्रा, त्या तसबिरा जशा दिसतात तशाच त्या मुळांत आहेत असें धरून चालून तूं त्यांतील कोणती ती पसंत कर; मग आम्ही ती मुलगी समक्ष पाहूं आणि ती जर त्या चित्राप्रमाणें तंतोतंत भरली तरच तिचा स्वीकार करूं ! मग तर तुझी कांहीं हरकत नाहींना ? "

पुरोहितांची समजुतीची भाषा जाणून राजपुत्रानें सांगितलें, " मला आपल्या या बोलण्याचें बहुत आश्चर्य वाटतें ! चितार्‍याला त्या मनुष्याचें बाह्य स्वरूप रेखाटण्याचें कसब साधलें असेल; पण बाह्यस्वरूप हें कांहीं पसंती नापसंतीचें मुख्य अंग नव्हे. अंतरंगांतील भावनांची छटा ही बाह्य इंद्रियांवर उमटवून दाखविण्याची कला कारागिरांच्या हस्तगत झालेली

असेल; पण ती सत्यच असेल असें नाहीं. चित्र काढण्याच्या वेळीं मनुष्यानें जो आविर्भाव धारण केला असेल व तो त्या वेळीं ज्या वृत्तींत असेल ती वृत्ति किंवा तो आविर्भाव चितान्याच्या कौशल्यांत व्यक्त होऊं शकेल. पण त्यावरून खरा स्वभाव किंवा मनोधर्म व्यक्त होणें शक्य नाहीं. देहस्वरूपाप्रमाणें अंतरंगाचें स्वरूप रेखाटण्याची कला अद्याप तरी मनुष्याला साध्य झालेली नाहीं. तेव्हां जिला आपली जन्माची मैत्रीण करावयाची, जिच्या पापपुण्याचे आपण वाटेकरी व्हावयाचें, त्या स्त्रीच्या गुणावगुणांची, आचारविचारांची, मनोवृत्तीची व अंतःकरण स्फूर्तीची परीक्षा होणेंच जरूर आहे असें मला वाटतें. या अंतर्गुणांच्या जोडीला देहाचे गुण अनुकूल असतील तर उत्तमच. बाकी त्यांची विशेष महती नाहीं. पुरुष काय किंवा स्त्री काय त्यांच्या देहसौंदर्याबद्दल किंवा देहकुरूपतेबद्दल कोणीही अभिमान किंवा वैषम्य मानण्याचें कारण नाहीं. कारण देह हा जन्मतः प्राप्त होत असतो. तो कांहीं मनुष्यानें प्राप्त करून घ्यावयाचा गुण नव्हे. त्याच्या सुरूप किंवा कुरूपपणाबद्दल मनुष्य जबाबदार नाहीं. सद्गुण ही चीज मात्र मनुष्यानें आपल्या विचारसामर्थ्यानें प्राप्त करून घ्यावयाची असते. आचार, शील, सद्गुण वगैरे गोष्टींबद्दल मनुष्य स्वतः जबाबदार आहे. ही जबाबदारी कोणी कितपत संभाळली आहे हें चित्रांवरून कसें समजेल ? "

राजपुत्राचे विचार ऐकून राजा व पुरोहित प्रसन्नचित्त झाले. पुरोहितांनीं सांगितलें, " राजपुत्रा, तुझे विचार सर्वथैव विचारणीय आहेत. असा विचार करणारे लोक विरळाच असतात. बहुतेक माणसांचें लक्ष्य गुणापेक्षां स्वरूप आणि संपत्ती यांकडेच मोहिलेलें असतें. शास्त्रानें या सर्व गोष्टी ध्यानांत घेऊन विवाहाच्या कामीं शास्त्रनिर्बंध ठरविलेले आहेत. ते कल्याणकारक आहेत. पण शास्त्रास कोणी जुमानीत नाहींत. सर्वजण बहुतेक आपापल्या मनाच्या आज्ञेलाच मानतात. "

यावर राजपुत्रानें विचारलें, " आपण असें कसें ह्मणतां ? धर्माज्ञा पाळणें कल्याणकारक असतांना ती लोक पाळीत नाहींत हें आश्चर्य नव्हे कां ? आपलें कल्याण कोणास नको आहे ? "

ह्या प्रश्नाचें उत्तर देण्याकरितां पुरोहित बोलले, " सर्वत्र आपआपले कल्याणेच्छूच आहेत ! पण धर्माज्ञा कल्याणकारक आहे अशी त्यांची समजूत लवकर पटत नाहीं. धर्माज्ञा पाळण्यास मनाच्या शुद्धतेची

अवश्यकता आहे, मन हें सर्व इंद्रियांचा राजा होय ! तो राजा जशी आज्ञा करील त्याप्रमाणें मनुष्यांच्या हातून वर्तन घडत असतें. ''

पुरोहिताच्या तोंडचें अगाध ज्ञान समजण्याच्या हेतूनें राजपुत्रानें पुन्हां प्रश्न केला, '' मग तें मन सुख व कल्याण यांवर नजर देऊन मनुष्याच्या हातून सत्कृत्यें किंवा विहित आचारच कां घडवून आणीत नाहीं ? बहुतेक प्रसंगीं तें मन जर मनुष्याला भलत्याच वर्तनाची प्रेरणा करीत असेल तर तें मन मनुष्याचा महान शत्रूच होय असें समजलें पाहिजे. ''

यावर वसुप्रसाद ह्मणाला, '' मनाला जर राजपद द्यावयाचें तर बहुतेकांच्या अंतःकरणांतील हा राजा अशुद्ध स्फूर्तीच उत्पन्न करतो हें ह्मणणें संभवनीय नाहीं. तें जर राजपदारूढ असेल तर तें आपला दरजा ओळखीत नसलें पाहिजे, किंवा त्याचा दरजाच हीन असला पाहिजे. अगर त्याच्यावरही कोणी तरी सत्ता गाजविणारे असले पाहिजेत. ''

राजाचा प्रश्न अपुरा आहे असें वाटून किंवा पुरोहिताच्या अमृतमय वाणीचें यथेष्ट पान करावयास सांपडावें आणि शास्त्र व मन यांचा यथास्थित उलगडा व्हावा या हेतूनें राजपुत्रानें त्याच भाषणाच्या जोडीला पुरवणीदाखल ह्मटलें, '' किंवा मनाचा सर्व उपदेश, प्रेरणा, किंवा स्फूर्ति नेहमीं कल्याणकारक असून त्याच्यानुसार घडणारें प्रत्येक वर्तन सुखोत्पादकच असतें. फक्त कांहीं लोक त्या सुखस्थितीला विनाकारण दुस्थिती असें नांव देऊन शास्त्रांचें वृथा महत्व स्थापूं पाहतात ! किंवा मनाच्या प्रेरणेचा मनुष्याच्या आचार क्रमाशीं मुळींच संबंध नसेल ! ''

त्या पितापुत्रांचा सखोल प्रश्न ऐकून दमनपुरोहित आपलें विवेचन पुढें चालविण्यास जास्तच उत्सुक झाला. त्यानें सांगितलें, '' तुह्मी एकदम अशी गडबड करूं नका. सर्व गोष्टींचें व मुद्यांचें विवेचन स्वस्थतेनें ऐका. मन हें मनुष्याचा शत्रू आहे आणि मित्रही आहे. तें ज्या स्थितींत हितोपदेश करण्यास प्रवृत्त होतें तेव्हां ते मित्रभावी होय आणि ते जेव्हां अहितोपदेशास प्रवृत्त होतें तेव्हां तें शत्रुभावी होय. तें मन स्वभावतः अत्यंत उच्च दरजाचें आहे. एखाद्या पूर्णशुद्ध, सात्विक, कुलज, पवित्र, धर्मसंपन्न व गुणानिधि अशा सत्पात्राच्या पोटीं निर्माण झालेल्या पुत्राप्रमाणेंच मनाची अवस्था आहे. त्याचा मुख्यतः मनुष्याच्या वर्तनक्रमाशीं संबंध आहे. मनाची सत्ता मुळींच बाजूला ठेवून व शास्त्रप्रणित आचारतत्वांचें महत्व व तज्जन्य

सौख्य झुगारून देऊन मनुष्यांच्या सौख्यस्थितीचा विचार केला तर कोण-त्याही मनुष्याची आपल्या सुखस्थितीमध्यें कांहीं एक तक्रार असतां कामा नये. कोणत्याही प्रकारचा अविहित व धर्माला अमान्य असा आचार करून प्राप्त झालेल्या सौख्यस्थितींतील लोक किंवा मूळच्या सुखदस्थितींत असून सौख्याची वाढ करण्याकरतां वाटेल तो आचारकम करीत राहणारे लोक यांतून बहुतेकजण दुःख, अस्वस्थता, असमाधान यांचींच गाऱ्हाणीं सांगत असतात! केवळ धर्मप्रणित, शास्त्रविहित व सज्जनमान्य अशा आचाराचें दास्य करणाऱ्या जिवांतून अपवादक ह्मणून एखादाच प्राणी दुःखांत सांपडण्याचा संभव आहे. या दोन्ही अवस्था ध्यानांत घेतल्या आणि दोन्ही प्रकारच्या स्थितींतील माणसांचा बारकाईनें प्रत्यक्ष अनुभव घेतला ह्मणजे शास्त्र, धर्म, व सज्जनमुखांतून स्रवलेले अमृतबिंदु यांचें महत्व वृथा नाहीं असेंच कोणालाही समंजसपणानें कबूल करणें भाग पडेल."

या स्पष्टीकरणानें बहुतेक मुद्यांचा निकाल लागल्यासारखा झाला. फक्त एकच मुद्दा शिलक राहिला असें ध्यानांत धरून धर्मध्वज बोलला, "आतां फक्त मनाच्या स्वतंत्रतेपरतंत्रतेविषयींचा कायतो प्रश्न शिलक राहिला. मनासारख्या सर्वसामर्थ्यसंपन्न, बलवत्तर विभूतीवर सत्ता चालविण्यास कोणी समर्थ असेलसें वाटत नाहीं."

ते दोघे पितापुत्र शास्त्रविवेचन ऐकण्यास उत्सुक आहेत असें पाहून पुरोहित पुन्हां बोलूं लागले, "मन हें राजा आहे व सर्व इंद्रियांवर त्याचीच सत्ता चालते. इंद्रियांचा स्वभाव ओढाळ व विषयप्रिय असल्या-कारणानें तीं आपापल्या स्वभावानुसार आपापल्याला प्रिय अशा विषयांच्या उपभोगाकडे मनाला ओढीत असतात. मन हें उच्चनीच विकारांच्या दाबांत अडकलेलें असतें. मनाच्या हालचालींसंबंधानें दोन्ही प्रकारच्या विकारांचा झगडा चाललेला असतो. नीच विकार रजतजन्य असतात. उच्च विकार सत्वजन्य असतात. मन लेचेंपेचें असेल तर तें नीच वृत्तींच्या आधीन होतें. मन जर बळकट असेल तर तें नीच विकारांना हार जात नाहीं. त्याचा चांगला खंबीरपणा असेल तर तें नुसत्या ताटस्थ्यांतही न राहतां सत्वजन्य उच्च वृत्तींचें दास बनतें. नीच वृत्तींच्या दाबानें मन मलीन बनलें ह्मणजे तें इंद्रियवश होतें आणि चवचाल व विषयपराधीन इंद्रियांच्या प्रेरणेनुसार मनुष्य धर्म-शास्त्र, सद्बोध, सदाचार,

नीति, शुद्धता, विहितपणा यांच्या उरावर पाय देऊन मनसोक्त वर्तन करतो. फक्त तो व्यवहारदृष्ट्या व सामाजिकदृष्ट्या स्वतःचा सुरक्षितपणा, नफा, सुख, सोय, स्वस्थता, यश, कीर्ति, अब्रू याविषयीं मात्र चांगली सावधगिरी ठेवतो. या सावधगिरीसच ज्ञान, धोरण, शहाणपण अशा संज्ञा तशा प्रकारच्या लोकांकडून प्राप्त होतात. मलीन मनाच्या प्रेरणेप्रमाणें मनसोक्त आचार करून खरोखर या वरील गोष्टी जर तत्वतः साधता आल्या तर कोणीही कांहीं ह्मणणार नाहीं व शास्त्र, धर्म, सद्वचनें व यांचें महत्वही उरणार नाहीं. पण अशी जनता बाह्यतः कशीही दिसली तरी ती अंतस्थतः सुखी व निर्भय नसते! परिणामीं तर तिला अत्यंत कष्टतर स्थितीचा भोग भोगणें भाग पडतें. कारण मनुष्यजात त्रिविधतापाचें भक्ष्य आहे. कोणताही मी मी ह्मणविणारा मनुष्यजातींतील प्राणी अध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक यांतून कोणत्याना कोणत्या तरी परितापानें होरपळतच असतो. या तापांच्या त्रिविधतेपुढें भ्रमित, मोहित व मलीन मनाची अक्कल गुंग होऊन जाते."

या भाषणानें राजा व राजपुत्र यांचें समाधान झालें; पण राजपुत्रानें पुन्हां प्रश्न केला, "असें आहे तर खरें सुख प्राप्त व्हावें या हेतूनें सर्वजण धर्माचे दास बनून सत्वगुणाच्या आश्रयानें तापरहित होऊन सुख कां साधीत नाहींत? भलत्याच गोष्टींना सुख असें नांव देऊन त्यांच्या प्राप्तीकरतां आपलें शरीर, मन, यत्न, अक्कल, हिंमत आणि पैका कां खर्च करतात?"

राजपुत्राच्या या प्रश्नाचें उत्तर देऊन त्याचें पूर्ण समाधान करणें जरा दुरापास्त होतें. पण त्याला थोडक्यांत मुख्य मुद्दा कळवून ठेवावा आणि आपल्या या सर्व विवेचनाच्या मूळ मुद्यावर आणावें या मतलबानें पुरोहितांनीं सांगितलें, "धर्माचे दास बनणें ही गोष्ट अत्यंत बिकट आहे. प्रथमतः धर्म ही कल्पनाच अमान्य होण्यासारखी आहे. कारण त्याचे बंध क्लेशकारक असून त्याचें दास्य अगदीं नीरस, निःसत्व आणि लौकिकी फलाच्या दृष्टीनें निरर्थक भासणारें आहे. हीच त्याची पहिली भूल आहे. धर्मदास्याचें सर्व फल पारमार्थिक व पारलौकिक आहे असें महाजनांचे सिद्धांत आहेत. परमार्थ आणि परलोक या गोष्टी ऐहिकसुखाच्या मोहानें भ्रमित झालेल्याना विश्वसनीय वाटणाऱ्या नाहींत. अध्यात्मिक उन्नतीच्या पोटांत आधिभौतिक उन्नती कशा रीतीनें वास्तव्य करते हें तत्व समजणें फार कठीण आहे. साधारणतः सर्व जग आधिभौतिक सौख्याला हुरळलेलें

असल्यानें तें कोणत्याही गोष्टीच्या तात्काल फलासाठीं उत्सुक झालेलें असतें. धर्मदास्याचा अदृश्य कार्यकारणभाव कल्पनातीत असल्यानें त्याचें तात्काल फल कोणाच्याही ध्यानांत येणें दुरापास्त आहे. धर्मदास्य सर्वफलदायी आहे ही गोष्ट निःसंशय होय. पण या तत्वाचें ज्ञान होण्यास साधन म्हटलें ह्मणजे धर्मदास्यच होय. ह्मणजे धर्माचें ह्रद्गत कळण्यास धर्माची सेवा हेंच एक साधन होय. हें साधन निमुटपणें चालू ठेवून मनुष्यानें सत्संगप्राप्तीच्या नादांत राहिलें पाहिजे. कारण सत्संगावांचून मनाचा मलीनपणा नष्ट होणार नाहीं. तात्पर्य, विहिताचार आणि सत्संग याच गोष्टी विशेषतः आत्मकल्याणास अवश्य आहेत. तेव्हां हे राजपुत्रा, तूं सद्गुणसंपन्न पत्नीचा स्वीकार करून धर्मपर आचारानें वाग आणि सत्संगाची कळकळ व उत्कंठा ठेव म्हणजे तुझें सर्वतोपरी कल्याण होईल. "

पुरोहितांनीं राजपुत्राला कल्याणाचा मार्ग थोडक्यांत सांगून लग्न करण्याचा उपदेश केला हें पाहून राजाला मोठा आनंद वाटला आणि त्याचा पुरोहिताबद्दलचा पूज्यभाव जास्तच दृढ झाला. त्यानें राजपुत्रास विवाह करण्याला उत्तेजन देण्यासाठीं सांगितलें, " या दमनपुरोहिताची सेवा ह्मणजेच सत्संगप्राप्ति होय. तेव्हां तुझें एक कार्य अंशतः झालेंच आहे. आतां तूं योग्य कन्या पसंत करून सपत्निक हो. माझ्या डोळ्या-देखत तूं आपल्या पत्नीसह अभिषिक्त होऊन राज्याधिकार चालवूं लागलास ह्मणजे माझें समाधान झालें. अधिकारारूढ झाल्यावर तूं सद्धर्म व सदाचार पाळशील यांत शंका नाहीं. "

त्या दोघांचा मथितार्थ जाणून राजपुत्र ह्मणाला, " आतांपर्यंतच्या विवेचनात्मक भाषणानें माझें कांहींसें समाधान झालें आहे. तरी पण माझें मन असंख्य विचारांनीं व्यापलें आहे. सुख दुःख, इहलोक परलोक, धर्माधर्म, कर्माकर्म, बंधमोक्ष, कर्तव्याकर्तव्य इत्यादि द्वंद्वसमुदायांनीं माझ्या मनाची चलबिचल उडाली आहे. माझें मलाच कांहीं कळेनासें झालें आहे. तरी पण आपण दोघेही मला वंद्य आहां. आपल्या इच्छेचा भंग करणें हें माझ्या हातून कधींही होणार नाहीं. आपण सर्व कांहीं जाणणारे आहां; आपण अनुभवी आहां. आपण ठरवाल त्या कुलशीलसंपन्न सद्गुणी वधूशीं लग्न करून प्रपंच करणें आणि आपल्या इच्छेप्रमाणें शिवावतीच्या राज्याचीं अधिकार-सूत्रें स्वीकारून प्रजाजनांच्या हिताचें संरक्षण करणें या दोन्ही गोष्टी

स्वीकारण्यास मी कबूल आहें. गुरुजन आणि दमनपुरोहित यांच्या कृपेनें मला माझें कर्तव्य समजलें आहे. पण या योगानें मला परमार्थाची प्राप्ति होईल कीं नाहीं आणि माझ्याकडून माझें शुद्धकर्तव्य बजावणें होईल कीं नाहीं याविषयीं मात्र माझें मन साशंक झालें आहे. दमनपुरोहितांची चरणसेवारूपी सत्संगति माझें मन शंकारहित करो आणि माझ्या कर्तव्यपरायणतेनें माझें व माझ्या योगानें माझ्या कुलाचें सार्थक होवो अशी माझी ईश्वराजवळ प्रार्थना आहे. ”

असें बोलून राजपुत्रानें त्या दोघांना नमस्कार घातला. पुरोहितांनीं त्याला उभें करून सांगितलें, “ राजपुत्रा, तूं काळजीरहित हो. राजा वसुप्रसाद व त्या पुण्य पुरुषाचा तूं शुद्धभावी पुत्र मला मानतां हेंच मोठें आहे. मी तशा उच्च दरजाचा मनुष्य नाहीं. ज्याला सत्संग ह्मणतात तो मी नव्हे. तसें असतें तर माझ्या आजपर्यंतच्या सहवासानें व कृपासामर्थ्यानें तुमचें खरें कल्याण तुमच्या पदरांत पडून तुह्मी आधिव्याधि, शोक, क्लेश, चिंता यांतून कायमचे मुक्त होण्याच्या मार्गांत रममाण होऊन राहिला असता. माझा करुणासंपन्न सद्गुरु श्रीभारती किंवा त्यांच्यासारखे कोणी अन्य हरिप्रिय हेच खरे संत होत. त्यांचा संग ह्मणजेच सत्संग होय ! प्रपंचपसाऱ्यांत वावरत असतां कर्तव्यपर राहून अशा संतजनांच्या दर्शनाचा निदिध्यास ठेवल्यानें आपणा सर्वांचें इहपरलोकीं कल्याण होईल असा भरंवसा धरून असावें. ”

हें भाषण ऐकतांच राजा व राजपुत्र आनंदित झाले. श्रीभारतींच्या नामोच्चारानें त्यांना एक प्रकारचा उल्हास व जोर प्राप्त झाला. पण त्या दिव्य व महदुपकारी विभूतीचा कोठेंच शोध नाहीं ही गोष्ट आठवून ते सर्वजण चिंतामग्न झाले. त्या त्रिवर्गाच्या मनांत श्रीभारतींविषयींचे विचार खेळूं लागल्यानें ते आपापल्या कल्पनेंत गढून स्तब्ध राहिले.

---

# प्रकरण २१ वें.

## खल-कृत्रिम.



उत्तम, मध्यम, कनिष्ठ यांतून कोणत्याही प्रकारचें बी येणें ही गोष्ट अनेक गोष्टींवर अवलंबून आहे. तरी पण मुख्यतः बीज आणि क्षेत्र या दोन गोष्टी विशेष मुद्याच्या होत. सुक्षेत्रावांचून सुबी व्यर्थच होय. उखीर क्षेत्रांत तर तें वायाच जातें. वस्तुतः पाणी हा स्वच्छ प्रवाही पदार्थ आहे. पण तो ज्या गुणावगुणी पदार्थांत मिसळेल त्यासारखा बनतो. बचनाग व ऊस यांच्या पोषणास पाण्याची सारखीच जरूर आहे. पण तें शुद्ध जल बचनागामध्यें मारक व बाधक गुणांनीं प्रगट होतें; आणि उसामध्यें मधुर व साधक गुणांनीं दृश्यमान होतें. यांत पाण्याचा दोष नसून ऊस व बचनाग यांच्या गुणावगुणांचा मुद्दा मुख्य आहे. ज्याच्याशीं तें मिश्र होत नाहीं त्या ठिकाणीं तर त्याचा व्यर्थपणाच दिसून येतो. भल्या माणसाच्या मुखांतून निघणाऱ्या उपदेशाची गोष्ट अशीच आहे. सदुपदेश हा स्वभावतः शुद्धच असावयाचा; पण ज्यांचा जन्म नरकापासून झाला आहे, ज्यांच्या संचितांत पापाचें महत्त्व अधिक आहे अशा मनुष्याला सज्जनाचा उपदेश पटत नाहीं. हा त्या उपदेशाचा हीनपणा नसून तमोगुणव्याप्त पापी अंतःकरणाचा हा दोष होय !

दमनपुरोहितांनीं सामान्यतः जो बोध केला त्याचा भोगपालाच्या मनावर योग्य परिणाम झाला. त्याला आपल्या कृतकर्माचा व नीच विचारांचा पश्चात्ताप झाला. त्या योगानें तो कांहीं कोणी विश्ववंद्य साधु किंवा अलौकिक विभूति बनला नाहीं. पण तो पाप व भलतेच विचार यांपासून पराङ्मुख तरी झाला हें कांहीं थोडें झालें नाहीं. पण त्याचा बंधु जो मोहसंव त्याची स्थिति निराळीच बनली. त्याला आपल्या दुष्ट आचारांचा व घातकी विचारांचा अनुताप तर वाटला नाहींच पण पुरोहिताच्या उपदेशानें तो जास्तच संतापला. आपणाला अज्ञानी व मूढ समजून तो पुरोहित शहाणपणाच्या गोष्टी सांगण्याचा लौकिक जोडून स्वतःची आढ्यता वाढवीत आहे असें समजून मोहसंव त्या बिचाऱ्या भटजीवर क्रुद्ध

झाला. आपल्या कार्यांत मुख्य विघ्न त्या भटाचें आहे अशी त्यानें आपली समजूत दृढ करून घेतली. आपण स्वतः भोगपालाचें अंतस्थ विचार बेलाशक प्रगट केले यांत त्याला उलटें आपलें धैर्य व धोरण या विषयींचें कौतुकच वाटलें. पण भोगपालानें जें त्याचें पापमय बिंग जगाच्या नजरेस आणलें त्याबद्दल तो भोगपालावर अतिशय संतापला. भोगपालाला आपण धमकी दिली याबद्दल त्याला त्याच्या स्वतःच्या शौर्याचें चोज वाटलें. पण राजाला दिलेल्या धमकीबद्दल जेव्हां भोगपालानें त्याला तुच्छवत् करून वीरश्री व्यक्त केली तेव्हां मात्र तो पराकाष्ठेचा खवळला. अखेर त्याचें मन अत्यंत अस्वस्थ व क्रोधवश होऊन तो तेथेंच सर्व सभेचा ग्रास करण्यास तत्पर झाला. पण आपलें बल व सामर्थ्य जाणून त्यानें आपला राग व अशांतता झांकून ठेवण्याचा यत्न करून तो तेथून निघून गेला. त्या क्षणालाच त्यानें राजा, राजपुत्र, पुरोहित, भोगपाल यांचा निःपात करण्याचा कृतनिश्चय केला.

त्यानें एकांतामध्यें आपल्या प्रिय पत्नीची मुलाखत घेऊन तिला सर्व हकीगत निवेदन केली. त्या विषयीं नागिणीलाही दिराच्या वर्तनाचा अत्यंत तिटकारा आला. अकस्मात् धांवत जाऊन भोगपालाच्या नरडीचा चावा काढावा असें तिला वाटलें. तिला शांत करून मोहसंघानें सांगितलें, "क्रोधाच्या भरांत भलतेंच कृत्य करण्याची उचल करून स्वतःला धोक्यांत आणण्याचा प्रसंग येतो. तसाच विचार केला असता तर त्या पुरोहितासह भोगपालाला मी तेथल्यातेथेंच काटून टाकलें असतें. पण तें सुरक्षित कृत्य नव्हे. भिस्मेपणा धरून, स्वसंरक्षणाची खबरदारी ठेवून कपट क्रियेनेंच आपला मतलब साधला पाहिजे. भोगपालाचा सर्वस्वी नाश करावयाचा हा तर आपला निर्धार आहेच. आमच्या योजलेल्या कार्यांत त्याची बरीच आडकाठी येण्याचा आतां फारच संभव आहे. याकरतां त्याला अगदीं भंडावून सोडलें पाहिजे. त्याला स्वतःच्या स्थितींत अगदीं निर्बल व निरुत्साही करून टाकलें पाहिजे. याकरतां तूं भोगपालाच्या बायकोला आपल्या मंदिरांत बोलावून आण. ती गृहाचा त्याग करून जयसिंगाच्या वाड्यांत दडून राहण्यास कबूल होईल अशा प्रकारें तिला भोंद. माधवी नाहींशी झाली ह्मणजे तो मूर्ख पतिवियोगानें तळमळेल आणि बहुतेक वेडा होईल. तशा स्थितींत त्याचें निजधामगमन आपण घडवून आणूं. मग माधवी जाते कोठें? द्रव्य, विलास, वैभव, चैन, स्वातंत्र्य यांच्या मोहानें व भोगपालाला कह्यांत आणण्याच्या हेतूनें ती

गृहत्यागाला तयार होईल. पुढें भोगपालाचा अंत झाला ह्मणजे ती स्वतःचें सुख ध्यानांत आणून जयसिंगाशीं पुनर्विवाहासही कबूल होईल. भोगपालाचा नाश होणें लौकर साधलें नाहीं तरी सरदाराच्या घरांत तिला अनेक मोहांनीं भुलविलें ह्मणजे ती भोगपाल हयात असतांनाही सरदाराच्या हातांत हात देण्यास तयार होईल. खेरीज सरदाराला आपण अंतस्थ सूचना देऊन उत्तेजित करून ठेविलें ह्मणजे तो जबरीनें तिच्याशीं विवाह लावील. तिच्या संरक्षणाची व सुखस्थितीची हमी घेतली म्हणजे ती जबरदस्तीच्या विवाहाचा प्रसंग येऊं देणार नाहीं. तशी ती शहाणी व सुशिक्षित आहे. आजचें काम तिला पळून जाण्यास उद्युक्त करणें हें होय. "

नवऱ्यापेक्षां बायको असल्या उलाढालींत अधिकच तरबेज होती. आपण माधवी व भोगपाळ यांच्या कल्याणार्थ झटत असतां भोगपाल उलट अपल्या सुखसाधनाच्या मार्गांत व्यत्यय आणतो त्याअर्थी त्याला ताळ्यावर आणण्याकरितां आपली थोडी स्त्रीकरामत दाखविलीच पाहिजे असें सांगून माधवीला फूस दिली ह्मणजे ती वाटेल तें करावयास मागें घेणार नाहीं असें ठरवून शांभवीनें तिला भोंदण्याची हमी घेतली. नंतर त्या पतिपत्नींत दुसरा विषय निघाला. धर्मध्वजाला जगांतून नाहींसा करण्याबद्दलचें कारस्थानांतील मुख्य पात्रही शांभवीच होती. मोहसंघानें जयसिंगाजवळ ज्या गोसाव्यासंबंधानें उल्लेख केला तो गोसावी व त्याचा तरुण व रूपसंपन्न शिष्य यांची हकीगत त्याला शांभवीकडून समजली होती. याप्रसंगीं तिनें मोहसंघाला सांगितलें, " तें प्रकरण आतां अगदीं रंगाला आलें आहे. त्याकामीं कांहीं हुशार शिपायांची जरूर आहे. ते शिपाई धाडसी, शूर, द्रव्यलोलुप आणि विश्वासू पाहिजेत. त्या गोसाव्याकरवीं धर्मध्वजाला घुलवून ज्या संकेतस्थलीं आणावयाचें तेथें त्यांनीं दडून बसावें आणि राजपुत्र बेसावध असतांना त्याचा खून करून एकदम चालतें व्हावें. "

शांभवीची ही युक्ति मोहसंघास पसंत पडली. त्या कामीं ज्या धीरोदात्त शूर शिपायांची योजना करावयाची ते राजपुत्राच्या बिलकुल ओळखीचे उपयोगीं नाहींत असें वाटून त्यानें त्या कामीं जयसिंगाच्या पदरच्या नवीन शिपायांतून कांहींची योजना करावयाचें ठरविलें. त्या गोसाव्यानें हें काम उरकलें ह्मणजे त्यास कांहीं वस्तीनें ठार करावयाचें आणि त्याच्या बरोबरच्या तरुणासही त्याच्या गुरूच्या भेटीस पाठवावयाचें असा त्यांचा

कृतनिश्चय ठरला. या बाबतींत मोहसंव अध्वर्यु होता. तसाच प्रसंग गुदरला तर तो गोसावी आणि तो तरुण यांजवरच खुनाचा आरोप लागू होईलसें करावयाचें, असाही त्यानें डाव जमवून ठेवला. शांभवीनें नवऱ्याच्या या बेताला निदान त्या वेळेपुरती तरी पसंती दर्शविली. जयसिंगाच्या पदरचे शिपाई शांभवीच्या स्वाधीन करावयाचे आणि शांभवीच्या हुकुमाप्रमाणें त्यांनीं वागून राजपुत्राचा बळी घ्यावयाचा, असा बेत कायम झाला.

---

## प्रकरण २२ वें.

### सटवाईचा भोप्या.



द्रपती व नित्यंक हे कांतारवनांतून निघून अलकनंदेच्या रोखानें चालले. कूच दरकूच करीत मोठ्या सावधगिरीनें ते आपल्या इच्छित स्थळीं सुखरूप पोहोंचले. तेथें विश्रांतीसाठीं कांहीं काळ थांबून त्यांनीं अवश्य ती सामग्री खरेदी केली आणि मोठ्या उत्साहानें ते दोघेजण यशस्कारावर जाण्यास निघाले. वाटेनें त्यांचे अनेक बेत चालू झाले. शेवटीं नित्यंकाला भारतीच्या स्वाधीन करून आपण राजपुत्र धर्मध्वजाच्या संकटनिवारणार्थ शिवावतीमध्यें गुप्ततेनें वास्तव्य करावें अशी भद्रपतीनें योजना ठरविली. पण यशस्कारावर पोंचतांच त्यांची निराशा होऊन त्यांचे पूर्वीचे सर्व बेत मनांतल्या मनांतच राहिले. कारण त्या ठिकाणीं श्रीभारती नव्हते. तेथें दुसरेच कोणी प्रवासी राहिले होते. त्यांच्याजवळ तपास करतां असें समजलें कीं, श्रीभारतींनीं यशस्काराचा बहुतेक त्यागच केल्यासारखा दिसतो. कारण आज बरींच वर्षें ते कोठें गेले व कोठें आहेत याची कांहींच वार्ता नाहीं.

या निराशाजनक बातमीनें व्याकुळ होऊन भद्रपति आपल्या पुतण्यासह यशस्काराहून परतला. त्याला राजपुत्र धर्मध्वज व माधवी यांच्या संरक्षणार्थ शिवावतीला जाणें जरूर होतें. राजपुत्र धर्मध्वज हा श्रीभारतीच्या कृपेनें

प्राप्त झालेला पुत्र आहे अशीही वार्ता त्याला ठाऊक होती. तेव्हां कदाचित् श्रीभारती सिंधावर्तीत असतील अशीही त्याची कल्पना होती. या सर्व गोष्टींचा विचार करून भद्रवती व नित्यंक सिंधावर्तीस येऊन दाखल झाले. त्या ठिकाणीं गुप्त स्थितीनें वास करणें अवश्य व श्रेयस्कर आहे असें जाणून त्यांनीं आपले वेश पालटून नवीन नांवें धारण केलीं. भद्रपतीनें आपल्या वेषाला अनुरूप असें गोसावी हें नांव धारण केलें. नित्यंकाचें नांव पालटण्याची त्यांना जरूर वाटली नाहीं. तो फक्त स्वतःला भद्रपतीचा पुतण्या न ह्मणवितां गोसावीबोवांचा शिष्य नित्यंक असें म्हणवूं लागला. भद्रपतीनें आपण कोणीतरी अवलीया आहों असें लोकांना भासावें म्हणून तशाप्रकारचा आचारक्रम चालू ठेवला. त्यानें आपल्या जटा, दाढी, मिशा वगैरे होत्या तशाच कायम राखल्या; पण वस्त्राचा त्याग केला. जटांमध्यें कृत्रिम केश जडवून त्या फारच विस्तीर्ण व व्यापक केल्या. लंगोटी लाविली. सर्व देह सदोदित राखेनें माखून ठेवला. नखें वाढविलीं व माळांच्या योगानें कंठ, मस्तक, मनगटें, गळा दंड वगैरे अवयव भूषित करून टाकले. ते दोघे एका वडाच्या झाडाखालीं आढंगा लावून बसले. तो वटवृक्ष विस्तृत असल्यानें छायायुक्त होता. त्या वृक्षाखालीं एक देवीचें देऊळ होतें. त्या देवीबद्दल लोकांचा मोठा आदर होता. ती देवी ह्मणजे सिंधावर्ती राजधानीच्या हद्दीवरील सटवाई होती. ती सटवाई जाज्वल्य आहे असा सर्वत्र विश्वास असल्यामुळें लोकांचा तिच्या सामर्थ्याबद्दल पूज्यभाव असून तिला नाखूष ठेवण्यांत लोकांना दहशत वाटे. गांवांतील पुष्कळ बायका नवस करण्यासाठीं किंवा आपलीं लहान लहान बालकें सटवाईच्या पायावर घालण्यासाठीं नित्यशः तेथें जात. त्या सटवाईचा कोणीएक भोप्या होता. तो जातीचा कोणी शूद्र किंवा गुरव वगैरे नसावा अशी त्याच्या राहणीवरून कल्पना होत असे. तो ब्राह्मणाप्रमाणें दिसे ह्मणून त्याचा सर्व आचार अत्युच्च ब्राह्मणवर्णास अनुरूप होताच असें मानण्यास कांहीं आधार नव्हता. तो स्वतःस देवीचा भोप्या ह्मणवी. ती देवी सटवाई या नांवानेंच माहीत होती; तरी पण ती फार प्राचीन असून आदिमाया त्या रूपानें त्या ठिकाणीं वास्तव्य करून राहिली आहे अशी दंतकथा होती. तो भोप्या घरचा एकटाच होता. त्याचें वय सरासरीं वीस बावीस वर्षांचें दिसे. तो स्वरूपानें देखणा, तरतरीत व

उमदा दिसे. त्याची ऐट एखाद्या क्षत्रियाला हेवा उत्पन्न करण्यासारखी असे. तो घरचा एकटा होता. त्याचीं सर्व माणसें तो लहान असतांनाच मरण पावलीं. तेव्हां बाल्यावस्थेंत त्याचें लालनपालन कोणी दूरच्या नातेवाईकांनीं केलें. पुढें तो मोठा झाल्यावर त्याचे ते नातेवाईकही मरून गेले. ते सटवाईचें देऊळ त्याचें वडिलोपार्जित वतन होतें. त्या देवीपुढील उत्पन्नावर त्याच्या घराण्याचा उदरनिर्वाह चाले. आतां तर तो एकटाच असल्याकारणानें व देवीपुढची मिळकतही बरीच असल्यानें तो साधारणतः बऱ्याच सुस्थितींत होता. त्याचें पाळण्यांतील नांव वेगळें असून तो जनतेमध्यें भोळ्या किंवा भय्या या नांवानें माहित होता. त्याचें पाळण्यांतील नांव नित्यंक असें होतें. तें त्याला ठाऊक होतें व कांहीं जुन्या, ज्ञात्यांनाही ठाऊक होतें. आपल्या पाळण्यांतील नांवाखेरीज त्यानें आपली सर्व हकीगत गोसावी व त्याचा शिष्य यांना कारणाकारणानें निवेदन केली. त्याचा गोसावीबोवाशीं परिचय जमला. तो गोसावी व त्याचा शिष्य खरोखर कोणी भणंग असतील असें भय्याला वाटलें नाहीं. त्याला गोसावी व शिष्य यांचा स्वभाव पसंत पडला. त्या शिष्याचें नांवही नित्यंकच आहे असें भय्याला ओघाओघानें समजून आलें. त्यांनाही भय्याचा स्वभाव आवडला. त्यांचें परस्परांचें प्रेम जडलें व भय्याच्या मिळकतींतून गोसावीबोवांचा सर्व खर्च भागूं लागला.

अशा स्थितींत कांहीं काल गेल्यानंतर गोसाव्याची व शांभवीची मुलाखत झाली. शांभवीला मुलबाळ नव्हतें. तिचें वय संतती होण्याच्या स्थितींत होतें. तिला मूलबाळ मुळीं झालेंच नव्हतें असें नाहीं. तिला मुलें झालीं होतीं. पण तीं जगलीं नाहींत त्यावरून तीं जगत नाहींत अशीच तिची समजूत होती. तरी पण शांभवीला आपलें मूल जगण्याची अत्यंत काळजी वाटे. त्या हेतूस्तव ती त्या सटवाईला खेटें घाली, नैवेद्य देई, पैसाअडका पोंचवी आणि भय्यानें सटवाईची प्रार्थना करून तिचीं मुलें जगतील असें होण्याची खटपट करावी म्हणून त्यालाही उपकारानें बद्ध करण्याचा यत्न करी. भय्या देखणा, उमदा असल्या कारणानें आणि तो तिच्या मनोरथप्राप्तीस अनुकूल असल्यानें शांभवी भय्याकडे पाहून प्रसन्न होई व त्याच्याशीं चार चेष्टेचे शब्दही बोले. प्रसंगविशेषीं विशेष सलगी व मोकळेपणाही दाखवी. भय्या या गोष्टी जाणून असे, पण तो अत्यंत शुद्ध

मनाचा असल्या कारणानें स्वतः शांभवीची वृत्ति मुग्धतेनें अवलोकन करण्यावांचून अन्य कांहींच करीत नसे.

शांभवीची बरीच जानपछान झाल्यानंतर तिनें हलकें हलकें आपलें हृद्गत भय्याच्या द्वारें गोसाव्याच्या कानावर घातलें. त्यासमयीं ती शिष्य नित्यंकाकडे सार्थ दृष्टीनें बघे आणि तो आपलें हृद्गत किती उत्सुकतेनें ऐकतो हें वरचेवर बारकाईनें निरीक्षण करी.

शांभवी राजघराण्यांतील स्त्री आहे असें समजून येतांच गोसाव्याला मोठा आनंद झाला. कांतारांतील गुल्मामध्यें दडून असतांना मोहसंघाच्या तोंडून जिचें नांव त्याला ऐकूं आलें होतें आणि जिच्या कपटक्रियेच्या कौशल्यानें राजपुत्राच्या जिवाला अपाय करण्याचा मोहसंघ व जयसिंग यांचा विचार त्याला समजला होता तीच शांभवी मोहसंघाची पत्नी होय असें कळून येतांच गोसाव्याला बराच दम आला. आणि ती गरजू होऊन आपणाकडे आली आहे असें समजतांच त्याला आपल्या कार्यसफलतेबद्दल उत्तेजनच मिळाल्यासारखें झालें. त्याला कोणीकडूनतरी राजवाडयांत शिरकाव करून घ्यावयाचा होता. हलकें हलकें राजपुत्राशीं परिचय पाडण्याची त्याची मनापासून इच्छा होती. धर्मध्वज हा भारतीचा कृपापुत्र असल्यानें गोसाव्याला त्याच्याविषयीं प्रेम वाटे आणि दीक्षादेवीचा पति होण्याला तोच योग्य आहे अशी त्याची दृढ भावना असल्यानें त्याला त्याच्याविषयीं कळकळ वाटे. शांभवीच्या द्वारें आपल्याला राजवाड्यांत शिरतां येईल अशा अजमासानें गोसाव्यानें शांभवीला आपल्या नादीं लावलें आणि आपण तिचें मूल जगेल असें कांहींतरी साधन करून देऊं असें त्यानें तिला आश्वासन दिलें. तिनेंही त्याच्यावर भरंवसा टाकला आणि त्याचे उपकार फेडण्यासाठीं आपण हवातितका पैका देण्यास तयार व समर्थ आहों असें तिनें दर्शविलें. वस्तुतः गोसाव्याला पैका नकोच होता. पण त्यानें तिच्या द्रव्यदानाच्या तत्परतेबद्दल प्रसन्नता दर्शविली. तात्पर्य, गोसावी तिच्या द्रव्यमोहास मोहला नसून त्याच्या साधनसामर्थ्याला ती भुलली होती.

शिष्य नित्यंक हा हुषार व चाणाक्ष होता. खेरीज स्त्रीजातीचें पांडित्य व धोरण यामध्यें तो चांगलाच कौशल्यपूर्ण होता. त्यानें शांभवीचें धोरण जाणलें. तिच्या चित्तवृत्तीरूपी पतंगाला आपण दीपसम वाटत आहों हें त्यानें चांगलें ओळखलें. त्यानें ती गोष्ट गोसावीबुवाला विदित केली आणि प्रत्यक्ष

अनुभवानें पटवूनही दिली. तें पाहतांच शांभवी आपल्या पुऱ्या कबजांत येणार अशी गोसाव्याला खात्री पटली. त्यानें नित्यंकाला शांभवीस उत्तेजन देण्याचा उपदेश केला. त्यास अनुसरून नित्यंक जेव्हां शांभवीच्या भाषणाचें, हावभावाचें कौतुक करून तिनें केलेल्या आदरस्तुतीचा स्वीकार करून तिला तिच्या आशापूर्ततेचीं लक्षणें दाखवूं लागला तेव्हां तर शांभवी फारच चंचल बनली. त्या गुरुशिष्यांना आपण एकदां आपल्या घरीं केव्हां घेऊन जाऊं असें तिला होऊन गेलें.

त्या गुरुशिष्याची हवाल अशी होती. गोसावी शांभवीच्या द्रव्यास भुलला नव्हता. तीच त्याच्या मागें गरजूं होऊन लागलेली होती. शिष्य नित्यंक तिला भाळला नव्हता तर तीच त्याच्या चरणकमलीं भ्रमरीप्रमाणें लोलुप झाली होती. राजपुत्राचा खून किंवा माधवांचें पलायन यासंबंधानें तिनें त्यांच्याजवळ अद्यापि अवाक्षरही काढलें नव्हतें. त्या संबंधानें तिनें मोहसंघाला जो गुप्त मजकूर सांगितला होता तो तिचा कावा होता. ती निवळ थाप होती. धार्मिक व नैतिक दडपणाचा मुळींच दाब नसतांना स्त्रियांना प्राप्त झालेल्या शहाणपणाचा तो चातुर्यपूर्ण खेळ होता. राजपुत्राचा नाश करण्यास तिनें सरदाराचे शिपाई मागून घेतले. त्यांच्याच करवीं तें काम उरकण्याचा तिचा मतलब होता. गोसाव्याकरवीं राजपुत्राला संकेतस्थळीं न्यावयाचें याविषयीं तिचें त्या गोसाव्याशीं खलबत वगैरे कांहीं एक झालेलें नव्हतें. तो प्रसंग कांहीं इतर कारणावरून आपण सहज घडवून आणूं असा तिचा अजमास होता. तशी वेळ येऊन गोसाव्याच्या जिवाला अपाय घडला किंवा राजपुत्राचा खून होऊन त्याचा आरोप गोसाव्यावर आला तरी शांभवीला ती गोष्ट कांहींशीं इष्टच होती. कारण शिष्य नित्यंक त्या गोसाव्याच्या शब्दांधिन आहे असें तिनें ताडलें होतें. गोसाव्याची व त्याची ताटातूट होऊन तो अनाथ बनेल तर तो सर्वस्वी आपल्या अधीन होण्यास आयतेंच सुलभ होईल अशी तिची समजूत होती. फक्त गोसाव्याजवळून आपलें साधन प्राप्त होईपर्यंत त्याला अपाय घडता कामा नये एवढी खबरदारी घेण्याजें तिनें ठरवलें होतें.

---

# प्रकरण २३ वें.



## नित्यंकाचा इतिहास.




सावी व शांभवी यांचें बोलणें होऊन त्यानें आपल्या शिष्यासह राजवाड्यांत रहावयास जाण्याचें ठरविलें. राजघराण्यांतील सर्वांच्याच मनांत गोसाव्याबद्दल आदर उत्पन्न व्हावा अशी शांभवची इच्छा होती. पण तो योग कसा घडवून आणावयाचा याविषयीं गोसावी चिंता दर्शवूं लागला. पण शांभवीला त्याबद्दल मुळींच अडचण वाटली नाहीं. ती शहाणी व चतुर होती. ती निरक्षर, बावळी, भितरी किंवा बुजरी नव्हती. स्त्रीजात म्हणजे केवळ अबला अशी तिची समजूत नव्हती. स्त्रीनें केवळ पुरुषांच्या धोरणावर व मसलतीवर अवलंबून राहून त्याच्या सल्यास मान द्यावा आणि आपल्या जातीचा नादानपणा स्थापित होऊं द्यावा हें तिच्यासारख्या साक्षर स्त्रीला कसें मानवणार ! समसमानता, व्यक्तिस्वातंत्र्य, स्त्रीची पुरुषार्थसाधनपात्रता या गोष्टी तिला पटलेल्या होत्या. तेव्हां ती एखाद्या लाजाळू, विनयशील, बावळ्या बायकोप्रमाणें अडून कशी बसेल ! तिनें त्या गोसाव्याला योग्य व अवश्य त्या सूचना केल्या आणि ती आपल्या चातुर्याच्या प्रदर्शनाचें तयारीस लागली.

एक दोन दिवसांनीं तिनें आपला चंद्रहार अचानक हरवल्याचा बोभाटा केला. तो अतिमौल्यवान् होता. राजाच्या जवाहिरखान्यांत ठेवण्यास योग्य असा तो दागिना फार जुना व अपूर्व रत्नांनीं जडलेला होता. सर्व वाड्यांत ती बातमी हां हां ह्मणतां पसरली. मोहसेव, राजा, प्रधान, कारभारी सर्वजण त्याचा तपास करूं लागले. पण कांहींएक तपास लागेना. चाकरमाणसें, येणारे जाणारे यांमध्यें शक्य ती चौकशी केली; तरी कांहींच थांग लागेना. गणक, ज्योतिषी यांनीं प्रश्न पाहून तो दागिना स्त्रीच्या हातीं पडला असावा असा भावार्थ सांगितला; पण वहीम कोणावर घ्यावा ! घरांतल्या घरांतच कोणी चोर असावा अशी कल्पना कशी करावी. त्या दागिन्यावर धाड घालण्या-साठीं बाहेरचा कोणी चोर घर फोडून आल्याचा तर संशयच नव्हता. आतां काय करावें हा प्रश्न उत्पन्न झाला. शांभवीनें तर अतिशय धिंगाणा उडविला.

असा खानदानींतील मूल्यवान जिन्नस आपल्या ताब्यांतून हरवला याबद्दल तिनें सात्विकपणानें शोक चालविला. माधवी ही शृंगारप्रिय होती हें बहुतेकांना ठाऊक होतें. राणी इंदुमती, सुमंत यांसारख्या मंडळींकडून तिच्याबद्दल साशंकवृत्ति कांहींशी अस्पष्ट रीतीनें प्रगट होऊं लागली. तो बोभाटा शांभवी व माधवी यांच्या कानीं जावयास राहिला नाहीं. शांभवीनें माधवीच्या निर्दोषीपणाबद्दल खात्री दिली. माधवीच्या मनांत तसली भावना यावयाची नाहीं असा उलट तिचा कैवार घेऊन शांभवीनें तिच्या मनांत सासूविषयीं तिटकारा वाढविण्याचें काम साधून घेतलें. दागिना कोठेंच सांपडेना हें मोठें आश्चर्य खरं; पण वस्तुतः तें आश्चर्य नव्हतें ! कारण तो सहजासहजीं कोठें गळबटला नव्हता. तो मुद्दाम नाहींसा केला होता. तो चोरानें चोरला नव्हता तर त्याच्या मालकिणीनेंच तो चोरला होता. एखाद्या लफंग्यानें त्याच्यावर हात मारून त्याला कांहीं दिवस कोठें दृष्टिआड केलें नव्हतें. जिनें चोरीची ओरड केली होती त्या शांभवीनेंच त्याला मातींत घातलें होतें. प्रमिलेच्या मंदिराच्या आसपास एका ठिकाणीं शांभवीनें तो नेऊन पुरविला होता. त्याचा तपास करण्याकरतां देवदेव करण्याची कल्पना काढून शांभवीनें सटवाईच्या देवळांतील गोसाव्याचें सामर्थ्य ध्वनित केलें. तो गोसावी श्रीभारतींचा शिष्य आहे असें वर्तमानही त्याच समयीं वाड्यांत विदित झालें. मग काय विचारतां ! सर्वत्रांच्या अंतःकरणांत गोसाव्याबद्दल एकदम आदरभाव उत्पन्न झाला. विशेषतः पुरोहित, राजा व धर्मध्वज यांना तर तो आपला जिवलग वाटूं लागला. बहुतेक मंडळी देवळांत जाऊन त्यांनीं गोसाव्याचें दर्शन घेतलें. त्याच्या तोंडूनही तो भारतीचा छात्र असल्याचें ऐकून सर्वांनीं समाधान व्यक्त केलें. मोहसंघाला मात्र त्याच्या शिष्यत्वाबद्दल संशय आला. ती गोष्ट खरी नसून लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्यासाठीं आपल्या सुशिक्षित पत्नीनेंच तें धोरण लढविलें असावें अशा खात्रीनें तो त्या संशयास्पद स्थितींत हर्षमाण झाला. सुमंतांनीं त्याला चंद्रहाराची गोष्ट विदित करून त्याचा शोध लावून देण्याची विनंति केली. स्वतः शांभवीनें त्याला पूर्वसूचनेच्या प्रसंगीं ती जागा नक्की कळवून ठेवलेली असल्यानें त्याला चंद्रहाराची जागा माहीत होती. पण तो मोठा हुषार गोसावी होता. त्यानें एकदम कांहींएक सांगितलें नाहीं. त्यानें आपलें सौजन्य व नम्रता व्यक्त करण्यासाठीं आपल्या निर्बलतेबद्दलच पांडित्य सुरू केलें. आपला

गुरु जो भारती त्याच्या अगाध सामर्थ्याची तारीफ करून त्यानें आपलें असामर्थ्य गाऊन दाखविलें.

त्याच्या नम्र भाषणावरून त्याची निरभिमानवृत्ति सर्वांच्या ध्यानांत आली. अशा वृत्तीचे लोक एकाएकीं कृपा करण्यास अनुकूल होणार नाहींत व ते आपली महती आपल्या तोंडानें कधींही उच्चारणार नाहींत असें कल्पून पुरोहितांनीं गोसाव्याचें अभिनंदन केलें आणि त्याची स्तुति करून ते त्याला प्रसन्न करूं लागले.

फार ओढून उपयोगी नाहीं असें जाणून गोसाव्यानें चंद्रहाराचा शोध लावून देण्याचें आश्वासन दिलें आणि त्याकामीं दोन रात्रींचा वायदा केला. ती मुदत सर्वत्रांस मान्य झाली. दोन्ही दिवस पुरोहित व धर्मध्वज यांनीं तेथेंच मुक्काम केला. पुरोहित व गोसावी यांचें भारतीसंबंधानें बरेंच भाषण झालें. त्या दोघांनीं भारतीच्या सत्वसामर्थ्याचें आपापले अनुभव परास्परांस कथन केले. त्यांच्या मुखांतील गोष्टी करमणुकीच्या व अगाध सामर्थ्याच्या होत्या. त्या ऐकण्यांत धर्मध्वज याचें चित्त गढून गेलें. शिष्य नित्यंक सन्निधच होता. तोही आपल्या गुरुजींचें भाषण लक्ष्य लावून ऐकत होता; पण त्याचें चित्त विशेषत: राजपुत्र धर्मध्वजाकडे गुंतल्यासारखें दिसे. गोसावी व पुरोहीत बोलत असतां धर्मध्वजही त्यांत कांहीं भाषण करी व मध्यंतरीं कांहीं प्रश्न विचारून आपली जिज्ञासा व सत्वप्रियता व्यक्त करी. त्य प्रसंगीं शिष्य नित्यंक राजपुत्राच्या अमृतमयवाणीनें समाधानी व प्रसन्न झाल्यासारखा दिसे. राजपुत्रही त्या शिष्याकडे सार्थबुद्धीनें पाही. ती गोष्ट लक्ष्यांत आणून गोसावीबोवा लागलीच आपल्या शिष्याच्या स्वरूपापेक्षां त्याच्या सद्गुणाची तारीफ करून त्याची फार स्तुति गाईत. शिष्य नित्यंकाला धर्मध्वजाची माहिती करून घेण्याची अवश्यकता अर्थातच राहिलेली नव्हती. पण त्याचें सद्गुणवर्णन ऐकून आणि त्याची प्रसन्न, उल्हासी व उमदी मुद्रा पाहून राजपुत्राला मात्र त्याची हवाल समजण्याची जबर लालसा उत्पन्न झाली. हलके हलके तो शिष्य व त्याचा गुरु आपल्या वाड्यांत येतील तेव्हां त्यांच्याशीं परिचय करून आपण आपली जिज्ञासा तृप्त करून घेऊं अशा आशेनें त्यानें आपली त्यावेळची इच्छा तशीच दडपून ठेवली. पुरोहितांच्याही लक्षांत त्या सर्व गोष्टी आल्या. पण त्यांनीं त्याविषयीं विशेष विचार करण्यांत लक्ष्य घातलें नाहीं.

त्या दोन्ही दिवसांत गोसाव्यानें विशेष चमत्कारिक वर्तन, किंवा कांहीं अद्भुत प्रकार करून दाखविला नाहीं. तो चार चार घटका ध्यानस्थ होऊन मात्र बसे. तिसरा दिवस उजाडतांच त्यानें आपण होऊनच सुमंताना चंद्रहाराची जागा सांगितली. त्यानें केलेलें प्रमिलेच्या मंदिराचें व त्याच्या सभोंवारच्या आवाराचें वर्णन ऐकतांच सुमंत पुरोहितही चकित् झाले. भारतीच्या शिष्याला त्या सद्गुरूच्या कृपेनें कांहीं अशक्य नाहीं असे उद्गार काढून पुरोहितांनीं त्या चकितपणास सार्थ स्वरूप देऊन टाकलें. ते दोघेजण व राजपुत्र वाड्याकडे परत जाऊन ती जागा उकरण्यास अति उत्सुक झाले. धर्मध्वजानें जाण्याच्या सुमारास गोसावीबुवास ह्मटलें, " आपणाला आतां आमच्या वाड्यात कांहीं दिवस वास्तव्य करून आह्माला आपल्या संगतीचा लाभ दिलाच पाहिजे. तूर्त यावेळीं आपला शिष्य आमच्याबरोबर पाठवीत असाल तर बरें होईल. "

राजपुत्राच्या इच्छेस सुमंत व पुरोहित यांनींही अनुमोदन दिलें. गोसाव्यानें त्या सर्वांच्या कनवाळू व आदरयुक्त स्वभावाची तारीफ करून सांगितलें, " माझा शिष्य नित्यंक आपल्या आदरास पात्र होण्यासारखाच आहे. त्याला पाहतांच कोणाचेंही चित्त प्रसन्न व्हावें असा त्याच्या जननकाळचा गुण दिसतो. राजपुत्राच्या वयास अनुसरून त्याला तो आपला स्नेही वाटावा असा स्नेहधर्म उत्पन्न होणेंही साहजिकच आहे. त्याचा आविर्भाव तसाच वेधक आहे. पण बिचारा दुर्दैवी खरा ! "

गोसाव्याचे हे कांहींसे चमत्कारिक व कांहींसे सरळ असे उद्गार ऐकून राजपुत्र ह्मणाला, " तो स्वरूपानें उमदा, प्रसन्न, प्रफुल्ल व आनंदी दिसतो हा त्याच्या जन्मकाळाचा गुण ह्मणा किंवा ही त्याच्यावरील ईश्वरी कृपा म्हणा. पण मी जो त्याला बरोबर न्यावयास सिद्ध झालों याचें कारण त्याचा स्वभाव हें होय. माझा व त्याचा विशेष परिचय नाहीं. तरीपण या दोन दिवसांत सत्य वाणीनें आपण जे त्याचें सद्गुण वर्णन केले व त्याच्या स्वतःच्या भाषणांत व वर्तनक्रमांत आपल्या सत्य भाषणाची जी साक्ष पटली त्यावरून माझ्या मनांत तुमच्या शिष्याविषयीं आदर व लोभपूर्ण स्नेह उत्पन्न झाला आहे. आपल्या इच्छेप्रमाणें आपण त्याला यावेळीं आमचेबरोबर पाठवा किंवा पुढें आपल्याबरोबर घेऊन या; कसेंही करून आमच्या घरास आपले पाय लावा ह्मणजे झालें. पण आपण आपल्या शिष्याला भाग्यहीन कां ह्मणतां तें कळत नाहीं ! "

या भाषणावर जास्त खुलासा करणें इष्ट वाटलें ह्मणून गोसावी बोलूं लागला, " हा शिष्य फार उच्चकुलोत्पन्न आहे. याची स्थिति संपन्नतेची होती. हा आपल्या आईबापांचा एकुलताएकच आहे. आईबाप त्याचे अत्यंत लाड करीत. त्याचे आईबाप धर्मपर आचरणानें युक्त होते. ते सद्गुणसंपन्न होते. मातापित्यांच्या शीलास अनुसरून याचें शील उत्कृष्ठ बनलें. लहाणपणापासूनच याचे स्वाभाविक सद्गुण व शुद्ध प्रेम व्यक्त झालें पण हा लहान असतांनाच कोणी नातेवाईकानें किंवा कोणी चांडालकर्मी दुष्टानें याच्या बापास विषप्रयोग केला. त्यांत त्याचा अंत झाला. याची आई महान् पतिव्रता असल्यानें सहगमन करावयास प्रवृत्त झाली. पण कांहीं कळवळणाऱ्या माणसांच्या हरकतीनें तिचा तो बेत तहकूब राहिला. पण उपयोग काय? माशाला जलावांचून कितीसा काळ कंठवणार! त्याला दुधाच्या किंवा तुपाच्या समुद्राचें आधिपत्य दिलें तरी त्याला त्याचा काय उपयोग होणार! त्याला जलच पाहिजे. हंसीला मानससरोवराची राणी करून काय उपयोग? तिला आपल्या हंसाची संगत प्रियतर वाटणार हें उघड होय. त्याचप्रमाणें अस्सल पतिव्रतांची गोष्ट आहे. त्यांना आपल्या पतीवांचून अन्य कोणतीही वस्तु प्रिय वाटणें संभवनीय नाहीं फार काय पण स्वतःचा प्राणही त्यांनीं पतिसेवा, पतिसुख, पतिकल्याण यांसाठींच धारण केलेला असतो. अशाच प्रकारची ती साध्वी होती. पतीच्या पश्चात् लवकरच ती सती पतिवियोगानें झुरणीस लागली. ती माझ्या स्नेहाची-एका दूरच्या नातेवाईकाची भार्या होय. आपण धरणीला खिळलों आहों, आतां आपला अंतकाळ ओढवला असें खास वाटून तिनें मला या मुलास घेऊन जाण्यासाठीं निरोप पाठविला. कारण तिच्या पश्चात् तिच्या नवऱ्याचे ह्मणजे तिचेच दायाद या मुलाचा नीट सांभाळ करतीलसें तिला वाटलें नाहीं. मी तिकडे जात असतां वाटेंत मजवर कांहीं प्रसंग येऊन माझें जाणें वेळेवर घडलें नाहीं. जेव्हां मी तेथें पोंचलों तेव्हां या मुलाच्या दायादांनीं हा मुलगा अकस्मात नाहींसा झाल्याचें वृत्त मला सांगितलें. अखेर मी घरीं परत गेलों. ईश्वराच्या कृपेनें पुढें कांहीं दिवसांनीं हा मुलगा मला भेटला. मीं त्यास घरीं नेलें. त्याचे चुलते, सावत्र आजी वगैरे माणसें त्याचा सत्यनाश करण्याचा विचार ठरवीत असतांना यानें ऐकलें. ह्मणून तो तात्काळ घर सोडून पळून मजकडे आला असें तोच सांगतो. त्याचें तें ह्मणणें खरें असल्याचें

पुढें माझ्या अनुभवास आलें. कारण हा मुलगा माझ्या घरीं मीं छपवून ठेवला असेल अशी कल्पना करून याच्या चुलत्यानें माझ्या घरावर अकस्मात् हल्ला केला. तेव्हां मी या मुलासह पळून गेलों. माझें सर्वस्व हरण झालें. तेव्हां या मुलासह मी देशोधडीं लागलों. याप्रसंगीं पूर्वीं बराच काल माझ्यावर श्रीभारतींची कृपा असल्यानें मी साधारणतः सर्व उपाधी सोडून आनंदानें हरि हरि करीत बसलों होतों; पण मजवर हा अवचित् प्रसंग आला! मी हा असा गोसावी, कफल्लक आहें. मला त्याचें कांहीं नाहीं. पण या असल्या कुलशील-सद्गुण-रूप-यौवनसंपन्न तरुणास मजबरोबर अन्नान्नदशेंत रहावें लागत आहे हा दुर्दैवाचाच परिणाम नव्हे का ? ''

हें भाषण चाललें असतां नित्यंकानें मान खालीं घालून हिरमुसेपणा धारण केलेला दिसत होता. त्याच्याकडे पाहत पाहत राजपुत्रानें गोसाव्यास विचारलें, '' हा मुलगा नात्यानें तुमचा कोण होतो ? त्याचप्रमाणें आपणास मी नम्रपणें विचारण्याचें धाडस करतों कीं, आपलें कुल श्रीभारतीप्रमाणें ब्राह्मणवर्णीयच आहे काय ? ''

याचें उत्तर देण्यास गोसावी किंचित् थबकला. तेव्हां पुरोहित कांहीं प्रश्न करण्याच्या बेतात दिसले. गोसावी काय उत्तर करतो तें ऐकण्यास शिष्य नित्यंकही उत्सुकतेनें डोकें वर काढून बघूं लागला. इतक्यांत गोसाव्यानें विचार करून सांगितलें, '' मी गुरुपदाला योग्य असा ब्राह्मणवर्णीय नाहीं. मी जातीचा क्षत्रिय आहें. हा शिष्य माझा नात्यानें कोण हें मला सांगतां येईलसें वाटत नाहीं. तरीपण तो माझा सख्खा असा कोणीही नाहीं. फारतर तो माझा चुलत भाचा किंवा पुतण्या याहून लांबच्या नात्याचा नाहीं. ''

हें ऐकतांच दमनपुरोहितांना कांहीं तरी स्मृति झाली असावीसें त्यांच्या चेहऱ्यावरून भासलें. कांहीं वेळ थोडी आठवण केल्यासारखें करून ते ह्मणाले, '' आपल्या या शिष्याचें नांव काय आहे तें अद्याप आह्मांस समजलेलें नाहीं. तरीपण नांवाचा प्रश्न सोडून दिला व थोडासा फरक बाजूस ठेवला तर भद्रपती या नांवाचा कोणीएक क्षत्रिय व त्याचा पुतण्या नित्यंक यांच्या व आपल्या हकीगतींत बरेंच साम्य दिसतें. आह्मीं त्या भद्रपतीची हकीगत जनवार्तेंतच ऐकलेली आठवते. पण त्याचा तो नित्यंक सख्खा पुतण्या ह्मणून बोभाटा होता. तो अकस्मात नाहींसा झाला. पण तो पुन्हां हस्तगत झाल्याचें ऐकिवांत नव्हतें किंवा नाहीं ! ''

पुरोहितांच्या या भाषणानें गोसावी व शिष्य हे दोघे चरकले, पण त्यांनीं आपली अंतर्वृत्ति बाहेर उघड न होऊं देण्याची खबरदारी राखिली. गोसाव्यानें त्यावर सांगितलें, " हकीगतीसारख्या हकीगती पुष्कळ सांपडतात. आपण ह्मणतां त्या नित्यंकाची हकीगत तशी असेल तर तीही कींव करण्यासारखीच होय. आपणाला नांवाचा घोटाळा पडला आहे पण त्याबद्दल इतकेंच कळवूं शकतों कीं, मला गोसावीबोवा असें ह्मणतात व या शिष्याला शिष्य असें ह्मणतात; तरी पण त्याचें नांव नित्यंकच आहे. "

या नामस्पष्टीकरणानें पुरोहित जास्तच घोटाळ्यांत पडले. ज्याअर्थी तो गोसावी उघडपणें त्याचें नित्यंक असें नांव कळवीत आहे त्याअर्थी त्यांत कांहीं शंका घेण्यास नको असें वाटून पुरोहित ह्मणाले, " आपण मघा ह्मटलें त्याप्रमाणें नांवामध्येंही सादृश्य असणें शक्य आहे. कसेंही असो, या तुमच्या शिष्याची हवाल करुणास्पद आहे यांत कांहीं संशय नाहीं. "

इतकें होईपर्यंत राजपुत्र विचार करीत स्वस्थ बसला होता. तो आपला विचार संपवून ह्मणाला, " अशा सद्गुणी तरुणावर संकटकाल कां गुदरावा हें एक गूढच आहे. असो; बोवाजी, आपण जर हा शिष्य आमचे येथें ठेवाल तर त्याच्या गुणांचें चीज होईल. माझा पिता राजा वसुप्रसाद हा गुणज्ञ आहे. आतां माझें हें बोलणें व्यावहारिक दृष्टीनें बरें आहे असें दिसेल; पण आपण श्रीभारतीचे अनुग्रही आहां. आपल्या संगतींत राहणाऱ्या या शिष्याचें कल्याण करण्यास आपण समर्थच असला पाहिजे व आपण तसे सामर्थ्यसंपन्नही दिसतां. तेव्हां या शिष्याचें कल्याण करण्यास आह्मी आपला समर्थपणा दाखवून आपल्याला कमीपणा देणें रास्त होणार नाहीं व तसा आमचा उद्देशही नाहीं. आपण आपल्या प्रेरणेनें या शिष्याचें कल्याण कोणाच्या तरी हस्तें घडवून आणालच; मग त्या कामीं आम्हांला यश देण्याची आपण कृपा केली तर मोठी मेहरबानी होईल. "

राजपुत्राच्या भाषणांतील धोरण कल्पनेनें जाणून पुरोहित ह्मणाले, " हा शिष्य सांप्रत आपत्कालांत असला तरी तो क्षत्रियकुलज आहे आणि शील-सत्वसंपन्न आहे. या गोष्टी त्याचें कल्याण केल्यावांचून राहतील कशा. भाग्या भाग्याचें चमत्कार कोणी सांगावेत. "

पुरोहिताचे अंतर्गत व्यापार आपल्याच व्यापाराप्रमाणें असावेत असें ओळखून राजपुत्र कांहीं बोलणार तोंच तो गोसावी बोलला, " तूर्त आपण

जाण्याचें करावें. पुढें मागें या गोष्टीचा विचार करूं. याला कोठें ठेवून जाव-याचें झालें तर मी याला आपल्याच हवालीं करीन इतकें आश्वासन मी या वेळीं देऊं शकतों. ”

गोसाव्याच्या या भाषणानें नित्यंकही प्रमुदित झाला. त्याच्या प्रसन्नते-वरून राजपुत्रानें त्याच्या मनाचा कल जाणला. त्यानें त्याच्याशीं कांहीं भाषण केलें आणि ती सर्व मंडळी चंद्रहासाचा तपास काढण्यासाठीं राजवाड्याकडे निघाली. दोन दिवसांची मुदत संपल्या कारणानें भोगपाल, शांभवी, माधवी, राजा, राणी वगैरे सर्वजण पुरोहितांच्या आगमनाची वाटच पाहत होते.

---

## प्रकरण २४ वें.

## वृद्धाचा निरोप.



तिं धावती राजधानीमध्यें राजवाड्याच्या अगदीं नजीक वसुप्रसादाची एक सुंदर बाग होती. ही बाग मध्यंतरीं बरीच मोडकळीस आली होती. त्या बागेंत उत्तम प्रकारचीं फुलझाडें व फलझाडें असून मध्यंतरीं एक सुंदर मंदिर होतें. तें मंदीरही दुरुस्तीला आलें होतें. त्या बागेकडे लक्ष जाऊन राजाच्या हुकमावरून त्या बागेची दुरुस्ती करण्यांत आली. तिची प्राचीन रचना मोडून ती सर्व नवीन तऱ्हेवर तयार झाली. त्यावेळीं तिला शक्य तितकें वेधक स्वरूप देण्यांत आलें. तेथील मंदी-रही नवीन तऱ्हेवर बांधण्यांत आलें. त्यांत सर्व प्रकारच्या नवीन सोई केल्या. त्यासमयीं त्या बागेला प्रमिलामंदिर असें नवीन नांव देण्यांत आलें. प्रमिला प्रौढ झाली तेव्हां बराच काळ ती या मंदिरांत काढूं लागली. तिच्या सेवेला तेथें पुष्कळ दासी ठेवलेल्या असत. ती आपल्या दासी व सखीजनांसह तेथें अनेक तऱ्हेच्या क्रीडा करून मनाची करमणूक करी.

गोसावीबोवांची सर्व हकीकत पुरोहीत, राजपुत्र वगैरे मंडळीकडून राज-वाड्यांत विदित झाली. राजा व राणी यांना त्या हकीकतीनें हर्ष वाटला.

त्यांच्या मनांत गोसावी व शिष्य नित्यंकयांच्याविषयीं आदरभाव उत्पन्न झाला. पण चंद्रहाराविषयींचा प्रश्न समजतांच शांभवीला मोठा हर्ष झाला. मोहसंघ, पुरोहित, धर्मध्वज यांनीं आपल्या समक्ष मंदिराच्या बाहेरील, गोसाव्यानें सांगितलेली जागा खणविली. बरीचशी माती वर निघतांच शांभवीचा चंद्रहार त्या खळग्यांत झळकला. मोहसंघानें तो बाहेर काढून हातांत घेतला. तो सुस्थितींत आहे असें पाहून सर्वत्रांसच बरें वाटलें. तो दागिना घेऊन सर्व मंडळी आश्चर्यभरित होऊन राजवाडयांत गेली. राजाराणीला तो प्रकार समजतांच तेही आश्चर्यानंदभरित झाले. इंदुमतीनें शांभवीला तो चंद्रहार अर्पण केला. तिनें लागलीच तो गळ्यांत घालून सासू, सासरा व पुरोहित वगैरेंना वरकरणी वंदन केलें.

हा सर्व प्रकार ठीक झाला; पण त्या ठिकाणीं चंद्रहार गेला कसा याविषयीं सर्वांचें मन साशंक झालें. सर्वजणांना प्रमिलेविषयीं शंका उत्पन्न झाली. अनेकजण तर्क करून प्रमिलेसंबंधीं अनुकूळ प्रतिकूळ मत दर्शवूं लागले. माधवी मात्र आपल्यावर आलेल्या वहिमाचा पुकारा करून खवळल्यासारखी झाली. ती स्पष्ट शब्दांनीं वन्सना दोष देऊं लागली. प्रमिलेच्या तोंडावर बोलून तिच्यावर चंद्रहाराच्या चोरीचा आरोप उघडपणें कोणी केला नाहीं तरी सर्वांच्या शंकेचें स्थान आपण आहों, हें तिच्या ध्यानांत आल्यावांचून राहिलें नाहीं. ज्या गोसाव्यानें चंद्रहाराची जागा ओळखली तो चोर ओळखण्यासही समर्थ असलाच पाहिजे अशी तिनें कल्पना केली. त्या गोसाव्याची प्रत्यक्ष गांठ घेऊन आपण त्याला त्याचा जबाब विचारूं. जर त्यानें आपल्यालाच गुन्हेगार ठरविलें तर त्याला आपण ती गोष्ट सिद्ध करण्यास सांगूं. अर्थातच त्याला तसें करतां येणार नाहीं. मग तो जर कांहीं तरी उडवाउडव करूं लागला तर आपण त्याला लबाड ठरविण्याचें भय घालून आपल्यावरील आरोपाची निष्कृति त्याच्याच तोंडून करून दाखवूं. अशा प्रकारच्या विचारांनीं प्रमिलेचें हृदय भरून गेलें; आणि तिनें चोरून त्या सटवाईच्या देवळांत गोसाव्याच्या भेटीस जाण्याचा बेत ठरवून ठेविला.

गोसावी बोवांचें सर्व भाकीत अगदीं बरोबर जमलें तेव्हांतर त्यांच्याविषयींचा आदरभाव दृढतर झाला. राजा, राणी, पुरोहित व राजपुत्र या सर्वांच्या संमतीनें त्याला शिष्यासह घरीं आणावयाचें ठरलें. शांभवीनें चंद्रहार सांपडण्याबद्दल देवीला नवस केला होता. तो फेडण्याकरतां तिच्या देवळांत

जोडप्यानें जाण्याची अवश्यकता होती. तेव्हां मोहसंघ, शांभवी यांच्याबरोबरच राजपुत्र, पुरोहित वगैरेंनीं देवळांत तयारीनें जावें आणि परत येतांना त्या गुरुशिष्यांना थाटानें राजवाड्यांत आणावें असें ठरलें. त्याप्रमाणें ती सर्व मंडळी ठरलेल्या दिवशीं देवळांत गेली. नवस फेडण्याचें काम उरकलें. पुरोहित व राजपुत्र यांनीं बोवांना राजवाड्यांत चलण्याची प्रार्थना केली. मोहसंघ व शांभवी यांना ती गोष्ट इष्टच होती. पण आपलें इष्ट आयतेंच पूर्ण होत आहे, असें जाणून त्यांनीं गोसाव्याशीं असलेली आपली विशेष सलगी उघड होऊं दिली नाहीं. गोसाव्यानें ती विनंति मान्य केली. पण तेथील मुक्काम हालविण्याचा दिवस मात्र जरा पुढें ढकलला. त्यानें येण्याचा नक्की दिवस राजपुत्र व पुरोहित यांनाच तेवढा कळविला आणि त्या दिवशीं आपण होऊनच शिष्यासमवेत राजधानींत येऊं व कांहीं काल तेथें राहूं असें आश्वासन दिलें. त्या समयीं कोणत्याही प्रकारचा थाटमाट, समारंभ वगैरे करण्याचा त्यानें नकार दर्शविला. याप्रकारें बोलणें चालणें होऊन राजमंडळी तेथून परत गेली. गोसावीबोवांनीं सर्वांच्या इच्छेचा कांहींसा भंग केला याबद्दल सर्वांनीं दिलगिरी दर्शविली; पण त्यांच्या वचनपूर्ततेवर विसंबून ते विशेष खंत न मानतां परतले. त्यासमयीं शांभवीनें गुप्तपणें त्यांतल्यात्यांत सवड साधून नित्यंकाबरोबर कांहीं लवळपणा करावयास कमी केलं नाहीं.

बायकांच्या जातीला घालूनपाडून बोलण्याची संवयच असते. त्यांत वितुष्टभाव असलेल्या स्त्रियांतून एकीला एकीचें कांहीं वर्म सांपडलें ह्मणजे तर त्यांच्या तोंडाचा पट्टा कांहीं विचारावयासच नको. प्रमिलेवर तसाच प्रसंग गुदरला. माधवी दिवसानुदिवस तिला जास्तच टोंचून बोलूं लागली. ती तिच्या दासींजवळ तिची फारच कुचेष्टा करून तिला भलभलतीं दूषणेंही देई. दासींकडून प्रमिलेला तो प्रकार कळला ह्मणजे ती संतापे; पण आपल्यावरील आळ स्पष्टपणें नाहींसा होईपर्यंत तिला माधवीचें बोलणें सोसून घेणें भाग पडे. तिनें त्यासाठीं गोसाव्याकडे जाण्याचा विचार ठरविला होता. गोसावीबोवा वाड्यांतच येणार आहेत हें कळलें तेव्हां तिचा तो भेटीस जाण्याचा बेत जरा ढिला पडला. तिनें माधवी व शांभवी यांच्या दूषणाबद्दल इंदुमतीजवळ तक्रार केली होती. इंदुमतीला राजकन्या निर्दोषी असावी असें वाटत होतें. तरीपण तिच्या मंदिरानजीक

चंद्रहार पुरलेला सांपडला याचें तिला गूढ पडून तिची वृत्ति थोडीशी साशंकच झाली होती. गोसावीबोवा घरीं आले ह्मणजे आपण सर्व खुलासा करून घेऊं असें सांगून इंदुमती प्रमिलेला तेवढया वेळेपुरतें गप्प करीत असे. पुढें जेव्हां असें कळलें कीं, तूर्त कांहीं दिवस ते गोसावी-बोवा वाडयांत येत नाहींत तेव्हां त्यांच्या भेटीबद्दल प्रमिला अधीर झाली. माधवीच्या हृदयविदारक शब्दांनीं सतावून तिनें बाबांच्या भेटीला जाण्याचा बेत मुकरर केला; आणि आपल्या एका विश्वासू वृद्ध दासदासीला बरोबर घेऊन तिनें वडिलांच्या परवानगीवांचून देवळांत जावयाचें धाडस केलें !

गोसावीबोवा राजधानींत केव्हां येणार तो दिवस पुरोहित, राजपुत्र व राजा यांवाचून चौथ्याला माहीत नव्हता. ज्या दिवशीं रात्रीं प्रमिलेनें देवळांत जावयाचा संकेत केला त्याच्या दुसऱ्या दिवशीं गोसावी राजधानींत यावयाचा होता. पण सटवाईचा भोप्या त्यांच्या होणाऱ्या वियोगानें दुःखित झाला होता. गोसावीबोवा व त्याचा शिष्य नित्यंक यांना एकदां आपल्या घरीं न्यावें असा त्याचा फार मनोदय होता. राजवाडयांतील मुक्काम हलल्या-नंतर गोसावी व नित्यंक हे यात्रेला जावयाचे आहेत असें त्यांच्या तोंडून भाप्याला कळलें होतें. पुन्हां भेटीचा योग येणें लांब आहे असें पाहून भाप्यानें त्यांना स्वगृहीं चलण्याचा आग्रह केला होता. त्यावरून भाप्याच्या घरीं एक दिवस मुक्काम करून दुसरे दिवशीं ठरल्याप्रमाणें राजवाड्यांत जातां यावें या हेतूनें त्या दोघा गुरुशिष्यांनीं आदल्याच दिवशीं देवळांतून आपला मुक्काम हलविला.

भाप्यानें गोसाव्याला आपला वृत्तांत कळवितांना आपण घरचे एकटे असल्याबद्दल सांगितलें होतें. ती गोष्ट गोसावी व नित्यंक यांच्या चांगली स्मरणांत होती. पण ते जेव्हां समक्ष त्याच्या घरीं गेले तेव्हां त्यांना भाप्याच्या सत्यपणाबद्दल थोडा संशय घेण्यास कारण घडलें. कारण तेथें त्यांना एक मनुष्य दिसला. तो कोणी पाहुणा आला असावा अशी त्यांनीं प्रथम कल्पना केली. पण त्याच्या राहणीवरून व त्याच्या व भाप्याच्या घरगुती भाषणाच्या ओघावरून तो त्या घरांतलाच रहिवासी असावा व त्याचें आणि भाप्याचें कांहीं नातें असावेंसें वाटलें. सदर मनुष्य वयस्क होता. तो अगदीं जराजर्जरित दिसत होता. त्याच्या वयोवृद्धतेमुळें त्याची शारी-

रिक शक्ति इतकी क्षीण झालेशी दिसत होती कीं, तो मनुष्य काठीचा आश्रय घेतल्यावांचून कसा चालतो याविषयीं नवल वाटे.

गोसाव्यास पाहतांच त्या वृद्धानें भय्याला संमतीदाखल प्रश्न केला, "तूं ज्यांच्या सामर्थ्याविषयीं मला हकीगत सांगितलीस ते गोसावीबोवा हेंच काय? आणि हा तरुण त्यांचा शिष्य वाटतें? योग्य आहे. यांच्या वृत्तीवरून हे सामर्थ्यवान् असले पाहिजेत अशी कोणालाही कल्पना करण्यास अडचण पडणार नाहीं!"

या भाषणाच्या अर्थावरून गोसाव्यानें असें सहज जाणलें कीं, हा म्हातारा भय्याच्या घरांत नेहमींचाच राहणारा असून आपला शक्य तो मजकूर भय्याच्या मुखानें त्याला विदित झाला असलाच पाहिजे. असा विचार करून म्हाताऱ्याच्या भाषणावर गोसावी बोलला, "हा भय्या फार चांगला मनुष्य आहे. तो मनाचा मोकळा, माणसाचा भोक्ता, व लोभी दिसतो. आमचा कांहीं संबंध नसतां यानें आह्मांस मोठीच मदत केली. हेंच काय पण याच्या आधारावरच आजपर्यंतचे दिवस आह्मीं देवळांमध्यें आनंदानें घालविले. माझी सर्व हवाल आपल्याला भय्याकडून विदित झालीच असेल. भय्याच्या सांगण्यांत तो घरचा एकटाच आहे असें आल्याचें स्मरतें. मग आपण कोण? आपण तर त्याचे कोणी नातेवाईक असून येथील कायमचेच रहिवासी दिसतां हें कसें?"

यावर भय्या कांहींतरी बोलणार तोंच वृद्धानें बोलण्याची घाई केली आणि तो ह्मणाला, "तसें खरें व हल्लीं आहे हेंही खरें. तो भय्या वस्तुतः येथें घरचा एकटाच आहे. मी हल्लीं बरेंच दिवस येथें आहें. पण या भय्याच्या घराशीं माझा कांहीं संबंध नाहीं. माझें त्याचें नातें आहे. तरी पण माझी त्याची जात एक नाहीं."

हें विसंगत उत्तर गोसाव्याला कसें पटणार? त्यानें लागलीच प्रश्न केला. "यावरून मनुष्यजात यासंबंधाखेरीज आपलें व त्याचें नातें संभवेल कसें? तसें असेल तर आपलें सर्वच माणसांचें एकमेकांशीं नातें आहे असें ह्मटलें पाहिजे!"

गोसावीही मोठा चाणाक्ष आहेसें पाहून वृद्धानें सांगितलें, "तशी भावना धरून वागणारा तर अत्यंत श्रेष्ठ होय. पण तशी अंतर्वृत्ति पाहिजे. शाब्दिकसिद्धांत कामाचे नाहींत. नाहींतर सर्व पशू एकच याविषयीं पांडित्य करणारा सिंह व सर्व पक्षी एकच यावर व्याख्यान देणारा ससाणा हे दोघे

जीवन्मुक्त ठरण्याचाही संभव आहे. मी कांहीं कोणी श्रेष्ठपदारूढ योगी नाहीं. आपले व आपल्या या तरुण शिष्याचें क्षत्रियत्वावांचून व हाडामांसाखेरीज जसें एक प्रकारचें नातें जमविलेलें आहे तसेंच मी ब्राह्मण व हा क्षत्रिय असून आमचें नातें आहे. फरक एवढाच कीं तें जमवून आणलेलें नाहीं."

या भाषणानें गोसावी व शिष्य हे दोघेही घोटाळ्यांत पडले. गोसाव्याची मुद्रा किंचित् पालटल्यासारखी झाली. नित्यंक हा आपला नामधारी शिष्य आहे हें त्या वृद्धानें जाणलें असावें असें वाटून तो थोडा विचारांत पडला. शिवाय त्या वृद्धाच्या तोंडचीं कांहीं ज्ञानपूर्ण वाक्यें स्मृतींत घोळत असल्यानें तो त्याच्या सूज्ञपणाबद्दलही आदरभावयुक्त झाला. वृद्ध व भय्या हे अनुक्रमें ब्राह्मण आणि क्षत्रिय आहेत असें कळून येतांच गोसाव्यानें वृद्धास प्रश्न केला, "मग आपलें व या भय्याचें गुरुशिष्याचें नातें आहे काय? तसें असेल तर आपल्या सहवासाचा व सद्बोधाचा या भय्याच्या मनावर व वर्तनावर बराच परिणाम झाल्यासारखा दिसतो."

गोसावी आपली स्तुति करीत आहेसें पाहून भय्या बोलला, "आपल्या अनुभवास काय आलें असेल तें खरें. मी जातीचा क्षत्रिय आहे व माझ्या घरीं कोणी वृद्ध ब्राह्मण कांहीं काल वास्तव्य करून आहे या गोष्टी कळविण्याचें आजवर कारणच पडलें नव्हतें. आपला माझा परिचय पडल्यापासून आपल्याशीं मी जें कांहीं बरें वाईट वर्तन केलें असेल तो माझा गुण नव्हे. केवळ या वयोवृद्ध गुरुवर्णीय माणसाच्या आज्ञेनेंच मी तसा वागलों. आपल्याला शक्य ती मदत करावी अशी या वृद्धाची मला सक्त ताकीद होती. आपण आतां दूर जात आहां तेव्हां आपणास शेवटीं एकदां घरीं घेऊन येण्याबद्दल आग्रह किंवा विनंति करण्यास या वृद्धानेंच मला आज्ञा केली."

भय्याच्या अंतःकरणांत त्या वृद्धाविषयीं फार उच्च कल्पना व प्रेमभाव आहेसें जाणून गोसावी ह्मणाला, "आपलें वर्तन यथायोग्य आहे. आपण शिष्य वृत्तींत आहां. शिष्यावरून त्याच्या गुरुचीही पारख होते. तुमच्या आचार विचार क्रमावरून पाहतां हे वृद्ध गुरुपदारूढ होण्यास योग्यच आहेत. अशा विभूतीस मी वंदन करतों."

असें बोलून गोसावी त्या वृद्धाला वंदन करूं लागला तोंच तो वृद्ध सौजन्यानें त्याला तसाच अडवून ह्मणाला, "छे! छे! आपण मला वंदन करण्यास मी कोणी तसा अधिकारी नाहीं."

गोसाव्याची परीक्षा पाहण्यासाठींच म्हातारा असें म्हणाला असेल अशी कल्पना करतां येण्यासारखी होती आणि नव्हतीही. कसेंही असलें तरी गोसाव्यानें त्याच्या प्रेम-प्रतिकारास विशेष न जुमानतां त्यास सांगितलें, " कांहींही असलें तरी आपण वृद्ध आहां आणि आपण उच्चवर्णीय, सदाचारी ब्राह्मणवर्णीय आहां, मी क्षत्रिय आहें. आपण ब्राह्मण आम्हाला वंद्यच आहां. "

हें बोलून त्यानें म्हाताऱ्याला नमस्कार घातला. तें पाहतांच त्याच्या शिष्यानेंही त्यास नमस्कार केला. त्या समयीं त्या शिष्याकडे न्याहाळून पाहून वृद्ध म्हणाला, " यासमयीं मनोरथ परिपूर्ण होतील असें म्हणण्यापेक्षां अधिक स्पष्ट काय बोलावें ? "

इतकें म्हणून तो वृद्ध गोसाव्यास उद्देशून म्हणाला, " तुम्ही मला वंद्य मानलें हा तुमचा थोरपणा आहे. बाकी सामर्थ्याच्या दृष्टीनें तुम्हीच गुरुपदाला योग्य आहां. आणि तशी जाणीव असल्यानेंच तुम्ही हा तरुण अनुग्रहीत केला आहे. मला तुमच्या प्रमाणें सामर्थ्य नाहीं. मी नुसता जातीचा ब्राह्मण आहें. तुम्ही आपल्या अगाध सामर्थ्यानें जशी त्या राजस्नुषेच्या चंद्रहाराची जागा ओळखली तसें मला मात्र कांहीं करतां येणार नाहीं. "

वृद्ध केवळ लेचापेचा ब्राम्हण नसावा अशी गोसाव्याची आधींच समजूत झाली होती. तो बोलून दाखवीत नव्हता तरी त्यानें शिष्याला दिलेला आशिर्वाद व एकंदर त्याची चमत्कारिक सखोल भाषापद्धती यांवरून तो कोणी अधिकारसंपन्न महाजन असावा आणि तो आपल्याला चंद्रहाराबद्दल टोंचून बोलला असावा असें जाणून गोसावी म्हणाला, " महाराज, आपण कोण आहां याचें मला ज्ञान नाहीं. हा तरुण माझा अनुग्रहित शिष्य नाहीं. मला गोसावी बनावें लागलें म्हणून याला शिष्य बनविलें आहे. मजजवळ कांहींच सामर्थ्य नाहीं. मी पेचांत आहें. चंद्रहाराची जागा ओळखण्याइतका मी विद्याकलासंपन्न नाहीं. मी माझ्या सद्गुरूंच्या कृपेनें तसा होईन असा मात्र मला भरंवसा आहे. माझा गुरु श्री भारती हा आपलें नेहमींचें ठिकाण सोडून कोठें गेला आहे हें कळत नाहीं. मी त्याच्याच शोधांत आहे. त्याच्या कृपेवर भिस्त ठेवूनच मी कांहीं कार्यसिद्धीकरतां उलाढाली करीत आहें. आपणही कोणी सज्जन दिसतां. हरिप्रिय या नात्यानें आपणही मला वंद्य व गुरुसमानच आहां. "

इतकें बोलून त्यानें चंद्रहार व शांभवी याबद्दलची सर्व हवाल वृद्धाला

प्रांजळपणें कळविली. ती हकीकत ऐकून म्हाताऱ्यानें व नित्यंकानें अतिशय आचंबा व्यक्त केला. नंतर तो म्हातारा ह्मणाला, " तुमचा गुरु भारती हा माझ्या माहितीचा आहे. एवढेंच काय पण तो माझा गुरुबंधु आहे. तो याच प्रदेशांत कोठें तरी गुप्ततेनें किंवा उघडपणें भटकत अस-ल्याबद्दल माझी खात्री आहे. तोही कांहीं कारस्थानांत किंवा चिंतेंत असावा असें त्याची व माझी गांठ पडली त्या प्रसंगावरून वाटतें. असो, माझ्या गुरुबंधूचे आपण शिष्य आहां त्याअर्थी मला आपलें शुभच इच्छिलें पाहिजे."

हें ऐकतांच गोसावी उल्लासयुक्त झाला. त्याला तो म्हातारा गुरुसमान वाटूं लागला. तो प्रेमभरित होऊन म्हणाला, " परमेश्वराच्या कृपेनेंच आपल्या दर्शनाचा आज योग आला. याचा मला केव्हांही लाभच होईल. आपण माझ्या गुरूचे बंधु आहां. तेव्हां आपल्या तोंडून मला कांहीं सूचनेप्रीत्यर्थ वाक्यें ऐकावयास सांपडावीं ह्मणजे त्यांस अनुसरून माझें कार्य यशस्वी होईल, असा मला भरंवसा आहे. माझा गुरु भारती जरी मला प्रत्यक्ष दर्शन देऊं इच्छित नसला तरी माझें शिष्याचें कार्य फलद्रूप होण्याच्या हेतूनेंच त्यानें मला आपलें दर्शन होण्याचा योग घडवून आणला असावा अशी माझी दृढ समजूत आहे. "

यावर तो वृद्ध म्हणाला, " तुमची भारतीगुरूच्या ठिकाणीं बरीच निष्ठा दिसते. आतां मी आपणांस काय सांगावें ! गुरुकृपेनें ह्मणण्यापेक्षां मी तरी निदान म्हणतों कीं, ईश्वरीकृपेनें तुमचें कार्य यशस्वी होण्यास अडचण पडूं नये. आतां माझ्यासारखा ज्ञानहीन, विद्वत्तारहित, तर्कशून्य, युक्तिमंद भिकारडा ब्राह्मण तुह्माला उपदेशपर वाक्यें काय सांगणार ? तुमची इच्छा मोडली असें केवळ होऊं नये म्हणून मी इतकेंच सांगू शकतों कीं, मनुष्यजातींतील प्राण्यांत इतर प्राण्यांप्रमाणेंच स्त्री व पुरुष असा भेद झालेला आहे. त्यांत पुरुष तेवढा श्रेष्ठ आणि स्त्री म्हणजे कमी दर्जाची असें समजण्याचें कारण नाहीं. संसारकृत्यांत त्यांचीं कर्तव्यें भिन्न भिन्न आहेत, पण महत्वानें तीं समसमान व सारखींच अवश्य आहेत. त्यांच्या कर्तव्याची व स्थितीची अदला-बदल करणें शक्य नाहीं व शक्यता ठरवून तसा प्रयत्न करणें म्हणजे अखेर हंसें करून घेणें आहे. सांगण्याचें कारण हेंच होय कीं, तुमच्या बरोबरच्या या तरुणाचा भाग्योदय होऊन संसारी बनण्याचा योग आला तर याला जी बायको पसंत कराल ती फार परीक्षेनें करा. स्त्रीनें आपला पति म्हणजे आपला

देव समजावें. एक पतिसेवाच स्त्रीला वाटेल त्या सामर्थ्यांनीं संपन्न करण्यास समर्थ आहे. हरेक प्रकारच्या धर्मसंमत, सज्जनमान्य, शास्त्रविहित कर्मांपासून प्राप्त होणारें पुण्य एका पतिसेवेंतच आहे अशी स्त्रीची ठाम समजूत झाली असली पाहिजे! हवी ती परिस्थिति उत्पन्न होईल, पाहिजे तसला वेडा-वांकडा प्रसंग गुदरेल, वाटेल तो बलवत्तर मोह भूल घालील, अनेक प्रकारचे उपदेश कानावर पडतील, नानाविध भीति, किंवा आशानिराशा चित्त-वृत्तीला व्याकूळ करतील, कसेंही झालें तरी कोणासही हार न जातां पाति-व्रत्यालाच प्राण समजून आपल्या एका धर्ममान्य विहित पतिचरणींच एकनिष्ठता राखणाऱ्या स्त्रीचें अखेर इहपरलोकीं कल्याण होतें हा ईश्वराचा सिद्धांत आहे. अशा प्रकारचा हा स्त्रीधर्म आहे. पुरुषांना यशस्वी करण्यास स्त्रियांचें कौशल्य, धैर्य, पराक्रम, पुण्याई या पेक्षांही त्यांचें सत्वपूर्ण एकनिष्ठ पातिव्रत्य अधिक सहाय्य करतें हें कोणीही विसरूं नये. ”

असा उपदेश करून तो वृद्ध थांबला. याच्यापुढें आपल्याला बोलण्याचें अवसान नाहीं असें त्यानें बोलून दाखविलें. त्याची जर्जरित अवस्था पाहून त्यांनींही कोणीं त्याला जास्त श्रम घेण्याचा आग्रह केला नाहीं.

त्या वृद्धाच्या उपदेशाचें त्या त्रिवर्गांना थोडें फार आश्चर्यच वाटलें. त्यांतल्या-त्यांत भय्याला त्या उपदेशांतील मतितार्थ समजला; पण त्याचा रोख व मत-लब न समजल्यानें तो अत्यंत आश्चर्यभरित झाला. त्यानें सदुपदेशाचें प्रतिपादन आरंभून विशेषतः त्यासर्यी स्त्रीधर्माचेंच महत्व कां गाइलें या-बद्दल भय्या बुचकळ्यांत पडला. भय्यासारख्या स्थितींतील कोणीही असाच बुचकळ्यांत पडण्याचा संभव आहे. पण काळेंकरून त्यांची संशयास्पदावस्था दूर होईल हें निःसंशय आहे. गोसावी व शिष्य यांना मात्र त्या स्त्रीधर्म-प्राधान्य उपदेशामुळें म्हाताऱ्याच्या बौद्धिक, तार्किक, व आध्यात्मिक शक्तीचें कौतुक वाटून स्वतःबद्दल थोडेंसें भयच वाटलें. पण ती भयप्रद स्थिति कोणत्याही प्रकारें बाधक होणार नाहीं अशी त्यांची खात्री असल्यानें ते विशेष फिकीरींत मात्र राहिले नाहींत. प्रसंगीं तो उपदेश हितपरिणामी होईल अशी त्यांनीं आपापल्या मनांत खूणगांठ बांधली. शिष्यनियं-काचें मन तर त्या स्त्रीधर्मप्रतिपादनांत गढून गेल्यासारखें झालें.

तो सबंध दिवस व रात्र अशाच प्रकारच्या बोलण्यांत आनंदानें घाल-वून गोसावी व शिष्य यांनीं वृद्धाचा निरोप घेतला. भय्यालाही त्यांनीं

पुनर्भेटीचें व स्नेहसंवर्धनाचें आश्वासन दिलें व कालांतरानें त्याच्या नित्य सहवासाची आशा दर्शविली. त्यानेंही त्यांच्या सर्व इच्छेशीं आपल्या मनाचें सादृश्य दर्शविलें आणि श्रीभारती त्या प्रदेशांत हिंडत असल्याचें वृत्त समजल्यामुळें त्यांच्या भेटीच्या आशेनें उत्तेजित होऊन त्या दोघांनीं वृद्धाला पुन्हां एकदां नमस्कार घातला आणि त्याचा शुभ आशिर्वाद घेऊन त्यांनीं भव्याचें घर सोडलें.

---

## प्रकरण २५ वें.

### प्रमिलाहरण.



मिला आपल्या दासीसह बागेंतील मंदिरांतून बाहेर पडली. तो समय रात्रीचा होता. शुक्ल पक्षांतील दशमीचा चंद्रमा स्वच्छ प्रकाशला होता. रात्रीचा प्रवास करावयाचा ह्मणून तिनें एक विश्वासू शिपाईही बरोबर घेतला होता. तो वयानें ह्मातारा झालेला होता. राजकन्येच्या या गुप्त प्रवासास त्या शिपायाकडून सहाय्य होणें कठीणच होतें; पण ती केवळ आपल्यावरील किटाळ नाहींसें करण्याच्या भावनेनें गोसाव्याच्या भेटीस जात आहे हें जाणून त्यानें तिच्या ह्मणण्यास रुकार दिला होता. वाटेनें जातां जातां त्या त्रिवर्गांचें बोलणें चाललें होतें. तिची दासीही वयानें उतारवयी व विश्वासू होती. तिला राणीकडून गृहस्थितींतील महत्वाचें वर्तमान ऐकावयास सांपडत असे. त्याचप्रमाणें त्या वृद्ध शिपायासही राजाकडून गृहस्थितीची बातमी लागत असे. वाटेनें त्या दासदासींनीं प्रमिलेच्या विवाहाची वाटावाट चालविली. ' गोसावी बोवांजवळ कोणी एक तरुण शिष्य असून त्याचें नांव नित्यंक असें आहे. त्याच्यावर राजपुत्र व पुरोहित यांची मर्जी बसली आहे. तो जातीचा अस्सल क्षत्रिय आहे. तो सांप्रतकाळीं आपद्ग्रस्त आहे तरी त्याचे गुण, स्वभाव व कुल पाहतां तो धुळीनें आच्छादित असा हिरा आहे असें ह्मणावें लागतें. प्रमिलेला तो वर उत्तम आहे अशी दमनपुरोहित व राजपुत्र यांनीं राजाराणीजवळ शिफारस केली. राजाराणी यांना ती सूचना

मान्य होऊन त्यांनीं तो नित्यंक जांवई म्हणून पतकरला असून ते त्याच्या आगमनाची उत्सुकतेनें वाट पाहत आहेत. त्या नित्यंकाचा गुरु जो गोसावी तोही जातीचा क्षत्रिय असून त्याचा मामा किंवा चुलता आहे. तो गोसावी भद्रपती असावा असा पुरोहितांना संशय आला होता. कारण भद्रपती या नांवाचा एक थोर, कुलीन व संपन्न क्षत्रिय व त्याचा पुतण्या नित्यंक यांची हकीगत आणि तो गोसावी व त्याचा शिष्य नित्यंक यांची हकीगत यांत त्यांच्या दृष्टीनें बहुतेक साम्य आहे. कसेंही असो; तो नित्यंक हाच राजजामात होणार असें ठरल्यासारखेंच झालें आहे. ' अशी आपापसांत भाषा करून त्यांनीं प्रमिलेला सांगितलें, " राजकन्ये ! या स्वच्छ चांदण्याच्या प्रकाशांत तूं तर आह्मांला साक्षात् भूवरील चंद्रकलाच भासत आहेस ! वृथादूषणरूपी राहूच्या छायेपासून मुक्तकलंक होण्यासाठीं तूं गोसावीबोवाकडे निघाली आहेस हें वरकरणी ठीक होय. पण हें पहा, आह्मी दोघेही वयस्क आहों. आह्मी तुम्हासारख्या माणसापेक्षां बहुत पावसाळे अधिक पाहिलेले आहेत. या प्रवासांत तुझा अंतस्थ हेतु निराळा असावा अशी आमची कल्पना आहे. तुझ्याबरोबर गुप्तपणें येण्याचें कबूल करण्यापूर्वी आह्मीं दोघांनींही त्याबद्दल आपापसांत वाटाघाट केली आहे. तूं न लाजतां आमच्याजवळ सर्व कांहीं कबूल कर. कारण राजपुत्र, पुरोहित, राजा व राणी यांना तो वर पसंत आहे हें आह्मीं ऐकलें आहे. आणि तसें आहे म्हणूनच आह्मी तुझ्या या अंतस्थ हेतुप्रधान गुप्त व चोरट्या प्रवासास बेलाशक अनुकूल झालों आहों. तो गुणसंपन्न नित्यंक तुलाही आवडला आहेसें वाटतें तरी उघडपणें खरें सांग. "

त्या वृद्धवृद्धेचा हा प्रश्न ऐकून प्रमिला बरीच लज्जायमान झाली. त्यांना उत्तर काय करावें हें तिला कांहींच सुचेना. कारण दासी जें काय बोलली तें अक्षरशः खरें होतें. देवळामधील गोसाव्यापाशीं मुलाखत करून आल्यानंतर राजपुत्र व दमनपुरोहित यांच्या संगनमतानें राजाराणी यांनीं शिष्य नित्यंकास जामात करून घेण्याचें योजलें होतें. प्रमिला चांगली प्रौढ झाली असल्याकारणानें तिला पतिपत्नीच्या संबंधाची जाणीव झालेली होती. दमनपुरोहितांच्या तोंडून तिला नवरानायकोचें विहित कर्तव्य, स्त्रीधर्म, कन्येचें पितृसंबंधीं कर्तव्य याही गोष्टी तिच्या मनांत चांगल्या ठसल्या होत्या. राजपुत्र व पुरोहित यांनीं तिची बागेमधील मंदिरांत गांठ घेऊन तिच्याशीं थट्टेनें बोलणें काढतां काढतां तिच्या विवाहनिश्चयाचें वृत्त तिच्या कानावर घातलें होतें; त्यांनीं आपापसांत

वाटाघाट करून शिष्य नित्यंकाचे गुण, शील, कुल वगैरे गोष्टी तिच्या कानावर घालवून त्याच्याविषयीं राजाराणी व आपण स्वत: यांची पसंती दर्शविली होती. त्याच वेळीं प्रमिलेनें आपल्या मनानें त्या नित्यंकास माळ घातली होती. चंद्रहारासंबंधीं दोषाचा शितोडा असह्य होऊन तो दोष नाहींसा होऊन आपला माथा उजळ करण्याकरतां जरी ती देवळाकडे गुप्ततेनें निघाली होती व बाह्यत: तिनें दासदासीजवळ तेवढेंच कारण स्पष्ट केलें होतें; तरी तिच्या अंत:करणांत नित्यंकाचें प्रत्यक्ष दर्शन हा विषय नव्हता असें मात्र नाहीं. नाहीं होय म्हणतां ह्मणतां तिनें त्यांच्या बोलण्यास अप्रत्यक्षरीतीनें संमती दिली. बऱ्याच वेळानें ते तिघेजण देवळाच्या अगदीं सन्निध आले. आतां आपल्याला त्या गोसाव्याशीं बोलावयास सांपडून आपल्या चित्तरूपी सरितेच्या समुद्रास प्रत्यक्ष पहावयास सांपडेल अशा उत्सुकतेनें ती हुरूप धरून राहिलेला मार्ग त्वरितगतीनें क्रमीत होती. पण देवळांत पोंचतांच तिची व तिच्याबरोबरच्या परिवाराची निराशा झाली. कारण त्यावेळीं देवळांत तेथील देवतेवांचून अन्य कोणीच नव्हतें.

आतां काय करावें ? त्या गोसाव्याचा शोध कोठें करावा ? तो राजधानींत गेला ह्मणावें तर तो आपण निघेपर्यंत तेथें आल्याचा बोभाटा नव्हता. आपण व त्यानें एकसमयावच्छेदेंकरूनच आपापलीं स्थानें सोडलीं ह्मणावें तर वाटेनें त्याची व आपली गांठ पडावयास पाहिजे होती. त्याच्या मनांत राजधानींत मुळींच यावयाचें नसल्यामुळें राजनिमंत्रणास त्यानें तोंडापुरतें होय ह्मणून कांहीं मुदत मागून घेतली असावी आणि जनतेची उपाधी चुकविण्याकरतां तो कोठें अरण्यांत निघून गेला असावा अशी कल्पना करावी तर त्याच्यावर खोटेपणाचा आरोप येतो. त्याचा दरजा, पवित्रपणा, अनुभव यांवरून त्याच्या पदरीं असत्य बांधणें बरें नव्हे. तो कांहीं कोणाचा बांधलेला नव्हता. त्याच्या मनांत राजधानींत यावयाचें नसतें तर स्पष्टपणें, भीड न धरतां राजाची आग्रहाची विनंति अमान्य करण्यास तो मुखत्यार होता. अशा प्रकारच्या अनेक कल्पनातरंगांत ते तिघेही हेलकावे खाऊं लागले. वृद्ध व वृद्धा आपापसामध्यें आणखी कांहीं तर्क लढवूं लागले आणि त्या देवालयांतील दगडाच्या मौनव्रती देवतेशेजारीं ही चालती बोलती दुसरी देवता प्रमिला मुग्ध होऊन बसली.

आतां तेथें तसेंच वेड्यासारखें उगीच बसण्यांत अर्थ नाहीं असें समजून

तो वृद्ध राजसेवक देवद्वाराच्या बाहेर आला. चोहोंकडे लांबवर दृष्टी टाकीत तो जांभया देऊन हातानें चुटक्या वाजवूं लागला. आतां आल्यावाटेनें निमुटपणें परत जाणेंच शहाणपणाचें आहे असें समजून तो राजकन्येला तशी सूचना करण्यासाठीं पुन्हां देवळांत जाण्याकरतां वळणार तों कोणी एक मनुष्य घोडा उडवीत येत आहे असें त्यानें पाहिलें. तो सरळ देवळाकडे येत आहे असें दिसतांच ह्मातारा तसाच थबकला. आपण त्याच्या दृष्टीसच पडूं नये ह्मणजे त्याच्याशीं बोलण्याचें कारण पडणार नाहीं असें वाटून म्हातारा देवळाच्या दुसऱ्या बाजूच्या आड जाणार तोंच तो घोडेस्वार तेथें दाखल झाला. त्यानें एकदम आपला घोडा थांबविला आणि खालीं उडी टाकली. म्हाताऱ्यानें त्यास ओळखलें नाहीं. तो कोणी अनोळखी प्रवासी असावा अशी कल्पना करून ह्मातारा जरासा समाधान पावला. तो कोणी ओळखीचा निघालाच तर आपला गुप्त प्रवास बाहेर फुटेल किंवा तो कोणी अनोळखी असेल तर आपण कोण हें त्यास कळल्यावर त्याच्यापासून अपाय होण्याचा मुळींच संभव नाहीं असें समजून त्यानें कांहीं विचारलें तर त्याला आपल्या त्रिवर्गाबद्दल उघड माहिती द्यावयाची असें त्यानें आपल्या मनाशीं ठरवून ठेविलें.

घोडेस्वाराला त्या देवळांत मुक्काम करावयाचा होता. चार दोन घटका विसावा घेऊन त्याला राजधानींत जावयाचें होतें. त्यानें त्या म्हाताऱ्यास पाहतांच प्रश्न केला. " कोण हो ! अशा रात्रीच्या वेळीं या ठिकाणीं तुह्मी काय ह्मणून उभे आहां ? "

या प्रश्नावर ह्माताऱ्यानें विचारलें, " आपल्या आविर्भावावरून आपण कोणी थोर सरदार असावेसें वाटतें. आपण माझ्या ओळखीतले दिसत नाहीं. मी राजा वसुप्रसादाचा एक सेवक आहे. आपण कोण व कोणीकडे चालला आहां हें कळेल तर फार चांगलें होईल. "

हें ऐकून स्वारानें सांगितलें, " तुह्मी कोण हें मला कळलें हें बस् झालें. मी तुमच्या माहितीचा नाहीं पण तुमच्या राजाला मी कोण हें ठाऊक आहे. मी एक शिवावतीला जाणारा प्रवासी आहे. मला चारसहा घटका देवळांत विश्रांति घ्यावयाची आहे. "

असें कळतांच म्हातारा पुढें झाला. त्यानें त्याचा घोडा धरून सामान उतरण्यास त्याला मदत केली. त्यावरून तो सज्जन असावा अशी कल्पना

करून स्वार सामान काढतां काढतां त्यास म्हणाला, " तुह्मी एकटेच आज या देवळांत असण्याचें कारण काय ? कां तुमच्याकडे या देवळाची रखवाली असते ? "

यावर ह्मातान्यानें त्यास स्पष्टपणें सांगितलें, " तसें कांहीं नाहीं. राजकन्या प्रमिला ही देवीच्या दर्शनार्थ काल येथें आली असून परत जाण्यास उशीर झाल्यानें तिला रात्रीं येथें मुक्काम करावा लागला. आतां पहाट होतांच आह्मी राजधानीकडे परत जावयास निघणार आहों. आपलेंही इच्छित स्थळ तेंच आहे. पण उपयोग काय, आपण घोड्यावर व आह्मी तिघे पायींच जाणार ! "

इतकें भाषण होईतों स्वारानें आपला घोडा झाडाच्या एका खोडाला बांधला. ह्मातान्यानें सर्व सामान देवळाच्या बाहेरच भिंतीशीं टाकलें आणि त्वरा करून त्या स्वाराला निजण्याबसण्यासाठीं ह्मणून तेथेंच बाहेर घोड्याचा गाशा आंथरुणवजा पसरला. देवळांत राजकन्येचा मुक्काम आहे हें जाणून तो घोडेस्वार बाहेर वस्ती करण्यास राजी होईल अशी त्याची ठाम समजूत होती.

घोडेस्वारानें तो प्रकार पाहून ह्मातान्याचा चाणाक्षपणा ओळखला. पण स्वाराच्या हेतूबद्दल ह्मातान्याचा अजमास मात्र चुकला. तो स्वार आंथरलेल्या गाशाशेजारीं उभा राहून ह्मातान्यास ह्मणाला, " राजकन्येबरोबर आणखी कोणी दासी किंवा राजघराण्यांतील स्त्री आहे वाटतें ? "

यावर ह्मातान्याकडून दासी असल्याबद्दल होकार येतांच तो स्वार पुन्हां म्हणाला, " राजकन्या प्रमिला अवघ्या एका दासदासीसह अशा ठिकाणीं सडी आली आहे हें जरा कसेंसेंच वाटतें. प्रमिलेसारखी तारुण्यसंपन्न, अविवाहित प्रौढा गाडी घोडे न घेतां येथें येणें आणि अशा या देवळांत रात्रीं वस्तीला राहणें हें सरळ दिसत नाहीं. यांत कांहीं तरी गूढ असावें. "

इतकें बोलून त्या स्वारानें ह्मातान्याला कांहीं बोलण्यास सवडच दिली नाहीं. तो सरळ देवळांत शिरला. मागोमाग म्हाताराही आंत गेला. देवीपुढें दिवा जळत होता त्याच्या प्रकाशांत प्रमिलेचा चेहरा दिसण्यास अडचण पडणारी नव्हती. स्वारानें तिला पाहतांच ती विनयानें उठून उभी राहिली. ती वृद्ध दासीही तिच्याशेजारीं उभी राहिली. ह्मातान्यानें राजकन्येला सर्व प्रकार समजावून दिला आणि मोघम उद्गार काढले, " बाईसाहेब ! आपण स्वस्थ असावें. निघायची वेळ होई तों आपण

आपल्यादासीसह येथें स्वस्थ आराम करावा. हे घोडेस्वार व मी बाहेरच्या अंगाला पडतों. आपणाला देवानें ही दुसरी सोबतच पाठवून दिली. हे देखील राजधानीलाच यावयाचे आहेत."

म्हाताऱ्याचा भावार्थ त्या स्वारानें तेव्हांच ओळखला. तसा तो चाणाक्ष होता; पण त्या चाणाक्षपणाच्या जोडीला त्याच्या मनोवृत्तींत सद्गुणाचें वास्तव्य नव्हतें. तो त्या म्हाताऱ्याच्या भाषणावर चटकन म्हणाला, "मी तसें करावयास पाहिजे होतें; पण राजकन्येला येथें टाकून बाहेरच्या अंगाला रखवाली करीत पडणारा मी कोणी राजदूत नव्हे. आपलें एक भाषण मात्र सत्य आहे आणि तें खरें करण्यास मी केव्हांही तयार आहे."

स्वाराचें धोरण कांहीं नीट दिसत नाहीं असें पाहून म्हातारा किंचित् चरकला. पण पुढें तो काय म्हणतो तें स्पष्टपणें कळण्यासाठीं त्यानें त्यास विचारलें, "आपण कोणी तरी थोर आहां. थोरांच्या भाषणांत कांहीं तरी विशेष अर्थ असावयाचाच. आमच्यासारख्या गरीबांची गोष्ट निराळी. आपण कोणतें भाषण सत्य करण्यास तयार आहां ?"

या प्रश्नावर स्वारानें थोडें स्मित केलें आणि राजकन्येकडे पाहत पाहत तो म्हणाला, "ईश्वरानें तुम्हाला माझी सोबत पाठविली ही गोष्ट खरी आहे. तुम्हाला आतां सोबत नकोच आहे. या राजकन्येची इच्छा असेल तर मी तिचें करग्रहण करून तिला जन्माची सोबत देण्यास एका पायावर तयार आहे."

हे उद्गार ऐकतांच राजकन्या संतापली. ती त्याच्याकडे तिरस्कारयुक्त दृष्टीनें पाहूं लागली तोंच म्हाताऱ्यानें साफसाफ उत्तर केलें, "अशा प्रकारें अभद्र उद्गार काढणाऱ्याच्या जिव्हेचे तुकडे उडवण्यास राजकन्येच्या बाजूनें सहस्रावधी समशेरी तयार असल्याचें माहीत नसणाराप्रमाणें आपण असें धाडसाचें भाषण कसें करतां ?"

म्हाताऱ्याच्या या दरडावणीस न जुमानतां स्वारानें सांगितलें, "मी हें सर्व कांहीं जाणतों. पण मी कोण हें तुम्हास कळलें म्हणजे माझ्या अंगांत त्या सर्व समशेरी बोथट करण्याचें अवसान आहे हें तुम्हास कळून येईल. राजकन्येनें आपला सर्व हट्ट सोडून मजबरोबर चलावें हें बरें. त्याबद्दल राजा वसुप्रसाद जो जाब मागेल तो देण्यास मी तयार आहें."

आतां प्रसंग नीट नाहीं असें पाहून म्हाताऱ्यानें राजकन्येस सांगितलें,

" बाईसाहेब ! तुम्ही दासीसह देवळांतून बाहेर चला. या महाराजांना देऊळ रिकामें करून द्या. आपण अद्याप परत गेलों नाहीं तेव्हां राजवाड्यांतून आपल्याकडे दूत रवाना झालेच असतील. त्यांच्या येण्याची वाट पाहत येथें बसण्यापेक्षां आपण चालूं लागणेंच बरें. वाटेनें त्यांची गांठ पडल्यावर त्यांनीं आणलेल्या वाहनांत आपण बसावें ! "

म्हाताऱ्याचें हें भाषण अगदीं बनावट होतें. तरी राजकन्या व दासी यांनीं त्यांतील अर्थ जाणला. त्या देवळांतून बाहेर पडण्यासाठीं देवीला नमस्कार करून चालूं लागल्या तोंच त्या स्वारानेंही तेवढ्यांतल्या तेवढ्यांत विचार करून म्हाताऱ्याच्या भाषणांतील कावा ओळखला. तो म्हाताऱ्यास उद्देशून बोलला, " राजभृत्य होण्यास तुम्ही लायख आहां ! पण तुमच्यासारख्याचें धनी होण्यास आम्ही लायख असल्यानें तुमचा कावा व मतलब समजणें आमच्यासारख्यास अगदींच सोपें असतें. अशा स्थितींत मला कोणतीही भीति घालण्याचा उपयोग काय ? "

येवढ्या वेळांत राजकन्या दासीच्या मागोमाग देवद्वारानजीक आली तों स्वारानें तिच्या दंडास स्पर्श करून तिला मागें ढकललें. तो उपमर्द सहन न होऊन राजकन्येनें वक्रदृष्टी करून त्याला झिडकारलें व आपला दंड सोडवून ती मागें सरली. घोडेस्वाराला पुन्हां तशी संधी सहज सांपडूं नये ह्मणून दासीनें तिला आपल्या पाठीशीं घातलें. पण त्या शूर ह्मणविणाऱ्या बेताल घोडेस्वारास असल्या हरकतीचें काय वाटणार ! त्यानें त्या म्हाताऱ्या दासीला बाजूस खेंचलें आणि पुन्हां राजकन्येला ओढून आपल्या घोड्याकडे नेण्याच्या विचारानें तिचें मनगट धरण्याचें धाडस केलें; तोंच तो राजनिष्ठ व बाणेदार ह्मातारा आवेशयुक्त होऊन त्यानें त्या स्वाराच्या हातावर आपल्या हातानें एक जोराचा तडाखा मारला. त्या प्रतिकारानें चिडून घोडेस्वारानें आपल्या कमरेचा खंजीर बाहेर काढला आणि कांहीं एक विचार न करतां, आपल्या शौर्यगुणाच्या शुद्धपणास न जुमानतां तो खंजीर ह्मातारा व म्हातारी यांच्या शरीरांत भोंसकला. त्याबरोबर लागलींच ते दोघेजण किंकाळी फोडून खालीं पडले. त्यांच्या अंगांतून रक्तस्राव होऊं लागला. आतां दिरंगाई करून कामाचें नाहीं असें समजून स्वारानें राजकन्येला फरफरा ओढीत घोड्यापर्यंत नेलें. घोड्याला सज्ज करण्यास व त्याचें जीन, रिकबी यथासांग आवळण्यास त्यास फुरसत नव्हती.

कारण त्या वेळीं प्रमिलेला मोकळी सोडली असतां ती पळून जाईल व आपल्या ओरडण्यानें कोणातरी आसपास असूं शकणाऱ्या माणसांना सावध करील अशा भीतीनें त्यानें तिला तशीच धरून अत्यंत प्रयासानें कसा तरी लगाम घोड्याच्या तोंडांत अडकविला आणि तिला घोडयावर बसविलें. तेवढ्यांत ती आरोळी मारूं लागली तोंच तो स्वारही घोड्यावर बसला आणि त्यानें तिचें तोंड दाबून धरून राजधानीची दिशा सोडून भलत्याच मार्गानें अरण्याचा रस्ता सुधारला आणि अचानक सांपडलेल्या अशा मौल्यवान् शिकारीच्या आनंदांत तो घोडा चौखुरी उडवीत चालला. पण आपलें खोगीर तसेंच तेथें पडलें आहे त्यावरून आपण कोण हें समजेल किंवा राजकन्येच्या शोधार्थ धावून येणाऱ्या वीरांपुढें आपणाला हतवीर्य होऊन बंदीवान व्हावें लागेल ही त्या बिचाऱ्याला कल्पनाही झाली नाहीं! दुष्ट लोकांचें शौर्य अनन्वित व अन्यायाचीं कृत्यें करण्याकडेच खर्च होत असल्या कारणानें न्यायदेवता तशांच्या दुरदर्शीपणाचा व सावधगिरीचा तात्पुरता तरी लय करून त्यांच्या भ्रष्टकर्मांच्या शासनाचें बीजारोपण करून ठेवतें हें मी मी म्हणविणाऱ्या चांडालकर्मी शहाण्यांच्या मनांतही येत नाहीं.

---

## प्रकरण २६ वें.



### चोराचा पाठलाग.



गोसावीबोवांचें वास्तव्य देवळांत होतें तेव्हां भय्या त्या-ठिकाणीं प्रसंगीं वास्तव्य करी; पण तो त्याचा नेहमींचा क्रम नसे. नित्याची पद्धत म्हटली म्हणजे तो पहाटेच्या सुमारास देवळांत दाखल होत असे. नेहमींच्या रावत्याप्रमाणें भय्या त्या दिवशीं पहाटे देवळांत आला. त्यासमयीं चांदणें माव-ळलें होतें. देवळाच्या द्वारांत पाऊल ठेवतो तों त्याला तीं दोन्हीं मनुष्यें गाढ निजल्यासारखीं दिसलीं. त्यानें आपल्या हातांतील दिवा टळटळीत केला आणि देवीजवळचा नंदादीपही भरण घालून चांगला प्रज्वलीत केला. तीं मनुष्यें कोण आहेत हें समजण्यासाठीं तो त्यांना हाक मारूं लागला

तों त्यांच्या शेजारीं रक्ताचे डाग दिसले. रक्तस्रावावरून त्याला कांहीं दग्याचा संशय आला. लागलीच तो कंदील घेऊन देवळाच्या बाहेर आला. त्यानें देवळास प्रदक्षिणा करून आसपास सर्वत्र निरीक्षण केलें. पुन्हां तो दाराच्या पायऱ्याशीं आला तों तेथें त्याला घोड्यावरील खोगीर व पसरलेला गाशा दिसला. तो गाशा वाऱ्यानें उडून गुंडाळी होऊन आंतील माणसांप्रमाणेंच बाहेर धुळींत लोळत पडला होता. आपल्या धन्याच्या नीच कृत्यानें लज्जायमान होऊनच जणूं काय त्यानें आपलें तोंड लपविलें होतें. भय्यानें तो गाशा चांगला आंथरला व त्या सामानाचें निरीक्षण केलें. तें सामान कोणाचें व तें ज्याच्यावर घालावयाचें तो घोडा कोठें आहे याविषयीं त्याची कांहींच कल्पना चालेना. तो पुन्हां आंत गेला आणि तीं माणसें कोणत्या स्थितींत आहेत तें पाहूं लागला. प्रथमत: त्यानें त्या म्हाताऱ्याजवळ ओणवें बसून त्यास हांका मारण्यास आरंभ केला. त्यानें त्याला वारा घालून त्याच्या बरगडीवरील गोठलेलें रक्त पुसलें तों त्याच ठिकाणीं त्याला जखम झाली आहे असें त्याच्या ध्यानांत आलें. तो म्हातारा घोरत होता त्यावरून तो जिवंत आहे अशाविषयीं शंकाच नव्हती. त्यानें त्याच्या डोळ्यावर व कपाळावर हात फिरवून त्यास सावध करण्याचा यत्न चालविला. त्या उपचारांनीं म्हातारा लागलीच उठला नाहीं; पण त्याला मारलेल्या हाकांनीं ती वृद्ध दासी मात्र सावध झाली. तें पाहतांच भय्यानें तिच्याकडे वळून तिला वारा घातला. देवळामधील पाण्याची कळशी आणून त्यानें तें तिच्या डोक्यावर थापलें. थोडयाच वेळांत ती चांगली सावध झाली. तिला विशेषशी जखम झाली नव्हती. जखमेच्या भयंकरपणापेक्षां भीतीच्या उग्रतेनेंच ती शुद्धिगत झालेली होती. आपल्याला सावध करणारा मनुष्य कोणी निराळाच तरुण आहे हें पाहून तिला बराच धीर आला. त्या दोघांनीं लागलींच एकमेकांशीं बोलण्याचा खटाटोप करण्याऐवजीं म्हाताऱ्याची शुश्रूषा आरंभली. भय्यानें म्हाताऱ्याच्या कपाळावर पाणी थापलें त्या उपचारानें म्हातारा सावध झाला. त्यानें आपले डोळे उघडले. कोणी अनोळखी मनुष्य आपली सेवा करीत आहेसें पाहून त्यानें कांहीं शब्द उच्चारण्याचा यत्न चालविला; पण रक्तस्रावामुळें उत्पन्न झालेल्या अशक्ततेनें त्याला बोलण्याचे कष्ट पडूं लागले. तेव्हां दासीनें त्याला स्वस्थ पडण्यास सांगितलें आणि ती त्याचें डोकें चोळीत बसली.

भय्या त्याची छाती दाबून जखमेच्या जागेला धुऊन पट्टी बांधूं लागला. आणखी कांहीं वेळानें म्हातारा हुषार होऊन उठून बसला. नंतर त्यांच्या अपेष्ठेसंबंधानें भय्यानें त्यांना प्रश्न केले. त्या दोघांनीं मिळून त्याला साद्यंत हकीगत समजावून दिली. गोसावी व त्याचा शिष्य राजधानीकडे गेल्याचें वर्तमान भय्यानें त्यांना कळविलें. प्रमिलेला पळविणारा दुष्ट कोण हें ओळखण्याची मोठी पंचाईत पडल्यामुळें ते तिघेही अत्यंत कष्टी झाले. भय्यानें त्यांना असें मात्र सांगितलें कीं, " मी या देवळाकडे येत असतां कोणी घोडेस्वार घोडा उडवीत गेलेला मीं पाहिला. पण त्या घोड्यावर कोणी दुसरें मनुष्य होतें कीं नाहीं हें कांहीं माझ्या ध्यानांत नाहीं. तो घोडेस्वार कोण याची चौकशी करण्याचें मला कारणच नव्हतें. शिवाय, त्याच्याशीं विनाकारण कांहीं बोलण्याची सोयच नव्हती. कारण त्याचा घोडा अंधारांतही वायुवेगानें पळत होता. तो कोणत्या रस्त्यानें गेला हें मात्र मला ठाऊक आहे. "

ही बातमी ऐकतांच म्हातारामहातारीची प्रमिलेविषयीं पूर्ण निराशा झाली. आपण कसेबसे राजधानींत परत गेलों तरी आपल्याला तोंड काढण्यास जागा नाहीं; असें पाहून ते दोघे अति खिन्न झाले. प्रमिलेच्या गुप्त प्रवासास सहाय्य होणें हा साधारणतः गुन्हा समजला जाऊन आह्मी चांगले बरे झाल्यानंतर आह्माला शासन होईल असें वाटल्यावरून त्यांनीं परत राजधानींत न जातां तिचा शोध लागून तिची प्राप्ती होईपर्यंत रानोवनीं भटकत रहावयाचें असें आपल्या मनाशीं ठरविलें.

त्या दोन्ही सेवकांचें करणें भय्याला यथार्थ वाटलें; पण त्या दोघांनीं वृद्धावस्थेंत राजकन्येच्या शोधार्थ हिंडणें सुरक्षित नव्हे असें समजून भय्या त्यांस म्हणाला, " तुह्मी दोघेही सालस दिसतां. राजकन्येला तुह्मी गुप्त प्रवासास सहाय्य केलें ही कदाचित् चूक असेल; पण त्यांत तुमचा हेतु चांगलाच होता. आतां तुह्मी येथेंच थांबा. एखाद्या भाड्याच्या गाडी घोड्याच्या सहाय्यानें तुम्ही माझ्या घरीं जा. माझ्या घरच्या वृद्ध म्हाताऱ्याला हा सर्व मजकूर निवेदन करा. तो तुमची सर्व बरदास्त ठेवील. मी स्वतः प्रमिलेच्या शोधास जातों. राजकन्येला सोडवून आणल्यावांचून मी परत येणार नाहीं. हा मजकूर तुम्ही माझ्या घरच्या वृद्धास कळवा. मी येईपर्यंत तो या वृद्ध देवीसंबंधानें सर्व तजवीज करवील. त्याला तुमच्यासंबंधीं कांहीं ओळख पटून

त्यानें तुमचा स्वीकार करावा म्हणून तुम्ही त्याला असें सांगा, ' तुमचा शिष्य जो भय्या किंवा देवीचा भोप्या त्यानें आम्हांस इकडे पाठविलें आहे. त्याचें पाळण्यांतील नांव नित्यंक असें आहे. "

हें नित्यंक नांव ऐकतांच त्यांना कांहीं संशय आला. गोसावीबोवाचा शिष्य नित्यंक तोच हा भय्या असावा आणि त्याच्या घरचा म्हातारा तोच गोसावी असावा. गोसावी व त्याचा शिष्य राजधानीकडे गेल्याचें त्यानें सांगितलें तें खोटें असावें. असे तर्क त्यांच्या मनांत ठाम झाले. त्यांच्या कल्पनेस बळकटी येण्याला भय्याची प्रमिलेविषयींची तत्परता जास्तच कारणीभूत झाली. त्यासंबंधानें त्यास कांहीं विचारावें म्हणून ते दोवे तोंड उघडणार तोंच त्यांची वृत्ति ओळखून भय्यानें सांगितलें, " आतां विलंब करून उपयोगी नाहीं. प्रमिलेला पळविणारा चोर घोड्यावर आहे. मी पायी आहें ! कसेंही असो; मी त्याला हरप्रयत्नानें गाठीन. तो कोणीही असला तरी तो अन्यायी, दरोडेखोर आहे हें खास ! तुम्ही केलेल्या वर्णनावरून तो स्वार कोणी सरदार असावा ! तसें असलें तरी कांहीं हरकत नाहीं. राजकन्येला पळवून नेण्याचें पातक त्यानें केलें हें त्याचें मोठेंच धाडस होय. पण तें पातक, तें धाडस, तो अन्याय माझ्या उपयोगास येणार हें खास ! माझ्या गुरूच्या कृपेनें माझ्या हातून राजकन्येची मुक्तता झाली तर राजा वसुप्रसादाच्या कृपेस मी पात्र होईन आणि त्याच्या द्वारें मी आपलें फार दिवस योजून ठेवलेलें मनोगत सफल करीन. " असें बोलून तो एकटाच तडकाफडकी निघाला. स्वार ज्या वाटेनें जातांना त्यानें पाहिला त्याच वाटेनें तो मार्गक्रमण करूं लागला. त्या स्वाराचा व राजकन्येचा पाठलाग करीत असतां वाटेनें भूक लागली तर काय करावयाचें याचा देखील त्यानें विचार केला नाहीं. तो जात्या शूर होता; पण आपत्तीमुळें सटवाईचा भोप्या होऊन नैवेद्यावर त्यानें आपलें उपजीवन चालविलें होतें; तरी पण तो बीजाचा उच्च क्षत्रिय असल्यानें प्रसंगीं त्याच्या वीरवृत्तीनें उचल खाल्ली हें योग्यच होय ! उच्च विचारसंपन्न व शुद्धमनोभावयुक्त असे धीर पुरुष आपल्या पवित्रकर्मतत्परतेच्या भरांत स्वतःचा आराम, शांति, सुख, भूक, तहान यांची पर्वा करीत नाहींत हें भूषणास्पदच होय.

---

## प्रकरण २७ वें.

### बागेंतील घरधनी.



भय्या पायपिटी करीत रानामधून घोड्याच्या पावलांचा माग काढीत चालला होता. वाटेनें जीं शेतें लागलीं त्यामधील उभें पीकही ठिकठिकाणीं जनावराच्या भरधाव गतीनें मोडून पडलेलें दिसत होतें. शेताची राखण करण्यासाठीं शेतकरी लोक रानांत माळे, कोपी करून राहतात; तशा कोपीही कांहीं कांहीं ठिकाणीं दिसत होत्या. त्या कोपीमधील राखणदारांस विचारतां त्यांच्याकडून कोणी स्वार त्वरितगतीनें बेलाशक शेतांतून गेल्याचा सुगावा त्यास लागला. कांहीं ठिकाणच्या राखणदारांनीं त्याच्या घोड्यावर कोणीएक स्त्री असून ती ओरडत असल्याचीही बातमी सांगितली. अशा प्रकारच्या माहितीनें उत्तेजित होऊन भय्या स्वाराच्या शोधांत फिरत असतां भुकेनें व तहानेनें व्याकुळ होई तेव्हां त्याला त्याच्या इच्छेविरुद्ध आपलें चालणें थांबवावें लागे. शेतकऱ्यांच्या झोपड्यांवांचून आपल्याला विश्रांतीस जागा सांपडणार नाहीं व खाण्यापिण्याची सोय लागणार नाहीं असें पाहून तो तशा ठिकाणीं जाई. एखाद्या ठिकाणीं लहानशी कोप असे. कांहीं ठिकाणीं कायमचे लहान लहान सोपे बांधलेले दिसत. कांहीं कोठें कोठें बंगलेवजा छानदार घरेंही बांधलेलीं होतीं. अशा ठिकाणांतून एखाद्या जागेचा त्यानें आश्रय करावा; त्यांतील मालकाची करुणा भाकून क्षुधातृषाशांतीची तजवीज करून घ्यावी; थोडा आराम करावा आणि चांगली हुषारी आली कीं पुन्हां आपल्या ईप्सित स्वाराचा शोध काढीत रस्ता सुधारावा, असा त्याचा क्रम चालू झाला. मध्यंतरीं तो वाट चुके. पुन्हां कांहीं शोध करून व तलास काढून तो वाटेला लागे. याप्रकारें एक आठवडा लोटला; पण स्वाराचा तपास लागेना! राजकन्येचा शोध लावून तिला बंधमुक्त केल्यावांचून परत जावयाचें नाहीं असा तर त्याचा निर्धार होता.

एक आठवड्याच्या अंतीं तो बहुत दूर जाऊन पोहोंचला. त्या समयीं तो एका शेतांतील बंगलेवजा गृहांत राहिला होता. त्या घराचा मालक वृद्ध असून मोठा बोलका असे. तो आपल्या शेतांतच अलीकडे रहावयास आला होता. बंगल्याभोंवताली त्याची बरीच शेतकी होती. तेथें धरणाचें पाणी पाटामधून वाहत होतें. खेरीज मालकानें दोन तीन विहीरीही बांधल्या होत्या. पाण्याची विपुलता असल्या कारणानें त्यानें आपल्या शेतांत बहुत बागाईत केलें होतें. त्या मालकाचें वसतिस्थान तेथून बरेंच लांब होतें. केवळ हवा पालटण्यासाठीं तो तेथें येऊन राहिला होता.

भय्या त्या घरांत शिरला आणि त्यानें तेथील यजमानाची गांठ घेतली. तो मनुष्य सुस्वभावी असल्यानें त्यानें भय्याचें स्वागत केलें. तो फार लांबून आला असल्यामुळें दमला आहे असें पाहून त्यानें त्याचें नांव, गांव वगैरे चौकशी करून अगोदर त्याच्या खाण्यापिण्याची चौकशी केली. या योगानें भय्यास सुग्रास खायला मिळून स्वच्छ आणि गार असें पाणी प्याव-यास मिळालें. त्यामुळें तो बराच तरतरीत झाला. अन्नाच्या योगानें कांहीं वेळानें जडत्व येऊन भय्याला झोंप येऊं लागली. मालकाशीं कांहीं किरकोळ भाषण चाललें असतां भय्या पेंगूं लागला हें पाहून त्या यजमानानें त्यास सांगितलें, "भय्याजी, आपणास झोंप येत असल्यास पडा चार घटका. मलाही आतां उद्योग आहे. माझा नित्यविधी आटोपून जेवणखाण झालें ह्मणजे मग मी रिकामा होईन तेव्हां आपणास हाक मारीन. आपली झोंप पुरी झाली ह्मणजे आपण बोलत बसूं. तुह्मी आतां येथून जावयाची घाई करूं नका. संकोच धरण्याचें कारण नाहीं. प्रसंगानें मनुष्य कोणा-च्याही घरीं येतो."

इतकें भाषण होत आहे तोंच भय्याला सुषुप्तीनें व्यापलें आणि तो तसाच त्या बैठकीवर पसरला.

तो समय तिनसांजचा होता. तेथील यजमान भोंवतालच्या बागबगीच्यांत गेला. त्यानें आपली नित्याची पाहणी आटोपली व कांहीं सुवासिक फुलें व उत्तम उत्तम फळें घेऊन तो परत आला. रात्रीचें खाणें पिणें उरकल्यावर त्यानें सुमारें दहा घटका रात्रीच्या सुमारास भय्याला हांक मारली. अजमासें प्रहर दीड प्रहर गाढ निद्रा लागल्या कारणानें भय्याचा आळस बराच कमी झाला होता. तो हांक मारतांच जागा झाला. तो बैठकीवर उठून बसला तोंच

मालकानें त्याला चूळ भरून टाकण्यासाठीं पाणी आणवून दिलें. भय्या उठून उभा राहून चालूं लागला तों त्याच्यानें साफ पावलें टाकवेनात. मानसिक उल्हासाच्या स्फूर्तीनें त्यानें जें लांबलचक मार्गाक्रमण केलें होतें त्याचा त्याच्या पायाला शिणवटा आला व झोंप होतांच तो त्याला चांगलाच जाणवला. त्यानें तेथूनच चूळ भरून तोंड खुळखुळून स्वच्छ केलें आणि डोळ्यावरून ओला हात फिरवून तो बैठकीवर नीटपणें बसला. यजमानानें लागलीच सुंदर व चवदार फळें फोडून त्याच्यापुढें ठेविलीं व सुवासिक पुष्पेंही त्याच्या शेजारीं टाकलीं. ते दोघेजण फळें खाऊं लागले तोंच आसपासच्या शेतकऱ्यांतून कोणी लोक गप्पागोष्टी करण्यास तेथें आले. त्यांमध्यें बरेचजण म्हातार होते. मालकानें त्या सर्वांना फळांच्या फाकी दिल्या. सर्वांचे फळहार चालू असतांना तो यजमान आपल्या बागांचीं व पुष्पफलांचीं गुणवर्णनें करीत होता. भय्या हाच काय तो त्या मंडळींत परका असल्यानें जमलेल्या मंडळींनीं यजमानाजवळ त्याची विचारपूस केली. तेव्हां त्या मालकानें त्याला नुकतीच जी माहिती मिळाली होती तेवढी त्यांना सांगून तो भय्याशीं भाषण करूं लागला. त्याच्या प्रश्नांचीं भय्या उत्तरें देत असतां मध्येंच ती मंडळी त्याला दुसरे प्रश्न विचारीत. अशा रीतीनें बोलणें सुरू झालें असतां मंडळींच्या प्रश्नावरून भय्याचें वसतिस्थान त्यांना कळलें. तो अगदीं तरुण असून एकटाच किती तरी लांब भटकत आला आहे याविषयीं मंडळींनीं साशंक व आश्चर्यवृत्ति दाखविल्यावरून भय्या ह्मणाला, " मी हल्लीं ज्या भागांत आहें हा देश तरी कोणता ? मी या प्रांतांत प्रथमतःच आलों आहे. येथील रिवाज, रहाणी, स्थिति मला माहीत नाहीं. या प्रदेशाचा अधिपति कोण वगैरे विषयींही मला कांहींच माहिती नाहीं. मात्र माझ्या देशाविषयीं तुह्माला चांगलीच माहिती दिसते ! "

भय्याची जिज्ञासा ओळखून घरधनी ह्मणाला, " तुमचा आतां दोन चार दिवस येथें मुक्काम पडलाच समजा. तुह्माला आतां मी व ही मंडळी मिळून सर्व कांहीं सांगतों. हें पहा, हा आमचा देश ह्मणजे लहानसें संस्थान आहे. पण येथील लोक सधन स्थितींत आहेत. येथें बहुतेक जमीनदारांचेंच वास्तव्य आहे. या प्रदेशाचें नांव जालंदर असें आहे. तुमच्या सिंधावतीचा व या देशाचा कांहीं संबंध नव्हता; पण कालाच्या अद्भुत सामर्थ्यानें हा देश विस्कळित होऊन याचे बरेच तुकडे झाले आहेत ! पूर्वीं हा देश जंबाल-

वंशीय राजघराण्याच्या मालकीचा होता. जंबालांतील पुरुष सत्वसंपन्न व बलाढय होते. त्या कुलांतील क्षात्रधर्मरत राजे उदार व सत्वस्थ असत. त्यांत शेवटचा पुरुष ईशपती या नांवानें प्रख्यात होता. ”

हा भूतकाळ न खपून त्या मंडळींतील एकजण घरधन्यास ह्मणाला, “ काका ! हें काय आपण म्हणतां ! ईशपती प्रख्यात होता म्हणजे काय ? सांप्रतकाळीं तो आपल्या प्रिय पार्वती पत्नीसह हयांतच आहेना ? मग असें कसें ? होता तेथें आहे म्हणा ! ”

यावर घरधनी बोलला, “ बरोबर आहे. या घराण्याचा शेवटचा पुरुष ईशपती व त्याची पत्नी पार्वती हे दोघे हल्लीं ईशसेवारत होऊन राहिले आहेत. ते वयानें अगदींच थकलेले असतील ! हल्लीं त्यांचें वय जवळ जवळ नव्वदाहून अधिक असेल ! खेरीज शारीरिक अशक्ततेहून मनाच्या उद्वेगामुळेंच ते दोघे जास्त थकले आहेत ! ”

आतांपर्यंतची हकीकत ऐकल्यावरून पुढील त्यांची सर्व माहिती कळावी अशी भय्याला भावना झाली. तो त्यांस विनंति करून ह्मणाला, “ आपण सांगतां त्या सत्वसंपन्न, हरिभक्तिपर, राजघराण्यांतील जोडप्यास एवढी मानसिक चिंता असण्याचें कारण काय ? ”

यावर धन्यानें उत्तर केलें, “ तो एक मोठा इतिहासच आहे. आपल्याला करमणुकींत वेळ घालवावयाचा आहे तेव्हां तुम्हाला सगळीच हकीकत सांगतों. हें पहा, हा ईशपती व त्याची कांता पुत्रवियोगानें गांजलेली आहेत. सरासरी वीस पंचवीस वर्षांपूर्वी त्यांचा एकुलता एक लहान पुत्र अकस्मिक नाहींसा झाला. ईशपतीला तीन बंधु होते. त्यांचे परस्परांतील बंधुप्रेम मोठें वाखाणण्यासारखें असे; पण बायकांनीं कोणाचें बंधुप्रेम टिकूं दिलें आहे कां ? या बायका ह्मणजे नाहीं तेथें भानगडी उत्पन्न करतील ! त्यांच्या बायकांत तेड व वांकडें येऊन त्यांनीं आपापल्या पतीवर आपल्या स्त्रीस्वभाव कौशल्याचे कौटिल्यपूर्ण प्रयोग चालूं केले. त्यांत दोन भावांना पुत्र नव्हते. तिसऱ्या भावाला एक पुत्र होता. तो बहुगुणसंपन्न होता. पण गुणवान् मनुष्य जगावर टिकूं देणें ह्मणजे ईश्वराला कसलेसेंच वाटतें असें दिसतें ! ईश्वराच्या अनुज्ञेनें त्याच्या कालावधीचा परिपाक होऊन तो मुलगा सर्पदंशानें कालवश झाला. त्या मुलाबद्दल सर्व बंधूंना तळमळ लागली. ते तिन्हीं बंधु महान् पराक्रमी, शूर, व एकीप्रिय होते.

त्यांचा एक विचार होता तोंपावेतों त्यांच्याविषयीं कोणी कांहीं भलता विचार मनांत आणला नाहीं. पण पुढें त्या चौघांची वाताहत झाली. ज्याचा पुत्र सर्पदंशानें मेला तो पुरुष आपल्या स्त्रीसमवेत अकस्मात् मरण पावला. त्यांच्या मरणाचें खरें कारण कळलें नाहीं. बाकीचे दोघेजण निपुत्रिक होते. त्यांच्या बायका आपल्या स्थितीला त्रस्त होऊन वाटेल तशा बोलत. त्यामुळें घरांत वाचावाच सुरू झाली. त्या गृहकलहास कंटाळून त्यांतील एक भाऊ गृहत्याग करून निघून गेला. तो पुढें बरेच दिवसांनीं एका विहिरींत मेलेला तरंगत असतांना आढळला. ईशपतीला एक मुलगा झाला होता. त्याचें नांव नित्यंक असें होतें. दोन भाऊ मेले व दोन हयात राहिले. त्यांतील ईशपती हा वडील होय. धाकट्याचें नांव भद्रपती होतें. या भद्रपतीची बायकोही मरून पुढें तो एकटाच होता. भद्रपती हा स्वभावानें मोठा श्रद्धाळू व देवधर्मी होता. त्यानें पुन्हां लग्न केलें नाहीं. त्याला संतती नव्हती. ईशपतीचा ह्मणजे आपल्या भावाचा मुलगा नित्यंक याच्यावरच तो पुत्राप्रमाणें लोभ करी. त्या नित्यंकास भद्रपतीचाही विशेष लळा असे. हा भद्रपती अनेक धार्मिक, दैविक, तांत्रिक, मांत्रिक क्रियांचा भोक्ता होता. पुढें कांहीं कालानें परमेश्वराच्या इच्छेस अनुसरून तो पुत्र नित्यंकही हें जग सोडून गेला. त्याचें मरणही एकाएकींच घडलें. भद्रपती त्याला आपल्या बरोबर हवा तिकडे हिंडावयास नेई. एकदां तो एका अरण्यांत गेला असतां त्यानें नित्यंकाला बरोबर नेलें होतें. तेथें त्यांच्यावर वाघानें हल्ला केला आणि तो नित्यंक व्याघ्रमुखांत पडला. खरें काय असेल तें राम जाणें; पण भद्रपतीनें तरी नित्यंकाच्या निधनाचें हें कारण सांगितलें. ईशपतीला भद्रपतीबद्दल भलताच संशय येण्याचें कारण नव्हतें. पुत्रदुःखानें ईशपती व पार्वती यांची कंबर खचली. त्यांना अन्नपाणी गोड लागेना. ईशपतीला राज्याधिकारही नकोसा झाला. भद्रपती आपल्या बंधूची समजूत घाली, त्याचें व भावजईचें सांत्वन करण्याचा यत्न करी; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ईशपतीनें कारभार पहाण्याचें टाकल्यासारखें केलें तेव्हां भद्रपती नाइलाजास्तव अधिकार चालवूं लागला व कामकाज पाहूं लागला. याच समयास एक कांहीं भलताच प्रकार घडला. त्या ईशपतीप्रभृति चार भावांना दोन भगिनी होत्या. त्यांतील एक बहीण सांप्रत हयातही असावी असें वाटतें. ती बहीण कलिंगाधिपती जो निष्कलंक त्याची सून होय. तिच्या नवऱ्याचें

नांव काय हें मला आठवत नाहीं. कारण त्या निष्कलंकाला दोन बायका होत्या. त्या दोघींनाही मुलगे होते. सुबाहू, वीरबाहू, आणखी कोणीतरी दोन तीन असे ते पांजचारजण सख्खे सावत्र बंधू होते. त्यापैकीं ती बहीण कोणाला तरी दिली होती हें खास! त्यांची दुसरी बहीण जांबवती या नांवाची होती. ती सर्वांत अगदीं कनिष्ट ह्मणजे शेंडेफळ होतें. ती फार सौंदर्यसंपन्न होती. तुमच्या शिवावतीच्या नृपतीचा हल्लीं जो महापराक्रमी सरदार जयसिंग या नांवानें गाजत आहे त्याला ती कन्यका पसंत पडली होती. जांबवतीनें तो पति नाकारला; किंवा तिच्या भावांनीं तें स्थळ नाकारलें कांहीं ह्मणा. कोणत्या तरी कारणानें जयसिंगाचा हिरमोड झाला यामुळें जयसिंगाचा भद्रपती व ईशपती यांवर दांत राहिला. पुढें ती जांबवती ज्याची कांता झाली त्याचा व जांबवतीचा कपटानें खून करण्यांत आला. त्यांत जयसिंगाचें अंग असावें असा तर्क होता. असो, पुढें याहूनही विलक्षण प्रकार घडला. जयसिंगाचा सूड घ्यावा अशा हेतूनें भद्रपती कांहीं जारण मारण कर्मे करूं लागला. खरें खोटें कोणास ठाऊक; पण निदान त्याचा बोभाटा तरी असा होता! त्यांतच कोणी दुष्टानें किंवा सुष्टानें संधी साधली आणि ईशपती व पार्वती यांचें मन भद्रपतीविषयीं भ्रष्ट केलें. भद्रपतीनें आपलें अभिचारकर्म सिद्ध होण्यासाठीं आपला लहानगा पुतण्या बळी दिला असें त्या दुष्टानें ईशपतीच्या मनांत भरवून दिलें. ईशपतीनें त्या भाषणावर भरंवसा टाकला. ईशपती व पार्वती यांनीं अविचारानें किंवा सुविचारानें भद्रपतीवर भलताच आरोप लागू करून त्याला अगदीं नीच ठरविलें. भद्रपती त्या किळसवाण्या आरोपानें मेल्यापेक्षां मेला होऊन गेला. आपल्यावरच्या घाणेरड्या आरोपाची निष्कृति करण्याकरतां त्याला कांहींएक मार्ग दिसेना. त्यानें नित्यंकाचें मरणवृत्त कळवितांना त्याला वाघानें मारलें असें सांगितलें होतें. ईशपती व पार्वती हे दोघे लोभानें जेव्हां पुत्राच्या शवदर्शनाची इच्छा करूं लागले तेव्हां भद्रपतीनें सांगितलें कीं, " त्या मुलाला वाघानें माझ्या समक्ष ठार केलें नाहीं तर वाघ त्याला घेऊन पळून गेला. मी त्याच्यामागें धावण्याची पराकाष्ठा केली; पण माझा नाइलाज होऊन मी निराशेनें परत आलों. व्याघ्राच्या जबड्यांत सांपडलेला नित्यंक मेला किंवा वाघानें खाल्ला असें ह्मणण्यास कोणतीच हरकत नाहीं ह्मणून मीं तसें सांगितलें.

हा मजकूर त्या वेळींही बहुतेकांना थोडा संशयास्पद वाटला; पण पुढें त्याची शक्यता भासून तें प्रकरण संपलें. मात्र या नवीन प्रकारानें ईशपती व पार्वती यांना तें वृत्त जास्त शंकित वाटून त्यांचा संशय दृढ झाला. त्यांना तो प्रेमाळु, आज्ञाधारक, सेवादक्ष, भद्रपती शत्रू वाटूं लागला. आपल्या प्रियबंधूची ती वृत्ति पाहून व आपल्यावरील आरोपानें त्रस्त होऊन भद्रपती वेड्यासारखें आचरण करूं लागला. त्याचा चित्त-विभ्रम झाला. त्याचें डोकें फिरल्यासारखें झालें. तो नित्यंकाच्या नांवानें आरोळ्या मारूं लागला. तो इतर समवयी मुलांना नित्यंक ह्मणूनच मिठ्या मारी. अशा दुर्दशेंत तो एके दिवशीं राजवाड्यांतून चालता झाला. त्याचा आजवर पत्ता नाहीं. तो मेला किंवा जिवंत आहे हें कांहींच ज्ञात नाहीं व त्याची चौकशी करण्या-जोगेंही कोणी राहिलें नाहीं.

इकडे ईशपतीचीही भलतीच अवस्था झाली. तो अगदीं स्वस्थ बसून राहिला. त्याला जग नकोसें झालें. त्यानें आपल्या राज्याचे चार वाटे केले. त्यापैकीं तीन वाटे धर्मदाय ह्मणून वाटून टाकले. चौथा वाटा तिहींच्या मानानें बराच मोठा होता. तो त्यानें आपला वडील हिस्साचा ह्मणून आपणाकडे ठेवला. तो वाटाही ईशपती कोणाला तरी देईल अशा समजुतीनें जयसिंगानें त्याच्या-जवळ त्याची मागणी केली. ईशपतीला त्याचा दुष्ट स्वभाव ठाऊक होता. त्यानें आपल्या भगिनी व मेहुण्याचा घात केल्याबद्दल त्याला पक्का संशय होता. तेव्हां त्यानें जयसिंगाचें मागणें साफ नाकारलें व त्याचा नीचपणा त्याला जाणवेल असा खडखडीत जाब केला. तेव्हां जयसिंगानें हजारों लटपटी करून ईशपतीवर हल्ला केला. त्यावेळीं जयसिंगापासून बचाव करणें ईशपतीला शक्य नव्हतें. तो मानसिक उदासीनतेनें व्यापला होता. खेरीज त्याच्या प्रदे-शांतील व्यवस्थेबद्दल तो बेगुमान होता. जयसिंगानें ईशपतीला व पार्वतीला कैद केलें. तेव्हां ईशपती त्याची करुणा भाकूं लागला. तो आपल्या वैभवाचा त्याग करण्यास तयार झाला. जयसिंगानें त्याच्याकडून जबरदस्तीनें त्याच्या प्रदेशाचा वारसा लिहून घेतला. त्यांतील कांहीं भागाबद्दल बक्षीस पत्रकें करून घेतलीं आणि त्याला त्याच्या पत्नीसह मुक्त केलें. तेव्हांपासून तो ईशपती व पार्वती बैरागी होऊन कोठें गेले आहेत त्याचा आज नक्की पत्ता नाहीं. बाकी ते हयात आहेत हें खास ! कारण कोणा कोणाला ते नुकतेच भेटल्याचेंही ऐकलेलें आहे. अशा प्रकारची या जालंदर देशांतील जंबालवंशाची चाल

आहे. सांप्रत या देशावर जयसिंग सरदाराचीच हुकमत चालते. त्याच्या वतीनेंच या संस्थानचा कारभार चालतो. फक्त एक भरभक्कम ठराविक रक्कम जयसिंगाला द्यावयाची असते. तिची भरपाई केली ह्मणजे आह्मी किंवा आमच्यासारखे शेतकरी आपापले वतनांचे मुखत्यारच आहों. जयसिंग सरदारानें नवीन मिळविलेल्या खाजगत प्रदेशाचा किंवा त्याच्या वसुलाचा हवातसा विनियोग करण्यास त्याला सिंधुपर्ता पौरवांची हरकत असण्याचें कारणच राहिलेलें नाहीं. आणि या प्रदेशाबद्दल तर त्याच्याजवळ वारशी हक्कांची व बक्षीसाचीं चोख पत्रकें आहेत. "

हा सविस्तर वृत्तांत ऐकून भय्या आपल्या मनांत चकित् झाला. त्यानें अत्यंत दीर्घ सुस्कारा टाकून घरधन्यास विचारलें, " आपण वयानें माझ्या अजोबासारखे आहां. तेव्हां आपल्याविषयीं मी शंका घेत नाहीं. पण तुह्मी हा इतका जुना मजकूर अगदीं पाठ केल्यासारखा सांगितला कसा याचें मला आश्चर्य वाटतें. "

यावर तो घरधनी व त्याचे वयस्क सोबती एकदम ह्मणाले, " हां यांत कांहींच नाहीं. आह्मीं सबंध बखरीच्या बखरी तोंडपाठ ह्मटल्यासारख्या सांगूं. आमच्या अशा गोष्टी नेहमीं चालतात. खेरीज तो ईशपती व त्याची पत्नी पार्वती हे आम्हाला परमपूज्य वाटतात. आतां तर ते ऋषीच बनले आहेत. त्यांच्या एकंदर अवस्थेचें दुःख आठवून आह्मांस अद्याप रडूं येतें. हल्लीं तें जोडपें अत्यंत थकलें असून पवित्रपणानें काळ कंठीत आहे. तें जोडपें ईशसेवेंतच गढून आहे. इतक्या अवधींतही त्यांचें वियोगदुःख नाहींसें होऊन त्यांना शांतता प्राप्त झाली नाहीं याबद्दल ईश्वराच्या न्यायीपणाचें कौतुक वाटतें ! त्याविषयीं आमची नित्य वाटाघाट चालते. असो; त्यांच्याशीं तुम्हाला कांहीं मोठेंसें कर्तव्य नाहीं. सहजासहजीं हकीगत निघाली तेव्हां तुम्हाला सर्वच इतिहास सांगितला. बरें पण तुह्मी इकडल्या या भागांत अगदीं सडे, एखाद्या भणंगाप्रमाणें कां हिंडत आहां. "

हा प्रश्न ऐकतांच भय्या थोडकासा विचारांत पडला. अनेक कल्पनातरंग ध्यानांत आणीत न बसतां त्यानें प्रचलित विषयाचेंच मनन केलें आणि तो ह्मणाला, " आपण मला जी हकीगत सांगितली ती मनाला चटका लावून सोडणारी आहे. त्याविषयीं यावेळीं कांहीं न बोलणेंच बरें ! "

एवढे शब्द बोलत असतांना भय्याचा चेहरा पालटलेला दिसला. त्याच्या

मुखावर गांभीर्य व आशा निराशा यांची छाया स्पष्टपणें दृग्गोचर झाली. ती त्याची विचारमय दृश्य स्थिति घरधनी व इतर मंडळी यांच्या ध्यानांत आली. त्यांनीं त्यास विचारलें, " आमच्या प्रश्नाचें उत्तर देण्यास तुह्मांला अवघड वाटतें कीं काय ? तुमचा या प्रवासांतील हेतु विशेष गुप्त आहे कीं काय ? किंवा जंबालवंशाशीं तुमचा जवळचा अगर दूरचा संबंध पोंचतो किंवा कसें ? यांतून कांहींच प्रकार खरा नसेल तर आमच्या कथानकानें तुमच्या वृत्तींत फरक पडलेला कां दिसावा ? "

ह्या प्रश्नांनीं भय्याचें मन जास्तच अस्थिर झालें. त्याच्या अंतःकरणांतील सर्व विचार एकत्र गोळा होऊन त्याच्या कंठाशीं आले. तो आतां स्पष्टपणें आपले विचार प्रकट करणार तोंच त्याला गहिंवर आला आणि ते सर्व विचार अश्रुरूपानें नेत्रांतून बाहेर पडूं लागले. त्याची ती विलापस्थिति पाहतांच सर्वत्रांना आश्चर्य वाटलें. पण त्यांना त्या विलापाचें कारण समजेना. ते सर्वजण भय्याचें सांत्वन करून त्यास पुन्हां पुन्हा धीर देऊन त्याच्या विलापाचें कारण विचारूं लागले. थोडया वेळानें त्याची ती उबाळी जाऊन तो कांहींसा स्वस्थ झाला. त्यानें त्यांच्या सर्व प्रश्नांची स्मृति धरून त्यांना सांगितलें, " मी क्षत्रियकुलोत्पन्न आहें, हें तुह्मांला समजलेंच आहे. जालंधराधिप जंबाल घराण्याशीं माझा संबंध आहे किंवा नाहीं ह्या दोन्ही गोष्टी सोडून दिल्या आणि माझ्या शोकाचें कारण उघड करावयाचें म्हटलें ह्मणजे मी इतकेंच सांगूं शकतों कीं, या घरधन्यांनीं सांगितलेल्या हकीकतींत आणि माझ्या स्वतः-च्या हकीगतींत बरेंच—ह्मणजे सर्वशः ह्मटलें तरी चालेल--साम्य आहे. तेव्हां कथासादृश्यामुळें माझी स्थिति मजपुढें उभी राहिली. त्यांतून मला तारून नेण्यास एक माझा गुरूच समर्थ आहे असें वाटून ती स्थिति आणि माझा गुरु मजपुढें उभे राहून मला रडें कोसळलें. सांप्रत मी प्रवास करण्याचें कारण अगदीं वेगळें आहे. माझा त्याच्याशीं वस्तुत: विशेष संबंध नाहीं; पण कांहीं आशासफलतेवर धोरण ठेवून मीं होऊनच कांहीं कार्य अंगिकारलें आहे. तें अति महत्वाचें आहे. सिंधुपती पौरवकुलटिळक राजा वसुप्रसाद याची कन्या प्रमिला कदाचित् तुह्मांतून कोणाला ठाऊक असेल. "

प्रमिलेच्या नांवाचा उच्चार होतांच त्यांतील बहुतेकजण बोलले, " राज-कन्या प्रमिला आह्मीं प्रत्यक्ष कोणी पाहिलेली नाहीं. पण आम्हाला तिची हकीगत ठाऊक आहे. सरदार जयसिंगाचा पराक्रमी पुत्र कामसेन याच्यासाठीं

सरदारानें जिला मागणी घातली आणि राजसभेंत मोठें रण माजलें तीच ती प्रमिला होय. ''

हा मजकूर ऐकतांच भय्या म्हणाला, '' मी त्या राजधानीनजिकचा राहणारा असून मला हा काहीं एक वृत्तांत ठाऊक नाहीं. ती अद्याप अविवाहित आहे एवढेंच काय तें मला माहीत आहे. तुह्माला राजसभेंतील हा मजकूर कसा माहीत झाला कोण जाणे ! ''

भय्याला त्याच्या आश्चर्यस्थितींतून काढावें या हेतूनें मंडळी म्हणाली, '' एवढेंच काय; पण राजानें सरदाराची मागणी नाकारली व दमनपुरोहितांनीं कामसेनाला नांवें ठेविलीं म्हणून तो सरदार व कामसेन अतिशय क्रुद्ध झालेले आहेत हें देखील आह्माला विदित आहे. दमनपुरोहिताला पश्चात्ताप होईल असें शासन करावें आणि राजकन्येवर झडप घालून जबरीनें तिचा कामसेनाशीं विवाह लावावा असा देखील त्यांचा दृढ निर्धार झाला आहे. आमचा त्या सरदाराच्या विश्वासू सेवकाशीं संबंध येतो त्यामुळें आह्मांला या बातम्या सहज समजतात ! असो; पण तुह्मी त्या प्रमिलेबद्दल आरंभीं काय सांगणार होतां ? ''

हा प्रश्न ऐकून भय्यानें प्रमिलेची आणखी सर्व इत्थंभूत हकीगत विचारून घेतली. आणि आपलें भाषण पुढें चालूं केलें, '' तीच राजकन्या प्रमिला सांप्रत राजधानींतून नाहींशी झाली आहे. ती कांहीं जादूच्या प्रयोगानें गुप्त झाली नाहीं किंवा ती आपण होऊन पळून गेली नाहीं. गांवापासून बऱ्याच अंतरावरील सटवाईच्या देविच्या दर्शनास ती गेली असतां तेथून कोणी दुष्टानें तिला जबरदस्तीनें पळवून नेलें आहे. तुमच्या हकीगतीचा विचार पाहिला ह्मणजे तिचें हरण करणारा चांडाल तो सरदारपुत्र कामसेन असावासें वाटतें. तो दुष्ट एका सड्या घोड्यानिशीं बाहेर पडला आहे. त्यानें तिला आपल्याच घोड्यावर बसवून नेली असल्याबद्दल मला खात्रीलायक सुगावा लागला आहे. मी त्या देवीचा भोप्या आहें. माझ्या देवळांत हा गुन्हा घडला म्हणून मीं मुद्दाम त्या हरणकर्त्याचा पाठलाग चालविला आहे. प्रमिलेचा शोध लावून तिला पळविणाराला कंठस्नान घालून राजा वसुप्रसादाची व तिची पुन्हा भेट करविणें हेंच माझें सध्यांचें कार्य होय ! त्यासाठींच प्रवास करीत करीत मी हा असा येथवर आलों आहे. या प्रांतांत तो दुष्ट कामसेन राजकन्येला घेऊन आल्याचें वर्तमान मला समजलेलें आहे.

येथवर मीं त्याच्या तपासाकरतां हिंडलों. पण येथून पुढें सरळ मार्ग दिसत नाहीं. या प्रदेशाच्या भोंवतीं सर्वत्र डोंगर, पहाड, अरण्यें पसरलेलीं आहेत. तेव्हां मला आतां मोठा विचार पडला आहे. आतां कोणती दिशा स्वीकारावी व त्या दोघांचा शोध कसा काढावा याची मोठी पंचाईत वाटत आहे. मी या प्रांतांत अगदीं गैरमाहीत आहें. माझ्या कार्यसिद्धीसाठीं आपण सर्वांनीं मला शक्य ती माहिती सांगून थोडी बहुत मदत केल्यास मजवर मोठेंच उपकार होणार आहेत. शिवाय प्रमिला ही राजकन्या आहे. तुमच्या मदतीनें तिची प्राप्ती झाली व ती सुरक्षितपणें शिवावतीला पोहोंचली तर राजा वसुप्रसादाला तुह्मी उपकारबद्ध केल्यासारखेंही होईल. तरी तुह्मी तुमचा विचार मला कळवल्यास मला माझा मुक्काम लवकर हलवतां येईल."

या सूचनेनें सर्वजण चमत्कारिक स्थितींत घोटाळत आहेत तोंच तो घरधनी कांहीं विचारमंथन केल्यासारखें करून बोलला, "परमेश्वराच्या घरचा योगायोग काय असेल तो असो. पण मला वाटतें तुमची व त्या राजकन्येची भेट खास होणार. तुह्मी येथें येण्यापूर्वी दोन दिवस एक मनुष्य एका तरुण स्त्रीला घेऊन या ठिकाणीं या माझ्या घरांत आला होता. तो घोडेस्वारच होता. त्यानें आपल्याच घोड्यावर त्या स्त्रीला आपल्या समवेत घेऊन प्रवास चालविला होता. तो सरासरी प्रहर दीडप्रहर येथें मुक्कामास होता. तो कामसेन नव्हता तरीपण तो सरदार, संस्थानिक, जहागीरदार यापेक्षां कमी दरजाचा दिसत नव्हता. त्याच्या बरोबरची स्त्री रूपलावण्यसंपन्न असून तारुण्यानें दिमाखदार दिसणारी होती. पण त्या समयीं तिचा चेहरा म्लान दिसत असून ती अत्यंत कष्टी दिसत होती. प्रवासाच्या श्रमानें ती कोमेजली असेल असें मानून मीं आरंभीं कांहीं चौकशी केली नाहीं. पण जेव्हां आमच्या बायकांनीं तिला घरांत बोलाविलें तेव्हां तो गृहस्थ तिला आपल्यापासून हालूं देईना. ती बिचारी केविलवाणी मुद्रा करून रडूं लागली. त्यावरून मीं त्या मनुष्यास तिच्या व त्याच्या नात्याविषयीं प्रश्न केला. तेव्हां त्यानें मला बेलाशक असें सांगून दिलें कीं, ही माझी दुसरी बायको आहे. तिचे आई-बाप नुकतेच मेले असल्याकारणानें ती दुःखानें व्याप्त झाली आहे. तिची यावेळीं माहेरीं रहावयाची इच्छा होती. पण माझ्या अडचणीमुळें मी तिला घेऊन जात आहे यामुळें ती कष्टी आहे. सासुसासऱ्याच्या मरणा-

बद्दल त्यांच्या पुत्रांना ह्मणजे माझ्या मेहुण्यांना दुखवटा देण्यासाठीं मी मुद्दाम स्वतः सासुरवाडीस गेलों होतों; आणि परत जातांना आपलें कुटुंब बरोबर आणावयाचें हा माझा मुख्य उद्देश होता. वाटेनें आमच्यावर चोर-टयांनीं हल्ला करून आमचें एक तट्टू पळविलें. त्यांच्या कचाटयांतून मी बायकोसह बचावलों; पण घोडें एकच राहिल्यामुळें आह्मी एकाच घोडयावर प्रवास चालविला आहे. येथून माझें नगर बरेंच लांब आहे; पण या जालंधर देशांतील स्वर्गद्वार नांवाच्या पाहडावरील अपर्णेश्वर हें आमचें कुलदैवत असल्यानें मी पत्नीसह त्याच्या दर्शनास जाऊन मग स्वगृहीं जाणार आहे. ”

अशी हकीगत सांगून त्यानें लागलीच येथून जाण्याची तयारी केली. तो क्षणभरही जास्त येथें राहीना. मजजवळून फळफळावळ विकत घेऊन तो लागलीच त्या तरुणीसमवेत वारूवर स्वार झाला. त्या बरोबर ती स्त्री मोठ्या आशेनें आमच्याकडे पाहूं लागली. तिच्या मनांत आह्मांला कांहीं सांगावयाचें होतें; पण त्याच्या दराऱ्यानें ती बोलण्यास भीत होती. तो स्वमुखानें आपली हकीगत सांगत असतांना ती एकसारखी अश्रुपात करीत होती. त्यावेळीं तिनें सांकेतिक रीतीनें जी हालचाल दर्शविली त्यावरून त्याची सर्व हकी-कत खोटी असावी; ती त्याची पत्नी नसावी असें अनुमान निघतें. शेवटीं त्या मनुष्यानें घोड्याला टाच लावली तेव्हां त्या स्त्रीनें चाणाक्षपणानें एक हातरुमाल हलकेंच खालीं सोडून दिला. तो त्या स्वाराच्या ध्यानांत आला नाहीं. त्यांच्या जाण्याच्या घाईंत तें फडकें पडलें असें समजून मीं तें उचललें व त्यांना हाक मारणार तोंच त्यांचा घोडा भरधाव गतीनें बहुत दूर गेलेला दिसला. त्यानें येथून अति त्वरित निघून जावें ह्मणून आपलें तट्टू चौखुरी उडविलें; पण ती अति वेगपूर्ण गती आमच्या उपयोगी पडली असें आतां तरी निदान ह्मणणें भाग आहे. तो रुमाल सहजासहजी पडला नसून तो त्या स्त्रीनें मुद्दामच टाकला असावा असें अनुमान होतें. त्या रुमालावर कांहीं अक्षरें विणलेलीं आहेत व तीं सुबोधही आहेत; पण त्यावरून आह्मास ओळख पटण्यासारखा कांहीं बोध होत नाहीं. ”

हा मजकूर समजतांच सर्वांनीं तो रुमाल पाहण्याची इच्छा दर्शविली. बोलतां बोलतां रात्र बरीच झाली होती तरी त्यांतून कोणीही आळस किंवा कंटाळा दर्शविला नाहीं. सर्वांची उत्सुकता पाहून व आपण स्वतः उत्सुक

होऊन त्या घरधन्यानें तो नकशीदार रुमाल आणून मंडळीपुढें टाकला. त्यावर **भारतीशिष्य प्रिया माधवीग्रस्त**+ + +अशीं अक्षरें स्पष्टपण विणलेलीं होतीं. ती पाहतांच भय्या त्यांचा अर्थ जमवूं लागला. सर्वजणच त्या अक्षरांचे निरनिराळे शब्द बनवून त्यांतून अर्थ काढूं लागले. अखेर ईश्वराच्या कृपेनें भय्यालाच त्यांतील बरोबर अर्थ कळून तो ह्मणाला, "ही स्त्री हजार वाटेनें राजकन्या प्रमिलाच असावी असा निष्कर्ष निघतो. हा 'भारती-शिष्य' कोण तें त्याचें त्याला ठाऊक पण 'माधवीग्रस्त' या शब्दावरून मात्र प्रमिलेच्या नांवाचाच बोध होत आहे" असें बोलून भय्यानें त्या मंडळींना प्रमिला, माधवी, चंद्रहार यांचें प्रकरण सांगून प्रमिलेचें सटवाईच्या देवालयांत येण्याचें मुख्य कारणही त्याला समजलें होतें तसें सांगून टाकलें. मंड-ळींना देखील भय्याचें भाषण सार्थ व संभवनीय वाटलें. त्यांनीं त्याच्याशीं बरीच वाटाघाट करण्यांत सबंध रात्र घालविली. घरधनी व त्याचे सर्व दोस्त यांचा एक विचार होऊन त्यांनीं भय्याला शक्य ती मदत करावयाचें ठरविलें. दुसरा दिवस तेथेंच विश्रांतींत काढून भय्या अवश्य ती सामग्री बरोबर घेऊन एका माहितगार वाटाड्यासह अपर्णेश्वराला जाण्याकरतां नवीन मित्रमंडळींचा निरोप घेऊन स्वर्गद्वार पहाडाच्या पायथ्याकडे चालता झाला.

---

## प्रकरण २८ वें.

### उहापोह.



मिला आपल्या दासदासीसह चोरून जशी देवळांत गेली तशी ती परत आली असती म्हणजे तिच्या त्या गुप्त प्रवासाचा बोभाटा झालाच असता असें नाहीं. पण ती परत आली नाहीं असें पाहतांच तिच्या इतर दासी बाव-रल्या. त्यांना प्रमिला मंदिरांतून कांहीं गुप्त कामासाठीं कोठेंतरी गेली आहे इतकेंच ठाऊक होतें. तिनें त्यांना आपला गुप्तहेतु किंवा योजलेलें स्थळ कळविलें नव्हतें. आपण आपलें कार्य उरकून दुसऱ्या दिवशीं परत येऊं आणि नंतर सर्व हकीकत उघडपणें सर्वांनाच कळवूं असें

तिनें आपल्या दासींना जातांना सांगून ठेविलें होतें. आपलें हें रात्रीचें गुप्त मार्गक्रमण अगदीं गुप्त राखण्याविषयींही तिनें जवळच्या सर्व सेवकांना बजाविलें होतें. पण सकाळ होऊन बराच दिवस वर आला तरी ती किंवा दासदासी परत आली नाहीं तेव्हां मंदिरांतील दासी चिंतेंत पडल्या. जेवणाखाणाची वेळ होईपर्यंत ही गोष्ट कशीतरी निभावली; पण दुपारच्याप्रहरीं राजकन्या नेहमींप्रमाणें राजवाड्यांत गेली नाहीं तेव्हां अर्थातच तिच्या शोधार्थ वाड्यांतून शिपाई आला. राजवाड्यांतील मंडळींना तिच्या प्रकृती-अस्वास्थ्यावांचून अद्यापतरी अन्य शंका येण्याचें कारण नव्हतें. पण राजदूत मंदिरांत दाखल होतांच त्याला दासींकडून सर्व हकीगत समजली. तो जेव्हां परत गेला आणि प्रमिलेचें अंतर्धान विदित झालें तेव्हां राजपरिवारांत मोठीच गडबड उडाली. राजानें मंदिरांतील सर्व चाकरमाणसें बोलावून नेलीं आणि त्यांना प्रमिलेची हवाल विचारली. राजपुत्र धर्मध्वज व भोगपाल यांनीं तर त्या भृत्यगणांना खोदखोदून प्रश्न विचारले, पण मुळांतच जेथें कांहीं जास्त माहिती नव्हती तेथून निष्पन्न काय होणार ? तिच्याबरोबर जो सेवक व दासी गेली होती त्यांतून कोणीही लबाड किंवा गैर चालीचें नाहीं याबद्दल राजपुत्रासह सर्वांची खात्री होती. कांहीं झालें तरी प्रमिलेचा तपास लागलाच पाहिजे असें राजपुत्रानें जोरदार उद्गार काढले. आपल्या अविवाहित स्थितीला कंटाळून निराशेनें त्या प्रौढ कन्येनें आत्मघात करून घेतला असावा अशी कल्पना मोहसंवानें काढली. प्रमिलेच्या या बाबतींत मोहसंवाचें अंग नव्हतें हें खरें ! तरी पण त्याच्या मनांत प्रमिला कामसेनाला मिळवून द्यावी असें होतेंच. आपण परस्परच तिचा शोध लावूं आणि गुपचुपपणें तिला कामसेनाच्या हवालीं करूं असा त्याचा मतलब होता. राजपुत्र धर्मध्वज किंवा भोगपाल यांतून जर कोणी प्रतिज्ञेनें बाहेर पडतील तर ते तिचा खास तपास लावून तिला राजवाड्यांत परत आणतील आणि मग तिला परस्पर पळविण्याचा आपला डाव हुकेल अशा भावनेमुळें त्यांतून कोणीही तिच्या शोधाबद्दल विशेष खटपट करण्याला सरसावूं नये ही गोष्ट त्याला इष्ट वाटत होती. या मतलबानेंच तो तिच्या आत्महत्येबद्दल बोलला. राजा व दमन यांनीं भलताच हट्ट सोडून देऊन तिला जर कामसेनाला दिली असती तर आजचा प्रसंग संभवनीयच नव्हता असें ठासून बोलून तो राजा व

पुरोहित यांनाच दोषी ठरवूं लागला. तो भलताच दोष सहन न होऊन राजपुत्र धर्मध्वज दिमाखदारपणानें ह्मणाला, "मोहसंघाचें हें भाषण कवडी किमतीचें आहे. वस्तुत: प्रमिला आपलें कुल जाणणारी आहे. ती शीलसंपन्न आहे. तिच्या हातून असला अविचार होणार नाहीं. खेरीज तिनें आपल्याबरोबर ज्या अर्थी दासदासी यांना घेतलें आहे त्याअर्थी तिचा तसा कांहीं भलता विचार नसावा हें स्पष्टच होत आहे. याहीउप्पर मनोवृत्तीच्या असह्य वेदनांनीं तिला अविचारप्रवृत्त केलें असेल असें धरून चाललें तरी त्यांत राजा किंवा राजपुरोहित यांच्यावर दोष लागूं होत नाहीं. त्यांनीं योग्य तेंच केलें आहे. त्याबद्दलच्या दोषास तिची तीच जबाबदार होय. एखाद्या क्षुधार्ताला धर्मानें अग्राह्य अशा वस्तूची प्राप्ती न होण्यामुळें जर त्यानें अविचारप्रवृत्त होऊन चोरीचा गुन्हा केला आणि आपली क्षुधाशांति केली तर त्या चोरीबद्दलची शिक्षा त्याची त्यालाच भोगली पाहिजे. धर्मबाह्य पदार्थसेवनाची आडकाठी करणारास त्या चोरीबद्दल जबाबदार धरण्यांत जितका शहाणपणा आहे त्याहून जास्त शहाणपणा मोहसंघानें केलेल्या दोषारोपांत नाहीं. पण याची जास्त वाटावाट करण्याचें प्रयोजन नाहीं. कारण राजकन्येनें तसा विपरीत विचार स्वीकारला असेल असें अनुमान करण्यास जागाच नाहीं. याउप्परही मोहसंघ हे तिच्या आत्मघातास च पुष्टी देऊन खात्री देत असतील तर त्यामध्यें त्यांचें अंग असलें पाहिजे निदान त्यांना ती गोष्ट ज्ञात तरी असावयास पाहिजे अशी कोणी शंका घेतली तर ती योग्यच होईल !"

राजपुत्राच्या या भाषणानें मोहसंघाच्या नाकाला मिरच्या लागल्या. तो क्रोधयुक्त होऊन बोलला, "राजपुत्रा, तूं आपली जिव्हा हवी तशी स्वैर सोडूं नको. आपल्या बहिणीच्या बाबतींत तूं वाटेल त्या कल्पना कर; राजा व पुरोहित यांनीं राजकन्येचें हवें तें करावें. तिच्या नशिबीं असेल तसें होईल !

पण तूं जर माझ्याच माथ्यावर भलभलते आरोप लादूं पाहशील तर त्याचा परिणाम भलताच होईल. मला जें योग्य दिसलें तें मी बोललों. तुह्मांला तें न रुचेल तर टाकून द्या आणि प्रमिला जीवंत आहे असें मानून खुशाल तुह्मीही तिच्यामागें जीव देण्यास जा. त्याला माझी किंवा कोणाचीही हरकत येण्याचा संभव नाहीं."

मोहसंवाचें कोपयुक्त भाषण ऐकून राजपुत्र डरला नाहीं. तो बाणेदारपणानें बोलला, " दादा ! यांत तुह्मांला राग येण्यासारखें काय आहे ? तर्कशास्त्र लढविलें तर तुमच्यावर तसा आरोप लागू होण्यासारखा आहे असें मी पुन्हां ह्मणतों. तुह्मी असा त्रागा करूं नका. प्रमिलेचा शोध लावणें हें तुमचेंही कर्तव्यच नाहीं काय ? तिच्या तपासाप्रीत्यर्थ कोणाचे जीव जावयाचे आहेत हें भविष्यवाद्यास किंवा ईश्वरास ठाऊक. तुह्मी ईश्वर खास नाहीं. राजकन्येविषयींचे कर्तव्यबंध ध्यानांत घेतले तर तिच्या शोधार्थ हिंडतांना आमच्याबरोबर आधीं किंवा मागाहून तुमचा जीव जाणेंही इष्टच होईल. आतां तुमच्या अनुज्ञेचा झोंक पाहिला ह्मणजे पुन्हा देखील तर्कशास्त्र तुह्मांलाच त्या आरोपांत गुंतविण्यास प्रवृत्त होऊं पाहतें याचा कांहीं विचार पहा ! "

राजपुत्र आपल्याला सारखा अडवीत आहे व त्याचें मन आपल्या भाषणानें भलत्याच संशयानें ग्रस्त झालें आहेसें पाहून मोहसंवानें भाषणाचा ओघ किंचित् पालटला आणि आपला अनिवार संताप दाबून ठेवून तो ह्मणाला, " प्रमिलेविषयींच्या कर्तव्यानें आह्मांला बद्ध करावयाचें कांहीं अवघड नाहीं. आतां तर तो बंध विशेष उपयोगी पाडण्यासारखा आहे. पण आह्मी जेव्हां कामसेनाची तरफदारी केली त्यावेळीं हा कर्तव्यबंध कोणीच जुमानला नाहीं. प्रमिलेवर जर आमची कांहींच सत्ता नाहीं तर तिच्या संबंधानें कोणताही कर्तव्यबंध आमच्यावर लागूच करतां येत नाहीं हें तुम्हां शहाण्यांना कां समजूं नये ? "

मोहसंवाची मर्जी मोडली असल्यामुळें तो नाराज झाला आहे असें राजपुत्रानें तेव्हांच जाणलें. पण त्याच्या भाषणांत नुसतें हिरमोडजन्य औदासीन्य नसून तो जरा कुत्सित व अपायकारक अर्थानें व्यापृत आहे असें ताडून राजपुत्र पुन्हां सणसणीतपणानें बोलला, " दादा ! मनुष्याला राग येणें हा मनुष्यस्वभावच आहे. मनाचा हेतु पूर्ण झाला नाहीं ह्मणजे क्रोध हाच त्याचा परिणाम होय ! पण क्रोधवश होण्याला मर्यादा आहे. बापानें मुलाला त्याचें इच्छित दिलें नाहीं तर मुलानें रागवूं नये; पण सामान्य वृत्तीस अनुसरून तो क्षोभवश झाला तरी त्या क्षुब्धतेचा शेवट पितृघातांत होणें केव्हांही अत्यंत नीचपणाचें होय ! मग पुत्राचें ईप्सित शुद्धाशुद्ध असो आणि बापाचा नकार योग्यायोग्य असो ! दादा ! तुमची राजकन्येवर

सत्ता आहे. तिचें कल्याण पाहणें हें तुमचें कर्तव्य आहे. या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी राजा व पुरोहित यांच्याहून तुमचा अधिकार मोठा नाहीं हें तुह्मी विसरत आहां ! आपण बुद्धिवान् असाल, ज्ञानी असाल, विद्वान् असाल, पराक्रमी असाल पण राजा वसुप्रसाद व राजपुरोहित दमन यांच्या मानानें तुमचा अनुभव किती कोता आहे हें तुह्मी ध्यानांत घेतलें पाहिजे. राजकन्येचें कल्याण राजा व पुरोहित यांना तुमच्यापेक्षां जास्त समजतें हें तुह्मी मानत नाहीं म्हणून तुमच्या मनाची धांदल उडालेली दिसते. कामसेन तुमचा अत्यंत स्नेही असेल; सरदार जयसिंग हा महान् बलाढ्य असेल; पण विवाहाची बाब अत्यंत नाजुक व मननीय आहे. तो धर्मशास्त्राचा प्रश्न आहे. धर्मशास्त्र ऐकावयास सोपें आहे, वाचावयास सुलभ आहे; त्याची टर करावयास भोळसर आहे व त्याच्या अनुज्ञांवर ताशेरा उडविण्यास तें साधें आहे; पण त्याचा मतितार्थ जाणणें आणि त्याची सर्व मानवजातीच्या अत्यंत कल्याणाची जाणीव ध्यानांत येणें या गोष्टी सौख्यलोलुप विद्वत्ता आणि विषयपर पंडितपणा यांच्या आंवाक्या बाहेरच्या आहेत हें तुह्मी जाणत नाहीं. दमनपुरोहितासारख्या विभूतींनाच त्या धर्मशास्त्राचें मनोगत आकलन होणें शक्य आहे. या दृष्टीनें तुमची पात्रता विशेष नाहीं. असल्या कामांत तुमच्या आमच्यासारख्यांनीं आपापले विचार कळविणें एवढेंच आपलें काम आहे. आपलें मत ग्राह्य ठरलें तरी किंवा न ठरलें तरी गुरुजनांच्या आज्ञेस वंद्य मानणें हेंच आपलें कर्तव्य होय. स्वमताचा वृथा अभिमान धरून त्याला मान न देणाऱ्यांना शत्रुवत् लेखणें किंवा त्यांच्या नाशास प्रवृत्त होणें हा नीचपणा होय ! आपली मर्जी असेल तसें करा; राजकन्येचा शोध लावणें; ती मेली असल्यास तिच्याबद्दल कींव करणें, जिवंत असल्यास तिचें संरक्षण करणें हें आपलें व आमचें काम आहे. कोणताही धोका सोसून आह्मी आमचें कर्तव्य बजावण्यास तत्पर आहों. ”

राजपुत्राच्या या भाषणानें मोहसंघ चुप राहिला. बाकीच्या मंडळींना कौतुक वाटलें. राजाराणी यांना धीर आला. दमनपुरोहितांना प्रेमानें गहिंवर आला. ते ह्मणाले, “ राजकन्येचा शोध लावणें ही गोष्ट इष्ट आहे. व भोगपाल किंवा राजपुत्र धर्मध्वज यांसारखे वीर त्याप्रीत्यर्थ बाहेर पडले तर निराश होऊन परत येतील अशांतला भाग नाहीं. पण तिच्या शोधाला सोपेपणा यावा व दिशा कळावी एतदर्थ त्यासंबंधानें देवळांतील गोसावी-

बोवासच तो प्रश्न विचारावा. त्यांचा शिष्य नित्यंक यासच अखेर राजकन्या द्यावयाची असें आपण त्यांना स्पष्ट कळवावें. राजकन्येला नित्यंकाचे सद्गुण वर्णन, कुलशील, सत्वसंपन्नता, कळल्यापासून तिचें चित्त त्याच्या चरणीं वेधलेलें आहे. एवढेंच काय पण राजाज्ञा ह्मणजेच पित्राज्ञा शिरसा मान्य करून तिनें त्या शिष्य नित्यंकाला मनानें वरिलेंही आहे. हा वृत्तांत कर्णोपकर्णी गोसावीबोवा व त्यांचा शिष्य यांच्या कानावर गेलेला आहे. पण आपण आतां त्यांच्याकडे जाऊन किंवा त्यांना येथें आणून सर्व संदिग्धपणा काढून टाकावा. गोसावीबोवा आपल्या सामर्थ्यानें राजकन्ये-विषयीं जो तपास कळवितील त्यास अनुसरून राजपुत्र, भोगपाल आणि त्यांच्या जोडीला शिष्य नित्यंक या त्रिवर्गांनीं राजकन्येच्या शोधास बाहेर पडावें. मोहसंघाला तिच्या कौमार्य स्थितीबद्दल खिन्नता वाटून जे विचार सुचले व ज्यामुळें तो राजेसाहेब व त्यांचा पुरोहित मी दमन यांना तो भलतींच दूषणें देण्यास सिद्ध होऊन त्यांच्याविषयीं इतर आप्तवर्गाचें मन कलुषित करण्याचा यत्न करूं लागला. ते त्याचे विचार विचारणीय नाहींत व आपल्या कौमार्यस्थितीला कंटाळून केवळ धर्माज्ञा, पित्राज्ञा, शास्त्राज्ञा यांचा सत्कार करण्याकरतां त्या कुलवंत राजकन्येनें आत्महत्या केली असेल ही शंका मानण्याचें प्रयोजन नाहीं हें उघड होण्यासाठींच मी हा नित्यंक-प्रमिलेचा विवाहसंबंध धडधडीतपणें बोलून दाखविला. राजकन्या जिवंत असून तिला कोणींतरी चांडाळकर्मी दुष्टानें संकटांत पाडलें असावेंसं वाटतें. मग गोसावीबोवा काय सांगतील तें खरें ! ''

दमनाची ही सूचना सर्वांनाच मान्य झाली. गोसावीबोवाकडे भोगपालानें जावें असें ठरलें. त्याकरतां दुसरा दिवस कायम केला. पुरोहितांच्या उघड भाषणानें मोहसंघाला प्रमिला व शिष्य नित्यंक यांचा संबंध कळला. त्याला आपल्या शांभवीनें आधींच घेरलेला आहे आणि त्याच्या गुरुजीलाही शांभ-वीनें आपल्या आटोक्यांत आणलेला आहे, तेव्हां आपण तो राजकन्येचा विवाह मोडून टाकूं; शिष्य नित्यंक व गोसावीबोवा यांच्याकडून तो विवाह अमान्य करवूं; गोसाव्याच्या सहाय्यानें धर्मध्वजाला जगांतून उठवूं आणि नित्यंकाच्या मदतीनें राजकन्येला फशी पाडून अखेर तिला कामसेनाच्याच हातांत देऊं अशा विचारांनीं मोहसंघ थोडासा आनंदितच झाला. गोसावी व शिष्य यांनीं शांभवीला जें वचन दिलेलें आहे तें पुरविण्याच्या हेतूनेंच त्यांनीं

राजपुत्र व प्रमिला यांच्यावर हा पाश टाकला असावा अशीही कल्पना त्याच्या मनांत वावरूं लागली. प्रमिला कशासाठीं घरांतून चोरून बाहेर पडली व ती कोठें गेली हें जरी अद्याप नक्की समजलें नाहीं तरी तिच्यावर कांहीं तरी अकस्मिक प्रसंग गुदरला असावा आणि त्याचा मुख्य मुळवा मोहसंघ व कामसेन यांच्याजवळ असावा अशी मात्र सर्वत्रांची बालंबाल खात्री झाली.

---

## प्रकरण २९ वें.

### विवाहसंकल्प.



दुसऱ्या दिवशीं सटवाईच्या देवळांत जाण्यासाठीं भोगपालानें यथास्थित तयारी केली. बोवाजींना तेथेंच प्रश्न विचारण्यापेक्षां राजवाड्यांत आणून मगच कायती वाटावाट करणें बरें असें वाटून तो त्याला आणण्यासाठीं आवश्य त्या वाहनाच्या तयारीनेंच जाण्यासाठीं सिद्ध झाला. पण त्या सर्वांच्याच सुदैवानें भोगपालाची तेवढी यातायात देखील अनवश्यक झाली. कारण तो निघण्याच्या अगदीं ऐन वेळेला गोसावीबोवा आपल्या शिष्यासह राजधानींत येऊन राजवाड्याच्या दरवाजाशीं दाखल झाले.

तो सुयोग पाहून राजाला बहुत आनंद झाला. त्यानें बोवाजींचें स्वागत केलें. शिष्य नित्यंक याच्याकडे जांवई या दृष्टीनें पाहतां इंदुमतीस फार संतोष झाला. बोवाजी व राजमंडळ यांचें साभ्यास्ती भाषण होऊन कुशल प्रश्न झाले. बोवाजींनीं देवीच्या देवळाचा त्याग केला त्या वेळेपासून ते राजवाड्यांत येईपर्यंतचा सर्व मजकूर त्यांनीं साधारणतः व्यक्त केला. त्यांची योग्य ती तजवीज लावून त्यांना कोठें ठेवावेत याविषयीं राजा वाटावाट करूं लागला. सर्वांच्या विचारें त्यांना प्रमिलाबागेंत ठेवावें असें ठरलें. बोवांनींही ती आरामकारक जागा पसंत केली. बोवांनीं दुसऱ्या दिवशीं बागेंत जावयाचें असें ठरलें.

त्यांची सर्व बरदास्त ठेवण्याबद्दलची जबाबदारी मोहसंघानें आपण होऊन आपल्या शिरावर घेतली. त्यांतही त्याचा डाव होता. पण त्याबद्दल इतक्या सूक्ष्मतऱ्हेनें त्या वेळीं कोणीं विचार केला नाहीं. प्रमिला नाहींशी झालेली असल्यामुळें बागेंतील मंदिर आतां आयतेंच रिकामें झालेलें होतें. मोहसंघ व शांभवी यांनींही बोवासंगतीं बागेंतच रहावयास जाण्याचें ठरविलें. यांतही कांहीं विशेष हेतु होताच ! पण शांभवी व मोहसंघ यांची बोवाजीशीं मूळची दोस्ती होती आणि त्यांच्यामुळेंच बोवाशीं आपली सलगी झाली हें जाणून कोणींही मोहसंघ व शांभवी यांच्या हेतूविषयीं भलता ग्रह करून घेतला नाहीं.

चार सहा घटका रात्र होईपर्यंत बोवाजवळ कोणीही प्रमिलेची गोष्ट काढली नाहीं. जो तो त्याबद्दल उत्सुक होताच. पण बोवांचें जेवणखाण उरकून ते स्वस्थ व शांत होईपर्यंत त्यांना ताप देणें कोणालाच प्रशस्त वाटलें नाहीं. नित्याप्रमाणें सर्व व्यवहार उरकून वाड्यामध्यें बहुतेक सामसूम झालें तेव्हां राजा, राजपुत्र, पुरोहित, भोगपाल वगैरे मंडळी गोसाव्याशीं गप्पा मारीत बसली. शिष्य नित्यंकही बोवासांन्निधच होता. पुरोहित व राजपुत्र यांनीं बोलण्यास आरंभ केला. त्यांनीं त्याला राजकन्येची सर्व हकीगत विदित केली आणि तिच्या तपासाविषयीं कांहीं प्रश्न पाहण्याबद्दल त्यांनीं त्याला विनविलें. भोगपालानें आपण त्यांना आणण्यासाठीं अगदीं तयार झालों होतों हें कळवून त्यांनीं चंद्रहार सांपडून दिल्याबद्दल त्याची फारच स्तुति केली आणि प्रमिलेच्या बाबतींतही तशी कृपा करण्याबद्दल विनविलें. राणि इंदुमती कन्याविरहाबद्दल डोळ्यांत आंसवें आणून, आड बाजूला बसून, नाक वर ओढून सुस्कारे टाकीत होती. राजा व पुरोहित या दोघांनीं मिळून बोवाजीपुढें हात जोडून सांगितलें, " आपण सर्व जाणणारेच आहां. आमच्या मनांत प्रमिलेबद्दलचा काय विचार असावा हेंही आपण सहजच ओळखलें असेल. निदान जनवार्तेंतून तरी आपल्याला कांहीं कुणकुण लागली असेलच. कसेंही असलें तरी आह्मी आतां आपणास स्पष्टच सांगतों कीं, प्रमिलेचा शोध सांगणें ह्मणजे माझ्या कन्येचा शोध सांगणें असें ह्मणण्यापेक्षां आपण आपल्याच स्नुषेचा शोध लावणें होय. कारण आमचा सर्व विचार होऊन आह्मीं आपला शिष्य नित्यंक यास राजकन्या दान केली आहे. एवढेंच नव्हे तर या शिष्याचें कुल-शील-सत्व-सद्गुण ध्यानांत घेऊन आमच्या अनुज्ञेनें प्रमिलेनें आपल्या मनानें शिष्य नित्यंकास माळ

घातली आहे. आतां लोकोपचारास अनुसरून सर्व सोहळाच काय तो प्रत्यक्ष व्हावयाचा राहिला आहे. आपण प्रमिलेबद्दल जो शोध सांगाल त्यास अनुसरून राजपुत्र व भोगपाल हे तिच्या शोधासाठीं जावयास तयार झालेले आहेत. शिष्य नित्यंकानें प्रमिलेच्या शोधार्थ बाहेर पडावें कीं न पडावें हा आतां प्रश्नच राहिला नाहीं."

हें भाषण चाललें असतां नित्यंकाचे कान त्याच्याकडे होते. पण त्याचें मन मात्र धर्मध्वजाच्या गुणांकडे व चरणाकडे वेधलें होतें. त्याचे नेत्र सवड साधेल त्याप्रमाणें राजपुत्राचें मुख न्याहाळीत होतें. दमनपुरोहितांच्या ध्यानांत तो प्रकार आला होता. पण त्यांना त्यांतील सत्य अर्थ समजला नाहीं. त्यांना वाटलें कीं, प्रमिलेच्या स्वीकाराविषयींच्या विचारांतच मग्न होऊन तो नित्यंक राजपुत्राचें मत समजण्यासाठीं आतुर झाला असावा. या कल्पनेप्रमाणें पुरोहित नित्यंकास ह्मणाले, "राजपुत्र धर्मध्वजानें आपणाला मेहुणा या नात्यानें पसंत केलें आहे. आपलें कल्याण करणें हेंच राजपुत्राचें अनेकांपैकीं एक कर्तव्य होऊन राहिलें आहे. आपण एकदां आपल्या मुखानें प्रमिलेचा स्वीकार केल्याचे उद्गार काढा ह्मणजे आह्मी कृतकृत्य झालों."

यावर उत्तर काय करावें याविषयीं नित्यंक विचारांत पडला. पण आपल्या विचारांचे सार काढण्याकरतां विचारमंथनाच्या भानगडींत न पडतां त्यानें आपल्याबद्दलची सर्व मुखत्यारी गोसावीबोवावर टाकली. तेव्हां अर्थातच त्याच्या सालसपणाची व पोक्त, सभ्य, धर्मपर वृत्तीची वाहवा होऊन राजा व पुरोहित यांनीं बोवाजीपुढें पुन्हां हात जोडले. गोसावीबोवांनीं कांहीं वेळ अगदीं स्तब्धता धारण करून बोलावयास आरंभ केला, "राजकन्या प्रमिला हिची काय अवस्था झाली असावी हें नक्की सांगण्यास चंद्रहारापेक्षां बराच जास्त काळ लागेल. पण अखेर तिचा शोध लागेल हें खचीत आहे असें मी आतांच सांगूं शकतों. आतां तिच्या व नित्यंकाच्या विवाहाबद्दल आज वाटाघाट करणें अवश्य दिसत नसल्यावरून तो प्रश्न मुळींच सोडून द्यावा असें मी ह्मणतों. राजकन्येचा पत्ता नाहीं आणि तिच्या लग्नाचा निश्चय करण्याची घाई करणें हें जरा कसेंसेंच नव्हे का?"

या प्रश्नावर धर्मध्वजानें सांगितलें, "सांप्रतच्या स्थितींत तसा निश्चय ठरविणें अप्रशस्त वाटण्यासारखें आहे. पण आपणच ज्या अर्थी प्रमिला सांपडेल असें आज भविष्य वर्तवितां त्याअर्थीं तिचा विवाहनिर्धार करून

ठेवणेंही प्रशस्तच होय ! ती जिवंत असावी अशी आमची मनोदेवता आह्मांस सांगते ! आणि आपल्याही भाषणावरून ती जिवंत आहे अशी खात्री होते. मग आपल्यासारख्याच्या आशीर्वादानें आह्मी प्रमिलेला काळाच्या दाढेंतूनही ओढून सुरक्षित आणू यांत संशयच नाहीं. खेरीज मी तर असें ह्मणतों की, आपल्या रुकारावर आतां प्रमिलेची पतिपसंती अवलंबून नाहीं. तिनें मनानें नित्यंकाला वरलेंच आहे. नित्यंकावांचून अन्य पुरुष तिच्या दृष्टीनें बंधु पित्या-समानच होत. आपल्या रुकारावर आतां फक्त प्रमिलेचें सुखदुःख मात्र अव-लंबून आहे. कारण आपण तिचा स्वीकार केला नाहीं तर तिला पतिविरह-स्थितींत राहून या नित्यंकपतीच्या ध्यानांतच काळ कंठला पाहिजे. ती थोर कुलांतील कुलीन कन्यका आहे, ती सनातन धर्माच्या शुद्धतत्वांची दासी आहे. यासाठीं मी म्हणतों कीं, आपण आतां प्रमिलेची स्थिति ध्यानांत घेऊनच काय तें बोला. ”

राजपुत्राच्या या भाषणानें नित्यंक खुष झाला. त्याला असें वाटलें कीं, त्या बृहस्पतीतुल्य पांडित्य करणाऱ्या सद्गुणी व सुरूप राजपुत्राला कडकडून आलिंगन द्यावें. पण करणार काय ? पतकरलेल्या पेशास अनुसरून त्याला शिष्यास उचित अशा तऱ्हेनें आपली आतुरता दाबून टाकावी लागली. प्रत्यक्ष आलिंगनाचें सौख्य स्तुतिपर भाषणावरच भागवून घ्यावें असें योजून तो ह्मणाला, “ अहाहा ! या राजपुत्राचें भाषण किती गंभीर, उदात्त व प्रेमळ आहे बरें ? राजा वसुप्रसादावर परमेश्वराची कृपा आहे हेंच खरें. अशा बुद्धि-मान, सदाचारी व हिंमतबाज वीराची भगिनी जी राजकन्या प्रमिला तिचा स्वीकार करण्यास कोण नाकबूल होईल ? राजपुत्राच्या या सूचनेस कोण अमान्यता दर्शवील ? राजकन्येचा स्वीकार न केला असतां तिला ज्या जन्मभर कष्टतर यातना भोगाव्या लागतील त्यांची जाणीव धरणाऱ्या या राज-पुत्राच्या शब्दाचा अवमान करण्यास कोण सरसावेल ? सनातनधर्मीय, शुद्ध साध्वींचीं मनें व स्थिति यांची बरोबर कल्पना करणाऱ्या या राजपुत्राच्या गुणसौंदर्याचें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे. ”

नित्यंकांचीं स्तुतिपर वाक्यें कोठवर जातील याबद्दल थोडीशी भीति वाटून गोसाव्यानें त्याला गप्प बसण्याची हळूच खूण केली ह्मणून त्यानें आपलें बोलणें थांबविलें. व मग गोसावीबोवा ह्मणाले, “ हा नित्यंक क्षत्रियकुलोत्पन्न असून गुण, रूप, आचार यांनीं कसा आहे हें तुह्मी जाणतांच. कारण

एके प्रसंगीं मीं याचा सर्व इतिहास तुम्हांस समजावून दिला आहे. हा दुर्दैवी आहे. सांप्रत हा अतिशय दुःस्थितींत आहे. असें असून आपण सर्वत्रांनीं थोर विचारानें राजकन्या त्याला अर्पण केली आहे व तिनेंही त्याला मनानें वरलें आहे तर तोहि तिला आतांपासून विहितपत्नीच मानील यांत संशय नाहीं. पुढें या वधुवरांचा भाग्यकाल प्राप्त होऊन प्रत्यक्ष सर्व विवाहसंस्कार होण्याचा काळ येईल तो शुभदिनच होय. आतां माझी गोसाव्याची आपणांस हात जोडून अशी एक मागणी आहे कीं, याच प्रसंगीं या राजपुत्र धर्मध्वजाचाही लग्ननिश्चय कायम व्हावा."

ही सूचना ऐकतांच सर्वजण एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. गोसावीबोवा सर्वसंगपरित्याग करून वैराग्यपर बनले असून त्यांच्याजवळ दानयोग्य कन्यका असण्याचा संभव कसा याबद्दल सर्वच साशंक झाले. गोसावीबोवांचा कोणी स्नेहीसोबती राजकुलांतील असेल आणि त्याच्या कन्येसाठींच त्यांनीं ती सूचना केली असावी असा तर्क करून राजा बोलला, "राजपुत्राचा विवाह करण्याचा आमचा विचार ठरलाच होता. कित्येक योग्य व सुस्वरूप राजकन्यांच्या तजविराही आह्मांकडे आल्या होत्या; पण राजपुत्राला कन्येच्या सौंदर्यापेक्षां सद्गुणाचीच जास्त थोरवी वाटते असें त्याच्या त्यावेळच्या उद्गारावरून स्पष्ट झालें होतें. तेव्हां सद्गुणसंपन्न, शीलवान् व कुलज अशी कन्या शोधण्याच्याच नादांत आह्मी आहों. राजपुत्राला राज्याभिषेक करून आपण स्वतः उपाधीरहित व्हावें असेंच आमच्या मनांत होतें; पण तो योग लवकर जमेलसें दिसत नाहीं !"

यावर गोसाव्यानें विचारलें, "कां बरें ? त्या योगाला अशी विशेष हरकत काय आहे ? राजपुत्राच्या लग्नासंबंधीं विचार आपल्या व पुरोहितांच्या थोरवीस अनुसरून आहेत हें मोठें भूषण होय ! कन्येच्या लावण्यापेक्षां तिचे सत्वयुक्त सद्गुणच स्तुत्य होत. सती सावित्री, द्रौपदी, जानकी, तारामती इत्यादि आजपर्यंत होऊन गेलेल्या स्त्रिया सौंदर्यखनी होत्या हें खरें असलें तरी आज सर्व जगाच्या कानांत त्यांची कीर्ति गुणगुणत आहे, सर्व जगाच्या जिव्हाग्रावर त्यांचें पवित्र नांव खेळत आहे याचें कारण त्यांचें सौंदर्य नसून त्यांचें अस्सल, उज्वल, धर्ममान्य सद्गुण हेंच होय ! आईबापांनीं, सासुसासऱ्यांनीं किंवा पतीनीं कन्या, स्नुषा किंवा पत्नी यांच्या सुरूपतेपेक्षां सद्गुण व सदाचारसंपन्नता यांचेंच कौतुक करणें योग्य होय ! तशा

उज्ज्वल गुणांनीं संपन्न, कुलजवर अशी कन्यका प्राप्त होण्याचा पूर्ण संभव असेल तर मग राजपुत्राच्या विवाहोत्सवास अन्य कांहीं हरकत नाहींना ? "

या प्रश्नाला उत्तर मिळण्यापूर्वीं धर्मध्वज बाईनें ह्मणाला, " पितृज्ञा, गुर्वज्ञा, धर्माज्ञा या गोष्टी पाळणें हें कर्तव्यपर व कल्याणदायक आहे याविषयीं कोणताही सूज्ञ साशंक होणें शक्यच नाहीं. पण विवाहापूर्वीं सत्संगाची प्राप्ती करून घ्यावी असा माझा मनोनिर्धार झाला आहे. माझे परमपूज्य माता पिता व कुलपुरोहित यांनींही माझी ही विनंति मान्य केल्यासारखी आहे. माझ्यावर प्रसाद करणारे महाराज श्रीभारती यांचें दर्शन, सान्निध्य ह्मणजेच मी सत्संग समजतों. त्या महात्म्याची भेट होईपर्यंत अविवाहित राहणें बरें असें मला वाटतें. तेव्हां लग्ननिश्चय कायम करण्यापूर्वीं वडिलांनीं व तत् सदृश गुरुजनांनीं माझ्या या विनंतीला मान द्यावा अशी माझी हात जोडून प्रार्थना आहे. "

ही विनंति ऐकतांच शिष्य नित्यंक बराचसा कष्टी झाल्यासारखा दिसला. तो खालीं मान घालून बसला. व आतां गोसावी बावा काय भाषण करतात किंवा राजा व दमनपुरोहित काय उत्तर देतात हें ऐकण्यासाठीं घाबरा होऊन तो वरचेवर राजपुत्राच्या मुखकमलाकडे पाही. ही त्याची कृति व स्थिति लक्ष्यांत घेऊन सर्वजण साश्चर्यतेनें त्याच्याकडे पाहून विचार करीत आहेतसें दिसलें. तो प्रकार सूक्ष्मतेनें ध्यानांत आणून गोसावीबोवा ह्मणाले, " हा शिष्य नित्यंक म्हणजे तुमचा जामात व राजपुत्राचा मेहुणा असा म्लान कां दिसूं लागला याबद्दल तुह्माला थोडें आश्चर्य वाटण्याचा संभव आहे. पण त्याची ती स्थिति केवळ निराशाजन्य आहे. त्याला निराशेनें भय वाटण्याचें कारण असें आहे कीं, राजपुत्राकरतां ज्या कन्येचा आह्मी उल्लेख केला किंवा करणार आहों ती या नित्यंकाची जाते किंवा मामेबहीण होय. राजपुत्रासारख्या बहुगणसंपन्न वीरानें तिचा अंगिकार करणें ह्मणजे क्षीरसागर आणि सुरसरिता यांचाच संगम होय ! त्या मातापितारहित, कुलीन, सदाचारी, साध्वीव्रततत्पर कन्यकेनेंही आपला जीव राजपुत्र धर्म-ध्वजाच्या चरणींच वाहिलेला आहे. ह्मणजे शिष्य नित्यंकासंबंधीं प्रमिलेची व आपली भावना व ती कन्या आणि तिचे मातापिता गुरु यांची धर्मध्वजा-संबंधाची भावना यांत काडीचेंही अंतर नाहीं. तेव्हा आपल्या भगिनीचा राजपुत्राकडून स्वीकार होणार नाहीं तर तिची जन्मभर मोठी कष्टतर स्थिति

होईल हें लक्षांत येऊनच तो नियंक दुःखी दिसत आहे. पण वस्तुतः त्यानें निराश होण्याचें कारण नाहीं. ज्या औदार्यानें शिष्य नियंकानें पत्ता नसलेल्या राजकन्येचा स्वीकार करून तिला विहितपत्नीच्या पवित्र अधिकारारूढ केलें तशाच प्रकारचें औदार्य राजपुत्र धर्मध्वजानें वडिलांच्या अनुज्ञेनें दाखवावयाचें आहे ! त्यास कोणाचीही हरकत येईलसें दिसत नाहीं."

गोसाव्याच्या या आशापूर्ण सूचनेस मान्यता दर्शविण्यासाठीं राजा ह्मणाला, "आमची या कामीं मुळींच हरकत नाहीं. राजपुत्राची सत्संगाची इच्छाही अत्यंत पवित्रच. तेव्हां तिच्या आड मात्र आमच्यानें येववणार नाहीं. त्याचें मन वळलें तर आमची पूर्ण मान्यता आहे. पण हा आमचा जामात तर आपल्याबरोबर अनाथ स्थितींत हिंडत आहे. तेव्हां ज्या आतेबहिणीबद्दल त्याला इतकी कळकळ वाटते ती पोरकी कन्यका सध्यां कोणत्या स्थितींत आहे तें मात्र अद्याप कांहींच उघड झालेलें नाहीं."

राजाच्या भाषणास पुष्टी देण्याच्या हेतूनेंच पुरोहित बोलले, "त्या कन्यकेचें गुणवर्णन, वंश, कुल वगैरे सर्व गोष्टी मोघमच कळल्या आहेत; पण हा शरीरसंबंधाचा प्रश्न आहे, तेव्हां राजपुत्रानें पाणिग्रहणाची शपथ उच्चारण्यापूर्वींच आह्मांस त्या कन्येचें नांव, तिच्या मातापित्यांचें नांव, कुल, देश वगैरे कळणें इष्ट आहे असें वाटतं. हें माझें भाषण गैरवाजवी तर नाहींना ?"

पुरोहिताचा समंजसपणा ध्यानांत घेऊन गोसावी ह्मणाला, "आपण ह्मणतां या गोष्टी समजणें अत्यावश्य आहे. आपल्याला ती कन्या विशेष अज्ञातही नाहीं. कलिंगाधिप राजा सुबाहु, व जंबालवंशीय राजकन्या दाक्षायणी यांच्या पोटीं उत्पन्न झालेलें कन्यारत्न दीक्षादेवी हीच आपली सून होय ! कलिंगदेशांत आपलें जाणें नाहीं तरी आपण त्या देशाला अगदींच तोडून टाकलें असेल असें वाटत नाहीं."

हे शब्द ऐकतांच दमन पुरोहितांनीं सांगितलें, "आमच्या मूळपुरुषांचा देश तोच होय. आमच्या कित्येक पिढ्या इकडे झाल्या त्यामुळें आह्मी त्या भूमीस विसरल्यासारखे झालों आहों. क्वचित् प्रसंगीं मी त्या प्रदेशांतील आमच्या आदिदेवतेच्या दर्शनास जातों. एवढाच काय तो आतां संबंध राहिला आहे. राजा सुबाहु यास मी जाणतों. पण तो अकस्मात् मृत्युमुखीं पडला हें

माझ्या ऐकिवांत आहे. त्याला एक कन्या किंवा आणखी एखादा पुत्र आहे किंवा होता हें मला पक्कें स्मरतें. ''

पुरोहितांना बऱ्याच गोष्टींची स्मृति झाली याबद्दल गोसावी व नित्यंक यांना बरें वाटलें, पण पुरोहितांना त्या सर्व गोष्टी सर्वशः आठवतातसें दिसलें नाहीं. त्यामुळें गोसावी आपल्या शिष्याशीं कांहीं कुजबुज करून ह्मणाले, '' राजपुरोहितांच्या लक्ष्यांतून एक अगदीं मु... ष्ट कशी गेली हें आश्चर्य करण्यासारखें आहे. त्याच सुबाहूची कन्या दीक्षादेवी ही पुरोहितांनीं पाहिलेली आहे. त्यांना ती दीक्षादेवी पसंतही पडलेली आहे. इतकेंच नव्हे तर राजपुत्र धर्मध्वज आणि दीक्षादेवी यांचा जोडा जमविण्याच्या कामीं शक्य ती खटपट व मदत करण्याचें पुरोहितांनीं आश्वासनही एकेकाळीं दिलेलें आहे. ही आठवण फार जुनी आहे. त्यावेळीं दीक्षादेवीचे आईबाप हयात होते—'' याच्या पुढील मजकूर पूर्ण करण्यासाठीं त्याच भाषणाला जोडून नित्यंक ह्मणाला, '' त्यासमयीं राजपुरोहित आपल्या कुलाचारास अनुसरून कुलदेवतेचा नवस फेडण्यासाठींच तिकडे गेले होते. त्या देवीचे नांव पद्मावती असें आहे. त्यासमयीं पुरोहितांनीं त्या देवीला—''

याच्यापुढचे शब्द नित्यंकाच्या तोंडून बाहेर पडण्यास किंचित् घोटाळा होत आहे हें चाणाक्षतेनें जाणून गोसाव्यानेंच त्या वाक्याची पूर्णता केली कीं, '' राजपुत्र धर्मध्वजाच्या जन्मोत्पत्तीबद्दलचा नवस केलेला होता. हा सर्व मजकूर जसाच्या तसा ध्यानांत असण्याचें कारण हा नित्यंक त्या समयीं तेथें होता. दीक्षेचा बाप अकस्मात् कालवश झाल्यानंतर थोडक्यांतच तिची साध्वी आईही पतीच्या भेटीस गेली. दोघांनींही मरतांना दीक्षादेवी राजपुत्र धर्मध्वजाला अर्पण केलेली आहे. राजपुत्राचे गुण, रूप, वगैरे सर्व कांहीं ध्यानांत आणून व पित्राज्ञा वेदतुल्य समजून त्या विनयशील दीक्षादेवीनेंही राजपुत्रावाचून अन्यत्र पुरुष पितृसम मानले आहेत. तसा योगायोग जमून येईपर्यंत मध्यंतरीं धर्मध्वजाचा विवाहोत्सव साजरा झाला तरी देखील त्याच्या पट्टराणीची बटीक होऊन राहण्याबद्दल त्या एकपतिनिष्ठ पवित्र दीक्षेनें अचल निर्धार केलेला आहे. ''

ह्या आठवणीनें पुरोहितांना पूर्वीचें सर्व स्मरण झालें. त्यांनीं राजा व राजपुत्र यांच्या समक्ष ती गोष्ट कबूल केली आणि तशा महत्वाच्या गोष्टीच्या विस्मरणाबद्दल बहुत दिलगिरी दर्शवून स्पष्टपणें सांगितलें,

" गोसावीबोवा ह्मणतात तीच कन्यका आह्मांला मान्य आहे. राजेसाहेबां-नींही ती गोष्ट मान्य केलेलीच आहे. ती शुभलक्षणसंपन्न कन्यका हल्लीं कोठें आहे तें सांगा. आजपासून पहिल्याच शुभ मुहूर्तावर हा मंगलकारक समारंभ उरकण्यास आह्मी तयार आहों. "

हें भाषण ऐकतांच धर्मध्वज ह्मणाला, " पुरोहित व राजा यांना मान्य अशी गोष्ट करण्यास मी तत्पर आहें. खेरीज माझ्याकरतांच ज्या स्त्रीनें एवढा बलवत्तर निर्धार केला आहे त्या स्त्रीवाचून मलाही अन्य स्त्रिया मातेसमानच होत. परंतु, श्रीभारतीमहाराजांचें प्रत्यक्ष दर्शन घडून अनुज्ञा मिळेपर्यंत विवाह करावयाचा नाहीं असा माझा अंतस्थ संकल्प आहे. तेव्हां तो योग जमून येऊन मी विवाह करावयाचा असें निश्चित झालें, तर त्याच स्त्रीला वरीन. "

राजपुत्राच्या मनांतील संकल्प उघड होतांच नित्यंकाला पुन्हां जरा अवघड वाटलें. पण तो गोसावी व दमनपुरोहित जणू काय हे संगनमतानेंच ह्मणाले, " आह्मी दोघेही त्या पवित्र भारतीचेच दास आहों. श्री भारती या विवाहास मुळींच हरकत घेणार नाहींत. राजपुत्रानें आपला मानसिक संकल्प जरा मृदु करून दीक्षादेवीचें पाणिग्रहण करावें. श्रीभारतीचा आज कांहींच पत्ता नसल्यामुळें त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनाचा योग केव्हां येईल हें सांगणें शक्य नाहीं. तोंपर्यंत हा विवाह लांबविण्याचें बिलकुल कारण नाहीं. राज-पुत्रानें नित्यंकाप्रमाणें प्रतिज्ञा बोलून दाखविली आणि भारतीची गाठ पडल्यानंतर त्यांना जर ती गोष्ट सम्मत झाली नाहीं तर त्याची सर्व जबाब-दारी आह्मी आपल्या शिरावर घेतों. त्याविषयीं राजपुत्रानें निश्चित रहावें. "

हे प्रोत्साहक शब्द ऐकतांच नित्यंकाचा चेहरा हर्षानें टवटवीत दिसूं लागला. राजपुत्रानें थोडासा पोक्त विचार करून स्पष्टपणें सांगितलें कीं, " गोसावीबोवा व पुरोहित हे श्रीभारतीचे छात्र आहेत तेव्हां त्यांचा शब्दही मला वंद्यच होय. त्यांच्यासारखे गुरुजन जबाबदारी स्वीकारतात तर मी याचक्षणीं उघड बोलून दाखवितों कीं, नित्यंकाच्या भगिनीला मी आपली विहित पत्नी मानतों. तिच्यावाचून अन्य स्त्रिया मला भगिनीसमान होत. पंचतत्वें व माझा परमगुरु भारती यांना साक्ष ठेवून मीं आज त्याच कन्यकेचा स्वीकार केला आहे. आतां माझी पुन्हां एवढीच विनंति आहे कीं, हा लग्नोत्सव विहित विधिनुसार साजरा करण्यापूर्वी श्रीभारतीच्या शोधार्थ

जाण्यास मला आज्ञा असावी. त्या महात्म्याचें चरणदर्शन घडलें आणि तो असला ह्मणजेच हा लग्नसोहळा धन्य होईल ! ''

राजपुत्राची गुरुचरण दर्शनाची आवड पाहून पुरोहितास कौतुक वाटलें. व त्या गोसाव्यासही बहुत आनंद झाला. पण तो हलकेच म्हणाला, '' राजपुत्रानें केलेल्या या सूचनेची जरूरच नव्हती. कारण हा सोहळा प्रत्यक्ष घडणें सहजच लांबणीवर पडणारें आहे. कारण दीक्षादेवीची अवस्थाही प्रमिलेप्रमाणेंच आहे. राजकन्येप्रमाणेंच त्या दीक्षेचाही तपास नाहीं. ती भूतलावर अस्तित्वांत आहे हें मात्र खास ! तिच्यावरही फूत्कार टाकणारे अनेक नीच सर्प आहेत. त्या दीक्षारूपी कपोतीचा ग्रास करण्याकरतां अनेक ससाण्यांच्या हिकमती चालूं आहेत. ''

गोसाव्याच्या या भाषणानें राजा फारच विव्हल झाला. दीक्षादेवी जगाच्या पाठीवर कोठें तरी गुप्त स्थितींत किंवा संकटांत आहे हें ऐकून त्याचा धीर खचला. पुत्राच्या प्रतिज्ञेस अनुसरून त्याला आतां अन्य स्त्रीचें करग्रहण करणें शक्यच नाहीं हें जाणून राजा त्रस्त होऊन राहिला. दीक्षेचा मुळींच शोध लागला नाहीं तर राजपुत्र जन्मभर ब्रह्मचर्य स्थितींत राहून आपल्याला पौत्रप्राप्ती होणार नाहीं या भावनेनें तो तळमळूं लागला. त्याच्या पुढें अवसान खचविणाऱ्या अनेक कल्पनांचें काहूर उभें राहिलें. धर्मध्वजाला वचनभ्रष्ट होण्याचा उपदेश किंवा आज्ञा करणेंही त्याला मुळींच प्रशस्त वाटेना. दमन पुरोहितही क्षणभर विषण्ण होऊन उगीच इकडे तिकडे पहात राहिले. तो प्रकार पाहून राजपुत्र मोठ्या हिंमतीनें ह्मणाला, '' कसेंही असलें तरी ती राजकन्या आतां माझी पत्नी व राजा व पुरोहित यांची स्नुषा ह्मणजे कन्याच झाली आहे. तिच्यासंबंधानें भ्रष्ट भावना धरून जे कोणी अधम तिला क्लेश देण्याचा उपद्व्याप करीत असतील किंवा करण्याचें धाडस करतील ते आपणा सर्वांचे शत्रूच होत. गोसावीबोवा ज्या अर्थी तिच्या अस्तित्वाची खात्री देतात त्याअर्थी त्यांना तिच्यावरील प्रसंग ठाऊक असावा असें दिसतें. त्यांनीं ती गोष्ट शक्य असल्यास स्पष्ट सांगावी ह्मणजे मी व भोगपाल घरांतून बाहेर पडल्यानंतर प्रमिला व दीक्षा यांचा शोध लावण्यास ठीक पडेल. व त्यांचा सुगावा लागतांच त्यांच्या छळकांच्या नरडीचा घोट घेण्यास आमच्या समशेरी तहानेलेल्याच आहेत हें त्यांनीं पक्कें ध्यानांत वागवावें. ''

राजपुत्राचा आवेश पाहून नित्यकाला आनंदाचें भरतें आलें. राजा,

पुरोहित, गोसावी, भोगपाळ, इंदुमती यांना आनंदही वाटला आणि उद्विग्नताही वाटली. पण जें झालें तें बरें झालें किंवा जें होतें त बऱ्या करतांच होतें असें श्रद्धेनें धरून चालून त्यांनीं आपापलीं मनें स्वस्थ करण्याची खटपट चालविली.

---

## प्रकरण ३० वें.

### गुरुशिष्यांचें बागेंत वास्तव्य.



मिला व शिष्य नित्यंक यांचा विवाह आणि धर्मध्वज व दीक्षादेवी यांचा विवाह यासंबंधाची सर्व हवाल मोहसंबाच्या द्वारें सरदार जयसिंग यास समजली. तें ऐकतांच सरदाराचें मन द्वेषानें भरून गेलें. राजकन्या एका गोसाव्याच्या हीन शिष्याला दिली हें समजतांच सरदारपुत्र कामसेन याच्या तळव्याची आग मस्तकास पोचली. ज्या दोन स्त्रियांच्या नादानें आपण अद्याप ब्रह्मचर्यव्रतानें नाहीं तरीपण अविवाहित राहिलों त्यांची अशी वाट लागलेली पाहतांच कामसेनानें आपल्या हीनवृत्तीस पूर्ण जागें केलें. त्या दोन्ही तरुण स्त्रिया आपल्याला लाभल्या नाहींत तरी निदान त्या दुसऱ्या कोणालाही पचूं द्यावयाच्या नाहींत असा त्याचा निर्धार झाला. दीक्षादेवीचा अद्याप कांहींच शोध नव्हता तरी ती सांपडली ह्मणजे तिला माळ घालण्यासाठीं धर्मध्वज अस्तित्वांत असूं नये ह्मणजे झालें, असा विचार करून कामसेन राजपुत्राच्या जिवावर उठला. ह्या दुष्ट गोष्टीस मोहसंब अर्थातच पूर्ण सहाय्य झाला. त्याचप्रमाणें प्रमिलेचा शोध लागला म्हणजे तिला तो शिष्य नित्यंकही सांपडूं नये अशा विचारानें त्या शिष्यासही दुनियेंतून नाहींसें करण्याबद्दल त्या दोघां दुष्टांनीं विडा उचलला. दीक्षेच्या कांहीं सुगाव्यामुळें वीरबाहू तिच्या शोधार्थ ह्मणून बाहेर पडल्यास बरेंच दिवस झाले; तरी अद्याप तो परतही आला नाहीं किंवा त्याची कांहींच वार्ता नाहीं याबद्दल ते दुष्ट व्यथित झाले होते; पण त्याच्या चौकशीकरतां कोणी हुषार दूत रवाना करण्याचें ठरवून त्यांनीं आपशी ती काळजी साधारणतः हलकी करून टाकली.

राजपुत्र धर्मध्वजाचा खून मोहसंघास इष्टच होता; पण नित्यंकाला ठार मारणें ही गोष्ट कामसेनाइतकी मोहसंघाला अवश्य वाटत नव्हती. खेरीज नित्यंक व गोसावी यांच्या मार्फतच राजपुत्राचा खून घडून यावयाचा आहे असेंही त्याला शांभवीकडून समजलें होतें व तो आपल्या प्रिय पत्नीचें तें कारस्थान खरेंच मानून होता. तो सर्व मजकूर त्यास विदित करून मोहसंघ ह्मणाला, "शिष्य नित्यंक यास खरोखर लग्न कर्तव्य असेल कीं नाहीं याचाच मला संशय येतो. त्या दोघांनीं माझ्या प्रिय शांभवीस जें वचन दिलें आहे तें पूर्ण करून दाखविण्याच्या मतलबानेंच त्यांनीं प्रमिलेचा हस्त स्वीकारून व राजपुत्राला दीक्षादेवी देण्याचें सुचवून राजपुत्र, पुरोहित वगैरे मंडळीवर आपली छाप बसविली असावी. राजा, राजपुत्र यांच्या मनांत आपणा स्वतःविषयीं आदर, प्रेम, विश्वास कळकळ उत्पन्न करून त्यांना फसविण्याचाच हा डाव असला पाहिजे. अशा या कपटमोहानें ते दोघेजण राजपुत्राला व्यवस्थित समाधी देतील आणि प्रमिला प्राप्त झाली ह्मणजे नित्यंकाकरवीं आयतीच तिला आणून आपल्या स्वाधीन करतील असा माझा अजमास नव्हे बहुतेक खात्री आहे. तेव्हां शांभवीशीं एकांत करून मी या गोष्टीचा छडा काढवतों. तोंपर्यंत तरी निदान नित्यंकाच्या जिवास किंवा देहास अपाय करणें किंवा त्याचें अनिष्ट चिंतणें योग्य नाहीं असें मला वाटतें ?"

हा विचार कामसेन व जयसिंग या दोघांनाही मान्य झाला; पण त्याची पूर्ण व खरी चौकशी होऊन त्याचा अंतस्थ मतलब शांभवीच्या मार्फत कळेंपर्यंत आपण प्रमिलेच्या शोधार्थ दिरंगाई करणें बरें नव्हे असें वाटून जयसिंगानें अनेक शूर सेवकांची ठिकठिकाणीं रवानगी करावयाचें ठरविलें. दीक्षादेवीचाही शोध जारीनें करण्याची त्याच वेळीं आणखी तजवीज झाली. राजकन्येच्या शोधाकरतां धर्मध्वज, भोगपाल व नित्यंक असें तिघेजण निघावयाचे होते. ते निघण्यापूर्वींच राजपुत्राचा घात झाला पाहिजे असा सरदारानें हट्ट धरला. त्या संबंधानें त्याच्या मनाची चिंता कमी करण्याकरतां मोहसंघ ह्मणाला, "हीं कामें युक्तीनें व धोरणानें पार पाडलीं पाहिजेत. त्याबद्दल मीं निराळीच योजना केली आहे. भोगपालाच्या पत्नीनें आपलें सर्व ह्मणणें मान्य करून नवऱ्याची खोड मोडण्याचा निर्धार केला आहे. तिला एक दोन दिवसांतच आपल्या वाड्यांत दाखल करतों. आपण तिला कोणत्या

प्रकारें भुलवावें व तिच्याशीं कसें वर्तन ठेवावें हें आपलें बोलणें झालेंच आहे. आपल्या वाडयामध्यें ती कोणाच्याही नजरेस पडून तिच्या गुप्त स्थितीचा स्फोट होता कामाचें नाहीं. तिला आपल्या वाड्यांतील गुप्त तळघरांत दडवून ठेवावी ह्मणजे कांहीं भीति राहणार नाहीं. माधवी अकस्मात् नाहींशी झाली ह्मणजे भोगपालाच्या नाड्या ढिल्या पडतील, त्याचें अवसान खचेल; मग त्याला प्रमिलेच्या शोधार्थ हिंडण्याचा दम किंवा उमेद राहणार नाहीं. शिष्य नित्यंक याला शांभवीच्या मोहपाशांनीं जखडून टाकलाच आहे. तो राजधानींतून हालणार नाहीं अशी तजवीज शांभवी आपल्या आनंदपूर्ण सहवासानें खात्रीनें करील. शांभवीच्या केवळ वचनाखातर तो प्रसंगीं प्रमिलेचा त्यागही करील. हीं दोन माणसें अशा रीतीनें कमी झालीं ह्मणजे एकटा राजपुत्रच काय तो प्रमिलेच्या शोधार्थ हिंडावयास राहिला. शक्य तितक्या जलदीनें त्याला इहलोक सोडावयास लावण्यांत यश आलें तर बरेंच, नाहींतर तो एकटा कोठें जाणार ? तो प्रमिलेला हुडकून आणण्याच्या आंत आपण किंवा आपले अनेक दूत तिला केव्हांच धरून आणतील. ”

ह्या विचारांनीं तर जयसिंग फारच हुरळला. त्याला मोहसंवाच्या अकलेची मोठी किंमत वाटली. नंतर मोहसंवानें त्याला कांहीं शिपाई व एक नाईक शांभवीच्या हाताखालीं देण्याची सूचना केली. त्यानें लागलीच त्यांची तिकडे रवानगी करण्याचें ठरविलें. राजपुत्राला ज्याठिकाणीं मारण्याचें नक्की होईल त्याठिकाणीं जाण्याचा कामसेनानें आपला निश्चय सांगितला. त्या अंतस्थ बेतासंबंधानें एकदा शांभवीशीं गुप्त मुलाखत होणें इष्ट वाटल्यावरून कामसेनानें भोगपालास तशी विनंति केली. भोगपालानें त्यास सांगितलें, “ आतांतर ती गोष्ट अगदीं सहज व सोपी झाली आहे. आतां आह्मी आपलें खाजगत ठाणें प्रमिलामंदिरांत दिलें आहे तेथें तुह्मी केव्हांही या. मी असलों किंवा नसलों तरी शांभवीस तशी सांकेतिक चिठी पाठवा. ह्मणजे ती आपल्याशीं गुप्तपणानें सर्व कांहीं खुलासा करील. ”

असा विचार ठरवून भोगपाल तेथून परत गेला. गोसावीबोवा व नित्यंक हे ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं बागेंत जाऊन राहिलेच होते. बागेंतील मंदिरांत भोगपाल व शांभवीचें वास्तव्य होतें तेथेंच त्या गुरुशिष्यांनीं रहावें असा भोगपालानें फार आग्रह केला. पण गोसावीबोवास ती गोष्ट पसंत पडली नाहीं ह्मणून त्या बागेंतच पण मंदिरापासून बरेंच दूर अशा ठिकाणीं त्यांची

राहण्याची वेगळीच सोय करण्यांत आली. राजवाड्यांतून त्यांची बहुतेक बरदास्त होत होती; पण त्यांतल्यात्यांत मोहसंघ व शांभवी यांचीच त्या कामीं विशेष दक्षता होती. शांभवीनें त्या दोघांशीं बागेंत आल्यानंतर वेगळेंच कारस्थान चालविलें होतें. तिनें गोसावीबोवास नानातऱ्हेचा द्रव्यमोह दाखवून असें सांगितलें कीं, " तुह्मी प्रमिलेचा शोध सांगाल तो माझ्या सल्ल्यानें सांगा. "

शांभवी असें कां ह्मणत आहे हें गोसावीबोवास नीटसें समजेना. प्रमिलेचा खरा तपास लावून देण्यास किंवा तिच्याविषयींचें खात्रीलायक ज्योतिष सांगण्यास तो कोणत्याही प्रकारें समर्थ नव्हता. चंद्रहाराच्या प्रकरणावरून त्याच्या सामर्थ्याची उगीचच वाहवा झाली होती. वस्तुतः ती शक्कल शांभवीची होती. व त्यांतील तिचा हेतूही साधला होता. त्याच हेतूबरोबर गोसावी व त्याचा शिष्य यांचाही हेतु साधला हा परमेश्वरी प्रसाद होय. किंवा शुद्ध आचार व भावना यांनीं संपन्न अशा माणसांचीं कार्यें अशीं चमत्कारिक रीतीनेंच सफल होतात असा नियमच दिसतो. शांभवीला जर कांहीं प्रमिलेची खबर माहीत असेल तर तिच्या धोरणानें चाललें असतां त्या नादावलेल्या स्त्रीकडून आपलें मोठें काम होईल अशा समजुतीनें गोसाव्यानें तिचें ह्मणणें मान्य केलें. तिनें याचसमयीं गोसाव्याला आपल्या संततिप्राप्तीच्या साधनाविषयींही विशेष निकड लावली. गोसाव्यानें लवकरच तिच्या साधनाची पूर्तता करण्याचें वचन दिलें.

---

## प्रकरण ३१ वें.

### नवीनच चिंता.



गोसावीबोवा बागेंत रहावयास येऊन सरासरी एक पंधरवडा लोटला नाहीं तोंच प्रमिलेचा शोध लागण्याऐवजीं भोगपालाची माधवी घरांतून एकाएकीं नाहींशी झाली. संध्याकाळीं पांच वाजण्याच्या सुमारास ती बागेंत जाण्याच्या निमित्तानें एक दोन दासीसह राजवाडया-बाहेर पडली. त्या समयीं त्या दासी शिपायाप्रमाणें माधवीच्या पुढें चालल्या होत्या. बागेच्या दाराशीं येईपर्यंत त्यांनीं बहुतेक मागें पाहिलेंच नाहीं. दारां-तून आंत शिरण्याच्या समयीं त्या दोघीजणी थांबल्या आणि त्यांनीं पाठमोरें वळून पाहिलें. त्यांना जेव्हां लांबवर पाहूनही माधवी दिसेना तेव्हां त्या विचारांत पडल्या. तशाच स्थितींत तेथें बराचवेळ थांबून त्या कंटाळल्या. माधवी कांहीं कामासाठीं कदाचित् वाडयांतच परत गेली असेल असें समजून त्याही राजवाडयांत परत गेल्या. तेथेंही माधवी नाहीं असें पाहतांच त्यांना आश्चर्य वाटलें. त्यावेळीं लागलीच त्यांनीं त्यासंबंधानें बोभाटा केला नाहीं. कांहीं वेळानें निदान रात्रीची जेवणाची वेळ होईपर्यंत ती परत येईल अशी त्यांना आशा होती. शेवटीं त्या-वेळपर्यंतही जेव्हां ती परत आली नाहीं तेव्हां त्यांची निराशा झाली व त्या आपल्या मनांत ब्याच घाबरल्या. पण त्या गोष्टीचा बोभाटा झाला तर आपण आपल्या कानावर हात ठेवावयाचे व त्यासंबंधानें आपणांस कांहींच माहिती नाहीं असें सांगावयाचें असें त्यांनीं ठरवून ठेविलें.

माधवीबद्दल जेवणाच्यावेळीं बोभाटा झाला. सर्व मंडळी त्याबद्दल तर्कवि-तर्क करूं लागली. संभवनीय अशा सर्व कल्पना करून त्यांनीं तिचा शक्य तो शोध केला पण तपास नाहीं. कोणाला कांहींच सुचेना. भोग-पाल तर आपल्या मनांत अतिशयच खिन्न झाला.

तिच्या व भोगपालाच्या परस्पर वर्तनाविषयीं वाटावाट सुरू झाली. त्या-मध्यें कोणीं कोणीं माधवीला दोषी ठरविलें. कोणीं कोणीं भोगपालाला दूषण

लावलें. शेवटीं असा निकाल लागला कीं, भोगपालाचा शिरजोरपणा, लहर, तडफ, दुराग्रह, वगैरे गोष्टींस त्रासून माधवी आपल्या माहेरीं पळून गेली असावी. हाच तर्क बहुतेकांना मान्य झाला.

ती रात्र कशी तरी उजाडली. दुसऱ्या दिवशीं माधवीच्या माहेरीं विश्वासू दूत रवाना झाले. ते परत येईपर्यंत सर्वजण आशा धरून कांहींसे स्वस्थ होते. पण ते दूत जेव्हां विन्मुख होऊन हात हालवीत परत आले तेव्हां सर्वांच्या मनास निराशेनें घेरलें. प्रथम प्रमिला व तिच्या मागोमाग माधवी याप्रमाणें एकेक स्त्री घरांतून नाहींशी होऊं लागली तेव्हां त्यांत कांहीं तरी कपटजाल असावें असें सर्वांचे तर्क चालूं झाले. सर्वजण आपापल्यापरीं कल्पना चालवूं लागले तेव्हां मोहसंघानें माधवीबद्दलही प्रमिलेप्रमाणेंच तर्क केला. मोहसंघ ज्याअर्थी आत्मघातावांचून अन्य कांहींच बोलत नाहीं असें कळून आलें तेव्हां धर्मध्वजाला तर मोहसंघाच्या घातकी साहसकर्माचाच दृढ संशय आला. मोहसंघच त्या दोन्ही स्त्रियांच्या घातास सामील असावा आणि त्यामुळेंच तो बेलाशक त्यांच्या आत्महत्येचें वृत्त खात्रीलायक सांगत असावा अशा कल्पनेनें भोगपालासही घेरलें. मोहसंघाचा भोगपालावर रोष होता व तो आणि त्याची बायको शांभवी यांचा माधवीशीं कांहीं गुप्त खल चाले हेंही धर्मध्वज व भोगपाल यांच्या नजरेस आलें होतें. यावरून शांभवी त्या साहसी जोडप्याच्या कृत्रिमासच बळी पडली असावी अशी बहुतेकांची खात्री होऊं लागली. त्यासंबंधीं एकदां कायमचा निकाल लावून घ्यावा म्हणून धर्मध्वज व भोगपाल यांनीं सर्वांच्या अनुमतानें गोसावीबोवाला विचारण्याचें ठरविलें.

एक दोन दिवस तसेच आणखी व्यर्थ शोध करण्यांत गेले. नंतर एके रात्रीं गोसावीबोवा व शिष्य नित्यंक बागेमध्यें आपल्या बिऱ्हाडांत स्वस्थ बसले होते. अशा समयास राजपुत्र व भोगपाल तेथें गेले. भोगपालाला पत्नीवियोगाची केवढी तळमळ लागली असली पाहिजे याची कल्पना त्याच्या चेहऱ्यावरून होत होती. राजपुत्रानें भोगपालाच्या अंतस्थितीचें व घरगुती वागणुकीचें वर्णन करून गोसावीबोवास त्या दोन्ही राजस्त्रियांच्या शोधाची निकड लावली. गोसावीबोवांनीं त्याबद्दल मोठी दिलगिरी प्रगट करून दाखविली आणि त्या दोन्ही स्त्रिया सांपडतील असा आशिर्वाद दिला. पण तेवढ्यानें समाधान न होतां राजपुत्रानें माधवीच्या शोधाबद्दल तर अगदीं

हट्टच धरल्यासारखें केलें. तेव्हां गोसावीबोवांनीं वरकरणी आणखी आढेवेढे घेऊन शेवटीं नाइलाजास्तव त्यांचे प्रश्न तात्काळ उलगडून टाकण्याचें पत्करलें. त्यांनीं तिघांना अगदीं शांत बसण्यास सांगून ते स्वतः डोळे मिटून बसले. वस्तुतः गोसावीबोवाजवळ तसें कांहीं दैविक किंवा मांत्रिक सामर्थ्य नव्हतें. पण आपल्यावरील भाव कायम राखण्यासाठीं त्यांनीं देवर्षींचा सर्व आविर्भाव आणला. सुमारें चार घटका आसनावर ध्यानस्त बसून त्यांनीं डोळे उघडले व त्या तिघांकडे गंभीर दृष्टीनें पाहून त्यांनीं राजपुत्रास हांक मारून सांगितलें, " माधवीची सर्व हकीकत मी प्रथमतः सांगणार आहें. पण मी त्यासंबंधीं भाषण सुरू करण्यापूर्वी तुह्मांपैकीं दोघांनीं या माझ्या झोंपडीच्या चोहोंबाजूंनीं सक्त पाहरा करीत रहावें. कारण आपले बोलणें पांचव्या माणसास कळतां कामाचें नाहीं. तुह्मांपैकीं कोणीतरी एकजणानें मजजवळ बसावें व इत्थंभूत वर्तमान ऐकावें आणि त्यानें तें मग एकांतांत दोघांना सांगावें. "

बोवांच्या या सावधगिरीस त्या त्रिवर्गांनीं मान्यता दर्शविली. नित्यंक व भोगपाल यांनीं बाहेर पाहारा करावा व राजपुत्रानें बोवाजवळ बसावें असें त्यांच्या विचारानें ठरलें. राजपुत्र शेजारीं बसतांच बोवा ह्मणाले, " आपली भावजय माधवी ही सांप्रत सरदार जयसिंग व त्यांचा पुत्र कामसेन यांच्या ताब्यांत असली पाहिजे. तिला घरांतून नाहींशी करण्यांत तुमचे बंधु मोहसंघ व कदाचित् त्यांचें कुटुंब यांचें अंग आहे. माधवीला अद्याप कोणत्याही तऱ्हेचा अपाय घडलेला नाहीं. त्या दुष्टांनीं तिला कोठें ठेविलें आहे तें ठिकाण मात्र यावेळीं किंवा पुढेंही केव्हांच समजणें माझ्या या मंत्रसामर्थ्याच्या बाहेर आहे. बाकी सरदार जयसिंग, कामसेन व मोहसंघ यांच्यावाचून दुसरा कोणीही यांत जबाबदार असा अपराधी नाहीं. आतां तुह्मी याच कार्यास लागा. राजकन्येच्या शोधाविषयीं आत्तांच हट्ट करूं नका. बेताबातानें सर्व कांहीं घेतलें पाहिजे. कारण या गोष्टी आपल्या स्वाधीन नसतात. मंत्रदैवतांच्या धोरणानेंच सर्व कांहीं घेतलें पाहिजे. नाहींतर आपल्या हट्टानें सर्व कांहीं उगीच बिघडावयाचें. आणखी महिना पंधरा दिवसांच्या आंत प्रमिलेचा सर्व गुप्त वृत्तांत असाच समजेल. "

असें सांगून गोसाव्यानें आसन सोडलें. वस्तुतः ही माधवीची बातमी सांगण्याच्या कामीं त्याला मंत्रदैवतांची जरूर नव्हती. त्याला ती गोष्ट अगाऊ

माहीत झालेली होती. तें कसेंही असलें तरी राजपुत्राला त्या हकीगतीचें नवल वाटलें. नंतर त्यानें नित्यंक व भोगपाल यांना एकेकास आंत बोलावून सर्व हकीगत निवेदन केली. त्यासमयीं आळीपाळीनें भोगपाल व नित्यंक आणि खुद्द गोसावीबोवा हे पर्णकुटीच्या बाहेर रखवाली करीत होते.

गोसाव्याच्या शब्दावर भरंवसा ठेवून राजपुत्र व भोगपाल हे सरदार व त्याचा पुत्र यांच्यावर अतिशयच संतापले. फार बारकाईनें शोध काढून सरदार, कामसेन व मोहसंघ यांच्यावरील गुन्हा धडधडीत शाबीत करून दाखवावयाचा आणि प्रसंगीं त्या तिघांनाही कंठस्नान घालून माधवीला मुक्त करावयाची याविषयीं भोगपाल वल्गना करूं लागला. पण त्या रहस्याचा स्फोट होऊं दिल्यास कार्यनाश होईल अशी राजपुत्रानें सूचना देतांच भोगपाल कांहीं स्थिर झाला आणि गोसावीबोवाचे उपकार मानून ते दोघे चुलत बंधू बागेंतून परत निघून गेले.

---

# प्रकरण ३२ वें.

## मंदिरप्रवेश.



मोहसंघ आणि सरदार जयसिंग यांना प्रमिला किंवा दीक्षा यांच्या तपासापेक्षां धर्मध्वजाच्या नाशाची फार त्वरा झाली होती. कामसेनाला राजपुत्राचा नाश इष्टच होता; तरीपण त्याला प्रमिला व दीक्षा यांचा शोध आणि शिष्य नित्यंकाचा घात यांविषयीं उत्कंठा वाटत होती. तेव्हां शांभवीकरवीं नित्यंकाची वाट लावण्याची योजना करून प्रमिला व दीक्षा यांना पकडण्याची कामगिरी कामसेनानें आपल्याच अंगावर घेतली. जयसिंगानें मोहसंघास त्याच्या चालढकलीबद्दल बरेंच खडसून गोसावीबोवांशीं परस्पर एकांत करण्यास सज्ज केलें. शांभवीला ती गोष्ट कळूं न देतांच गोसाव्याशीं सर्व कारस्थान जमवावयाचें असा संकेत करून ते दोघे गोसाव्याकडे गेले. शांभवीच्या मनांत शिष्य नित्यंकाशीं एकांतांत गप्पागोष्टी

करण्याबद्दल अतिशय अधीरता उद्भवली होती. तिला अलीकडे नित्यंकावांचून कांहींच सुचेनासें झालें होतें. तिनें आपलें तन, मन, धन सर्व कांहीं नित्यंकास अर्पण केलें होतें. जेवतां, खातां, उठतां, बसतां, तिच्या मनांत नित्यंकावाचून अन्य कसलाही विचार चालत नसे. रात्रीं स्वप्नामध्येंही तिला नित्यंकमूर्ती दिसे. नित्यंकाशीं एकांतांत गोष्टी करण्याच्या कामांत तिला मुख्यत: दोन अडचणी होत्या. एक अडचण गोसाव्याची. कारण तो गोसावी शिष्य नित्यंकाला विसंबून किंवा एकटा टाकून एक क्षणभरही इकडे तिकडे जात नसे. या कारणानें ती मूढ बनलेली शांभवी त्या गोसाव्यावरही मनांतून क्रुद्धच होती. संततीप्राप्तीच्या आशेनें ती त्याच्या नादीं होती. तेव्हां एकदां निर्वाणीला येऊन त्याच्याजवळून कांहीं मांत्रिक साधन पदरांत पाडून घ्यावें किंवा त्या बाबतींत एकदां पूर्ण निराश तरी व्हावें आणि मग त्या गोसाव्यालाही दगा करून तो नित्यंकापासून दूर होईल असा घाट जमवावा, असा तिचा अंतस्थ इरादा होता. अलीकडे तर ती नित्यंकाच्या भेटीच्या नादांत राजपुत्राच्या नाशाविषयींचा विचारही विसरल्यासारखीच होती. गोसावीबोवा ज्या कारणानें हवे असें वाटत होतें तें कारण नाहींसें व्हावें या बुद्धीनें तिनें त्याला साधनतंत्राची अत्यंत निकड लावली. तसें कांहीं यंत्र किंवा तंत्र बोवाजींना मुळींच ठाऊक नव्हतें. त्यांनीं आपल्या मतलबावर दृष्टी ठेवून त्या बाईला उगीच नादीं लावण्याकरतां आज उद्यां, आज उद्यां असें चालविलें होतें. तिची निकड पाहून आणि ती प्रमिलेची गुप्त वार्ता सांगेल असा भरंवसा मानून बोवांनीं तिला एक संततीप्राप्तीचें यंत्र करून देऊन तें दंडांत बांधण्यास सांगितलें. तें कार्य उरकतांच शांभवीला बोवा दृष्टीसही नकोसा झाला. तिच्या मनांत त्याचा नाश होईल तर बरें असाच विचार खेळूं लागला. त्याविषयीं तिनें अशी युक्ति शोधून काढली कीं, त्याला प्रमिलेच्या वास्तव्याची खोटी जागा सांगावयाची व तो तिच्या शोधार्थ राजपुत्रासह जाईल असें करावयाचें ! त्या ठिकाणीं मारेकरी–शिपाई–छपवून ठेवावयाचे आणि बोवा व धर्मध्वज तेथें शिरतांच त्यांचे मुडदे पडावेत अशी तजवीज करून ठेवावयाची ! हा बेत साधला म्हणजे आपला पती व जयसिंग यांच्या मार्गांतील अडचण दूर होऊन मोहसंघ व कामसेन यांच्यांत राज्यविभागणीचा योग येण्यास अडचण पडणार नाहीं; आणि बोवाचा पशु पडला म्हणजे शिष्य नित्यंकासमवेत आनंदानें काळ काढण्यासही व्यत्यय येणार नाहीं असा तिचा दुहेरी डाव होता.

तिची दुसरी अडचण म्हटली म्हणजे खुद्द तिचा पति मोहसंव याचीच होय. त्याविषयीं तिनें अशी योजना केली होती कीं, मोहसंव व सरदार यांनीं कांहीं तरी मोहानें बोवाजीस अरण्यांत नेऊन भुलवावें आणि शिष्य नित्यंकाचा प्रमिलेबरोबरचा विवाह मोडावा. एवढ्या वेळांत तिला नित्यंकाशीं पूर्ण एकांत करण्यास सांपडेल असा तिचा अजमास होता. पुढें गोसाव्याची कायमची वाट लागली म्हणजे अनाथ झालेल्या नित्यंकास आपल्या तैनातींत खाजगी नोकर ठेवावें म्हणजे मोहसंवास संशय न येतां तो नित्यंक वाटेल त्यासमयीं आपल्याला एकांतांत भेटण्यास हरकत पडणार नाहीं अशी तिची समजूत होती.

याप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्या. मोहसंव व सरदार बोवाजीस घेऊन सहल करण्याच्या हेतूनें अरण्यांत गेले. बोवानेंही आपल्या हेतूप्रमाणें नित्यंकास शांभवीशीं एकांत भेट करण्यास मोकळें सोडलें. त्या बाईच्या अंतःकरणांतील नित्यंकाविषयींचे खरे विचार काय आहेत व त्या कामीं ती लाघवी बाई आपल्या पतीला कशी फसवीत आहे हें गोसावी पुरतेपणीं जाणत असल्यानें त्यानें नित्यंकाला त्यासंबंधानें अति सावधगिरी राखण्याबद्दल वरचेवर बजावलें होतें. त्यांच्या एकांतांतच प्रमिलेचें गुप्त ठिकाण व्यक्त होण्याचें आश्वासन मिळालें असल्यामुळें त्याला तो एकांत अवश्य झाला होता. तो एकांत सुरक्षित साधावा म्हणूनच बोवाजी मोहसंघ व सरदार यांच्या बरोबर अरण्यांत जाण्यास सहज कबूल झाला होता. तात्पर्य, त्यांतून प्रत्येकजण आपापल्या निरनिराळ्या कार्यानें वागून आपला स्वतःचा डाव साधण्याच्या धोरणांत होता.

शिष्य नित्यंक यास गोसावीबोवा खाजगी रीतीनें पूर्णपणें जाणत असल्यानें त्यांना त्याच्या सावधगिरीबद्दल पक्का विश्वास वाटेना. तेव्हां नित्यंकाच्या संरक्षणाबद्दल साशंक होऊन त्यांनीं आपला सर्व गुप्त बेत राजपुत्रास कळवून ठेवला; आणि शांभवी व नित्यंक बागेंतील मंदिरांत एकांतामध्यें बोलत असतां राजपुत्रानें अति गुप्तपणानें त्या ठिकाणीं छपून बसावें आणि सर्व संवाद श्रवण करावा व कारण पडल्यास नित्यंकाच्या संरक्षणार्थ प्रगट व्हावें अशी राजपुत्रास बोवांनीं अगत्याची सूचना देऊन ठेविली होती.

सरदार मोहसंघ व बोवाजी अरण्याच्या वाटेला लागले तेव्हां शांभवीस अत्यंत हर्ष झाला. आतां आपलें मंदिर म्हणजे पूर्ण एकांताचें स्थळ आहे असें वाटून ती उल्हासित झाली. पण मोठ्या चातुर्यानें राजपुत्र धर्मध्वज त्या

मंदिराच्या गच्चीवर एका गुप्त जागेंत आधींच दडून बसला होता हें त्या चांडाळणीस कोठून माहीत असणार ? ती नित्यंकाच्या भेटीस आतुर झालेली धूर्त व नटवी शांभवी सर्व मंदिर शृंगारून नित्यंकाची मार्गप्रतीक्षा करीत बसली होती. तिनें आपल्या दोनच दासी मंदिरांत त्या समयीं ठेवून घेतल्या होत्या. नित्यंकाचें आगमन होतांच त्या दोघींनीं कांहींतरी निमित्त काढून हळूच तेथून काढता पाय घ्यावा आणि मंदिराबाहेर रखवाली करीत रहावें अशी त्यांना आगाऊ सूचना देऊन ठेवलेली होती.

सरासरी रात्रीं नऊ वाजण्याच्या सुमारास नित्यंक त्या मंदिरांत प्राप्त झाला. तो रात्रीं मंदिरांत येणार असें आगाऊ ठरलें असल्यामुळें शांभवीनें तेथें घाईघाईनें शक्य तो थाटमाट केला होता. दिव्याच्या उजेडानें तें मंदिर प्रकाशमान झालें होतें. दीपकजन्य उष्णतेची पीडा हरण करण्यासाठीं तेथें एक भला मोठा पंखा टांगलेला असून दोन्हीं दासी त्याच्या दोऱ्या ओढीत होत्या. एका दालनामध्यें एक छप्परपलंग ठेवलेला असून तो अवश्य त्या अस्तरणांनीं सजविलेला होता. त्याच्या सभोंवार हिरव्यागार रंगाची जाळीदार मच्छरदाणी लावलेली होती. तिचे तोंडाकडील एक अंग वर आवरलेलें होतें. पलंगासमोर एकदोन सिंहासनासारखी आसनें होतीं. त्यांच्यानजीकच अगरबत्त्या जळत होत्या. खिडक्यांना वाळ्याचे पडदे लावलेले होते. सुगंधित द्रव्यांच्या सुवासानें तेथील बहुतेक वस्त्रें दरवळत होतीं. रुप्याच्या ताटामधून उत्तमप्रकारची फळफळावळ ठेवलेली होती. पेढेबर्फी वगैरे मेवामिठाईही नकशीदार ताटांमध्यें भरलेली होती. पलंगाच्या सर्व बाजूंनीं सुगंधित पुष्पांच्या माळा सोडलेल्या होत्या.

नेमलेल्यावेळीं नित्यंक त्या मंदिरांत जातांच शांभवी मोठ्या विनयानें उठून उभी राहिली. ती सलज्जतेनें चार पावलें पुढें जाऊन त्याच्याविषयीं आदरभाव दर्शवूं लागली. तिच्या स्वागताची वाट पहात न थांबता नित्यंक त्या दोन आसनापर्यंत गेला. त्यासमयीं शांभवी एका आसनाशेजारीं तिरपी उभी होती. तिनें लाजत लाजत त्यांतील एका आसनाकडे बोट करून नित्यंकाला त्यावर बसण्याची सूचना केली. तेथील सर्व थाट पाहून व शांभवीचें आदरातिथ्य जाणून नित्यंकाला नवीन असें कांहीं ओळखावयाचें नव्हतें. त्यानें त्या स्त्रीचें मन आधींच ओळखलेलें होतें. तिच्या संकेतानुसार तो त्या आसनावर बसला तर नाहींच; पण त्यानें तेथें बसण्याची

साधारणतः नाखुषीच दर्शविली. तो तसाच लांब उभा राहून ह्मणाला, " आपण हवें तर त्या आसनावर बसावें. आपण माझें आदरातिथ्य करतां हें अधिक आहे. वस्तुतः त्यास मी मुळींच पात्र नाहीं. "

या भाषणानें शांभवीला आनंद वाटला. आपल्या मनाचा संतोष व प्रसन्नता व्यक्त करण्यासाठीं ती स्तुतिपूर्वक बोलली, " आपली ही मधुरवाणी ऐकून मला असें वाटतें कीं, कोकिलेला अभिमान धरण्याचें मुळींच कारण नाहीं. आपण हें आसन मंडित करण्यापूर्वी मी जर त्या आसनावर बसेन तर माझ्याकडून सौंदर्यदेवतेचा मोठा अपमान झाल्यासारखें होईल ! आपण स्त्रीजातीचेच काय पण पुरुषजातीचेंही चित्त चोरणारे आहां. अशा मोहकपणाच्या जोडीला निरभिमानाची वृत्ति मिळाली असल्यामुळें आपला मुखमृगांक सौंदर्याच्या मृदुत्वानें फारच वेधक झालेला आहे. आपण आतां आसनस्थ व्हावें ! "

हें रूपवर्णन ऐकून नित्यंक ह्मणाला, " बाई ! तुह्मी वक्तृत्वाच्या कलेनें संपन्न दिसतां ! पण त्याचा मला काय उपयोग ! मी येथें आपलें कौशल्यपूर्ण वक्तृत्व ऐकण्यास आलों नाहीं. मी येथें कशासाठीं आलों आहे हें तुह्मी जाणतच आहां. "

नित्यंक मुद्दाम अज्ञान पांघरल्यासारखें करीत आहे असें पाहून शांभवीनें सांगितलें, " आपला उद्देश कदाचित् मला ठाऊक असेल; पण आपणाला याठिकाणी येण्याची विनंति करण्यांतील माझा उद्देश काय असावा याबद्दलही आपणास कल्पना झालेलीच असेल ! मग अशाप्रकारें एखाद्या स्त्रीचा उगीच अंत पाहण्यांत मतलब कोणता ? आसनावर बसण्याचा माझा आग्रह नाहीं. आपली तशी इच्छा नसेल तर आपण आसनाकडे ढुंकूनही बघूं नये. आपण या पलंगाचाच आदर करा, अशी माझी हात जोडून प्रार्थना आहे. ही याचना आपण अमान्य कराल तर आपण येथें येऊन न आल्यासारखेंच होईल. "

शांभवीच्या भाषणांतील इत्यर्थ जाणून नित्यंक बोलला, " आपली याचना व माझें वचन ह्या दोन्ही गोष्टी मी चांगल्या जाणून आहें. या ठिकाणचें माझें आगमन सार्थ होईल यांत संशय नाहीं. पण माझा हेतु पूर्ण झाल्यावांचून मी खालीं बसणार नाहीं. प्रथमतः आपण आपल्या वचनास जागून मला राजकन्या प्रमिला हिचें गुप्त स्थळ कळवा. तिच्याबरील सांप्रतच्या

प्रसंगाचें साद्यंत गुप्त वर्तमान सांगा; ह्मणजे मग मी आपल्या वचनाबाहेर जाण्याचें स्वप्नींही आणण्याचें कारण नाहीं. या ठिकाणीं एकांतांत येण्याचें कबूल करण्यापूर्वींच मी किंवा गोसावीबोवा यांनीं तुह्मास हीच अट घातलेली आहे हें ध्यानांत आणा. ''

प्रमिलेची हकीगत आधीं समजल्यावांचून नित्यंक आपल्या विनंतीस जुमानीत नाहींसें पाहून शांभवी ह्मणाली, '' स्त्रियांची जात हट्टी असते असा आजवर लौकिक आहे; पण आपल्या उदाहरणावरून आतां तो नियम पालटण्यास हरकत नाहीं. आपण इतका आग्रह न धरतां पलंगाचा स्वीकार करून मला जर आज्ञा केली असती तर मी त्या आज्ञेचा अव्हेर करण्याचें पातक जोडण्यास कधीं तरी प्रवृत्त झालें असतें का ? आपलें कार्य प्रथमतः उरकून घेण्याची आपण इतकी जोरदार अट घालतां यावरून आपल्याला मजविषयीं संशय येत असावा हें उघड होतें. आजपर्यंतच्या अनुभवावरून जर आपणाला माझी खरी परीक्षा झाली नसेल तर तो माझाच दोष असें ह्मणणें बरें ! कारण तो आपला दोष आहे असें धडधडीत बोलण्यास या वेळीं आपल्या जागीं आपल्याहून भिन्न अशी कोणी व्यक्ति पाहिजे होती. कसेंही असो; माझं वचन मला राखलेंच पाहिजे. वचनपूर्तता ही परस्परावलंबनीय आहे आणि आपण सत्यप्रिय आहां यावरच निर्भर देऊन मी आपणास राजकन्येची सद्यस्थिति सांगतें तिकडे अवधान असावें. ''

या सुमारास मंदिराच्या बाहेर सरदारपुत्र कामसेन हा येऊन दाखल झाला. शांभवीच्या दोन्ही दासी तेथें सावधगिरीनें हिंडत होत्या. कामसेन मंदिरद्वाराशीं जाण्यासाठीं दरवाजाच्या पायऱ्या चढणार तोंच त्यानें त्यांतील एक दासी पाहिली. त्यानें तेथल्या तेथेंच उभे राहून दासीला जवळ हाक मारून विचारलें, '' तुमचे यजमान घरांत आहेत काय ? ''

त्याच्या प्रश्नास दासींनीं नकारात्मक उत्तर देऊन त्यास असें कळविलें कीं, '' मोहसंवमहाराज आज येथें नाहींत. ते येथें केव्हां यावयाचे आहेत हेंही कांहीं नक्की सांगतां येण्यासारखें नाहीं. मंदिरामध्यें आमच्या यजमानीणबाई ह्मणजे शांभवी बाईसाहेब आहेत. ''

दासींचा जाब ऐकून कामसेनानें त्यांना आपण आलों असल्याची वर्दी शांभवीस कळविण्याविषयीं सांगितलें. तेव्हां त्यांनीं त्यास साफ उत्तर केलें कीं, '' कोणाही मनुष्यास यावेळीं आंत जाण्यास परवानगी मिळणार

नाहीं व आम्हांसही यासमयीं आंत जातां येणार नाहीं. आपला निरोप आमचेजवळ कळवून ठेवा. बाईसाहेबांनीं आपला एकांत आटोपून मंदिराचें द्वार उघडलें ह्मणजे आह्मी त्यांस आपला निरोप कळवूं ! ”

यावर कामसेनानें जरा असमाधान दर्शवून दासींना सांगितलें, “ माझें काम खुद्द तुमच्या बाईसाहेबाकडेच आहे. तें तुमच्याजवळ सांगण्यासारखें नाहीं. तुह्मी त्यांना आत्तांच्या आत्तां माझी वर्दी द्याल तर त्या लागलींच मला आंत बोलावून घेतील. कारण काम काय आहे व तें किती महत्वाचें आहे हें तुमच्या बाईसाहेबांना विदित आहे. एकांतभंग न करण्याबद्दल तुह्माला इतकी सक्त ताकीद देण्याला तुमच्या बाईसाहेबांचा असा हा एकांत चालला आहे तरी कोणाशीं ? ”

कामसेनाला नित्यंकाचें नांव सांगून टाकलें ह्मणजे त्याची ब्याद टळेल व तो निमुटपणें निघून जाईल अशा समजुतीनें त्या बोलल्या, “ प्रमिलेचा पति शिष्य नित्यंक याच्याशीं कांहीं विशेष महत्वाच्या कार्यासंबंधानें बाईसाहेबांचें बोलणें चाललें आहे. त्यांची कांहीं तरी घरगुती बोलणीं चाललीं आहेत असें दिसतें. कारण त्या पलीकडच्या जाळीशीं उभे राहिलें असतां त्यांचें बोलणें साधारणत: ऐकूं येतें त्यावरून आह्मीं हा अजमास केला आहे. ”

त्या दासींचा कामसेनाबद्दलचा अजमास सपशेल चुकला. नित्यंकाचें नांव ऐकतांच त्याला त्या मंदिराशीं धरणेंच धरून बसण्याची भावना झाली. खेरीज त्या अप्रबुद्ध व अदूरदर्शी दासींनीं बोलण्याच्या सढळपणांत ज्या जाळीचा उल्लेख केला त्याचाही पूर्ण फायदा घेण्याची कामसेनास सवड सांपडली. त्यानें तेवढ्यांतल्या तेवढ्यांत अक्कल लढवून त्यांच्याजवळ अशी बतावणी केली कीं, “ तुमच्या बाईसाहेबांच्या एकांतभाषणांतील अर्थाबद्दल तुमची गैरसमजूत झाली आहे. माझें व बाईसाहेबांचें जें खलबत झालेलें आहे तें या नित्यंकाबद्दलच आहे. मला येथें येण्यास कांहीं विशेष अडचणीनें उशीर झाला ह्मणून मला तुमच्याजवळ परवानगी काढण्याचा प्रसंग आला हें निराळें. बाईसाहेबांची व माझी आधींच भेट होऊन मी त्यांच्या सल्ल्यानेंच येथें दडून बसावयाचा होतो; आणि सध्यां चालला आहे या प्रकारचाच एकांत मंदिरांत चालावयाचा होता. असो; मला उशीर झाला तरी इच्छित कार्यभाग साधला आहे. तुह्मी फार जपून अशाच पाहरा करीत रहा. मी त्या जाळीशीं जाऊन बसतों. येवढ्यांत माझ्याप्रमाणेंच जर आणखी

कोणी येथें येईल तर प्रथम मला कळवा. म्हणजे पुढें काय करावयाचें तें मी सांगेन. तुम्ही दोघी व मी तिसरा अशा सर्वांनीं मिळून मोहसंवमहाराज व शांभवी बाईसाहेब यांचें कार्य चोखरीतीनें पार पाडलेंच पाहिजे."

ही कावेबाजपणाची बतावणी त्या गयाळ दासींना खरी वाटली; आणि त्यांनीं कामसेनाचें ह्मणणें सर्वथैव मान्य केलें.

कामसेन जाळीच्या शेजारीं छपून बसला. त्यानें आंतील भाषणाकडे कान लावला होता तेव्हां त्यास शांभवीच्या तोंडचे असे शब्द ऐकूं आले कीं, "राजकन्या प्रमिला हिला कोणी बाहेरच्या चोरानें पळवून नेलें नाहीं. तिला पळविणारा चोर घरचाच आहे. त्या चोराचें नांव व्यक्त करणें जरी अगदीं अयोग्य आहे व त्यामुळें मला नीचता पत्करावी लागणार आहे तरीपण आपल्या मनाच्या संतोषापुढें मला माझ्या नीचपणाची मुळींच दिक्कत नाहीं. माझ्या पतिराजांनींच प्रमिलेला दडवून ठेविलें आहे. त्यांत त्यांचा अंतस्थ हेतु काय आहे तें मला माहीत झालेलें नाहीं. त्या कामीं त्यांना आणखी कोणी साथीदार आहेत की नाहींत हेंही मला ठाऊक नाहीं."

हें वर्तमान कळतांच नित्यंक आश्चर्यभरित झाला. तो कांहींसा खिन्न होऊन ह्मणाला, "आपले प्रियपती मोहसंव महाराज ह्मटले म्हणजे राजकन्येचे चुलत बंधूच होत. त्यांनीं आपल्या भगिनीला चोराप्रमाणें घरांतून नाहींशी करून दडवून ठेवणें हें मोठेंच भयंकर धाडस होय ! असें करण्यांत त्यांचा हेतु चांगला आहे कीं वाईट आहे याची वाटाघाट करीत बसण्याचा हा समय नव्हे. त्याचप्रमाणें या दुष्ट साहसांत त्यांचें जर कोणी दुष्ट मददगार असतील तर त्यांचीं नांवें समजणें ही गोष्ट देखील या वेळीं मोठीशी निकडीची नाहीं. सांप्रत राजकन्या कोठें आहे; तिच्यासंबंधानें त्या स्थळीं काय बंदो-बस्त आहे या गोष्टी कळणें अत्यंत जरूर आहे. सत्य, शुद्धता, नेकी हे सद्गुण राखण्यासाठीं तुह्मी आपल्या पतीचें घाणेरडे व अपायकारक कारस्थान बाहेर फोडतां हें आपणास एकप्रकारें भूषणच आहे."

नित्यंकाच्या या भाषणानें शांभवी थोडी घोटाळ्यांत पडली. त्याच्या या भाषणांत कांहीं गुप्त अर्थ असावा अशी तिला शंका आली. तेव्हां ती चाणाक्षपणानें बोलूं लागली, "आपण उच्चारलेल्या सद्गुणाप्रमाणें अनेक उच्च सद्गुणांचा पुतळाच माझ्यापुढें उभा असल्यानें व त्याच्याकडून माझ्या पतीशीं साधारणतः होणाऱ्या अविश्वासाबद्दल इच्छित मोबदला मिळण्याचें आश्वासन

असल्याकारणानेंच मी हें गुप्त उघड करीत आहे, हें आपण चांगलेंच ध्यानांत ठेवलें पाहिजे. असो; राजकन्या प्रमिला हल्लीं एका गुहेमध्यें वास्तव्य करीत आहे. ती गुहा चांगली ऐसपैस आहे. ती एका डोंगराच्या पोटांत मुद्दाम तयार केलेली आहे. तो डोंगर येथून सुमारें दोन तीनशें कोस दूर आहे. या मंदिराच्या दक्षिणदिशेनें सरळ गेलें म्हणजे एक निबिड अरण्य लागतें. तें अरण्य ओलांडलें म्हणजे त्याच डोंगराच्या पायथ्यास सुरवात होते. पायथ्याच्या उजव्या हातानें सरासरी मैल दीड मैल डोंगर चढला असतां ती दरी लागते. तिचें द्वार सहजासहजीं ओळखतां येण्यासारखें नाहीं. तें द्वार एका मोठ्या दगडी देवानें बुजविलेलें असतें. तो देव म्हणजे शेंदुर लावलेला एक म्हसबो आहे. त्या म्हसोबाच्या कडकपणाबद्दल आसपासच्या गांवढळ लोकांत मोठा वचक आहे. बहुतेक मनुष्यें त्याठिकाणीं जाण्यास वचकतात. कोणी धाडसानें गेलेंच तर लांबूनच त्या म्हसोबास नमस्कार करून नारळ वगैरे फोडतात. तो म्हसोबा म्हणजेच त्या गुहेचें द्वार होय. तें दूर ढकलून बेलाशक आंत शिरावें आणि बाहेर राहणाऱ्यानें तें द्वार पुन्हा होतें तसें बसवून टाकावें म्हणजे अन्य कोणाला संशयाचें कारण राहणें शक्य नाहीं. त्या गुहेमध्यें पराकाष्ठा एखादा पुरुष असतो. तोच अवश्य त्या सामग्रीचा पुरवठा करतो. प्रमिलेच्या बरोबर जो एक वृद्ध शिपाई व वृद्ध दासी असे नाहींसे झाले आहेत तेही त्याच ठिकाणीं अटकेंत आहेत. प्रमिला व वृद्ध सेवक यांना हातकडया व पायबेडया घालून ठेवलेलें असतें. ती दासी मात्र मोकळी असते. त्या सर्वांचें जेवणखाण वगैरे ती दासीच करते. असा प्रकार असल्याकारणानें एखाद्या साध्या शिपायावरच तेथील बंदोबस्त चांगला राहण्यास अडचण पडत नाहीं. ”

हें वर्णन ऐकून नित्यंक चकित् झाला. प्रमिलेच्या गुप्त स्थळची शांभवीला इतकी खडानखडा बातमी कशी याविषयीं तो किंचित् साशंक झाला. पण मोहसंघावर तिचें जें वजन होतें तें लक्ष्यांत घेतां व तिच्या कौटिल्याचा विचार मनांत आणतां त्याची साशंक वृत्ति दूर झाली. त्यानें तिला नम्रतेनें विनविलें कीं, “ आपल्या निष्कलंक प्रेमामुळेंच आपण इतकी चोख बातमी देण्याची मेहनत घेतली यांत शंका नाहीं. आपल्या मनांतील माझ्याविषयींचें तेंच निर्मल प्रेम त्या गुहाप्रवेशासंबंधानें फायदेशीर अशा कांहीं सूचना देऊं शकेल काय ? ”

नित्यंकाचा प्रश्न वाया जाण्याची भीतीच नव्हती. शांभवीनें लागलीच सांगितलें, " तशा कांहीं सूचना देणें तर अति अगत्याचें आहे. कारण माझ्या या हकीगतीच्या धोरणानें आपण आपलें कार्य साधलें तर मला त्यांत आनंदच आहे. पण या बाबतींत मी अगदीं निर्दोषी भासून सुरक्षित राहणें इष्ट आहे. या प्रकरणाच्या मुळाशीं मी आहें अशी नुसती शंका देखील निघता कामाची नाहीं. यासाठीं मी आपणास असें सुचवितें कीं, आपण किंवा आपल्या शुभेच्छुंकीं जे कोणी राजकन्येला सोडवून आणण्यास जातील त्यांनीं तेथें रात्रीच्या वेळीं प्रवेश करावा. त्यानें वेष पालटून फार जपून प्रवास केला पाहिजे. कारण त्या गुहेंत जरी एकाहून जास्त शिपाई नसतात तरी त्या वाटेनें आमचे गुप्त शिपाई टेहळणीवर असतात. खेरीज तुह्मांतून जो कोणी वीर गुहेंत प्रवेश करील त्यानें आपला चेहरा व सर्व देह झांकून वेणें अवश्य आहे कारण राजकन्येला गुहेंतून पळवून नेणारा कोण हें बाहेर कळतां कामाचें नाहीं. ती राजवाड्यांत परत आली तरी आपली मुक्तता कोणी केली याचें तिला ज्ञान असतां कामा नये. आणखी विशेष मुद्याची गोष्ट ही कीं, हें कृत्य आजपासून पंधरा दिवसांच्या आंतच उरकलें पाहिजे. कारण आजपासून बरोबर पंधराव्या दिवशीं प्रमिला त्या गुहेंत सांपडणें शक्य नाहीं. बरोबर पंधराव्या दिवशीं तेथून तिचा मुक्काम हलणार आहे. एकदां ती हातची गेली ह्मणजे मग मात्र ती परत मिळण्याची आशाच नको ! "

या सूचना विशेष महत्वाच्या आहेत असें जाणून नित्यंक तिला ह्मणाला, " आपले आम्हावर मोठे उपकार आहेत. वस्तुतः राजकन्या आपल्यालाही कांहीं कोणी परकी नाहीं. तरी पण तिच्याविषयींचें हें सर्व गूढ कारस्थान आपल्या पतिराजांचेच असल्याकारणानें हा विषय विशेष नाजुक झालेला आहे. आपण परोपकारबुद्धीनें व आपल्या थोरपणास जागून केवळ आपला शब्द खरा करण्याकरतां हें असलें महत्वाचें गुप्त फोडलें याबद्दल आह्मीं आपले आभार मानावे तितके थोडेच आहेत. याबद्दल ईश्वर आपलें कल्याण केल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या सर्व सूचना अक्षरशः पाळून आपला निर्मळपणा सुरक्षीत राखणें हें आमचें काम आहे. तें बजविण्यास आह्मी तत्परच राहूं. "

नित्यंकाचें हें भाषण व्यवहारदृष्ट्या योग्य व पुरेसें होतें. पण शांभवीला तें मुळींच रुचलें नाहीं. तिला त्याची उपकारबद्धता नको होती. परोपकारजन्य पुण्य किंवा परहितापासून उत्पन्न होणारा लौकिक यानें तिच्या मनाचें समाधान होणारें नव्हतें. तिला नित्यंकाचा अखंड स्नेह पाहिजे होता. त्याच्या भाषणांत त्यासंबंधानें एक अक्षरही निघालें नाहीं असें पाहून ती मोहसंमूढ स्त्री कांहींशी खिन्न, कांहींशी हताश व कांहींशी क्रुद्धही झाली. तिनें आपल्या या तिन्ही वृत्ति लपवून ठेवून तो नित्यंकाला जागे करण्याच्या बुद्धीनें पुन्हां सूचनापूर्वक वाणीनें ह्मणाली, "यांत उपकार कसले आले आहेत! मी हें काम केवळ निरपेक्षबुद्धीनेंच केलेलें नाहीं. हें आपणही जाणत असलाच पाहिजे. मग मला विनाकारण एवढी थोरवी देण्याचें कारण काय? पुण्य, पावित्र्य, औदार्य, सत्य, अशा प्रकारच्या सद्गुणवृत्तीनें माझें शांतवन होणार नाहीं."

इतकें बोलून कांहीं विचार करण्यासाठीं किंवा पुढें कांहीं सुचेना ह्मणून ती चरीचशी थांबली. तेव्हां त्यांचें मुद्याचें भाषण संपलें असें समजून किंवा जरी त्यांच्यात आणखी कांहीं संवाद झाला तरी तो आतां उपकारप्रत्युपकार मानण्यापुरतां केवळ लौकिकीच होणार असें धरून चालून कामसेन जाळीपासून निघून गेला. त्यानें दासींना आपला कार्यभाग झाला असल्याचें सांगून त्यानें त्यांचा निरोप घेतला. आणि आपण आल्याचें वर्तमान शांभवीच्या कानावर घालण्याबद्दल सूचना देऊन तो आपल्या घराच्या रस्त्याला लागला.

बराच वेळ थांबून शांभवीनें आपलें मध्येंच थांबलेलें भाषण पुढें चालविण्यासाठीं असें ह्मटलें कीं, "मी किंवा माझा पती, त्याचप्रमाणें आपण किंवा राजपुत्र धर्मध्वज यांतून कोणालाही प्रमिला परकी नसली तरी आज तिच्यावर प्रसंग आहे व आपण तिला मुकला आहां हें खास! प्रमिलेसारख्या रत्नाची प्राप्ती हेंच आज आपलें मुख्य ध्येय आहे. तें अमूल्य रत्न आपल्या पदरांत टाकण्यास आज मी तयार झालें याचें कारण तसलीं हजारों रत्नें ओवाळून टाकावीत असा आपला अधिकार होय. असा अमूल्य व देदीप्यमान नरचिंतामणी मी आपल्यासमोर उभा राहिलेला प्रत्यक्ष आपल्या दृष्टीनें पाहतें आहे; पण कुबेर नगरींतलें वैभववर्णन वांचून दारिद्र्याचा नाश होणें शक्य आहे कां? थंड प्रदेशाच्या गोष्टी ऐकून

उष्णतेचा ताप निवारण कसा होणार ? स्वादिष्ट व मिष्ट पक्वान्नांच्या गप्पांनीं किंवा नुसत्या दर्शनानें क्षुधार्ताची भूक यत्किंचितही कमी न होता अधिक खवळते हें न कळण्याइतके अप्रबुद्ध आपण कसे असाल ? ”

हीं शैलीयुक्त व सफाईदार वाक्यें ऐकून नित्यंक डगमगणें शक्यच नव्हतें. पण त्यामुळें तो आश्चर्य व उद्वेग यांनीं व्याप्त झाला. आतांपर्यंत त्यानें शांभवीच्या मनांतील आशाज्योत मालवून टाकिली नव्हती. आतां तिच्या जवळचें त्याचें कार्य उरकलें होतें. आतां तो आपल्या वचनपूर्ततेविषयीं बेफिकीर होता. वचन आणि वचनपूर्तता यांतील खरें तत्व व महत्व काय आहे हें तो तत्वतः जाणत असल्यानें तो शब्दभ्रष्ट झाले असतां लागणाऱ्या पातकाचें स्वरूप ओळखत होता. त्याला त्या समयीं व त्या परिस्थितींत विश्वासघात, मित्रद्रोह, वचनपराङ्मुखता याबद्दल मुळींच दिक्कत वाटत नव्हती. फार दिवस आशेच्या ओलाव्यावर जीव धरून मनोराज्यांतील आनंदगिरीच्या शिखरापर्यंत भराऱ्या मारणाऱ्या शांभवीच्या मनाला एकदम निराश करून टाकावें आणि तिला शक्य तो सद्बोध करावा या उद्देशानें नित्यंक तिला हाक मारून ह्मणाला, “ बाई ! आजपर्यंतच्या तुमच्या आचार-विचारावरून मला तुमचें अंतरंग समजून चुकलें आहे. तुमच्या मनांतील आशय अधिक स्पष्ट करण्याचें बिलकुल प्रयोजन राहिलेलें नाहीं. कोणत्या तरी बऱ्यावाईट हेतूनें मीं आतां पावेतों तुमची भीड धरली व तुमच्या आशेला पोषक असें भाषण केलें ही माझी सर्वथैव चूक होय. तुमचे विचार अतिशय नीच व त्याज्य आहेत. सिंधुपती राजा वसुप्रसाद याच्या कुलांतील कुलवंत कामिनींनीं भलभलत्याच लीला चालविणें, केवळ सौख्योपभोगावर नजर ठेवून धर्मभ्रष्ट, अनीतिकारक वर्तन करणें ह्मणजे उच्चतम पौरव कुलाला काळाकुट्ट कलंक लावणें होय ! तुह्मी आपलें कुल, शील, लौकिक, पहा. आपल्या वाडवडिलांची अब्रू ध्यानांत आणा ! आपल्या सनातन धर्माचें ब्रीद लक्ष्यांत घ्या ! इतका विचार करून आपल्याला माझ्याशीं स्नेह ठेवणें उचित वाटेल असें मला वाटत नाहीं. ”

नित्यंकाचें हें भाषण ऐकतांनी असून तो आपल्या मनाचा खंबीरपणा पहात असावा असा तर्क करून ती स्वेच्छाचारी शांभवी ह्मणाली, “ आप-ल्याला असें वाटत नाहीं ह्मणूनच आपण अद्याप माझा स्वीकार करीत नाहीं हें मी जाणतें. प्रेमापुढें कुल, शील, धर्म, नीति यांची प्रतिष्ठा पाळगणें म्हणजे

त्या प्रेमाचा उणेपणाच व्यक्त करणें होय. माझें आपल्या विषयींचें प्रेम दृढ, अचल आणि निश्चित आहे. आपण माझी कशाही तऱ्हेनें कसोटी पाहिली तरी मी एक रेसभरही कसाला कमी भरणार नाहीं. आपलें मन संशयखोर दिसतें. आपली संशयावस्था दूर होणें म्हणजेच माझ्या मनोरथाची प्राप्ति होणें होय. आपली शंकितावस्था नाहींशी करण्यास म्यां काय करावें ती आज्ञा व्हावी."

शांभवी आपल्या भाषणाचा भलताच गूढार्थ कल्पून विनाकारण स्वतःचा गैरसमज करून घेत आहे व अद्याप तिला तिच्या कामनातृप्तीची दृढ आशा आहेच असें जाणून नित्यंक पुन्हां बोलला, "बाई ! तुमचा अधिकार काय हें तुह्मी ध्यानांत घेत नाहीं. तुह्मी उच्च मानव कोटींतील असून कुत्र्यासारख्या नीच पशुवृत्तीचा अवलंब करीत आहां हें गऱ्हणीय नाहीं काय ? तुमचे यजमान मोहसंव महाराज यांच्या तुह्मी विवाहित पत्नी आहां. पतिपत्नींचा धार्मिक व कर्तव्यपर बंध हा कधींही व कोणत्याही स्थितीच्या ओढीनें सैलावणारा नाहीं. पंचतत्वांना साक्षी ठेवून ज्या पुरुषास स्त्रीनें माळ घातली तोच तिचा देव होय ! तोच तिचें आराध्य दैवत होय. त्याच्यावांचून अन्य पुरुष तिला पिता, पुत्र व बंधु यांसारखे होत. त्याची एकनिष्ठ सेवा हेंच तिचें अमरणांत कर्तव्य होय ! या कर्तव्यपरायणतेनेंच ती स्त्री आपलीं दोन्हीं कुलें पावन करूं शकते. हा सर्व विचार ध्यानांत आणून आपण मोहसंवमहाराजांच्या चरणीं एकतानतेनें लीन होऊन न रहाल तर पुढें काय काय प्रसंग ओढवतील बरें ?"

नित्यंकाचे विचार आपल्या कल्पनेहून बरेचसे भिन्न आहेत असें आतां कोठें तिच्या मनांत येऊं लागलें. तरी पण अद्यापही तो आपलें मन पाहण्या-साठीं व कांहींसा भीतिग्रस्त होऊनच असें बोलत असावा अशी कल्पना करून ती उच्छृंखल स्त्री बोलली, "आपल्या मनाची अशी धांदल उडते आहे याचें कारण आपल्याला अनुभव कमी हेंच होय. माझ्या भाषणांतील सार जाणून आपली शंकितावस्था दूर झालेली दिसते ! पण उपयोग काय ? चुलींतून निघून फोपाट्यांत पडावें असें ह्मणण्यापेक्षां फोपाट्यांतून निघून चुलींत पडावें अशी आपल्या मनाची व विचारांची स्थिति दिसतें ! आपलें मन शंकितावस्थेंतून निघून भीतिग्रस्त झालें असावेसें दिसतें. हें स्थल माझ्या पतीच्या मालकीचें व त्याच्या अधिकारातलें आहे असें समजून येथील

सुखमय आदराचा स्वीकार करण्यास आपण कचरत असाल आणि माझा अवमान करीत असाल तर आपण कोणत्याही प्रकारचें भय धरूं नये. आपल्या सहवासाचा आनंद भोगण्यास आपण न्याल तिकडे येण्यास मी तयार आहें. मनुष्यप्राणी आपल्या मनाचा स्वतंत्र आहे. आपलें सुख साधण्यास व आपल्या मनाचा संतोष राखण्यास तो मुखत्यार आहे. फक्त त्यानें सरकारचे कायदे चोख रीतीनें पाळण्याची खबरदारी घेतली ह्मणजे बस्स आहे. चोरी, असत्यप्रतिपादन, बेकायदेशीर परापहार, परपीडा, खून, खोटे कागद, फसवणूक अशाप्रकारचे व कायद्यानें प्रतिबंध केलेले अपराध न होऊं देण्याची खबरदारी घेतली ह्मणजे झालें. मी स्वतःच्या मनास अनुसरून आपल्या संगतीं जन्मभर काळ काढण्यासाठीं येणें यांत कांहीं गुन्हा नाहीं. हें ज्याच्यात्याच्या मर्जीचें काम आहे. यामध्यें माझ्या पतीची भीति बाळगण्याचें कारणच नाहीं. माझ्या पतीचा मजवर पति या नात्यानें हक्क आहे; पण त्यास तो हक्क केव्हां बजावतां येईल ! जेव्हां मी त्याच्या संगतीं राहून संसार करण्यास खुषी असतां माझ्या इच्छेविरुद्ध कोणी लबाड मनुष्य मला फसवून किंवा जबरीनें पळवून नेईल तेव्हां ! मग आपल्या या बाबतींत तसा प्रकार मुळींच नाहीं. मी कांहीं आतां अज्ञान नाहीं. मी प्रौढ, शहाणी, ज्ञानी व विद्यासंपन्न असून माझे हित, सुख, समाधान, हक्क, अधिकार कळण्यास मी समर्थ आहें. आपण मला कोणत्याही प्रकारें भोंदीत नाहीं. मी स्वतः आपण होऊन राजीखुषीनें अक्कल व हुषारीनें माझ्या पतीचा त्याग करून आपल्याला माळ घालण्यास तत्पर असतांना आपण भयाला हार जाणें हें जवळ जवळ नामर्दपणाचेंच काम आहे. मग आपलें काय म्हणणें असेल तें खरें. ”

हें एखाद्या बाजारबसवीसारखे अभद्र भाषण ऐकून नित्यंकाच्या अंगावर शहारे आल्यासारखे झाले. त्याचें अंतःकरण क्रोध व तिरस्कार यांनीं व्याप्त झालें; पण आवेशपूर्ण भाषणावांचून अन्य कांहीं प्रत्यक्ष कृति करण्यास तो असमर्थ किंवा नालायख असल्याकारणानें तो संतापयुक्त स्वरानें ह्मणाला, “ कायदेशीर आचरणासंबंधानें तुह्मी जो मुद्दा प्रतिपादला तो मलाही मान्य आहे. पण त्यावांचून तुमच्या तोंडून बाकीचे जे अमंगळ प्रलाप निघाले ते कदाचित् मला न समजतां माझ्या तोंडून निघाले असते तर मी आपल्या हातांनींच स्वतःची जिव्हा कापून टाकली

असती. आतांपर्यंत आदरातिथ्याच्या तत्वास अनुसरून मी तुम्हाला आदरार्थी अनेक वचनानेंच संबोधिलें. पण तेवढ्या कोरड्या मानालाही तुह्मी पात्र नाहीं. ह्मणून आतां स्पष्टपणें सांगतों कीं, हे कुलांगार कामिनी ! तूं मनुष्यरूपी डाखीण आहेस ! नष्टे ! तुझा भ्रतार मोहसंघ हा वस्तुतः अत्यंत नीच पुरुष आहे. तरी पण पति या नात्यानें तुला तो वंद्य आहे. त्याच्या गैर व हीन आचारविचाराबद्दल खंत मानून त्याला सुधारणें हेंच तुझें कर्तव्य होय ! तो मेला तरी तूं जिवंत आहेस तों पावेतों तुला तो त्याज्य नव्हे. हे पापिणी ! तुझें सर्व शरीर अंतर्बाह्य पापस्नात असल्यानें तुझ्या तोंडून किळसवाणें तत्वविचाराबाहेर पडत असले तरी मीं सांगितलेलें पत्नीच्या कर्तव्याबद्दलचें तत्वच सनातन-धर्मानें कंठरवानें प्रतिपादिलें आहे हें चांगलें लक्ष्यांत वागीव. धर्मप्रणीत आचारतत्वें त्रिकालाबाधित, सत्यपूर्ण व हितपरिणामीं आहेत यांत रतिमात्र संशय धरूं नको. श्रुतिप्रणीत, सज्जनमान्य, शास्त्रविहित तत्वांच्या डोक्यावर नाचून आपल्या पापी व नीच मनाचा छंद पुरविण्याच्या खटाटोपानें अखेर कोणाच्याही तोंडांत मातीच पडेल हे निर्विवाद आहे. नीच विकारास तूं हार जाऊं नको. हीन वृत्तीची तूं बटीक होऊं नको ! भ्रष्ट विचारांना बळी पडूं नको; लावण्य काळाच्या भ्रामक मोहास भुलूं नको; खडतर परिस्थितीच्या जबरदस्त टोचणीला डरूं नको; चंचल व सौख्य-लोलुप मनाच्या नीचतम प्रेरणेस भीक घालूं नको. आपला सनातन धर्म डोक्यावर वागीव ! ईश्वरतुल्य साधुसंतांनीं सांगून ठेवलेलीं उज्वल नीतितत्वें अक्षय्य हृदयांत वागवून सद्धर्मसंमत सदाचाराचेंच दास्य कर. यापेक्षां जास्त कांहींएक बोलण्याची माझी इच्छा नाहीं. तूं आपल्या वचनास जागून मला राजकन्येची गुप्त हवाल कळविली आहेस हे तुझे महदुपकार आहेत. मी आपल्या वचनाप्रमाणें मात्र वागलों नाहीं; पण त्यांत माझी कांहीं चूक आहेसें मला वाटत नाहीं. तूं मला जी गुप्त हकीगत सांगितलीस त्याचें खरें कारण वचनाची किंमत हें नसून तुझ्या नीच भावनांची स्फूर्ति हें होय ! आतां त्या योगानें तुझें मजवर जें ऋण झालें आहे त्याची फेड मी अन्य तऱ्हेनें करूं शकेन. तूर्त त्याची फेड ह्मणजे मी हा सर्व घडलेला प्रकार अत्यंत गुप्त ठेवीन हीच होय. आतां तुझ्याप्रमाणेंच चांडालकर्मी होण्याचें पतकरून मीं आपलें वचन पाळण्यास तयार होणें ह्मणजे माझ्या शक्तीच्या

बाहेरचे आहे. ( कारण मी सर्वस्वी आपल्या गुरूचा—गोसावीबोवांचा बंदा आहे. माझ्या एकंदर भाषणाचा योग्य विचार केलास तर तुझें अत्यंत कल्याण होईल. या उप्पर तूं व तुझें नशीब. आतां तुझी परवानगी न घेतां मी येथून निघून जातों. जाण्याच्या समयीं मी तुला पुन्हां एवढेंच सांगतों कीं, तुझ्या या विचित्र चेष्टांचा स्फोट होण्याची काडी इतकी देखील भीति धरूं नको. त्याविषयीं तूं अगदीं बेफिकीर रहा. जणूं काय तुझें व माझें कांहींएक बोलणें झालें नाहीं असें बेलाशक मान. तसें शक्य नसेल तर तूं हें सर्व भाषण आपल्या सख्या बहिणीजवळच केलेंस असें मानून अगदीं निश्चित रहा. ”

असें बजावून त्र्यंबक मंदिराचें दार उघडून आल्या वाटेनें बाहेर पडला.

---

## प्रकरण ३३ वें.

### भगिनीशुद्धि.



निर्त्यंक आणि शांभवी यांचा मंदिरांतील गुप्त संवाद ऐकून धर्मध्वजाचें अंतःकरण वृत्तिवैचित्र्यानें व्यापून गेलें. आपली भावजय शांभवी कुलघातकी आहे असें जाणून तो अत्यंत उद्विग्न झाला. शांभवीचा पति मोहसंघ हा आपला वडील बंधु असून आपल्याला पाण्यांत पाहतो हें जरी त्याला कळून चुकलें होतें; त्याच्या कपटमय वर्तनाबद्दल जरी त्याचें मन गढुळलें होतें तरी त्याच्या मनांत त्याविषयीं वैरभाव उत्पन्न झाला नव्हता. त्याचा किंवा त्याच्या कुलांगार पत्नीचा घात व्हावा अशी त्याची इच्छा नव्हती. शांभवीच्या एकंदर उद्गारावरून ती पापगर्तेच्या काठावर निःशंकपणें आंत उडी घेण्यास सरसावलेली दिसत होती तरी अद्याप तिनें आपला पवित्रपणा व सद्गुण मलीन केला नसावा असें खास अनुमान निघत होतें. मोहसंघाच्या मनावरील भलतेच संस्कार आणि त्याच्या संसर्गदोषास सर्वस्वी पात्र अशा शांभवीच्या मनावरील अशुद्ध व पोटभरू विद्येचा दाब यांच्या परस्पर

संमेलनाचाच तो दुष्ट व भ्रष्ट परिणाम होय असें ठरवून धर्मध्वजानें प्रसंग साधून शांभवीला उपदेश करून सन्मार्गाला चिकटून राहण्यास लावण्याचा यत्न करण्याबद्दल आपल्या मनाशीं ठरवून ठेविलें. नित्यंकासारख्या तारुण्य-संपन्न मनुष्यानें शांभवीला तुच्छवत् करून जीं कल्याणकारी व धर्मपोषक तत्वें सांगितलीं त्याबद्दल राजपुत्राला मोठाच गहिंवर दाटला. आपला मेहुणा नित्यंक याच्या वीर्यशालीपणाबद्दल तो एकसारखा आपल्या मनाशीं कौतु-कच करीत राहिला. राजा वसुप्रसाद, राणी इंदुमती, पुरोहित दमन यांना तो नित्यंकाचा वीर्यसंपन्न महिमा कळवून नित्यंकाला त्यांच्या देखत एकदां कडकडून मिठी मारावी असें त्याच्या मनांत वरचेवर येऊं लागलें. पण आपण तो सर्व प्रकार गुप्तपणें पाहिला असून तो गुप्तपणा बाहेर फोडणें प्रशस्त न वाटल्यामुळें त्याला आपला सर्व उत्सुकपणा तसाच दाबून ठेवावा लागला. कालेंकरून आपला तो हेतु पूर्ण होईल अशी त्याची खात्री होती.

कोणासही न कळत शांभवीच्या मंदिरांतून बाहेर पडण्याची संधी साधून तो बागेंतील पर्णकुटिकेमध्यें नित्यंकाच्या भेटीस गेला. गोसावी-बोवांच्या सूचनेनें व सल्यानें धर्मध्वज त्या मंदिरांत गुप्तपणें आपला व शांभवीचा संभाषण प्रसंग पाहण्यास हजर होता हें नित्यंकास ठाऊक नसल्यानें त्यालाही वरचेवर असें वाटे कीं, तो सर्व भाषणप्रसंग राज-पुत्रास कळवावा. प्रमिलेची गुप्तवार्ता समजतांच राजपुत्र तिला सोडवून आणण्यासाठीं निघेल व अर्थातच आपणास बरोबर नेईल; त्या प्रसंगानें राजपुत्राच्या एकांत सहवासाचा जो अनुभव मिळेल त्यांतच आपला जन्म धन्य करून घ्यावा. अशा प्रकारच्या अनंत विचारांनीं नित्यंकाचें मन खळ-बळून गेलें पण तो करणार काय ? गोसावी बोवांची त्याला तशी आज्ञा नव्हती ! तो गोसाव्याला सर्वमान्य समजत असे. त्यामुळें नाइलाज होऊन तो त्यासंबंधीं मुग्ध राहूनच धर्मध्वजाचा उमदा चेहरा व वीर्यशाली आवि-र्भाव न्यहाळण्यांत रममाण झाला. त्याची ती वृत्ति धर्मध्वजाच्या लक्ष्यांत येई. पण त्यांतील भावार्थ समजत नसल्यामुळें तो आपले विचार अन्य विषयाकडे वळवी.

गोसावीबोवा सकाळ झाली तरी आले नाहींत तेव्हां नित्यंकानें थोडीशी चिंता दर्शविली. त्याच्या जोडीला मोहसंघ व सरदार जयसिंग असल्यामुळें तो अस्वस्थ झाला असावा असें जाणून राजपुत्रानें त्यास सांगितलें

" तुह्मी अधीर व अस्वस्थ होऊं नका. ती सर्व मंडळी लवकरच परत येतील. जयसिंग व मोहसंघ हे कोणत्याही तऱ्हेचे घातकी लोक असले तरी गोसावीबोवासारख्या सात्विकी गुरुभक्तास अपाय करण्याची त्यांची छाती नाहीं. मलाही गोसावीबोवांच्या आगमनाची तुमच्यापेक्षां जास्त निकड आहे. आणखी एक दिवस फार तर मला त्यांची वाट पहाण्यास फुरसत आहे. तेवढया अवधींत ते परत आले नाहींत तर तुह्मी ते येतील तेव्हां त्यांना माझा असा गुप्त निरोप कळवा कीं, ' तुमच्या सूचनेप्रमाणें मी सर्व काम चोख बजाविलें. मला त्यांत पूर्ण यश आलें व मोठया लाभाची प्राप्ति झाली. तो लाभ काय तो मी पुन्हा परत आलों ह्मणजे प्रत्यक्षच दिसेल. ' परवांच्या दिवशीं कांहीं अत्यंत महत्वाच्या व गुप्त अशा राजकीय कामासाठीं मला दूर देशीं गेलें पाहिजे. मी सुमारें पंधरातीनचारांनीं परत येईन. उद्यांच्या दिवसांत बोवाजी परत आले तर माझ्या गुप्त राजकीय कार्याला आपण त्रिवर्गांनीं जाणेंच इष्ट आहे. पण तसें न झालें तर आपण येथेंच राहून गोसावीबोवास माझा निरोप कळविणें जरूर आहे. मी परत आलों ह्मणजे गोसावीबोवाबरोबर तुम्हांलाही माझें महत्वाचें कार्य विदित होऊन आनंदाचें भरतें येईल हें खास. "

इतकें भाषण झाल्यावर राजपुत्र कांहींवेळ नित्यंकासह बागेंत फिरून राजवाडयांत निघून गेला. शिष्य नित्यंक राजपुत्राच्या भाषणावर कल्पना करीत आणि आपल्या गुरुच्या आगमनाची वाट पाहत आपल्या झोंपडींत जाऊन बसला. दुसऱ्या दिवशीं वाट पाहून गोसाव्याच्या आगमनाविषयीं निराश होतांच त्यानें राजा व पुरोहित यांची एकांतांत गाठ घेतली. त्यासमयीं त्यानें त्यांना शांभवीच्या मंदिरांतील हवाल कळविली नाहीं. फक्त कांहीं बारीक चौकशी वरून आपल्याला प्रमिलेचें वास्तव्य कळलें असल्याचें सांगून त्यानें त्यांच्या समक्ष त्या स्थानाचें व त्यांत प्रवेश करण्याच्या तऱ्हेचें यथासांग वर्णन केलें. राजा व पुरोहित यांनाही त्या वर्णनानें आनंद वाटला. त्यांनीं आनंदानें राजपुत्रास प्रमिलागुहेकडे जाण्यास परवानगी दिली. गोसावीबोवा परत येईपर्यंत भोगपालानें नित्यंकाच्या सोबतीला बागेमध्यें असावें असें सर्वांच्या मतानें ठरलें. प्रमिलेची प्राप्ति होतांच माधवी व दीक्षादेवी यांच्या शोधास झपाट्यानें लागावयाचें आणि त्या प्राप्त झाल्या ह्मणजे मग मोहसंघ जयसिंग, कामसेन यांचा विचार पहावयाचा असा त्यांचा संकेत ठरला.

वेष पालटण्याचें जरूर तें साहित्य बरोबर घेऊन तो शूर राजपुत्र पांच-सात निवडक व विश्वासू अशा सेवकांसह भगिनीच्या शोधास बाहेर पडला. त्या सर्वांनीं लष्करी पोषाख केला होता. सर्वजण घोडयावर स्वार झाले होते. राजपुत्र सर्व प्रकारच्या संरक्षक हत्यारांनीं युक्त होता. वाटेनें जातांना कांहीं विघ्न आलें किंवा त्या गुहाप्रवेशांत कांहीं अडचण उद्भवली तर आपल्या तरवारीच्या जोरावर आपण तें विघ्न किंवा अडचण नाहींशी करूं आणि प्रमिलेला सुरक्षितपणें राजधानीस आणूं अशी जरी राजपुत्राला उमेद होती, प्रमिलेच्या तोंडून तिच्या छळकाचें नांव समजलें ह्मणजे त्याचाही पुरा समाचार घेऊं असा जरी त्याला आत्मविश्वास होता तरी तो तेवढयाच घमेंडीवर शेफारणारा नव्हता. कोणत्याही महत्वाच्या कार्यास मातापिता, कुलगुरु, पुरोहित, आचार्य, जगद्गुरु, साधुसंत यांसारख्या सात्विकी विभूतींच्या आशीर्वादानेंच यश येतें अशी त्याची ठाम समजूत असल्यानें तो त्यांना नमन करून आपला खरा प्रभू-धनी-मालक-सर्वाधिकारी जो श्रीभारती याचें एकसारखें स्मरण करीत चालला होता. याप्रमाणें आपल्या गुरूची मनोमय प्रार्थना करीत व आपल्या उद्दिष्ट कार्याबद्दल अनेकप्रकाराच्या योजना करीत तो भाग्यवान् राजपुत्र प्रमिला–गुहेच्या दिशेनें मार्गक्रमण करूं लागला.

---

## प्रकरण ३४ वें.

### दुटप्पी वर्तन




हसंघ व जयसिंग यांचें राजपुत्राच्या खुनाबद्दल शांभवीशीं जें कारस्थान चाललें होतें तें दिवसानुदिवस लांबणीवर पडत आहेसें पाहून त्या दोघांसही फार असमाधान वाटत होतें. त्यांतल्यात्यांत सरदारानें मोहसंघाला तो खून घडवून आणण्याची विशेष निकड लावली. खेरीज वीरबाहु दीक्षादेवीच्या शोधार्थ गेल्याला कितीतरी दिवस झाले तरी त्याचा कांहींच सुगावा समजत नव्हता; त्या कारणानेंही ते त्रस्त झाले होते. तेव्हां शांभवीच्या अपरोक्ष एकदां गोसावीबोवास समक्ष

गांठावें आणि त्यांना त्यांच्या शांभवीशीं चालूं असलेल्या गुप्त कार्याची ओळख देऊन प्रत्यक्षच कायतें विचारूत तो खून अमलांत येईल असें करावें, या उद्देशानें ते दोघे गोसाव्याला घेऊन एका अरण्यात गेले होते. वस्तुतः शांभवीनें मोहसंघाला गोसावी व नित्यंक यांच्या द्वारें राजपुत्राचा खून करविण्याबद्दल जें काय सांगितलें होतें तें सर्व बनावट होतें. तिनें त्या दोघांतून कोणाहीजवळ राजपुत्राच्या गुप्तवधाबद्दल अवाक्षरही काढलें नव्हतें. तिच्या मनांत राजपुत्राचा घात करावा ही गोष्ट वास करीत होती हें निश्चित होय; पण त्याची तजवीज तिनें अन्य तऱ्हेनें केली होती. तिनें नित्यंकाजवळ ज्या गुहेचें यथासांग वर्णन केलें ती गुहा खरी होती. पण त्या ठिकाणीं प्रमिला नव्हती हें उघडच होतें. तिनें त्या ठिकाणीं जयसिंगाजवळचे रानटी, धाडसी व नवखे शिपाई ठेवले होते. त्या सर्वांनीं आपले चेहरे झांकून घेऊन गुहेंत असावें आणि तशाच प्रकारच्या वेषानें जीं कोणी एक-दोन-चार-नवखीं माणसें गुहेंत प्रवेश करतील त्यांस तात्काळ तोडून टाकावें अशी तिची त्यांना सक्त आज्ञा होती. हा राक्षसी बेत सिद्धीस जावा आणि राजपुत्र धर्मध्वज व नित्यंकाचा गुरु गोसावी यांना तेथें अचानक कंठस्नान मिळावें या हेतूनेंच तिनें नित्यंकाला ती गुहा मोठ्या कळवळ्यानें जाहीर केली होती. नित्यंकाकडून ती बातमी राजपुत्र व गोसावीबोवा यांना कळून ते दोघे तात्काळ तिकडे जातील आणि प्रमिलेच्या प्राप्तीच्या आशेस भुलून मारेकऱ्यांच्या शस्त्रांस बळी पडतील असा तिला भरंवसा होता. त्या दोघांबरोबर कदाचित् नित्यंकही आपल्या पत्नीच्या—प्रमिलेच्या—लाभास्तव जाईल असा तिला संशय आला होता; पण तिच्या मतानें तो शुष्क व अताठायींच ठरला. कारण नित्यंकाला आपला स्त्रीकार करण्याच्या अटीवरच प्रमिलागुहा कळविली ह्मणजे त्यास आपल्याला सोडून प्रमिलेच्या शोधार्थ जाणें मुष्किलीचें होईल हें सहजच सिद्ध होत होतें. नित्यंकाला तिनें जरी हा गुहेचा वृत्तांत विपर्यासानें सांगितला तरी तिनें मोहसंघ व जयसिंग यांना तो गुहावृत्तांत सत्यपणानें समजावून दिला होता. गोसावीबोवा राजपुत्राला बरोबर घेऊन त्या गुहेंत जाणार असें त्यांचें आपल्याला वचन आहे अशी मात्र तिनें मोहसंघ व सरदार यांच्याजवळ थाप मारली होती. हा सर्व कपटमय व अविश्वासयुक्त बाजार मांडण्याचें कारण शांभवीला आपला पति, जयसिंग, कामसेन, माधवी, भोगपाळ यांना फसवून

आपलीं दोन्हीं कार्यें साधून मनाची राक्षसी हौस व घातकी महत्वाकांक्षा पुरवावयाची होती.

सरदार व मोहसंघ हे दोघे चतुर व धोरणी ह्मणविणारे दुष्ट शांभवीच्या बोलास सर्वस्वी फसले होते. गोसाव्यानें राजपुत्राला गुहेंत घेऊन जाण्याची अतिशय जलदी करावी हें त्यास सुचविण्यासाठीं व त्याच्या कामगिरीबद्दल त्याला मोठें बक्षीस देण्याची भुरळ घालण्याकरितां आणि त्यानें नित्यंक आणि राजकन्या यांचा विवाह मोडून टाकावा असा त्याला उपदेश करण्याच्या उद्देशानें त्यांनीं निबिड अरण्यांत जाऊन गोसाव्याशीं बोलणें सुरू केलें. त्यांना शांभवीच्या अनर्थकारक कौटिल्यदंभाची कल्पना नसल्यानें ते गोसावीबोवांशीं त्याला आपलाच साथीदार समजून अगदीं मोकळ्या मनानें बोलूं लागले. त्यांच्या आरंभींच्या भाषणावरून गोसावीबोवांनीं त्यांच्या विचारांचा रोख अजमावला. तो गोसावीही तसा धोरणी, चाणाक्ष, दूरदर्शी व कल्पक असल्यानें त्यानें आपण स्वतः त्यांचेच साथीदार आहों या त्यांच्या कल्पनेस कमीपणा येऊं दिला नाहीं. त्यांच्या कोणत्याही भाषणास व प्रश्नास होकार देऊन त्यानें त्यांचें समग्र भाषण यथास्थितपणें ऐकून घेतलें. त्यांत त्याला ज्या कित्येक अपूर्व, अमंगळ व सैतानी गोष्टी समजून आल्या त्यायोगानें त्याचें अंतःकरण भांबावून गेलें. त्याला त्यांच्या गर्हणीय कर्मांचा तिटकारा उत्पन्न झाला. ते स्वतः पिशाचवृत्ति असून त्यांचे विचार मनुष्यांचीं काळिजें भक्षण करणाऱ्या अघोर प्राण्यांना योग्य आहेत असें वाटून गोसावीबोवांचें धाबें दणाणून गेलें. पण भीति, थरकाप, घाबरेपणा, यांच्या योगानें सर्वच कार्यभाग फसेल असा पूर्ण विचार करून त्यानें आपली कोणतीही खरी वृत्ति त्यावेळीं त्यांच्या निदर्शनास येऊं दिली नाहीं. त्यानें त्यांचें ह्मणणें, सूचना, योजना, उपदेश, आज्ञा सर्व कांहीं शिरसावंद्य मानलें आणि तेथून परत जातांच राजपुत्राला प्रमिलागुहेकडे घेऊन जाण्याचें त्यानें त्यांना वचन दिलें.

राजपुत्र राजवाड्यांतून बाहेर पडला त्याच्या दुसऱ्या दिवशीं गोसावीबोवा आपल्या सोबत्यासह बागेंत परत आले. ते आपल्या झोंपडींत शिरले आणि मोहसंघ व जयसिंग बागेंतील मंदिरांत गेले. त्यांना शांभवीकडून सर्व कार्य सफळ झाल्याचें वर्तमान समजून राजपुत्र धर्मध्वज प्रमिलागुहेमध्यें गुप्तपणें जाऊन राजकन्येला आणण्याची प्रतिज्ञा करून गेला असल्याचें

वृत्तही कळलें. तेव्हां त्यांच्या आनंदास पारावारच राहिला नाहीं. प्रमिलेची शोध लागला नाहीं तर कामसेनाला राजजामात होऊन गादीचा वारसा फार तर मिळणार नाहीं, पण राजपुत्राचा मुडदा पडला ह्मणजे वसुप्रसादाचा वंश खुंटून मोहसंव व शांभवी यांना राजाराणीचें पद प्राप्त होईल आणि जयसिंग व कामसेन यांच्यावर उच्चसन्मान, श्रेष्ठ मरातब यांची वृष्टि होऊन त्यांचें महत्व परमावधीला जाईल अशा आनंदमय विचारांनीं ते दोन्ही ब्रह्मसमंध आणि ती डांकीण असे त्रिवर्ग प्रफुल्लित दिसूं लागले. ते आपल्याच तोऱ्यांत गर्क झाले. बरोबरच आहे, शुद्ध, सात्विक, पवित्र, सदाचारी, पापभीरू, धर्मपर, साधुसेवक अशा ईश्वरनिष्ठ माणसांना सर्वसाक्षी, सर्वसमर्थ, सर्वव्यापी परमात्मा कसें सांभाळतो याविषयीं त्या बिचाऱ्यांना कल्पना तरी कशी असणार ! तसल्या पापमूर्तींनीं आपल्याच घमेंडींत असावें, सज्जनांचा छळ करावा, धर्माचा ऱ्हास करावा, मनाचे चोचले पुरवावे आणि शेवटीं अनुताप करीत अक्षय्य नरकवास पत्करावा हेंच उचित होय !!

---

## प्रकरण ३५ वें.



### गोसाव्याचा प्रवास.




गोसावीबोवा बागेंतील पर्णकुटिकेंत शिरले त्यावेळीं तेथें नित्यंक व भोगपाल असे दोघेजण बोलत बसले होते. गोसावीबोवांना अरण्यांतून परत येण्यास विलंब कां लागला असावा याबद्दलच ते वाटाघाट करीत होते. आणखी एक दिवस वाट पाहून बोवा परत आले नाहींत तर त्यांना कांहींतरी संकटकाल प्राप्त झाला आहे असें गृहीत धरून त्यांच्या तपासास जाणें अवश्य आहे असा बेत ते ठरवीत आहेत तोंच बोवा पर्णकुटिकेंत शिरले. त्यांची दृष्टादृष्ट होतांच त्यांना बहुत संतोष वाटला. बोवांनीं आपली अरण्यांतील हकीगत कांहींच न सांगतां नित्यंकास त्यांच्या शांभवीशीं झालेल्या एकांतप्रसंगाची हवाल विचारली. ती हवाल व तो प्रसंग गुप्त असल्यामुळें नित्यंक भोगपालाच्या देखत ती हकीगत

सांगण्यास संकोच करूं लागला. तें जाणून बोवांनीं त्यास सांगितलें, " शांभवीबद्दल आपल्या मनांत जो कांहीं आदरभाव असेल तो ठेवण्याचें आतां मुळींच कारण नाहीं. ती अतिशय नीच व घातकी बायको आहे. बायको कसली ती केवळ कृत्या, लांव आहे, पशुजातींतील हिंसक प्राण्याप्रमाणें ती मनुष्याचें मांस, रक्त खात नाहीं एवढेंच काय तें ! ती शांभवी जरी या भोगपालाची भावजय आहे तरी तें नुसतें जातिजन्मसिद्ध व शरीरसंबंधाचें नातें आहे. त्यांतील उच्चतत्व व शुद्धकर्तव्यबंध लयाला गेलेले आहे. तिनेंच माधवीला सरदार जयसिंगाच्या हवालीं केलें आहे. त्यांत मोहसंघही सामील आहे. त्यांत त्यांचा अत्यंत नीच हेतु आहे. तात्पर्य, या भोगपालाचे ते दोघे शत्रु आहेत. याच्या देखत शांभवीचें कोणतेंही वर्म बोलण्यास हरकत नाहीं. "

या भाषणांतील कांहीं वाक्यांनीं भोगपाल कोपावेशानें स्फुरण पावूं लागला. पण त्यासमर्थी मध्येंच कांहीं वेगळा विषय काढणें बरें न वाटून तो सुस्कारे टाकीत गोसावी व शिष्य नित्यंक यांच्या तोंडाकडे पाहत राहिला.

गोसाव्याची सूचना ध्यानांत घेऊन नित्यंकानें निर्भयपणानें मंदिरांतील इत्थंभूत हकीकत सारांशरूपानें निवेदन केली. ती ऐकतांच गोसाव्याला मोहसंघ व जयसिंग यांच्या भाषणांतील अर्थाचा ताळेबंद पटला. त्यानें लागलीच भोगपालाला उद्देशून सांगितलें कीं, " आतांच्या आतां आपल्याला राजपुत्र भेटणें अति अवश्यक आहे. "

असें सुचवून तो भोगपालाला राजपुत्रास बोलावून आणण्याची इच्छा दर्शविणार तोंच नित्यंक व भोगपाल यांनीं त्याला राजपुत्राच्या प्रमिलागुहेकडील प्रवासाची हकीकत सांगितली. नित्यंकानें राजपुत्राला प्रमिलेचें गुप्त ठिकाण कसें ज्ञात झालें याबद्दल आश्चर्य व्यक्त केलें; तोंच गोसावी कावराबावरा दिसूं लागला. त्याच्या पोटांत धडाडी सुरू झाली. त्याच्या कपाळाला असंख्य आंठया पडल्या. तो आपल्या दातांनीं खालचा ओठ दाबून धरून मोठमोठे सुस्कारे टाकूं लागला. त्याच्या अंगाचा थरकाप होऊन त्याचे नेत्र सजल झाले; आणि डोळे फिरवीत फिरवीत ते ताठ करून अत्यंत विचारमग्न झाल्यासारखा तो मुकाटयानें उभा राहिला.

ही त्याची अवस्था पाहून नित्यंकास मोठेंच नवल वाटलें. भोगपालासही त्यांतील कांहींच अर्थ कळेना. राजपुत्राच्या गुहेकडील गमनाची हकीगत

निघतांच बोवांची अशी अवस्था झाली एवढें मात्र नित्यंकाच्या स्मरणांत आलें. त्याचाच उल्लेख करून नित्यंक त्यास विचारूं लागला, " आपल्या या अशा अवस्थेचें कारण काय ? यांतील मर्म आमच्या मुळींच ध्यानांत येत नाहीं."

याळाच जोडून भोगपाल ह्मणाला, " राजपुत्र धर्मध्वजानें प्रमिलेच्या शोधार्थ निघून जाणें ही गोष्ट अनिष्ट होती कीं काय ? "

हा प्रश्न ऐकतांच गोसाव्यानें स्तब्धतेचा त्याग करून लगोलग उद्गार काढले, " अनिष्ट काय आणि इष्ट काय ! त्यामुळें सर्वस्वी घात झाला ! मी चांडाळानें स्वतःच्या हातांनीं स्वतःच्या पायावर दगड पाडून घेतला! इतकेंच नव्हे तर त्यायोगें या नित्यंकाच्या डोक्यांतही धोंडा पाडण्यास मीच पातकी कारणीभूत झाला. मला काय बुद्धी सुचली पहा ! वस्तुतः मी सर्व कांहीं बऱ्याकरतांच केलें; पण योगायोग काय जमला पहा ! ज्याच्या नुर्तानुर्तच्या संरक्षणाकरतां मोठ्या सावधगिरीनें मीं जी कांहीं योजना केली ती माझी योजना त्याच्याच जन्माच्या नाशास कारण झाली हें ईश्वरीयोजनेचें कौतुक ह्मणावें कां आमच्यासारख्या दुर्दैवी जनांच्या खडतर प्रारब्धाची ही लीला ह्मणावी न कळे. "

असे उद्गार काढून गोसावीबोवा नित्यंकाकडे निराशामय दृष्टीनें पाहूं लागले. त्यांच्या त्या संदिग्ध विलापवाणीचा स्पष्ट अर्थ कळावा ह्मणून भोगपाल व नित्यंक यांनीं उत्सुकतेनें व घाबरेपणानें त्यांना सविस्तर व उमज पडेल अशा तऱ्हेनें काय ती हकीगत सांगण्याबद्दल विनविलें. त्यांची विनंति मान्य करावी कीं न करावी याबद्दल घोटाळून थोड्याशा विचारानंतर गोसावीबोवांनीं त्यांना प्रमिलागुहेचा कमटमय बनावटपणा आणि तींत प्रवेश करणारांचा निश्चित नाश याबद्दलचा सर्व मजकूर समजावून सांगितला. तो ऐकतांच भोगपालासही पराकाष्ठेचें दुःख वाटलें. पण नित्यंकाची स्थिति कांहीं चमत्कारिक झाली. त्याच्या डोळ्यापुढें एकदम राजपुत्र धर्मध्वजाची मूर्ति प्रत्यक्ष दिसूं लागली. त्यानें एका क्षणांत त्या मूर्तीच्या चरणीं मनानें लोटांगण घालून दुसऱ्याच क्षणाला गोसावीबोवांच्या समोर देहानेंही लोटांगण घातलें. त्याची ती बेसावध अवस्था पाहतांच बोवांनीं त्याचें शिर आपल्या मांडीवर घेतलें आणि त्याच्या अंगावरून हात फिरवून ते त्यास वारा घालूं लागले. भोगपालही त्याला सावध करण्याकरतां कांहीं उपचाराची योजना करूं लागला.

कांहीं वेळानें नित्यंक सावध झाला. आपली जी दशा झाली त्याबद्दलची कांहींएक दिक्कत न बाळगतां तो बोवाजीला त्याची कांहीं वेळापूर्वींची गलित अवस्था व राजपुत्राबद्दलचें पुढील अनिष्ट या संबंधानें कांहीं प्रश्न करण्याचा यत्न करूं लागला. पण त्याचें सर्व अवसान खचलें असल्यानें त्याला बोलण्याला बहुत कष्ट होत आहेत असें जाणून त्या दोघांनीही त्यास अगदीं स्वस्थ बसण्यास सांगितलें. नंतर भोगपालानें बोवाजीस विचारलें, " राजपुत्र धर्मध्वजाबद्दल भलतीच कल्पना निश्चयानें धरून चालण्यास कारण काय घडलें बरें. त्याचप्रमाणें त्या संबंधानें आपण सर्व दोष आपल्याच माथ्यावर घेऊन विलाप करतां याचें कारण काय ? शक्य असेल तर या गोष्टी आम्हांस स्पष्टपणें सांगाव्या. ईश्वराच्या कृपेनें भावी संकटाच्या निवारणार्थ कांहीं उपाय सुचणार नाहीं असें कशावरून ? "

भोगपालास खरा प्रकार कांहींच ठाऊक नसल्यामुळें तो राजपुत्राच्या संरक्षणाबद्दल आशा धरून होता. पण बोवाची त्या कामीं बहुतेक निराशाच झाली होती. तरी पण त्या दोघांना सांद्यंत वर्तमान सांगणें इष्ट वाटल्यावरून तें त्यांना सांगून टाकावें आणि कल्पनेनें निश्चित वाटत असलेला अपाय प्रत्यक्षपणें ज्ञात होईपर्यंत तो टाळण्याचा यत्न करावा असा विचार करून गोसाव्यानें त्यांना आपलें मोहसंव, जयसिंग यांच्याशीं झालेलें समग्र भाषण सांगितलें. त्याचप्रमाणें नित्यंक व शांभवी यांच्या संवादाच्या वेळीं मंदिरामध्यें राजपुत्रास गुप्तपणें बसण्याबद्दल आपणच सूचना दिली आणि त्यामुळेंच त्याला कपटमय प्रमिलागुहेचें वर्तमान समजून तो तिकडे धावला असें कळवून पुन्हां गोसावीबोवा कपाळावर हात देऊन बसले. भोगपालासही कांहीं सुचेनासें झालें. पण परमेश्वरकृपेनें भोगपालाच्या मनांत आकस्मिक एक विचार उत्पन्न होऊन तो जरा उल्हसित होऊन ह्मणाला, " तुह्मी दोघेही जरा स्वस्थ व्हा. या समयीं कोणीही झालें तरी तुमचें कोरडें समाधान करणार व तशानें तुमचा जीव स्वस्थ होणें शक्य नाहीं हें मीही जाणत आहे. धर्मध्वजाचे सद्गुण, त्याचा उमदा स्वभाव, उच्च विचार आणि त्याचें माझ्याशीं असलेलें नातें या गोष्टींचा विचार करतां माझेंही अंतःकरण त्याच्याबद्दल तुटत आहे हें मीं तुह्मास सांगितलें पाहिजे असें नाहीं. आपलें समग्र भाषण कळलें नव्हतें तोंपर्यंत मीही तुमच्याप्रमाणेंच घाबरलों होतों. पण तुम्ही गुहेचें जें वर्णन केलें त्यावरून मला जरा धीर आला आहे.

व आपण जर त्वरा केली तर अद्यापही राजपुत्रावरील प्रसंग खास टळेल असें माझ्या मनाला वाटतें. ”

हे शब्द ऐकतांच गोसावी व नित्यंक या दोघांनींही अत्यंत घाईनें व आशायुक्त होऊन विचारलें, “ त्वरा करावयाची म्हणजे काय ? काय असेल तें त्वरित सांगा. आतां वेळ घालविणें बरें नव्हे. बोला, राजपुत्राच्या बचावासाठीं मी आपला प्राण खर्ची घालण्यासही तयार आहें. ”

बोवांचें चित्त शांत होण्याची आशा धरून भोगपालानें सांगितलें, “ ज्या डोंगरामध्यें प्रमिलागुहा आहे असें तुम्ही सांगतां तो डोंगर राजपुत्राला नवीनच आहे. त्या प्रदेशाची धर्मध्वजाला विशेषशी माहिती असण्याचा संभव नाहीं. त्या डोंगराची व तुम्ही सांगतां त्या विशेष जागेची मला पूर्ण माहिती आहे. त्या ठिकाणीं लवकर पोंचण्याला कांहीं आडवाटा आहेत. राजपुत्राला त्या वाटा किंवा चोरवळणें माहीत असण्याचा संभव नाहीं. आपण जर या क्षणीं तिकडे जाण्यास निघालों तर खात्रीनें राजपुत्राच्या आधींच तेथें जाऊन पोहोंचूं. राजपुत्राच्या पूर्वींच आपण तेथें हजर असलों म्हणजे हा दुःखदायक प्रसंग टळेल याची शंकाच नको. राजपुत्र आपल्या आधीं निघालेला असला तरी रस्त्याच्या गैरमाहितीमुळें त्याला तेथें जाण्यास उशीर लागणार. तो आपल्या आधीं तेथें जाईल असें मनांत देखील आणावयास नको. आपण आज तरी परत आला हें भाग्यच समजलें पाहिजे. ही ईश्वरी कृपाच होय. आपण आणखी एक आठवडा आला नसतात तर मात्र मला ठाऊक असलेल्या जवळच्या चोरवाटांचा फायदा घेऊनही उपयोग झाला नसता ! ”

हा विचार गोसावी व नित्यंक यांस पसंत पडला हें सांगणें नकोच. पण नित्यंकाला झोंपडींत एकटा ठेवून जाण्याची गोसावीबोवास जास्त भीति वाटून तो भोगपालास म्हणाला, “ मला तो डोंगर व ती गुहा पूर्णपणें ज्ञात झालेली आहे. तुम्ही जर मला चांगल्या तऱ्हेनें सर्व चोरवाटा नीट समजावून द्याल व नक्की खाणाखुणा सांगाल तर म्या एकटयानें तिकडे जावें आणि तुम्ही येथें नित्यंकाचे संरक्षणास रहावें असें मला बरें दिसतें. अशा स्थितींत नित्यंकाला एकटेंच टाकून जाणें सुरक्षीत नाहीं. ”

बोवाचा प्रश्न सयुक्तिक होता. भोगपालासही तो रुचला. पण नुसत्या

सांगीव माहितीनें भागावयाचें नाहीं असें वाटून तो बोत्रास ह्मणाला, " ही मात्र मोठी पंचाईत आहे. मी स्वतः बरोबर असणेंच अवश्य आहे. त्या ठिकाणच्या चोरवाटा बिकट आहेत. त्या डोंगरांतील अंतर तोडणारीं आडवळणें भानगडीचीं आहेत. तोंडानें व खुणांनीं त्यांची माहिती कशी व किती देतां येईल ? तें तसें जमणार नाहीं. नित्यंकाच्या जोडीला येथें आपणांतून कोणी पाहिजे हेंही खरें आहे. "

ही अडचण ध्यानांत घेऊन नित्यंकानें सुचविलें, " वस्तुतः तुह्मी दोघांनीं मलाही तुमच्याबरोबर न्यावें हें बरें. पण माझ्या येण्यानें तुमच्या कार्यास दिरंगाई लागेल अशी जर तुह्मांस भीति वाटत असेल तर ती तुमची कल्पना खरी आहे. कारण, सांप्रत माझी सर्व शक्ती लय पावली आहे. मला कांहींच अवसान उरलेलें नाहीं. तेव्हां माझी सर्व चिंता सोडून तुह्मी दोघे याच पावलीं निघा. माझ्या सुरक्षितपणाची विवंचना करण्यांत तिकडे जाण्यास उशीर झाल्यानें जो अपाय घडणार त्याच्या मानानें मला एकट्याला येथें ठेवून जाण्यानें गुदरणारीं सहस्त्रावधी संकटें केवळ कःपदार्थ होत. "

नित्यंकाच्या या औदार्यपूर्ण उत्तरानें बोत्रांचें शांतवन झालें. त्यांनीं राजा व पुरोहित यांना तो खरा मजकूर विदित न करतां दुसरेंच कांहीं विशेष निमित्त सांगून त्यांनीं त्यांची आपल्या प्रवासास संमती घेतली. ते दोघे परत येईपर्यंत नित्यंकाच्या तैनातीस दुसरे चार दोन सेवक ठेवावेत अशी त्यांनीं सुमंताना विनंति केली आणि ते दोघेजण राजपागेंतील दोन खंद्या घोड्यावर आरूढ होऊन वाट चालूं लागले. त्या प्रसंगीं भोगपालानेंच वाटाड्याचें काम पतकरलें हें सांगण्याची अवश्यकता नाहीं.

---

## प्रकरण ३६ वें.



### नूतन परिचय.



जपुत्र धर्मध्वज आपल्या विश्वासू अनुयायांसह मार्गक्रमण करीत असतां त्यानें वाटेनें भेटणाऱ्या लष्करीपेशी अनोळखी माणसांबद्दल फार सावधगिरी राखली. तीन दिवस त्या गुहेच्या रोखानें प्रवास केल्यानंतर त्याला तें ओळखीचें निबिड अरण्य लागलें. अरण्याचा भयानकपणा पाहून घाबरण्यापेक्षां त्या खुणेच्या अरण्यापर्यंत आपण सुरक्षित व रस्ता न चुकतां येऊन पोंचलों ह्मणून त्याला उलट त्या अरण्याच्या देखाव्यानें उमेदच आली. त्यांतून मोठ्या कष्टानें तो बाहेर पडला. शांभवीच्या वर्णनाप्रमाणें त्या अरण्यांतून बाहेर पडतांच डोंगराचा पायथा दिसावयास पाहिजे होता. पण अरण्याची हद्द ओलांडतांच त्याला एक भली मोठी सपाटी दिसली. तेव्हां त्याला आपण वाट चुकलों असा संशय येऊन त्यानें तेथेंच कांहीं वेळ मुक्काम करून घोड्यांना व आपल्या सोबत्यांना विश्रांति दिली. त्या ठिकाणच्या कोणातरी माहीतगारास डोंगराची माहिती विचारावी आणि तेथें पोंचल्यास पायथ्यापाशीं घोडे बांधण्यास जागेची कांहीं सोय पहावी ह्मणून तो स्वतः तेथून एकटाच हिंडावयास गेला. आपले संवगडी आराम करून पुन्हां ताजेतवानें होईपर्यंत आपण परत येतों असें त्यानें त्यांस सांगितलें.

स्वतःच्या उमद्या वारूवर स्वार होऊन व आपली प्रिय समशेर कमरेला लटकावून तो सरासरी एक कोस चालून गेला तों त्या ठिकाणीं पुन्हा एक अरण्य दिसलें. त्या अरण्यांत प्रवेश करण्याचें जें सामान्य व राबत्यांतील द्वार होतें त्या ठिकाणीं राजपुत्र पोंचला तों तेथें कोणीएक जख्ख ह्मातारा बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्या वृद्ध गृहस्थास पाहतांच राजपुत्राच्या मनांत त्याच्याविषयीं आदर व स्नेह उत्पन्न झाला. तो सामान्य शेतकरी किंवा अरण्यवासी नसून कोणीतरी अवलीया असावा अशी राजपुत्राची कल्पना झाली. त्या ठिकाणच्या आसपास घरें किंवा झोपड्या वगैरे कांहीं दिसत नव्हतें. अरण्यास धरून लगत एखादें खेडेंगांव किंवा पिकाऊ शेतें अगर चराऊ रानेंही

दिसत नव्हतीं. कांहीं भाग माळरानाच्या सपाटीसारखा ओसाड असून चोहों-कडून ओढे, नाले व डोंगरावरून उड्या टाकीत येणारे प्रवाह दिसत होते. कोठें कोठें पाणी वाहत होतें. कांहीं ठिकाणीं पाणी सांचून नुसतींच डबकीं भरलेलीं दिसत होतीं. एकंदरींत तो प्रदेश अगदीं निर्जन व ओस होता. अशा त्या वस्तीरहित व भयानक काननांत त्या वृद्ध मनुष्यास एकटा पाहून एखाद्याच्या मनांत साहजिकपणेंच पिशाचाची शंका येऊन भीतीनें त्याची धांदल उडून गेली असती. पण धर्मध्वजाला तसें कांहींच वाटलें नाहीं. तो अस्सल क्षत्रिय जातिवंत वीर असल्याकारणानें त्याला भीति हा शब्दच माहीत नव्हता. खेरीज तो सन्मार्गगामी व शुद्धभावी असल्यामुळें त्याला कोणत्याही प्रसंगाची दिक्कत वाटत नव्हती. त्या वृद्ध गृहस्थाचा आविर्भाव व चेहऱ्याचा गंभीरपणा यांवरूनही त्याचा अधिकार व्यक्त होत होता. त्याला पाहतांच राजपुत्रानें घोड्यावरून खालीं उडी टाकली आणि त्याच्या शेजारीं जाऊन त्याला नमस्कार घातला. तो प्रकार पाहतांच तो म्हातारा उठून उभा राहिला आणि त्यानें राजपुत्रास चटकन उठण्यास सांगितलें. राजपुत्रानें उभे राहून त्याच्यापुढें हात जोडले आणि त्यांस विनंति करून विचारलें कीं, "आजोबा! आपण कोण आहां हें ओळखण्याचें मला ज्ञान नाहीं. मी एक अज्ञान, पामर आहें. कांहीं महत्वाच्या कार्याकरतां मी या प्रदेशांत आलों असून मला येथून जवळच असलेल्या डोंगरावर जावयाचें आहे. त्यासंबंधीं कांहीं माहिती विचारण्यासाठींच मी येथवर आलों आहे. या वेळपर्यंत मला वाटसरू, शेतकरी वगैरे कोणी भेटलें नाहीं. तेव्हां मी विवंचनेंत होतों. परंतु, सुदैवेंकरून आपली गांठ पडली आहे. तेव्हां आपण कोण हें मला कळवून जरूर ती माहिती आपण मला सांगाल काय?"

यावर वृद्धानें उत्तर केलें, "तुमची व माझी मुळीच ओळख नाहीं ही गोष्ट अगदीं खरी आहे. मग मी आपलें नांव सांगितल्यानें तुह्माला मी कोण याचा बोध काय होणार. नांव समजण्यापूर्वी जसें सांप्रत आपण मला एक शरीरधारी मनुष्यप्राणी समजून माझ्या वयमानास अनुसरून मला आजोबा या संज्ञेनें पाचारण केलें तसें तुह्मी माझें नांव ज्ञात झाल्यावर त्या नांवानें फार तर मला हांका माराल! संज्ञा पालटली ह्मणून माझ्यांत फरक काय झाला आणि आपल्याला जास्त माहिती काय मिळाली?"

या भाषणाचें राजपुत्रास कौतुक वाटलें. त्याच्या भाषाशैलीवरून तो

मोठा विद्वान असावासें वाटून राजपुत्र पुन्हां त्याला नमस्कार करून ह्मणाला, " महाराज ! आपल्या भाषणांतील मर्म मला समजणार नाहीं. आपण माझ्या आजापणजासारखे दिसतां. मी आपलें लेकरूं शोभेन. आपण मला आदरार्थी अनेक वचनानें संबोखण्याचें कारण नाहीं. आपलें नामाभिधान कांहींही असो; मला या जंगलापलीकडील डोंगरावर जावयाचें आहे. मला या प्रदेशाची बिलकुल माहिती नाहीं. ज्यानें मला या पर्वताची माहिती दिली तीस अनुसरून मी एक खुणेचें वन ओलांडून बाहेर पडलों: पण त्यानें दिलेल्या माहितीप्रमाणें या वनाच्या हद्दीबाहेर पर्वताचा पायथा लागला नाहीं. तेव्हां तेथेंच मी आपले सेवकलोक ठेऊन मी एकटाच येथपर्यंत रस्त्याचा शोध करण्यास आलों आहे. सुदैवानें मला आपली भेट झाली. आपण मला कांहीं माहिती सांगून येथें आसपास कोणकोणते पर्वत, दऱ्या, गुहा, देव वगैरे आहेत याची माहिती सांगण्याची कृपा कराल काय ? "

या प्रश्नाचा भावार्थ जाणून त्याचेंही सरळ उत्तर न करतां तो वृद्ध पुन्हां ह्मणाला, " तुमच्या किंवा तुझ्या कां होईना—प्रश्नाचें अवश्य व सरळ उत्तर देण्यास कबूल होण्यापूर्वी तुझ्या भाषणांतील चमत्कारिक शब्दरचनेच्या आश्चर्यांतच मी थक्क होत आहे. तूं असें ध्वनित करतोस कीं, ' सुदैवानें तुझी व माझी भेट झाली. ' या वाक्याचा भावार्थ काय ? माझें तुझ्याकडे कांहींच काम नाहीं तेव्हां माझ्या सुदैवाचा किंवा दुर्दैवाचा प्रश्नच नाहीं. तुझें कांहीं तरी माझ्याकडे काम दिसतें. तेव्हां यांत तुझ्या बऱ्यावाईट दैवाचा प्रश्न आहे. तुला मजपासून जी काय माहिती पाहिजे आहे ती मीं दिली कीं तूं स्वतःला सुदैवी ह्मणविणार ! बरें मीं ती दिली नाहीं किंवा तसें करणें शक्य झालें नाहीं कीं लागलीच तूं आपल्याला दुर्दैवी ठरविणार ! याचा अर्थ काय ! ह्मणजे दैव बरेंच लवचीक दिसतें ! माझ्या होकार नकारावर तुझें दैवाचा चांगलेवाईटपणा अवलंबून आहे, ह्मणजे तुझ्या दैवांत कांहीं अर्थच दिसत नाहीं. त्याला दुसऱ्या कोणीतरी हव्या त्या तऱ्हेचें बनवावें असें ठरतें हें आश्चर्य नाहीं का ? "

या भाषणानें राजपुत्र गोंधळला. पण तोही ज्ञानसंपन्न व मर्मज्ञ असल्यानें त्यानें वृद्धाच्या भाषणाचा पुन्हां विचार करून त्यास सांगितलें, " आपण ह्मणतां असा त्याचा अर्थ धरावयाचा नाहीं. आपल्या होकारावर किंवा नकारावर माझें दैव अवलंबून आहे असें नाहीं. आपल्या अनुकूल

किंवा प्रतिकूल भाषणावर माझ्या कार्याचें यश अवलंबून असल्यामुळें मी आपणास सुदैवी किंवा दुर्दैवी समजणार. आपणाकडून मला अवश्य ती माहिती समजली तर मी आपणास सुदैवी मानणार, तशी माहिती न समजली तर मी आपणास सुदैवी समजणार."

राजपुत्रानें जरी हें भाषण आपल्या पूर्वीच्या मुद्याच्या स्पष्टीकरणार्थ केलें तरी तें पहिल्याप्रमाणेंच समभावी झाल्यानें वृद्ध त्यास ह्मणाला, "स्पष्टीकरणार्थ केलेल्या भाषणांत फक्त शब्दयोजना आणि वाक्यरचना यांत फेरफार केला; पण त्यांतील भावार्थांत फरक कांहींच झाला नाहीं. तीनत्रिक नऊ यांतील गुण्यगुणक पालटून गुणाकारांत फरक कसा पडेल ?"

या बोलण्यानें राजपुत्राची अधिकच धांदल उडाली. तो आपल्या मनामध्यें भारतीचें स्मरण करीत त्याला हाका मारूं लागला. बराच वेळ मनन करून तो बोलला, "आपल्या विचारांचें एकंदर सार असें दिसतें कीं, कोणाचेंही सुदैव किंवा दुर्दैव परावलंबनीय असतां कामा नये. दुसऱ्याचें सहाय्य किंवा उपेक्षा यांवर जर दैवाचा चांगलेपणा अगर वाईटपणा अवलंबून राहील तर मनुष्य-दैवाचा स्वतंत्रपणा नष्ट होऊन तें परावीन होईल ! दैवाचें स्वातंत्र्य अबाधित आहे हें तत्व ठाम ठरलेलें आहे. तेव्हां माझें तें विवेचन चूक होय हें मी कबूल करतों. तेव्हां माझें दैव चांगलें असेल तर आपणाकडून मला इच्छित माहिती मिळेल आणि माझें प्राक्तन खडतर असेल तर आपणाकडून माझी निराशा होईल असें समजून मी आपणास फक्त माहिती विचारण्यापुरतांच प्रश्न करावयास पाहिजे होता असें आपलें मत दिसतें !"

राजपुत्राला बरेंच ज्ञान आहे व तो चातुर्यपूर्ण आहे असें पाहून वृद्धाला संतोष झाला. तो त्यास पुन्हां ह्मणाला, "आतां तूं बराचसा वळणावर आलास. आतां तुला मी असें विचारतों, कीं तुझें सुदैव असेल तर मी तुझें कार्य करीन व दुर्दैव असेल तर करणार नाहीं. ह्मणजे मीं कार्य केलें कीं तूं स्वतःला सुदैवी मानणार व तूं दैववान आहेस ही गोष्ट स्थापित होणार असें धरून चाल. मी तुला या प्रदेशांतील खडानखडा माहिती सांगितली; इतकेंच नव्हे तर मी स्वतः तुझ्याबरोबर हिंडून तुला तुझ्या इच्छित स्थळीं नेऊन पोंचविलें म्हणजे तर तुझ्या प्रारब्धाच्या चांगुलपणाची बळकट स्थापना झाली असें मानण्यास तूं कधींही हरकत घेणें शक्यच नाहीं ! बरें आतां आपण असें धरून चालूं कीं, तूं आपल्या योजलेल्या ठिकाणीं

पोंचलास आणि तेथें तुझें काम मात्र साधलें नाहीं इतकेंच काय पण तेथें जाण्यामुळेंच तुला अपाय झाला तर मग तूं आपल्याला पूर्ण भाग्यहीनच समजणें उचित होय ! मग कांहीं काळा पूर्वींचा सुदैवी प्राणी थोड्याच अवधीनें दुर्दैवाचा पुतळा बनणार आणि याच्याच उलट सर्व विचार केला ह्मणजे दुर्दैवाचा पुतळा असलेला प्राणी कांहीं कालावधीनें सुदैवाचा पुतळा बनणार असें सिद्ध होतें. मग या सुदैव दुर्दैवांत अर्थ काय ? ”

वृद्धाचा हा मुद्दा ऐकतांच राजपुत्रानें त्यास विचारलें, “ मग मनुष्याला सुदैव व दुर्दैव या अवस्था किंवा कल्पना मानण्याचें कारणच नाहीं असें ठरेल आणि मोठी आपत्ति गुदरेल व त्या योगानें शास्त्राची मोठी अनास्था होईल. पूर्वजन्मीं केलेलें पुण्यकर्म प्रारब्धरूपानें जे सुखोपभोग देतें तें सुदैव आणि जें पूर्वपापकर्म दुःखोपभोग देतें तें दुर्दैव, अशा ज्या शास्त्रसिद्ध व्याख्या त्या फोल ठरतील आणि पूर्वजन्म, यत्न, सत्क्रिया, दुष्क्रिया, पुण्य, पाप, सुस्थिति आणि दुस्थिति यांच्यामधील परस्पर संकीर्ण संबंध नाहींसे होऊन सर्वत्र अनास्था गुदरेल. ”

राजपुत्राचें हें मुद्देसूद व परिणामदर्शक प्रतिपादन ऐकून वृद्धाला संतोष होऊन तो बोलला, “ तशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. मी दैवाचें अस्तित्व नाकबूल करीत नाहीं. दैव आहे ही गोष्ट निश्चित होय ! पण आपल्याला सौख्यप्रद वाटतात ते उपभोग किंवा दशा प्राप्त झाली ह्मणजे भाग्य आणि आपल्याला दुःखद वाटणारा भोग किंवा स्थिति ह्मणजे अभाग्य असेंच केवळ ठाम ठरवतां येणार नाहीं. लग्न होणें ही गोष्ट सुदैवजन्य का दुर्दैवजन्य हें कसें ठरवावयाचें ? ज्याला दारपरिग्रहाची जबर वासना आहे त्याला स्त्रीप्राप्ती ह्मणजे भाग्योदय वाटणार; आणि ज्याला भार्यालाभाची इच्छाच नाहीं तर उलट स्त्रीपरिग्रहणाचा तिटकारा आहे ह्याला स्त्रीप्राप्ती ह्मणजे आपत्ति वाटणार ! तात्पर्य, सुदैव किंवा दुर्दैव ह्मणजे वासनातृप्ति किंवा इच्छाभंगच होय. ”

हा निष्कर्ष ऐकून राजपुत्रास जरा धीर येऊन तो बोलला, “ हरकत नाहीं. आपलेंच ह्मणणें मान्य केलें तरी भागण्यासारखें आहे. इच्छासमाधान ज्यांत होतें त्या स्थितीलाच सुदैवची मानावें आणि ज्यांत इच्छाभंग होतो तिला दुर्दैव असें ह्मणावें ? ”

राजपुत्राच्या मनानें आपण विजयशाली झालों असें वाटलें. त्याची

उमेद विशेष खर्चूं न देतां त्याचा मुद्दा खोडून काढावा अशा हेतूनें वृद्ध बोलला, " तुझें ह्मणणें यथार्थ दिसतें. पण ज्यांमध्यें मनुष्याची वासना समाधान पावतें अशी कोणती अवस्था आहे ती तूं ठाम ठरवून ठेविली आहेस काय ? "

या प्रश्नाला धर्मध्वजानें उत्तर केलें, " अशी अमुक एक स्थिति आहे असें मला निश्चयानें सांगतां येणार नाहीं. पण याविषयीं निःशंकपणें इतकें ह्मणतां येईल कीं, मनुष्याच्या मनाला ज्या गोष्टीच्या प्राप्तीची भावना उत्पन्न होईल ती प्राप्त झाली ह्मणजे त्याची वासना तृप्त झाली; आणि वासनातृप्ति ह्मणजेच सौख्य होय आणि सौख्यप्राप्ती ह्मणजेच सुदैव.

वृद्ध गृहस्थानें अवघड समजून विचारलेल्या प्रश्नाचें आपण बरोबर उत्तर दिलें असें वाटून राजपुत्र कांहींसा आनंदित झाला. पण त्यावरही तो वृद्ध कांहींतरी कोटी काढून आपल्याला नडवील असें आतापर्यंतच्या अनुभवावरून धरून चालून राजपुत्र त्याच्या तोंडून पुढें काय भाषण निघतें तें ऐकण्यात उत्सुक झाला. वृद्धानें त्यास सांगितलें, " माझ्या प्रश्नाला तूं जें उत्तर दिलेंस तें मला पाहिजे असेंच दिलेंस ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. वासनातृप्ति म्हणजे सौख्या होय हें कोणीही अमान्य करणार नाहीं. पण वासना तृप्त होणें शक्य आहे काय ? शक्य असेल तर वासनातृप्त झालेल्या मनुष्याला दुःखाचा किंवा दुर्दैवाचा वाराही लागणार नाहीं हें निश्चित होय ! पण ज्याची वासना तृप्त झाली आहे अशीं कितीं मनुष्यें तुला व्यवहारामध्यें आढळलीं आहेत याचा विचार कर ह्मणजे तुझी बहुतेक निराशाच होईल. कारणपरत्वें उद्भवलेल्या इच्छेच्या प्राप्तीनें मनुष्याला सुख वाटल्याचें तुला आढळून येईल; पण तशी इच्छाप्राप्ति ह्मणजे इच्छातृप्ती मात्र नव्हे. कारण एका इच्छेची प्राप्ती मनुष्याच्या मनाला समाधान देत नाहीं इतकेंच नव्हे तर ती प्राप्ती दुसऱ्या वस्तुप्राप्तीची इच्छा उत्पन्न करते. त्यांत जेव्हां इच्छाभंग होतो तेव्हां अंतःकरण क्षुब्ध होतें आणि:क्षुब्धता म्हणजे तर सौख्य नव्हे ! सौख्य देणारी इच्छाप्राप्ती चंचल व नवीन इच्छा उत्पन्न करणारी असते ह्मणजे हा इच्छेचा प्रवाह सतत चाललेला असल्यानें मनुष्याला समाधान असें कधीच प्राप्त होत नाहीं, मग सौख्य कोठलें आणि सुदैव कोठचें ? "

या विवेचनानें राजपुत्राची फारच त्रेधा उडाली. तो सुख दुःख, सुदैव

दुर्दैव, इच्छालाभ, इच्छाभंग, आशा निराशा या द्वंद्वांच्या जाळ्यांत अडकून पडला. त्यांतल्या त्यांत विचार करून तो बोलला, " आपलें ह्मणणें अगदीं यथार्थ दिसतें. त्याचा व्यवस्थित व बरोबर विचार करून सुखदुःखाबद्दल नक्की सिद्धांत काय स्थापावा हें समजण्याचें मला ज्ञान नाहीं. माझा गुरु— निदान मी आपल्या मनानें स्वीकारलेला गुरु—श्रीभारती यांची प्रत्यक्ष भेट होऊन जर मजवर त्यांचा अनुग्रह झाला असता तर मी असा घोटाळ्यांत पडलों नसतों. असो; आपल्या गहन भाषणाचा शक्य तो विचार करून मला असें वाटूं लागलें आहे कीं, जगतांत सुख या नांवाची चीज अस्तित्वांतच नसावी व सुदैवी ह्मणण्यास पात्र असा कोणीही नसावा. माझीच स्थिति पहा ! जगाच्या दृष्टीनें मी कोणी सामान्य पुरुष नाहीं. सिंधुपती किंवा पौरवकुलतिलक राजा वसुप्रसाद याचा मी धर्मध्वज नांवाचा एकुलता एक मुलगा होय ! पण मलाही सुख नाहीं. माझ्या स्थितीचा हेवा करणारे अनेक लोक सांपडतील; पण माझी जन्मदारभ्य वस्तुस्थिति समजली ह्मणजे माझ्या स्थितीचा हेवा करणारांना पश्चात्ताप करण्याचाच प्रसंग प्राप्त होईल. यावरून मला असें भासलें कीं, सुख ही निवळ कल्पना आहे. हा सर्व प्रपंचपसारा दुःखमयच आहे. माझी ही कल्पना चुकीची असेल तर निदान सौख्य या नांवाची वस्तु प्राप्त होण्याला अवश्य ती साधनसंपत्ति तर आह्माला उपलब्ध झालेली नसली पाहिजे. "

राजपुत्राच्या एकंदर भाषणाचा ओघ पालटलेला पाहून व त्याला सौख्यजिज्ञासा उत्पन्न झाली आहे असें ध्यानांत आणून वृद्धगृहस्थ त्याचें कांहींसें सांत्वन करण्याकरतां बोलला, " जगतांत सौख्य आहे किंवा नाहीं याचा निर्णय केव्हां होईल तो होवो; पण दुःखमय संसारांत ज्या उणिवा प्राप्त होतात त्या तृप्त न होण्यानें उत्पन्न होणारें दुःख कमी करण्यास मात्र मार्ग आहेत. दुःखाचा कमीपणा ह्मणजेच सुख असें मानावें आणि दुःख कमी करण्याच्या यत्नास लागून ज्यानें त्यानें आपणास सुखी करून घ्यावें. "

हा मुद्दा राजपुत्रास बराच पटल्यासारखा झाला. या मुद्याचा स्वीकार केला असतां आपल्या कार्यासही उत्तेजन येणारें आहे हें जाणून तो वृद्धास ह्मणाला, " आपण कांहीं वाक्यें सहज ह्मणून बोलतां पण तीं इतकीं अर्थपूर्ण असतात कीं त्यांतून आमच्यासारख्यांचा उडालेला घोटाळा तेव्हांच दूर होतो. आपल्या या मुद्यावरून असें अनुमान

ठरविण्यास हरकत दिसत नाहीं कीं. कमी दुःखी म्हणजेच साधारणतः सुखी ! पूर्ण दुःखनाश ह्मणजेच सर्व सौख्य होय. आपण कोणी तरी महापुरुष असावेत अशी माझी कल्पना झाली आहे. सहजासहजीं भाषण सुरू होऊन आपण मला कितीतरी ज्ञानोपदेश केला व कांहीं कांहीं गोष्टी तर माझ्या तोंडूनच उलगडून दाखविल्या असें माझ्या आतां ध्यानांत येत आहे. आतां वेळ बराच झाला आहे. चोहोंकडे चांदण्याचा स्वच्छ प्रकाश पडला आहे. मला परत गेलें पाहिजे. येथून कांहीं अंतरावरील जंगलाच्या सरहद्दीशीं माझे अनुयायी विश्रांतीकरतां थांबले आहेत. ते माझी वाट पहात असतील. तरी आपण कृपाकरून मला पाहिजे ती माहिती सांगा ह्मणजे आपण माझें महत्कार्य केल्यासारखें होईल. वस्तुतः आपल्या संगतीं आणखी बराच काळ घालवावा असें माझें एक मन सांगत आहे; पण माझ्यामागें ज्या हजारों भानगडी आहेत व सांप्रत ज्या एका महत्वाच्या कार्याकरतां मी येथवर आलों आहे त्याच्या निकडीनें मला या प्रसंगीं येथें जास्त दिवस राहतां येत नाहीं. आपण आपलें नेहमींचें राहण्याचें ठिकाण मला कळवाल व माझ्याशीं कांहीं भाषण करण्याचें वचन द्याल तर मी आणखी पंधरा तीन वारांनीं तेथें येईन. वस्तुतः मला सत्संग पाहिजे आहे. मला माझ्या सद्गुरु भारतीचें दर्शन घेण्याची अत्यंत उत्सुकता झाली आहे. त्या महात्म्याची कृपा होईपर्यंत आपली सत्संगती लाभेल तर मोठीच कृपा होईल. आपल्यासारख्याच्या संगतीनें व सेवेनेंच माझे गुरुकृपाप्राप्तीचें कार्य घडेल असें मला वाटत आहे. आपण व मी अनोळखी असतांना मला आपणाविषयीं असें कां वाटत आहे हें माझें मलाच कांहीं कळत नाहीं. तरी आतां आपल्या मर्जीस येईल त्याप्रमाणें मला काय तें सांगावें."

राजपुत्राच्या या भाषणानें वृद्धाचा चेहरा प्रसन्न दिसूं लागला. त्याची वृत्ति ओळखून वृद्ध म्हणाला, "तुला पाहिजे ती माहिती मजकडून मिळून जेव्हां तूं मजपासून अलग होऊन आपल्या योजलेल्या कार्यास जाशील आणि तुझें योजलेलें कार्य तुझ्या मनाप्रमाणें पार पडून मला भेटण्यास पुन्हां येशील तेव्हांचा प्रश्न आतांच सांगण्यांत अर्थ कोणता ! तें कसेंही असो; तुझें सांप्रतचें कार्य ह्मणजे तुला या बाजूचा खुणेचा एक डोंगर पाहिजे आहे. तेथें तुझें काय काम आहे तें मला सांगशील तर मी तुझ्या कार्यासही शक्य असल्यास हातभार लावीन. तूं ज्या अरण्यांतून बाहेर पडून येथें आलास

तें अरण्य तूं समजतोस तें नव्हे. ज्याच्या हद्दीवर आतां आपण बोलत बसलों आहों हें तें अरण्य होय. यांतून सुरक्षित बाहेर पडलें ह्मणजे एका डोंगराचा पायथा लागतो. त्या डोंगरास भूताद्री असें ह्मणतात. त्या पर्वतावर हनुमानाचें एक जाज्वल्यस्थान आहे. तेथें कित्येक लोक दर्शनाला जातात. वस्तुत: त्या पर्वताकडे जाण्याचा हा खरा मार्ग नव्हे. तूं रस्ता चुकून भलतीकडेच आला आहेस. माहितगार मनुष्यानें त्या पर्वतावर तुला चोर-वाटांनीं व गुप्त वळणांनीं फार लवकर नेलें असतें. असो; मी ह्मणतों तोच तुझा इच्छित पर्वत आहे काय ? तसें असेल तर त्यावर तुझें काय काम आहे तेंही मला कळूं दे ! ”

वृद्धाचें हें भाषण व शेवटचे दोन प्रश्न ऐकून राजपुत्रास उमेद आली आणि तो कांहींसा नाउमेदही झाला. त्या वृद्धाविषयीं त्याची फारच सात्विक भावना झाली असल्यामुळें तो आपल्या निरुत्साहाबद्दल बेफिकीर झाला आणि वृद्धास सांगूं लागला कीं, “ आपण ह्मणतां तोच तो पर्वत होय. त्याचें नांव भूताद्री आहे हें मला कळलेलें नव्हतें. तरी पण आपण त्या पर्वतावरील ज्या मारुतीचें वर्णन करतां तो मला सजमलेला आहे. तो मारुतीच माझी मुख्य खूण आहे. इतकेंच काय पण त्या मारुतीजवळच माझें काम आहे. त्या मारुतीला बाजूला सारलें ह्मणजे तेथें एका गुहेचें द्वार लागतें. त्या गुहेमध्यें माझी प्रमिला नांवाची बहीण अडकून पडली आहे. पडली आहे कसची ! चांडाळकर्मी नीच जनांनीं दुष्ट हेतूनें तिला पळवून नेऊन तेथें कैद करून ठेवली आहे. तिला सोडवून आणणें हेंच माझें सांप्रतचें कार्य होय. त्यासाठींच मला त्या पर्वतावरील गुहेकडे प्रवास करावयाचा आहे. आपण जर याकामीं सहाय्य करण्याची कृपा कराल तर माझ्या भगि-नीच्या छळकांचीं नरडीं चरचर चिरण्यास आपण मला शक्ती दिली आणि माझी भगिनी प्रमिला मला आपणच मिळवून दिली असें होऊन मी आपला जन्माचा ऋणि होईन. माझ्या गुरु भारतीच्या प्रेरणेनें व आपल्या स्वतः-च्याच सात्विक शक्तीच्या स्फुरणानें आपणास सद्‌बुद्धी होवो असें मी देवाला विनवितों. ”

राजपुत्राची शुद्ध वृत्ति, सत्वप्रेम, गुरुभक्तीबद्दल विश्वास या गोष्टी जाणून वृद्धाला प्रेमभाव दाटला. तो त्या प्रेमभरांत राजपुत्राला म्हणाला, “ तुझ्या-सारख्या विमलवृत्तीच्या मनुष्यापासून सद्गुरु किंवा देव यांनीं लांब

सहणें हा मोठाच अन्याय होईल. असो; या प्रयत्नानें तुझी बहीण तुला प्राप्त होईल कीं नाहीं तें कोणास ठाऊक ! पण त्या ठिकाणापर्यंत तुला नेऊन पोंचविण्याचें मात्र मी तुला अभिवचन देतों. पण त्या कार्मी तूं आतां-च्या आतां माझ्या संगतीं चल. माझ्याबरोबर तुला एकट्यालाच आलें पाहिजे. माझें वास्तव्य स्थान याच महारण्यांत आहे. हें अरण्य अति भयानक व निबिड आहे. यांतून प्रवास करून जिवंत बाहेर पडण्याची बहुतेक आशाच नको. तुला ज्या मारुतीकडे जावयाचें आहे तिकडे जाण्याचा खरा व सोपा मार्ग हा नव्हे. तो दुसऱ्या दिशेनें आहे. पण ती दिशा आतां येथून अतीच दूर राहिली आहे. आतां तुला याच महारण्यांतून निभावून गेलें पाहिजे. त्या-संबंधानें काय तजवीज करावयाची तें मीं ठरवीन. कारण तेथपर्यंत घेऊन जाण्याचें मीं तुला वचन दिलें आहे. तेव्हां आतां आपण अरण्यांतील माझ्या मकाणाकडे जाऊं. तेथें तूं कांहीं फलाहार करून स्वस्थ झोंप घे. मग उद्यांक सर्व बेत ठरवूं. ”

वृद्धाच्या भाषणास राजपुत्रानें अर्थातच रुकार दिला. आपले अनुयायी आपली वाट पाहून कंटाळतील आणि आपला पत्ता नाहीं असें पाहून साशंक होतील हें राजपुत्र जाणत होता. त्यासंबंधानें वृद्धाजवळ कांहीं गोष्ट काढावी असेंही त्याच्या मनांत आलें नाहीं असें नाहीं. पण झालेल्या सर्व प्रकाराबद्दल विचार करीत आणि पुढील कार्याची योजना ठरवीत तो एका हातांत घोडा धरून वृद्धाबरोबर चालूं लागला आणि मनांत असलेली गोष्ट वृद्धाजवळ बोलून दाखवून त्याची कांहीं तरी तजवीज लावण्याचें काम त्याच्या इच्छेस न जुमानतां तसेंच राहून गेलें हा एक चमत्कारच होय !

---

## प्रकरण ३७ वें.

### मसलत फसली.



तो वृद्ध गृहस्थ राजपुत्रास बरोबर घेऊन अरण्यांतून भूताद्रीचा मार्ग काढूं लागला. अरण्यांतील आपलें स्थान सोडून प्रवासास निघण्यापूर्वी त्यानें प्रमिलेसंबंधीं साद्यंत वर्तमान राजपुत्राकडून समजावून घेतलें होतें. राजपुत्राच्या तोंडून त्याला गोसावीबोवा व निल्यंक यांचीं नांवें विदित झालीं तेव्हां गोसावी व त्याचा शिष्य हे दोघे आपल्या माहितीचे असून आपण कांहींकाळ सिंधुदेशांत घालविला असल्याचें म्हाताऱ्यानें राजपुत्रास सांगितलें. त्यानें आपण कोण हें मात्र अद्याप राजपुत्राला कळूं दिलें नाहीं. वसुप्रसाद, दमन पुरोहित वगैरेंना आपण समक्ष पाहिलें असल्याचें वृत्तही म्हातारबुवांनीं राजपुत्राच्या कानावर घातलें. त्यावरून तो म्हातारा कोण हें जरी राजपुत्रास ओळखतां आलें नाहीं तरी त्याला आपल्या घराण्याची व राजकीय मंडळाची बहुतेक समग्र माहिती आहे असें त्याच्या सहजच ध्यानांत आलें. तो म्हातारा परका होता तरी त्याच्या सात्विकी तेजास वचकून राजपुत्र त्याला भुलला होता. त्यांत तो आपल्या घराण्यास परिचित आहे असं ज्ञात झालें तेव्हां तर तो अगदींच निःशंक झाला.

राजपुत्रानें सर्वस्वी त्या म्हाताऱ्यावर हवाला टाकला असल्यानें म्हातारा नेईल तिकडे तो निमुटपणें चालला होता. दोन तीन दिवस अरण्यांतून वेडयावाकडया आडवाटांनीं प्रवास केला तरी अद्याप त्या अरण्याची लांबी संपत नाहीं असें पाहून राजपुत्र वृद्धास म्हणाला, " या अरण्यांतच अद्याप आपण घोटाळत आहों. यांतून बाहेर पडून भूताद्रीवरील मारुती आपण गांठणार तरी केव्हां ? हें अरण्य असेंच आणखी कोठवर पसरलें आहे न कळे ! "

हे चिंतायुक्त उद्गार ऐकून म्हातारा बोलला, " राजपुत्रा ! आतां अशी चुळबुळ का ? तूं मजवर सर्वस्वी विश्वास टाकला आहेस. आपण जरी या अरण्यांतून महिनाभर बाहेर न पडलों तरी तुला काळजी करण्याचें कारण

नाहीं. कोणीकडून तरी तुला भूताद्रीवरील हनुमानाच्या पायाजवळ नेण्याचें माझें वचन आहे तें मीं पूर्ण केलें असें मी तुझ्याकडून वदविल्यावांचून राहणार नाहीं हें सत्य समजून ठेव. ”

म्हाताऱ्याच्या वचनाबद्दल आपण साशंक आहों असें समजून तो म्हातारा आपल्याला स्वतःच्या वचनाची बळकटी सांगत आहे असें पाहून धर्मध्वज त्यास म्हणाला, “ महाराज ! आपल्या वचनाबद्दल कुत्सित शंका घेण्यास मी कोणी धूर्तवादी अति शाहणा नाहीं. आपणासारख्यांच्या शब्दाची किंमत मला समजते. पण आपणास मी पूर्वीं एक मुख्य गोष्ट सांगण्याची विसरलों आहे. मला त्याबद्दल अगदींच भान राहिलें नाहीं हें मोठ वाईट झालें. त्या गुहेमध्यें शिरण्याची मुदत ठरलेली आहे. मी माझें शहर सोडल्यास आज बारा दिवस झाले. आणखी तीन दिवसांच्या आंत जर आपण तेथें पोचलों नाहीं तर मग माझी भगिनी प्रमिला तेथें सांपडणार नाहीं. मग साधारणतः ती कोठेंही सांपडण्याची आशा नाहीं. ”

ही नवीनच हवाल ऐकून म्हातारा त्यास बोलला, “ अशा महत्वाच्या कामीं या असल्या मुख्य गोष्टीचें विस्मरण होऊन कसें चालेल. आतां तरी तुला ही गोष्ट सुचली हें बरें झालें. नाहीं तर वेळ टळून गेल्यावर तूं तेथें पोंहोंचूनही न पोंहोंचल्याप्रमाणेंच झालें असतें ! कांहीं चिंता करूं नको. ठरलेल्या मुदतींत मी तुला इच्छित ठिकाणीं घेऊन जातों. त्या मितीच्या पूर्वी तेथें जाण्यानें प्रमिला हस्तगत होईल अशी जर तुझी खात्री आहे तर मग मी तुला तेवढ्या वेळांत प्रमिला असेल त्या ठिकाणीं नेईनच नेईन अशी खात्री बाळगण्यास तूं कां कचरतोस बरें ? त्या कामीं मला फार तर जास्त जवळची आडवाट स्मरणांत आणून जरा कष्टप्रद प्रवास करावा लागेल ! ”

म्हाताऱ्याच्या भाषणानें राजपुत्र संतोष पावला. आपल्या हातून कांहींही चुका झाल्यातरी त्या दुरुस्त करून आपलें सर्व कार्य साधण्यास म्हातारा तत्पर आहे असें पाहून त्याचें हृदय भरून आलें. त्यानें म्हाताऱ्यास वंदन करून आपण सर्वस्वी त्याचे उपकृत आहों असें दर्शविलें आणि तो म्हाताऱ्यासंगतीं निमुटपणें वनपथ क्रमूं लागला. बराच काळ त्रासदायक प्रवास करून म्हाताऱ्यानें राजपुत्रास अरण्याच्या बाहेर काढलें. त्यावेळीं गुहाप्रवेशाची मुदत संपण्यास एका दिवसाचाच कायतो अवधी राहिला होता. अरण्याबाहेरील प्रदेशाचें निरीक्षण करतां डोंगराचा पायथा जवळपास

दिसेना. दूरवर कांहीं पर्वत दृश्यमान होत होते; पण ते बहुत लांब असावेत असा सुमार दिसत होता. तेव्हां राजपुत्रानें अधीरपणानें वृद्धास विचारलें, " आतां फक्त एकच दिवसाचा अवधी राहिला आहे. येवढया वेळांत आपण तीं गुहा गांठणार कशी ? "

यावर वृद्धानें तावडतोब भाषण केलें नाहीं. त्यानें एकदां सभोंवार चारी दिशेस दृष्टि फेंकली आणि विचारमग्न झाल्यासारखें दाखवून सुस्कारे टाकण्यास आरंभ केला. त्याच्याकडे राजपुत्र आश्चर्यानें पहात राहिला आणि त्याच्या तोंडून काय जबाब येतो तो ऐकण्यास अति उत्सुक झाला. वृद्धानें त्याची ती स्थिति पाहून त्यास सांगितलें " या ठिकाणीं कांहींच बोलणें नको. जरा पुढें जाऊन एखादें सोईकर ठिकाण पाहून तेथें आपण बसूं आणि पुढील विचार ठरवूं. "

असें ह्मणून तो सरळ चालूं लागला. तें पाहतांच राजपुत्राला कांहींच बोलण्याची सोय न राहून तोही त्याच्या मागोमाग चालूं लागला. पुढें एका ठिकाणीं एक छानदार, छायायुक्त वृक्ष पाहून ते दोघे त्या वृक्षाच्या गार सावलींत बसले. राजपुत्र कांहींतरी पुन्हां प्रश्न करण्याच्या विचारांत होता. पण त्याच्या प्रश्नाची वाट न पाहतां वृद्ध आपण होऊनच ह्मणाला, " केलें काय आणि झालें काय ? मोठी पंचाईत येऊन पडली आहे. राजपुत्रा ! आतां तुला मीं काय सांगावें हेंच मला समजत नाहीं. सरळ रस्ता सोडून इतक्या बिकट आडवाटांचें आपण कष्ट सोसले कशासाठीं ? तर आपण तुझ्या इच्छित स्थळीं मुदतीमध्यें पोंचावें ह्मणून ! पण हें सर्वच गाड फसलें ! मी मुळींच वाट चुकून भलत्याच प्रदेशांत प्राप्त झालों आहे, आतां तुझा इच्छित पर्वत बहुत दूर राहिला. माझ्या ह्मातारपणाच्या विस्मृतीमुळें हा प्रसंग ओढवला पण आतां पुढें काय करावयाचें ? "

या भाषणानें राजपुत्राचा चेहरा एकदम निस्तेज झाला. त्याच्या उल्हासाची ज्योत पार विझून गेली. तो गांभीर्ययुक्त मुद्रेनें म्हाताऱ्याच्या चेहऱ्याकडे टक लावून पाहूं लागला. त्याला कांहींच सुचेना. तो प्रकार पाहून म्हातारा म्हणाला, " राजपुत्रा ! तूं तरी आतां मला काय म्हणणार आणि मी तरी आतां काय सांगणार ! सगळीच गोष्ट चकली. आतां मुकाट्यानें एखाद्या आसपासच्या गांवांत मुक्कामाला चल. तूं कांहीं बोलत नाहींस तरी आपल्या मनामध्यें मला काय म्हणत असशील ! "

हें ऐकतांच राजपुत्रानें दोनचार उसासे टाकले आणि अतिशय उदासीन होऊन तो बोलला, " वस्तुतः आपण सर्व कांहीं माझें कार्य साधण्याच्याच बुद्धीनें केलें; पण अखेर सर्व बेत फसून प्रमिला हातची गेली. आपल्याला यांत मी काय दूषण द्यावें ? सर्वच पंचाईत झाली आहे एवढें खरें ! माझ्या अनुयायांचें काय झालें असेल ? माझ्याबद्दल माझ्या आतिष्टांची काय कल्पना होईल ! त्याबद्दल एकंदर बाबींचा विचार करावा तितका थोडाच आहे. आपली प्रथमतः भेट झाली त्यावेळचें भाषण मात्र यासमयीं उत्तम लागू पडण्यासारखें आहे. आपण मजकरतां मनापासून इतके असह्य श्रमही सोसले तरी शेवटीं प्रमिला हातची गेलीच तेव्हां आतां मी दुर्दैवी कां सुदैवी हें ठरविणें मुष्किलीचें नाहीं कां ? तें कांहीं नाहीं ! ईश्वराच्याच मनांत मला संकटांत लोटावें आणि सर्वत्र अपयशी ठरवावें असें आहे दुसरें काय ! "

राजपुत्र आपल्या मनोद्वेगाच्या भरांतही आपणास दूषण देण्यास तयार नाहीं हें पाहून वृद्धाचें मन प्रेमपूर्ण झालें. तो मोठ्या प्रेमळवाणीनें राजपुत्रास बोलला, " राजपुत्रा ! तूं फार थोर विचाराचा दिसतोस ! माझ्या नादीं लागल्याचा शेवटीं असा निराशाजनक परिणाम झाला तरी तूं मजविषयींची आहे तीच वृत्ति कायम ठेवतोस हें तुला मोठेंच भूषण होय ! या तुझ्या भूषणाचें मोल मला तर होण्याजोगें नाहीं. आतां तूं ईश्वरासंबंधानें जें काय ह्मणतोस तें देखील निश्चितपणानें म्हणतां येणार नाहीं. ईश्वराच्या मनांत काय आहे तें कसें ओळखावयाचें ? ईश्वरीतंत्र कसें असतें याविषयीं कल्पना करणें मानवीशक्तीच्या बाहेरचें आहे. ज्यावेळीं आपणाला या कार्यांत यश येण्याची खात्री वाटली तेव्हां आपण जर ईश्वराविषयीं कल्पना केली असती तर ती चांगलीच केली असती; पण ती किती वेळ टिकली असती ! आतांच्या प्रसंगावरून ती आपल्याला परत घ्यावी लागली असती ! तशीच गोष्ट सांप्रतची आहे असें मानणेंच भाग आहे. या वेळीं आपण जी ईश्वराविषयीं कल्पना करूं तीही कदाचित् कालेंकरून परत घ्यावी लागेल. तात्पर्य, ईश्वराची लीला अगाध आहे. त्याचे मायावी खेळ कोणालाही सहज समजावयाचे नाहींत. तो सर्व सामर्थ्यसंपन्न, अनंत कल्याणगुण आहे अशी खात्री बाळगून त्याला भजणें येवढेंच आपलें कर्तव्य आहे. आपण आपलें हें कर्तव्य बजावीत राहिलें म्हणजे भजकासंबंधीं त्याचें कर्तव्य काय आहे त्याचा विचार त्याचा तो पाहील. " . . . . . . . .

हा उपदेश ऐकून राजपुत्राचें मन मोठ्या नाजुक स्थितींत पडलें. त्याच्या डोक्यांत अनेक विचार घोळूं लागले. तो वृद्ध गृहस्थ कोण असावा यासंबंधाच्या विचारांत तो जास्तच गढून गेला. आतां पुढें काय करावें याविषयीं त्याच्या विचारांची गती कुंठित झाली. तो अगदीं बावरल्यासारखा होऊन स्तब्ध राहिला आहे असें पाहून म्हाताऱ्यानें त्यास विचारलें, " राजपुत्रा, तूं असा स्वस्थ काय बसला आहेस ? पुढच्या योजनेसंबंधानें कांहीं बोलशील कीं नाहीं ? "

ह्या प्रश्नावर राजपुत्रानें सांगितलें, " मला कांहींएक कळत नाहीं. माझी अक्कल अगदीं गुंग झाली आहे. माझें स्वीकृत कार्य फसलें आहे याबद्दल दुःख करावें कां आपण जें चमत्कारिक पण अर्थपूर्ण भाषण करतां याचें कौतुक करावें हें मला कांहींच समजेनासें झालें आहे. माझ्यावर म्हणजे आमच्या कुटुंबावर सध्यां बऱ्याच आपत्ति गुदरलेल्या आहेत. माझ्या भगिनीप्रमाणें माझी भावजय माधवी ही देखील अशीच एकाएकीं गडप झाली आहे. आपण ज्या गोसावीबोवास जाणतां त्यांच्या प्रश्न पाहण्याच्या अगाध ज्ञानानें माधवीला सरदार जयसिंगानें पळविलें असल्याविषयीं आम्हांस समजलेलें आहे. त्याचप्रमाणें ज्या शिष्य नियंकानें प्रमिळेचा स्वीकार केला आहे त्याच्या आतेबहिणीनें आपल्या मनानें मला वरलें आहे. दमनपुरोहित, माझे मातापिता, गोसावीबोवा यांच्या अनुज्ञेनें मीही त्या सद्गुणखनी पत्नीचा स्वीकार केला आहे. तिच्यावांचून मला सर्व स्त्रिया मातृवत् आहेत. अशा त्या माझ्या पत्नीचाही तपास नाहीं. शिवाय सरदार जयसिंग, त्याचा पुत्र कामसेन व माझा स्वतःचाच चुलतभाऊ मोहसेन हे माझा घात करून राज्यास केव्हां अपाय करतील याचा मुळींच भरंवसा नाहीं. या सर्वांहून महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे मला माझ्या श्रीभारतीगुरूंचा शोध करावयाचा आहे. इतक्या प्रकारच्या पेचांत माझी बहुतेक राखरांगोळी होऊन जाईल असें मला वाटतें. गृहछिद्र कोणाजवळ सांगूं नये असें म्हणतात; पण मी आपणाजवळून कांहींच चोरून ठेवूं इच्छित नाहीं. माझ्या मोहसेननांवाच्या चुलतबंधूची भार्या शांभवी ही कुळघातकी निपजली आहे. तिनें शिष्य नियंकाबरोबर भलतेंच वर्तन चालविलें आहे याबद्दल माझा अंतरात्मा तुटतो आहे. इतक्या गोष्टींतून मी पार कसा पडणार ? प्रमिळेची सुटका करणें हीच पहिली

गोष्ट धरली तर या प्रथमग्रासांतील मक्षिकापातानें तर माझा सर्वच धीर खचत आहे. यासाठीं मी आपल्या स्वतःस केवळ निर्बल व पुरुषार्थ-हीन समजून आपल्या सारख्या गुरुजनसदृश महात्म्यावरच विसंबतों. "

इतकें बोलून राजपुत्र त्या म्हाताऱ्याच्या चरणावर पडला. त्या म्हाताऱ्यानें त्याला पोटाशीं धरून सांत्वनपूर्वक सांगितलें, " राजपुत्रा ! तूं आपला धीर खचूं देऊं नकोस ! भविष्यत् कालाच्या पोटांत काय आहे याचा अजमास कोणासही करतां यावयाचा नाहीं. हा सर्व कांहीं हरीच्या घरचा अचित्य खेळ आहे. संकटें जशीं जमावानें चालून येतात तशीं तीं एकाएकीं निःशेषही होतात. तुझ्यावर संकटसमुदायानें हल्ला केलाच असल्यामुळें आतां तुला हल्ला होणार आहे म्हणून दहशत बाळगण्याची तरी काळजी राहिली नाहीं. यापुढें तुला जर कोणती नवीन स्थिति प्राप्त होणें शक्य असेल तर ती सुस्थितीच होय. असो; पुढें होणाऱ्या गोष्टी कालांतरानें घडतील त्या दिसतीलच. तूर्तचा प्रसंग राजकन्या प्रमिलेसंबंधानें आहे. त्यामुळेंच तुझी नाउमेद झाली आहे; पण तूं असा अवसानगलित होऊं नको. तुला दिलेल्या वचनाप्रमाणें ज्या पर्वतावर प्रमिला असेल तेथें नेल्या-खेरीज तुला सोडून मी कदापि जाणार नाहीं. तुझी त्या गुहाप्रवेशाची मुदत संपली तरी तेथून ज्याठिकाणीं प्रमिलेचें स्थलांतर होईल तें स्थान आपण शोधून काढूं ! तुझ्या शत्रूंनीं प्रमिलेला कितीही लांब आणि कसल्याही अवघड ठिकाणीं नेलें तरी तें ठिकाण कोठें भूलोकांतच असूं शकेल ना ! मग त्याची तूं येवढी खंत कां करतोस ! "

अशा प्रकारें शांतवन करून तो म्हातारा राजपुत्रासह जवळच्याच एका खेडेगांवांत निघून गेला. तेथें त्यांची कोणाशींच ओळख नव्हती. तेव्हां कोणाच्या तरी घरीं जाऊन ओळख पाडण्यापेक्षां एखाद्या स्वतंत्र जागींच मुक्काम करणें बरें असें ठरवून त्यांनीं साधारणतः या खेड्यामधून जाणाऱ्या रहदारीच्या वाटेशेजारींच एका धर्मशाळेमध्यें मुक्काम टाकला.

---

# प्रकरण ३८ वें.

## मातृ-पितृ-पुत्र-योग.



सत्ताविसाव्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें भय्या किंवा सटवाईचा भोप्या स्वर्गद्वार नांवाच्या पहाडावरील अपर्णेश्वराच्या दर्शनाकरतां वाटाड्यासह पर्वत चढूं लागला. त्या ठिकाणीं कदाचित् प्रमिलेचा शोध लागण्याचा संभव आहे असें त्याच्या मनानें घेतलें होतें. ईश्वर प्रतिकूल झाला ह्मणजे जशीं हजारों विघ्नें आपोआप चालून येतात त्याप्रमाणेंच तो अनुकूल असला ह्मणजे विघ्नांतूनच कल्याण बाहेर पडतें आणि पोकळ व फोल गोष्टीच भरीव व सार्थ होतात.

भय्या अपर्णेश्वराच्या देवळांत शिरला त्यावेळीं तेथें अगदीं वृद्ध झालेलीं दोन माणसें बसलेलीं होतीं. त्यांत एक स्त्री होती व दुसरा पुरुष होता. तें देऊळ अगदीं जुन्या हेमाडपंती चालीचें होतें. त्या पर्वतावर थोडीशी वस्तीही होती. तेथील डोंगरी लोक रांगडे असून अत्यंत गांवढळ व अडाणी होते. त्यांना धड भाषाही बोलावयास येत नसे; मग त्यांच्यांतील चालीरीतीबद्दल तर विचारावयासच नको. ते अडाणी लोक थोडीबहुत शेतकी करून उपजीविका करीत. त्यांच्याजवळ गुरेंढोरें मात्र पुष्कळच होतीं. त्याच लोकांच्या सहाय्यानें त्या पर्वतावर देवदर्शनास जाऊन येणाऱ्या माणसांची कांहीं तरी सोय होत असे. देवळांमधील वृद्ध जोडपें त्या ठिकाणच्या लोकांच्या चांगलेंच परिचयाचें झालेलें होतें. तें जोडपें रात्रंदिवस परमेश्वरसेवेंत गढलेलें असे.

भय्या देवळांत जातांच त्यानें शंकराला नमस्कार घालून त्या वृद्ध जोडप्यासही वंदन केलें. तो प्रकार पाहतांच ते दोघे भय्याकडे आश्चर्ययुक्त मुद्रेनें पाहूं लागले. त्या ह्मातान्यानें त्यास ह्मटलें, “ बाळा ! तूं कोण हें मीं ओळखलें नाहीं. वृद्धपणामुळें मला मनुष्य नीटसें दिसत नाहीं. तुझी आमची ओळख आहे कीं काय ? ”

या प्रश्नास भय्यानें उत्तर दिलें, “ मी तुमच्या ओळखीचा आहे कीं नाहीं हें मला ठाऊक नाहीं. तुह्मी मात्र माझ्या ओळखीचे नाहीं. आपला

वयोवृद्धपणा ध्यानांत आणून मीं आपणास वंदन केलें. या मातोश्रीसमान ह्मातान्याबाई आपल्या पत्नीच असतील ! ”

या तारुण्यसंपन्न भय्याचा हा आदरभाव पाहून ह्मातारा ह्मणाला, “ तुझ्या तारुण्याच्या मानानें तुझ्याठायीं इतकी विनयसंपन्नता व शहाणपणा कसा ? अरे, आमच्यासारखीं वृद्ध मनुष्यें ह्मणजे साधारणपणें टाकाऊ जीव होत ! जिवंत आहों ह्मणूनच आह्मीं अन्न खायचें. साधारणतः धारण महाग करण्यालाच काय तो आमचा उपयोग ! आम्हांला विचारतो कोण ? ”

तो ह्मातारा स्थितिग्रस्त असावा असें ताडून भय्या ह्मणाला, “ ह्मातार-बाबा कोणाच्या कल्पना कशा असतील त्या असोत ! मला मात्र आपणाप्रमाणें वृद्ध दंपत्य शंकरपार्वती किंवा माझ्या आईबापाप्रमाणेंच वाटतें. हा माझा मूर्खपणाही कदाचित असेल; पण तो मला प्रिय आहे. या मूर्खपणानें झाला तर प्रसंगीं फायदाच होईल. वृद्ध जोडप्याला उमामहेश्वर मानून त्यांची शक्य तीं सेवा केली तर त्या सेवेनें ईश्वर संतुष्ट होईल असें माझ्या गुरूनें मला सांगितलें आहे. आपण या देवाचे पुजारी आहां कीं काय ? ”

भय्याचें मन संस्कारयुक्त झालेलें असावें असें जाणून ह्मातारा ह्मणाला, “ देव तुझें कल्याण करो ! तुझ्यावर तुझ्या गुरूच्या सदुपदेशाचा परिणाम झालेला दिसतो. नाहींतर अशा प्रकारची लीनता व सद्बुद्धि सामान्यतः दुर्मिळच होय ! मी या देवाचा एक उपासक आहें. मला कोणीं नोकर ह्मणून पूजेची सेवा सांगितलेली नाहीं. आज कित्येक वर्षें मी माझ्या कुटुंबासह यात्रा करीत असतां येथें आलों व हें ठिकाण निवस्थ आहेसें वाटून येथेंच आह्मीं वास्तव्य केलें. येथेंही आह्मीं बराच काळ शंभुचरणाजवळ काढला. एवढ्या काळांत माझ्या उपास्यदेवतेला तर माझी करुणा आली नाहींच; पण अलीकडे या स्थलाचा निवस्तपणा भंग होऊन आमच्यामागें एक नसतीच पीडा मात्र लागली आहे ! ”

तशा पवित्र व जर्जरीत दंपत्यालाही त्रास देणारीं माणसें जगतांत वास करतात याबद्दल आश्चर्य व खंत मानून भय्यानें त्यास विचारलें, “ ह्मातार-बाबा ! आपल्यासारख्यांना देखील त्रस्त करण्याची पुण्याई कोण जोडतो हें मला कळवितां काय ? ”

हा प्रश्न ऐकून ह्मातारा भय्याला बारीक नजरेनें न्याहाळीत ह्मणाला, “ कां बरें ! तुह्मी कोण आहां ? तुह्मी त्याचें काय करूं शकाल ? तुह्मी

कोणा राजाचे पुत्र कां आहां ? किंवा या देवळांतील भोलानाथाचें तुह्मी कोणी गण आहां ? ”

ही प्रश्नमालिका ध्यानांत घेऊन भय्यानें विचारलें, “ बाबा ! तुम्हाला कोणीतरी बहुत पीडा दिली असावी असें वाटतें. मी कोणीही असलों तरी तुमची पीडा व तुमचा छळवादी कोण हें कळविण्यास हरकत कोणती ? ”

त्याची विशेष इच्छा जाणून ह्मातारा हलकेच म्हणाला, “ तशी कांहीं हरकत नाहीं पण तुह्मी त्याचें काय करूं शकाल ? तो मनुष्य कोणीतरी श्रीमंत, सरदार, जहागिरदार असा बडा असावा. तो शक्तिवान् असून लष्करी-पेशाचा आहे. सांप्रत तो येथें नाहीं; पण तो दोन दिवसांनीं येणार आहे. मला त्याचें नांव ठाऊक आहे पण तो कोण; कोठचा वगैरे कांहींच ठाऊक नाहीं. त्याला वीरबाहू असें म्हणतात. हें नांव मला त्याच्याचकडून कळलें. ”

हें नांव ऐकतांच भय्या कांहीं आठवण करण्याचा यत्न करूं लागला. त्यामुळें त्याला वीरबाहूची कांहीं खूण पटली कीं नाहीं याविषयीं ह्माताऱ्याला कांहीं समजलें नाहीं. कांहीं वेळ थांबून भय्या म्हणाला, “ असेल ! तो कोणीही असला आणि त्याचें नांव कांहींही असलें तरी तो तुह्माला काय म्हणून पीडा देतो ? तुह्मीं त्याचा काय अपराध केला आहे ? ”

यावर तो ह्मातारा म्हणाला, “ तुह्मी कोण हें कांहीं अद्याप मला कळलेलें नाहीं. तुमच्या एकंदर वृत्तीवरून तुह्मी कोणीतरी भले आहां असें मला वाटतें. पण दुधानें तोंड भाजलें म्हणजे ताकही फुंकून प्यावें लागतें. तो वीरबाहू येथें आला तेव्हां तोही कांहीं आह्माला गैर दिसला नाहीं. पण आठचार दिवसांनीं त्यानें आमच्यामागें भलतेंच लचांड सुरू केलें ! ”

म्हातारा निराधार होऊन निराशेच्या भीतीनें व्याप्त आहे असें पाहून भय्यानें सांगितलें, “ आपलें ह्मणणें योग्य आहे. आपला संशयही यथार्थ आहे. माझा व त्या वीरबाहूचा कांहीं संबंध नाहीं. आपल्या जोडीला या ठिकाणीं तो एक तिसरा मनुष्य आहे हें देखील मला ठाऊक नाहीं. मी फार लांबचा मनुष्य आहें. मी अत्यंत दैवहीन आहें; पण माझ्या गुरु भारतीनें मला सनाथ केलें असल्यानें माझ्या दैवहीनतेची मला दिक्कत नाहीं. मला भय्या असें म्हणतात. आतां आपल्या पीडकाचें वृत्त मला सांगा. ”

वृद्धानें गुरु भारतीचें नांव पूर्वीं ऐकलें होतें. भय्याच्या तोंडून तें नांव निघतांच तो बोलला, “ यशस्कार नांवाच्या पर्वतावरील श्रीभारती हाच जर

आपला गुरु भारती असेल तर आपण सद्धर्मपालक असाल यांत संशयच नको. मीं त्या भारतीला पाहिलें नाहीं; पण तो पुरुष अत्यंत अधिकारसंपन्न महात्मा आहे असें माझ्या ऐकिवांत आहे. तुमच्या इच्छेस अनुसरून मी तुह्मांला वीरबाहूची सर्वच हकीगत सांगून टाकतो. आतां तुह्मी स्नानादि विधि उरका, भोजन करा आणि मग आपण बोलत बसूं."

भय्यानें हा विचार मान्य केला. एकंदर विधि उरकण्यांत एक प्रहर गेला. आणि सरासरी तिसरे प्रहरच्या सुमारास पुन्हां त्यांचें बोलणें सुरू झालें. त्या वेळीं ह्मातारा ह्मणाला, "त्या वीरबाहु समवेत कोणी एक स्त्री आहे. ती राजकन्या असावी असें वाटतें. तिला त्यानें ठार मारण्याची दहशत घालून आपलें नांव व आपण कोणाची कन्या वगैरे गोष्टी बाहेर न फोडण्याबद्दल सक्त ताकीद देऊन ठेविली आहे. तो ह्मणतो ती अविवाहित आहे. ती ह्मणते कीं तिचा प्रत्यक्ष विवाहविधि झालेला नाहीं तरी तिनें आपल्या मनानें एक बहुगुणसंपन्न वर वरिला आहे. त्या पुरुषावांचून सर्वांना ती पितृवत् मानते. तिनें ज्या पुरुषास मनानें माळ घातलेली आहे त्याचें नांव नित्यंक असें आहे. या नित्यंकाच्या ठिकाणीं अनेक सद्गुण आहेत. तो गरीब स्थितींत आहे; तरीपण तो उच्च कुलोत्पन्न, व सत्वसंपन्न शुद्धाचरणी असल्यानें तिच्या या पतिस्वीकारास तिच्या मातापित्यांची, बंधुवर्गाची, कुलपुरोहितांची पूर्ण संमती आहे."

इतकें बोलत असतां तो ह्मातारा व त्याची वृद्ध बायको हे दोघेहीजण डोळे पुसूं लागले. त्यांना हलके हलके इतका गहिंवर दाटला कीं, त्या ह्माताऱ्याला कांहीं वेळ आपल्या भाषणाचा ओघ थांबवावा लागला. तो प्रकार पाहतांच भय्या गंभीरपणानें बोलला, "अजोबा! आपण कष्टी होऊं नका! आपल्याला कोणत्या गोष्टीचा उद्वेग वाटतो तें मला सांगा. मी शक्य त्या प्रयत्नानें आपलें दुःख नाहींसें करीन. आपण डोळ्याला पाणी कां आणतां बरें?"

या कनवाळू शब्दांनीं त्या ह्मातान्या जोडप्याला धीर आला. पण आपल्या रडण्याचें कारण नाहींसें होणें अशक्य आहेसें वाटून तो अपर्णेश्वराकडे आशेनें पाहून म्हणाला, "आतां माझें काय राहिलें आहे? आतां आमचे उभयतांचे डोळे मिटतील तर फार बरें होईल! माझ्या दुःखाच्या कारणाचा इतिहास फारच मोठा आहे. सध्यां ही चालू हकीगत संपू द्या! त्या स्त्रीला या वीरबाहूनें अकस्मात् पळवून येथें आणून ठेविली आहे. त्याच्या मनांतून तिनें

दुसऱ्याच कोणा सरदारपुत्रास वरावें असें आहे. पण तिला तो सरदारपुत्र मुळींच मान्य नाहीं. कारण तो अत्यंत नीच, पापी, भ्रष्ट व दुर्गुणी आहे. वीरबाहूचें म्हणणें असें आहे कीं, तिच्या बापानें व एका चुलत भावानें तोच सरदारपुत्र पसंत केला असून सरदारास त्यांनीं तसें अभिवचनही दिलें आहे. या पोरीच्या छांदिष्टपणानें तिला तो सरदारपुत्र नको असल्यानें ती घरांतून पळून गेली; व वाटेनें त्यानें तिला पकडली. ती या सर्व गोष्टी शपथेवर नाकारते. वीरबाहु हा मोठा लफंग्या आहे. तिनें मनानें एक वर वरला असेल आणि त्यामुळें तिला जर सरदारपुत्राशीं पुन्हां विवाह करतां येत नसेल तर तिनें वीरबाहूच्या जनानखान्यांत नाटकशालेप्रमाणें रहावें असें त्याचें तिला आग्रहाचें ह्मणणें आहे. त्याचें कांहीं तरी आणखी विशेष गुप्त कारस्थान असावें; म्हणूनच तो येथून तिला घेऊन निघून जात नाहीं. त्या पोरीनें त्याचें कोणतें तरी म्हणणें खुषीनें मान्य करावें म्हणून तो आम्हास तिला तसा भलताच उपदेश करावयास सांगतो. ती त्याचें म्हणणें मान्य करील किंवा न करील हा प्रश्न स्वतंत्र आहे. पण आमच्यासारख्या मनुष्यांनीं त्या पोरीला असा उपदेश करणें हें पशुवत् आचरण होय अशा समजुतीनें आह्मी त्याची आज्ञा मान्य करीत नाहीं आणि म्हणूनच त्या पोरीला जास्त फूस सांपडून ती त्याचा धिःकार करते अशा कांहीं तरी कारणानें तो नित्य आह्माला गांजतो, शिव्या देतो, मारतो, प्रसंगीं लाथांनीं देखील तुडवितो ! ! ”

हे शब्द कानावर पडतांच भय्याची वीरश्री आवेशयुक्त झाली. क्षात्रतेजाच्या प्रकाशानें तो सटवाईचा भोप्या देदीप्यमान् दिसूं लागला. तो अत्यंत आवेशपूर्ण वाणीनें ह्मणाला, “ ह्मातारबोवा ! आपण आतां रतिमात्र काळजी करूं नका. ज्या अपर्णेश्वराची आपण मनोभावें सेवा करतां त्यानेंच या भारतीपुत्राला येथें आणलें आहे. आपला अधिकार लक्ष्यांत आणून आपल्याला वंदन करावयाचें टाकून जो अधम नीचपणानें आपल्याला नीच कर्मपराङ्मुखतेबद्दल नीचतेनें वागवितो त्या नीचास शासन करण्यास मी समर्थ आहें. तो कितीही शूर असो; तो कितीही बलवान् असो. त्याच्या नीचतम आचरणामुळें शौर्य आणि सामर्थ्यदेवता त्याला प्रतिकूळच होतील ! आज तो दुष्ट येथें हजर नाहीं त्यास इलाज नाहीं. पण तो येथें येतांच त्याचे जे पाय एका अतिवृद्ध, सत्वस्थ,

निराधार, स्थितिग्रस्त सज्जन जोडप्याला लाथा मारण्यास प्रवृत्त होतात ते जर माझ्या हस्तें तुटले नाहींत तर मी सद्गुरु भारतीचरणाचा दासच नव्हे. ”

इतकें आश्वासनपूर्वक बोलून त्यानें आपलें मन स्थिर केलें आणि तो पुन्हां त्या वृद्धास ह्मणाला, “ ती तरुण कन्यका कोठें आहे ती मला आपण दाखवाल काय ? तो येण्याच्या पूर्वी जर माझी तिची भेट होईल तर मी तिला निर्भय करून तिची खरी हकीगत समजाऊन घेईन. ”

भय्याचा आवेश पाहून ह्मातारा बराच धैर्ययुक्त झाला होता. तो त्याच्या विषयींच कल्पना करण्यांत गढला होता. भय्यानें ही जी नवीन इच्छा प्रगट केली तिच्याविषयीं तो त्यास ह्मणाला, “ ती कन्यका येथून लांब नाहीं. याच देवळाच्या भोंवतालच्या आवारांत एक भुयार आहे त्यांत तिला ठेविली आहे. तिच्या संरक्षणार्थ वीरबाहूनें येथील दहापांच रांगडे ठेवलेले आहेत. येथील लोक अगदींच अडाणी व गांवढळ असल्यामुळें ते सर्व वीरबाहूच्या श्रीमंतीला भुलले आहेत. तो जें जें सांगेल तें तें ते सर्वजण मनोभावें करतात. आपण रात्रीं त्या गुहेकडे जाऊं. ”

ह्मातान्यानें असें अभिवचन देतांच भय्यानें त्याला पुन्हां प्रश्न केला, “ त्या राजकन्येनें ज्याला मनानें माळ घातली आहे त्याचें नांव काय बरें मघांशी तुह्मीं सांगितलें तें ? ”

हा प्रश्न पोकळ नव्हता. हा प्रश्न विशेष हेतूनें मुद्दाम विचारलेला होता. भय्या तें नांव विसरला होता असें नव्हतें. तें त्याच्या चांगलेंच ध्यानांत होतें; पण त्या नांवाचा उच्चार करून त्या माणसाचें वर्णन करतांना त्या उभयतांना गहिंवर आला होता हें भय्यानें निरीक्षण करून ठेवलेलें होतें. त्याचा तो प्रश्न ऐकतांच ह्मातान्याचा चेहरा किंचित् पालटला. त्यानें त्याला पुन्हां सांगितलें, “ त्याचें नांव नित्यंक असें असून तो मोठा सद्गुणी, सालस आहे. ”

हें वाक्य उच्चारतांनाही पुन्हां म्हातारा गहिंवरला. तें पाहतांच भय्याच्या कल्पनेंत दृढपणा येऊन त्यानें त्यास विचारलें, “ म्हातारबोवा ! या नित्यंक नांवाचा उच्चार करतांना आपली अशी स्थिति कां होते हें या अपर्णेश्वरास स्मरून सत्य सांगा. त्याचप्रमाणें आपणा उभयतांचीं नांवें सांगा अशी आपणाला मी आग्रहाची विनंति करतों. ”

ह्या भाषणानें तो म्हातारा फारच घाईला आला. त्याची बायकोही अत्यंत

व्याकूळ झाल्यासारखी झाली आणि म्हातारा कांहीं हकीगत सांगणार तों ती वृद्ध सतीच बोलूं लागली, " बाबा, तुला आह्मी आपल्या जन्माची कहाणी काय सांगावी ? आमचाही एकुलता एक मुलगा होता. त्याचें नांवही नित्यंकच होतें. तो सातसायासानें झालेला पोर नित्यंक लहानपणींच आटपला. आमचा नित्यंक आपल्या मरणानेंही बिचारा मेला नाहीं. त्याला व्याघ्ररूपी कालानें ओढून नेलें. त्याच्या चुलत्यानें ह्मणजे माझ्या भद्रपती या नांवाच्या दिरानें आमच्या नित्यंकाला आपल्याबरोबर वनविहारार्थ नेलें असतां एका भयंकर वाघानें नित्यंकावर हल्ला केला आणि तो घातकी, हिंसक, क्रूर, निष्ठुर, कालरूपी व्याघ्र आमच्या नित्यंकासह डोंगरांत निघून गेला. अशाप्रकारें आम्ही पुत्रहीन बनलों. पुत्राच्या अपमृत्यूबद्दल आम्ही विनाकारण किंवा सकारण भद्रपतीला मोठें दूषण दिलें; तेव्हां लज्जायमान होऊन अब्रूखातर त्यानें गृहत्याग केला !"

असें बोलून म्हातारी रडूं लागली. ह्मातान्यानें आपलें रडें तसेंच आटपून धरून पुढें सांगितलें, " तो भद्रपती जिवंत असून कोठें तरी गोसावी होऊन भटकतो आहे असें म्हणतात. त्यानंतर आमच्यावर नानाप्रकारचे प्रसंग येऊन आमची वाताहत झाली. पुढची सर्व साद्यंत हकीगत फार लांबलचक आहे. ती ऐकून बाळा, तुला कंटाळा येईल ! "

हें सांगून म्हाताराही अश्रुपात करूं लागला. भय्यालाही गहिंवर अनावरच झाला होता. पण त्यांतल्यात्यांत गहिंवर सावरून तो त्या वृद्धांना म्हणाला, " तुमचें नांव तुम्हीं वगळलें आहेत ! हरकत नाहीं. तेवढें काम मी करतों. ईशपती आणि पार्वती अशीं आपलीं उभयतांचीं नांवें आहेत ना ? "

असा प्रश्न करून भय्याला त्या बागेंतील घरधन्याकडून जी हकीगत समजलेली होती तीच त्यानें म्हातान्यास सांगून त्यांचें राहिलेलें चरित्र त्यांच्यापुढें सादर केलें. तें कथानक कानीं पडतांच तें जोडपें आश्चर्यातिरेकानें भय्याच्या चेहऱ्याकडे पाहूं लागलें तोंच भय्याचें गहिंवरयुक्त मातृपितृप्रेम बाहेर उचंबळून येऊन त्याचें तोंडून पुढील उद्गार निघाले " हे सद्गुरुश्री भारती ! तुझ्या चरणाचा लीन दास हा नित्यंक भय्या हें स्वप्नतर पहात नाहींना ! हें जगच्चालक पार्वतीपरमेशअपर्णेश्वरा ! तूं अत्यंत कृपाळू होऊन ही माझी मातृपितृदेणगी, ही माझी अपूर्व कल्याणखनी, हा माझा इहपरलोकांतील अद्भुत ठेवा जतन करून ठेवलास हा मला भास तर होत नाहींना ? छे ! छे ! "

इतकें बोलून तो त्या वृद्धाकडे वळला आणि अत्यंत प्रेमानें धांवत जातांना ' हे माझे भूलोकांतील पार्वतीपरमेश्वर ! ' असे शब्द बोलून त्यानें त्या वृद्ध जोडप्याच्या चरणीं लोटांगण घातलें व त्यांना सांगितलें, " हे भाग्यसंपन्न ईशपते ! हे महानसाध्वी मातोश्री पार्वती ! हा आपला व्याघ्रमुखां-तून सुटलेला पुत्र नित्यंक आपल्याला प्रणिपात करीत आहे ! "

या शब्दोच्चारानें त्या म्हाताऱ्या ईशपतीच्या व पार्वतीच्या हृदयांत कोणता रस परमावधीला पोंचला असेल, त्यांची कोणती वृत्ति उचंबळून गेली असेल आणि त्यांचे कोणते भाव दाटून गेले असतील याविषयीं चाणाक्षपणानें व सहृदयतेनें कल्पना करणच श्रेयस्कर होय ! !

---

## प्रकरण ३९ वें.

### पतिपत्नी भेट.



ती पार्वती व साधु ईशपती या मातापित्यांची त्यांच्या नित्यंकपुत्राशीं भेट होऊन त्या त्रिवर्गाची आनंदाति-रेकाची उबळ शांत झाल्यावर त्या जोडप्यानें नित्यं-कास त्याची आतांपर्यंतची हवाल विचारली. त्यानें स्मरत असलेलें आपलें सर्व चरित्र त्यांना सांगितलें. श्रीभारतीनांवानें विख्यात असलेल्या सद्गुरूनेंच त्याला वाढविलें असें नित्यंकाच्या तोंडून त्यांना समजलें. पण व्याघ्रमुखांतून तो कसा मुक्त झाला वगैरे हकीगत मात्र त्यांना अज्ञातच राहिली. गुरुभारतीची भेट झाल्यावांचून त्यासंबंधीं सर्व उलगडा होणार नाहीं असें नित्यंकानें सांगितलें.

ती रात्र तशीच आनंदाच्या गोष्टी बोलण्यांत, सुखदुःख वर्णन करण्यांत व भारती आणि अपर्णेश्वर यांच्या कृपेचें महात्म्य गाण्यांत निघून गेली. दुसऱ्या दिवशीं नित्यंकानें गुहेंतील कन्यकेची गांठ घ्यावी असें ठरविलें. पण ती गोष्ट त्याच्या आईबापांना पसंत पडेना. त्यांना वीरबाहूची अद्याप भीति वाटत होती. नित्यंकानें त्या मुलीच्या कामांत कांहीं ढवळाढवळ केली असें वीरबाहूला समजेल तर विनाकारण तो जास्तच खवळून कदाचित्

नित्यंकाला अपाय करील अशा दहशतीनें ईशपती व पार्वती नित्यंकास ह्मणाले, " आह्माला वाटतें कीं कांहीं काळ निदान हा वीरबाहू या स्थलाचा त्याग करीपर्यंत आपण येथून कोठें तरी दूर निघून जावें. आपल्याला गुरुभारतीचें दर्शन घेतलेंच पाहिजे. तोंपर्यंत आपण त्यांच्या भेटीस जाऊं आणि मग त्यांच्या परवानगीनें पुन्हां या ठिकाणीं येऊन आनंदांत काळ घालवूं. कोणत्याही मोहानें किंवा लालुचीनें आम्हांस आतां तुझा वियोग सहन होणें शक्य नाहीं. वीरबाहूच्या ताब्यांतील मुलगी कोणीही असली तरी आपणास तिची मुळींच जरूर नाहीं. तिची स्थिति कींव करण्यासारखी आहे ही गोष्ट खरी आहे; पण या कामीं आपण दुसऱ्या कोणा समर्थाला विनंति करून तिचा परामर्ष घेण्याची व्यवस्था पाहूं. आपणास त्या वीरबाहूचें अखंड वैर जोडणें नको ! "

वस्तुतः ईशपतीचा हा विचार योग्य नव्हता असें कोण ह्मणेल. पण नित्यंकाला तो पसंत पडणें मुष्किलीचें झालें. तो राजकन्येसाठींच हिंडत होता. राजकन्येची प्राप्ती हेंच त्याचें आतांचें ध्येय होतें. त्याच्या ध्येयानेंच त्याला स्वर्गद्वारावरील अपर्णेश्वराजवळ आणलें. तेथेंच त्याला त्याच्या आईबापांचा अपूर्व लाभ झाला. म्हणजे त्या अपूर्व सौख्यप्रद लाभाचें कारण त्याचें ध्येयच होय अशी त्याची समजूत झाली. मग तो आपल्या ध्येयास कसा विसरणार? ईशपतीनें केलेल्या वर्णनावरून वीरबाहूनें कोंडून ठेवलेली कन्यका प्रमिलाच असावी अशी त्याची बहुतेक खात्री झालेली होती. प्रमिलेची स्थिति केविलवाणी होती ही गोष्टही ईशपतीला मान्य होती. तिची सुटका होऊन ती आपल्या आईबापांना भेटावी असें त्याला वाटत होतें; पण त्या कामीं तो वीरबाहूला भीत असल्यानेंच तो आपल्याला अगदीं तटस्थ राहण्याची सूचना करीत असावा असें नित्यंकानें ओळखलें. त्या प्रकरणांत वीरबाहूकडून आपल्याला अपाय घडेल अशा भीतीनेंच तो तेथून पाय काढण्याची इच्छा करीत असावा; तात्पर्य अलभ्य अशा लाभलेल्या पुत्रप्रेमामुळें त्याच्या तोंडांतून तटस्थवृत्ति अंगिकारण्याबद्दल उपदेश निघत असावा असें जाणून त्याला निर्भय व निःशंक करण्याकरतां नित्यंकानें सांगितलें, " आपणा उभयतांची आज्ञा मला मान्य आहे. पण आपण येथून अजीबात निघून जाण्याचा विचार मनांत आणण्याचें खरें कारण वीरबाहूचा दरारा हेंच असलें पाहिजे अशी माझी समजूत आहे. वीरबाहूनें कैद केलेली स्त्री राजकन्या प्रमिलाच आहे असें मला

हजारहिश्शांनीं वाटतें. तसें असेल तर माझें कामच झालें. कारण मी तिच्या-करतांच येथवर आल्यानें माझी व तुमची भेट झाली. ती जरी प्रमिला नसली तरी हरकत नाहीं; पण तिला मुक्त करून तिच्या सुहृदांच्या स्वाधीन केली तर त्यांना केवढा आनंद होईल व ते आपणास किती दुवा देतील हें तुह्मांस सांगावयास नकोच. आतां तुमची भीति दूर होण्याकरतां मीं आजच त्या स्त्रीची गांठ घेण्याचा बेत रहित करतो. प्रथमतः त्या दुष्ट वीरबाहूची वाट लावून तुह्माला निर्भय केल्यावर मग मात्र तुह्मी हा विचार कायम राखणार नाहीं आणि त्या स्त्रीच्या सुटकेस वचकणार नाहीं अशी मला पूर्ण आशा आहे."

नित्यंकाची ही सूचना त्यांना मान्य झाली. वीरबाहू तेथें परत येतांच तो त्यांना त्यांच्या कामगिरीबद्दल विचारूं लागला म्हणजे ईशपतीनें त्याला समजुतीच्या गोष्टी सांगण्यास लागावें. त्याला त्या अबलेला बंधमुक्त करण्याचा उपदेश करावा. त्याच्या नीच व चोरट्या कृत्याबद्दल जरा दरडवावें. तो नीच त्यास जुमानणार नाहींच. तो आपल्या घमेंडखोर व नीच वृत्तीस अनुसरून नेहमींच्या क्रमानुसार अमानुष वर्तन करण्यास लागतांच पुढें काय करावयाचें तें नित्यंकानें करावें. तोंपर्यंत नित्यकानें तो सर्व प्रकार आडून पहात रहावें व त्याच्या बरोबरच्या वाटाड्यानें त्याला शक्य ते सहाय्य करावें असा त्यांचा विचार कायम झाला आणि याबद्दल अवश्य ती सर्व खबरदारी घेऊन ते वीरबाहूच्या आगमनाची वाट पाहत बसले.

आपलें खाजगत काम उरकून वीरबाहू त्या ठिकाणीं आला. त्यानें प्रमिला-गुहेवरील रखवालदारांची गांठ घेऊन सर्व कांहीं सुरक्षित असल्याचें समजून घेतलें व आपला नित्यक्रम उरकून तो प्रमिलेकडे गेला. त्यानें त्या दिवशीं प्रमिलेला सांगितलें, " राजकन्ये ! आतां तूं आपला हट्ट सोडावास हें बरें ! आजपर्यंत मीं तुझी समजूत केली; तूंही माझा धिःकार केलास ? त्याचें मला कांहींच वाटत नाहीं. तूं ज्या पुरुषास मनानें वरलें होतेंस तो सांप्रतकाळीं भूलोकाचा त्याग करून गेला आहे. आतां तुला कामसेनाशीं किंवा तुला कामसेन आवडत नसेल तर माझ्याशीं विवाह लावण्यास मुळींच हरकत नाहीं. तूं कदाचित् आपल्या भावाला किंवा बापाला भीत असशील पण ती तुझी भीति व्यर्थ आहे. याही उप्पर तूं जर मूर्खपणानें आपला आग्रहच

धरून बसशील तर मी तुला तो सोडणें भाग पाडीन. कारण तुझा पति परलोकवासी झाला असल्याकारणानें आतां तूं बेवारसच झाली आहेस. आतां मी किंवा कामसेन यांतून कोणास तुझी मालकी द्यावयाची हें तूं आजच्या दिवसांत ठरीव. उद्यां याच वेळेस मी तुला काय तो जबाब विचारण्यास येईन. परवाच्या दिवशीं तुला येथून दुसरीकडे न्यावयाचें आहे. तूं जर शहाणी असशील तर येथून मजबरोबर माझ्या पट्टराणीच्या थाटानें चलशील ! मूर्ख, अडाणी, हेकेखोर, अजागळ असशील तर धर्माची खुळी तत्वें उराशीं धरून येथून कैद्याच्या रूपानें मजबरोबर येशील आणि जन्मभर त्या कामसेनाच्या जाचांत राहून अखेर कुत्र्याप्रमाणें तडफडून केव्हां तरी त्याच्या किंवा माझ्या हातून प्राणास मुकशील याचा पुरता विचार कर ? "

अशा प्रकारची कांहीं धमकी, कांहीं सूचना देऊन व कांहीं मोहाचीं भाषणें बोलून तो मदोन्मत्त वीरबाहु देवळामध्यें गेला. तो केव्हां यावयाचा होता हें ईशपतीला नक्की ठाऊक असल्याकारणानें तो तेथें येण्यापूर्वीच नित्यंक योजलेल्या गुप्त स्थळीं दडून त्याचा खेळ निरीक्षण करण्यासाठीं टपून बसला होता. वीरबाहूनें वाटाड्याला पाहतांच त्याची चौकशी केली. तो वाटाड्या वस्ताद होता. त्यानें वीरबाहूस पाहतांच वेड्याचें सोंग घेतलें आणि आपण कोणी तरी अगदीं गांवढळ भिक्षेकरी असून गोसाव्याच्या संगतीनें अपर्णेश्वराच्या दर्शनास आलों आहों असें त्यानें वीरबाहूस दर्शविलें. तो वीरबाहूजवळ खुणा करून कांहीं खावयास मागूं लागला. वीरबाहू उदारच होता. त्यानें लागलीच त्याची गरिबी व निर्बलता लक्षांत घेऊन त्यास खावयास देण्याच्या बुद्धीनें हातानें खुणा करून, " मार खावयास पाहिजे कां ? " असें विचारलें. तेव्हां तो वाटाड्या अत्यंत घाबरल्यासारखें करून कांपत कांपत देवळापासून लांब पळून गेला.

वीरबाहूनें लागलीच आपली कांठी आपल्या हातांत घेतली. तो त्या झालारबाईस प्रथम ह्मणाला, " काय गं ए थेरडे ! तुला सांगितलेलें काम अद्याप साधत नाहीं अशी तूं निरक्कल कशी ! अक्कलशून्य अशा स्थितींत तूं मुईला तोंड लागेपर्यंत जगलीस याची तुला शरम कशी वाटत नाहीं ! "

वीरबाहूनें आपल्याशींच काय तें बोलावें म्हणून ईशपती त्यास ह्मणाला, " अरे शहाण्या, शूर मनुष्या ! तूं माझ्याशींच काय तें बोल. "

यावर वीरबाहु त्याच्याकडे वळून ह्मणाला, " थेरड्या ! तिचाच नवरा तूं !

गधड्या! तुला तरी कांहीं ज्ञान, धोरण असावें कीं नाहीं ? लेको, तुह्मी दोघे पोक्त आहां. वडीलपणानें त्या अजाण पोरीला चार थोर व तिच्या कल्याणाच्या गोष्टी सांगून ती माझें ह्मणणें कबूल करील असें कांहीं जमवायाचें सोडून रोज मला कांहींतरी सबबी काय सांगतां ? मी गेल्यापासून परत येईपर्यंत दोन दिवसांत तुह्मीं तिची गांठसुद्धां घेतली नाहींत असें मला पाहऱ्यावरील लोक सांगतात ! मी जातांना काय बजावून गेलों होतो ? बोल, थेरड्या ! तूं अजून कसल्या घमेंडींत आहेस ! ”

ज्ञाताऱ्यानें त्यास उत्तर ह्मणून असें विचारलें, “ अरे पापकर्मी मनुष्या ! मी कसली घमेंड करणार ? तुझ्यासारख्या वयांत असतांनासुद्धां जर मी कधींच घमेंड दाखविली नाहीं तर आतां मी कशाची घमेंड दाखविणार ? ती पोरगी शुद्ध-सत्त्व गुणी आहे. तिला धर्मतत्वांचें रहस्य समजलें आहे. ती तरुण आहे तरी तिच्या मनांत सद्भावना, सदाचार, पातिव्रत्य, शुद्ध आचार यांचां हितपरिणामीं तत्वें पूर्णपणें बिंबलेलीं दिसतात. ती तुझ्या भलत्याच भावनास हुरळणार नाहीं. तूं तिला मुकाट्यानें सोडून दे. दुष्ट विचारापासून परावृत्त हो. याचा परिणाम चांगला होणार नाहीं. धार्मिकवर्तनलोलुप माणसांच्या अनन्वित छळानें परमेश्वराची अवकृपा होते. गर्व-मद-धुंदीमुळें तुझ्यासारख्या अहंभावी पापप्रवृत्त माणसाच्या लक्षांत या गोष्टी आरंभीं येत नाहींत; पण मागील उदाहरणें ध्यानांत घेऊन आणि अनुभवी सज्जनांचीं वचनें खरीं मानून तूं भ्रष्ट कर्मापासून परावृत्त हो ! ”

वीरबाहुसारख्याला या अमूल्य उपदेशपर वाक्याचें काय मोल वाटणार ! तो असल्या उपदेशकाला मूर्ख समजून आपल्या नीच कर्मपरायणतेलाच महत्व देणार ! त्यानें जरा क्रुद्ध होऊन ज्ञाताऱ्यास उत्तर केलें, “अरे वा ! वाहवारे थेरडोपंत ! ज्ञातारड्या ! अरे, तूं बराच धर्मज्ञ झालास ! आणखी आज तूं असा बेफामपणें कां बोलतो आहेस ! तूं तर मला अरे तुरे ह्मणण्याचा आज सपाटा चालविला आहेस ! अरे, गाढवाच्या कांद्या ! मी सांगितलेली कामगिरी उद्यांपासून मुकाट्यानें बजाव ! नाहींतर मी सक्तीनें त्या पोरीचें मला पाहिजेल त्याच्याशीं लग्न लावीन. पण येथून जातांना तुला माकडाला आणि तुझ्या या माकडीला कोलदांडा घालून कड्यावरून फेकून देईन हें ध्यानांत असूं दे ! ”

या धमकावणीस न भितां पार्वती बोलली, " आह्मी निरक्षर असल्यामुळें तुला अहो जाहो ह्मणण्याचें आह्मांला कळणार कसें ? मेल्या ! आजपर्यंत तूं आमचा काय ह्मणून रे सारखा छळ मांडला आहेस ? तुला कांहींच काळीज नाहीं कां ? तुझ्या हृदयांत सुविचाराला थाराच नाहीं कां ? तुला तुझ्या आईनें अपशब्दांचेंच बाळकडू पाजलें आहे कां ? मूर्खा ! तूं ही नीच कामगिरी सांगून आह्मांला लाथा मारतोस याची तुला लाज वाटत नाहीं कां? तुझ्या आईबापासारखे आह्मी तुला शोभूं ! तूं आपल्या आईबापांना असेच लत्ताप्रहार करशील कां ? "

या बोलण्यानें वीरबाहु रागावला. तो तिला ह्मणाला, " तुह्मी दोघांनीं आज बरेंच तोंड सोडलें आहे. माझ्या आईबापांनीं माझी अवज्ञा केली तर मी त्यांचें काय करीन तें मग सांगेन. तूर्त तुह्मी माझी अवज्ञा करतां व मी सरळ सांगतों त्यास वाकडें लावतां याबद्दल तुह्मांला मात्र आज चांगलेंच तुडविलें पाहिजे ! "

अशी सूचना देऊन तो गर्वोन्मत्त वीरबाहु त्या वृद्धांच्या अंगावर धावला. त्यांच्या सन्निध वेगानें धांवत जाऊन त्यानें लत्ताप्रहार करण्याकरतां आपली लाथ वर उचलली तोंच सत्पुत्र नित्यंक अति त्वरित गतीनें धांवत येऊन त्यानें आपल्या जवळील आजपर्यंत दडवून ठेवलेल्या शस्त्राचा प्रहार करून वीरबाहूचा जमिनीवर टेकलेला पाय तोडला ! त्या बरोबर वीरबाहु खालीं आदळला. त्याच्या उरावर एक पाय ठेवून नित्यंक त्यास म्हणाला, " हे पापप्रवृत्त हरामखोरा ! तूं या निरपराधी वृद्ध माणसांना आजपर्यंत जी विनाकारण पीडा दिलीस ती हा अपर्णेश्वर समक्ष पहात होता. तुझ्या पापाचा घडा पूर्ण होतांच त्याच परमेशाच्या इच्छेनें हें माझें शस्त्र तुझ्या पायावर बसलें. तुझा एक पाय तुटला हें कांहीं तुला पुरेसें शासन नव्हे. तूं जो पाय या मातृपितृसदृश वृद्धावर प्रहार करण्यास सज्ज केला होतास तो तसाच राहिलेला आहे. त्यानें देखील अद्याप तूं लोकांना पीडाच करशील. एतदर्थ परमेश्वराच्या प्रेरणेनुसार हा मी नित्यंक तुझ्या त्या पायाचाही तुकडा पाडतों. "

असें बजावून सांगून क्रोधावेशाच्या भरांत नित्यंकानें वीरबाहूचा दुसरा पायही छाटून टाकला. तो दुष्ट त्या वारांनीं विव्हळ होऊन बेसावध स्थितींत रक्तांत लोळत पडला. तें पाहून नित्यंक व त्याचे आईबाप यांना त्याची करुणा आली. त्यांनीं वीरबाहूस सावध करण्याची खटपट

चालविली. हा वृत्तांत हां हां ह्मणतां चोहोंकडे पसरला. वीरबाहूनें त्या ठिकाणच्या ज्या कित्येक लोकांना आपलेसें करून ठेवलें होतें त्यांतून कांहीं तेथें लागलीच धावून आले. त्यांतील कांहींजण नित्यंकाच्या भयंकर वर्तनामुळें त्याला भिऊं लागले. कांहींजण आपल्या रांगडी भाषेंत त्या प्रकाराबद्दल कांहीं बडबड करूं लागले. तो नित्यकाबरोबरचा वाटाड्या आसपास हिंडत होता. हें कृत्य घडतांच तोही तेथें धावून आला. त्याला त्या लोकांची रांगडी भाषा थोडीबहुत समजत होती. त्यानें त्यांतील कांहींजणास त्याबद्दल थोडेसें स्पष्टीकरण करून वीरबाहूच्या जखमेवर उपचार करण्याची सूचना केली. त्या लोकांत कोणीकोणी वनस्पत्याचे चांगले माहीतगार होते. त्यांनीं लागलीच जलदी करून कांहीं पाले व मुळ्या आणल्या आणि वीरबाहूच्या जखमांवर लावून त्यास कांहींसें शुद्धीवर आणलें.

नित्यंकाच्या सूचनेवरून त्या वाटाड्यानें त्या रांगड्यांना वीरबाहूस तेथून घेऊन जाण्यास सांगितलें. त्यांनीं आपल्यापैकींच एकाच्या घरीं त्याला नेलें. सर्व मंडळी तेथून गेल्यानंर नित्यंक त्या वाटाड्यांसह ईशपतीबरोबर राजकन्येच्या गुहेशीं गेला आणि त्यानें तिला बंधमुक्त केलें.

ती स्त्री प्रमिलाच होती. नित्यंकानें तिला लागलीच ओळखलें. भोप्याचें काम करीत असतांना त्यानें कित्येक वेळां राजकन्येला पाहिलेलें होतें. प्रमिलेस मात्र नित्यंक ठाऊक नव्हता; त्यामुळें आपला विमोचनकर्ता कोण हे तिला समजेना. तिनें ईशपतीच्या तोंडाकडे पाहून आपल्या जिज्ञासायुक्त मुद्रेनें त्यांस आपल्या मनांतील आशय कळविला. ईशपतीनें तें जाणून तिला नित्यंकाची सर्व हकीकत समजावून दिली. नित्यंक हें नांव कानीं पडतांच ती आपल्या मनांत अतिशय प्रसन्न झाली. तिचा चेहरा लज्जायमान होऊन मुकाट्यानें ती खालीं पहात राहिली. आपल्या पायांच्या बोटांचें निरीक्षण करण्याचा आविर्भाव दाखवून ती स्त्री मधून मधून हलकेंच नित्यंकाच्या चेहऱ्याकडे न्यहाळून पाहत होती. तिची ती कृति नित्यंक व ईशपती यांना समजून आली. ईशपतीला त्यांतील गुप्त भावार्थ समजेना. नित्यंकानें मात्र त्या कृतींतील गुप्त अर्थ जाणला. इतका प्रकार होऊन ईशपती, नित्यंक व प्रमिला यांसह पुन्हां देवळामध्यें आला. प्रमिलेनें लगलीच पार्वतीला वंदन केलें आणि तिच्या मुलाच्या हस्तें आपली मुक्तता झाल्या-बद्दल अतिशय कृतज्ञता व्यक्त केली.

प्रमिळेला फार वेळ घोटाळ्यांत ठेवणें बरें नव्हे असें समजून आणि त्या ठिकाणीं जास्त वेळ राहणेंही सुरक्षित नाहीं असें कल्पून नित्यंक ईशपतीस व पार्वतीस उद्देशून ह्मणाला, " ही स्त्री सिंधुपती राजा वसुप्रसाद याची कन्या प्रमिळा होय ! सटवाईच्या देवालयांत ही दर्शनाला आली असतां हिच्यावर वीरबाहूनें झडप मारून हिला पळविलें. त्यासमयीं हिच्या-बरोबर एक वृद्ध दास व तशीच एक वृद्ध दासी होती. त्यांना त्या दुष्ट वीरबाहूनें जखमी केलें. पहाटेच्या सुमारास मी देवळांत गेलों. माझ्या प्रयत्नानें ते सेवकजन सावध होऊन त्यांच्या करवीं मला सर्व मजकूर समजला. मी भारतीशिष्य नित्यंक लागलीच राजकन्येच्या तपासास निघालों आणि या शिष्य नित्यंकाच्या हस्तें राजकन्या मुक्त होण्याचा योग आला ही श्रीभारती, भगवान अपर्णेश्वर, आणि तुह्मी ईशतुल्या मातापिता यांचीच कृपा होय ! "

नित्यंकाच्या तोंडचें भाषण ऐकून प्रमिळेला संतोष वाटला. पण त्या भाषणांतील ' शिष्य नित्यंक ' हे शब्द मात्र तिला ब्रह्मानंददायक वाटले. त्या शब्दांनीं तिची अगदीं धांदल उडाली. आपण आपलें तन, धन, मन ज्याला अर्पण केलें तोच हा शिष्य नित्यंक आहे असें समतांच तिचें अंतःकरण बावरलें. एकदम जाऊन त्याला मिठी मारावी असें तिच्या मनांत आलें; पण लज्जा व विनयसंपन्न अशा स्त्रीच्या हातून ईशपती व पार्वती यां-सारख्या वडिलासमक्ष असें धारिष्ठाचें वर्तन घडणार कसें ? तिनें ईशपतीच्या जवळ कांहीं गुप्त भाषण करण्याची इच्छा दर्शविली. नित्यंकही कांहीं मननांत गढला आहे असें ईशपतीच्या ध्यानांत आलें. तेव्हां त्यांतील गुप्त भावार्थ काय असावा, राजकन्या व नित्यंक यांच्या वृत्तींत अशी चलबिचल कां उडाली असावी हें ध्यानांत यावें या उद्देशानें तो त्या संबंधानें त्यांना उद्देशून कांहीं बोलणार तोंच नित्यंकानें आपल्या जवळचा हातरुमाल त्यांच्या-पुढें टाकला. तो पाहतांच राजकन्या पूर्ण सलज्ज झाली. ती पार्वतीच्या आड जाऊन उभी राहिली. रुमालावरून नहीं ईशपतीला खरा भावार्थ उमगेना. प्रमिला तत्संबंधीं कांहीं बोलेना. नित्यंकही मौन धरून व बसला. तेव्हां पार्वतीनें त्यांना त्या संदिग्धतेची फोड करण्यास सांगितलें. त्यावरून नित्यंकानें प्रमिलेची पहिल्यापासून आंतापर्यंतची सर्व हकीकत सांगितली व त्या रुमालाचेंही वर्तमान स्पष्टपणें कळविलें. त्यावरून ईशपती व पार्वती प्रमिलेकडे

प्रेमदृष्टीनें पाहून तिला ह्मणाले, " ज्याच्या ठिकाणीं तुझें चित्त वेधून राहिलेलें आहे, ज्याच्या चरणीं तूं आपला देह अर्पण केला आहेस, ज्याच्याकरतां तूं जिवंत राहण्यास इच्छितेस, ज्याच्यावांचून तुला जगतांतील सर्व पुरुषजात पिताबंधू यांसारखी वाटते तोच हा तुझा पति शिष्य नित्यंक काय ? "

हा प्रश्न ऐकतांच ती पराकाष्ठेची लाजली. तिनें विनयानें नम्र होऊन सासुसासऱ्यांना नमस्कार केला. लागलीच नित्यंकानेंही आपल्या आईबापास वंदन केलें. ईशपतीनें त्या पतिपत्नीला अपर्णेश्वरापुढें नमस्कार घालण्यास सांगितलें आणि तो सद्गदित कंठानें म्हणाला, " हे भोलानाथ, मीं आजपावेतों तुला देखील कितीतरी वेळ बोल लावला. पण तूं कृपाळू व क्षमावान् होऊन अखेर मला इहलोकांतील मोक्षस्थितीसच पोंचविलेंस यांत संशय नाहीं. मला कोणतेंही वैभव भोगण्याची इच्छा नाहीं. मला तुझ्याच सन्निध अखंड वास करण्याची इच्छा आहे. ती पुरविणारा तूं समर्थ आहेस. हा माझा पुत्र नित्यंक व स्नुषा प्रमिला यांचेंही इहपरत्र कल्याण करण्यास तूं समर्थ आहेस. तुझ्या साक्षीनें नित्यंक व प्रमिला यांचा विवाह झालाच आहे. आतां सत्विधीपूर्वक विवाह व्हावयाचा योग लवकरच तूं जमवून आणशील. तूं या जोडप्याचें कल्याण कर. हा अपूर्व समय प्राप्त होण्याचें कारण जो महात्मा गुरुभारती त्याच्या दर्शनाची आह्मांस आतां फार इच्छा आहे. तीही तुझ्या कृपेनें सफल होईल. "

अशी प्रार्थना करून ते सर्वजण देवळांतून बाहेर पडले. आतां कांहीं काळ त्या स्थळाचा त्याग करणें इष्ट आहे असें सर्वांना वाटल्यावरून त्यांनीं पहाटेच्या सुमारास तो स्वर्गद्वार नांवाचा कल्याणदायी पर्वत उतरावयाचा संकल्प ठरविला.

---

## प्रकरण ४० वें.

### फणीपूरची धर्मशाळा.



मोठ्या पहाटेस उठून ती सर्व मंडळी अपर्णेश्वराचें दर्शन घेऊन ब्राह्ममुहूर्तावर पर्वत उतरावयास लागली. ईशपती व पार्वती यांच्या अवसानाप्रमाणें वाट चालून व अवश्य त्या वेळीं मुक्काम करून ती मंडळी कांहीं दिवसांनीं पर्वताच्या पायथ्याला येऊन पोंचली. त्या पर्वताकडे येण्यापूर्वी ज्या बागेच्या मालकाच्या घरीं नित्यंकानें मुक्काम केला होता व ज्याच्या जवळच्या रुमालामुळें प्रमिलेचा शोध लावणें सोपें होऊन त्याला आईबाप व पत्नी यांचा अपूर्व लाभ झाला त्याची भेट घेणें ही गोष्ट अत्यावश्य आहे असें वाटून तो सत्पुत्र नित्यंक बरोबरच्या वाटाड्याच्या धोरणानें त्या बागेंतील घराकडे चालूं लागला. मार्गक्रमण करीत असतां त्यानें ईशपतीचा हात धरून त्यास सुलभ तऱ्हेनें चालविलें होतें. त्याचप्रमाणें राजकन्येनें आपल्या सासूला हातांत धरिलें होतें.

या प्रकारें ठिकठिकाणीं मुक्काम करून विसावा घेत घेत अखेर ती मंडळी बागेच्या घरधन्याच्या बंगल्यांत जाऊन पोंचली. घरधन्यानें नित्यंकास तेव्हांच ओळखलें. नित्यंकाच्या पूर्वीच्या स्थितींत आणि आतांच्या स्थितींत महदंतर होतें. तें समजून येतांच घरधन्यास अतिशय समाधान वाटलें. नित्यंकानें त्याला त्याचें घर सोडून गेल्यापासून पुन्हां तेथें परत येईपर्यंतचें सर्व इत्थंभूत वर्तमान सांगून घरधन्याचे बहुत आभार मानले. त्याची लीनता, कृतज्ञता आणि शुद्ध वीरवृत्ति ध्यानांत घेऊन त्या घरधन्यासही मोठें समाधान झालें. त्यानें ईशपती व पार्वती यांचाही बहुत आदर करून त्यांच्या विषयीं मोठा संतोष व्यक्त केला. आठचार दिवस तेथें मुक्काम करून ते तेथून जावयास निघाले. जातांना त्यांनीं त्या घरधन्याकडून तोच वाटाड्या आपल्या संगती घेतला आणि पुन्हां मोठ्या सावधगिरीनें प्रवास करीत करीत ते फणीपूर या नांवाच्या गांवांत जाऊन पोहोंचले.

हें फणीपूर ह्मणजे ज्या गांवच्या धर्मशाळेंत धर्मध्वज आणि त्याच्या बरोबरचा वृद्ध यांनीं मुक्काम केला होता तेंच गांव होय. या ठिकाणीं येऊन राहण्यांत

नित्यंकाचा असा बेत होता कीं, एखाद्या मनुष्याला वश करून घेऊन गुप्ततेनें राजधानीस पाठवावें. आपल्या स्वतःच्या घरीं तो गडी गेला ह्मणजे त्यानें घरच्या ह्मातार्‍यास हा वृत्तांत कळवावा. ह्मणजे म्हातारा योग्य रीतीनें प्रमिलेचा मजकूर राजाच्या कानावर घालील आणि आपली सर्वच व्यवस्था समाधानकारक लागेल. ह्मातार्‍यास तसें योग्य न वाटलें तर निदान तो तरी फणीपुरास येईल आणि मग त्याच्या विचारें पुढची योजना ठरवूं. अशा प्रकारचे विचार करून नित्यंक तसा विश्वासू व हुशार असा कोणी मनुष्य पाहत होता. त्यानें त्या गांवांत एक घर भाड्यानें घेतलें होतें. आपण खरे कोण व आपली पत्नी कोणाची मुलगी या गोष्टी त्यानें बाहेर फुटूं दिल्या नव्हत्या. त्याच्या बरोबर जो वाटाड्या होता तो त्याचीं बहुतेक बाहेरचीं कामेंधामें करी. त्यानें आपलें नांव वगैरे पालटलें नव्हतें.

राजपुत्र धर्मध्वजास धर्मशाळेंत बसवून म्हातारा फणीपूरगांवांत कांहीं सामानसुमान आणण्यासाठीं ह्मणून बाहेर पडला. राजपुत्र एकटाच विचारमग्न होऊन धर्मशाळेंत बसला होता. शांभवीनें वर्णन केलेल्या गुहेंतून आतां प्रमिलेला कोठें नेलें असेल, आतां तिचा आपणास तपास कसा लागेल व ती आपल्या हस्तगत होऊन आपण आपलीं पुढचीं कामें कशीं पार पाडूं या विवंचनेंत तो होता.

बराचवेळ झाल्यानंतर तो ह्मातार्‍याची वाट पाहूं लागला. ह्मातार्‍यानें जो वेळ सांगितला होता तो निघून गेला तरी ह्मातारा परत आला नाहीं. तेव्हां धर्मध्वज चुळबुळ करूं लागला. तो धर्मशाळेच्या सोप्यांतून खालीं उतरून रस्त्यावर येऊन डोळ्यापुढें हात धरून लांबवर ह्मातारा दिसतो कीं काय म्हणून पाहूं लागला. त्यानें वरचेवर रस्त्यावर यावें, लांबवर बारीक दृष्टीनें पहावें आणि प्रत्येक खेपेला निराश होऊन पुन्हां सोप्यांत जावें. याप्रमाणें संध्याकाळ होईपर्यंत त्यानें वाट पाहिली. तेव्हां ह्मातार्‍याची वाट तरी काय झाली असावी म्हणून तो निराळ्याच चिंतेंत पडला. त्याला शोधण्यासाठीं फणीपूर गांवांत जावें असा विचार त्यानें मनांत आणला. पण आपण त्या गांवांत अगदींच नवखे असल्यानें रात्रीच्या प्रहरीं लोकांचीं घरें धुंडाळणें श्रेयस्कर नाहीं असें मनांत आणून त्यानें तें काम सकाळ होतांच करावयाचें असा निश्चय ठरविला.

थोडाबहुत फराहार करून आणि घोड्याची वैरण पाण्याची व्यवस्था

जमवून तो पथारी टाकून पडला. पण त्याला झोंप लागेना. त्याचें चित्त अनेक विचारांनीं अस्वस्थ होऊन गेलें होतें. तो अगदीं निराश होऊन गुरुभारतीचें स्मरण करीत होता. त्यांतच त्याच्या मनांत ह्मातान्याविषयीं अनेक बऱ्यावाईट कल्पनाही येऊन जात होत्या. याप्रकारें रात्रीं दहावाजे-पर्यंत काळ काढल्यावर त्या धर्मशाळेंत कोणी एक दुसरा पाहुणा येऊन दाखल झाला. तो अगदीं साधा मनुष्य असून प्रवासीच असावा असें दिसत होतें. त्यानें त्या सोप्याच्या एका टोकास आपलें मकाण लावलें. त्याच्या जवळच्या सामानावरून तो कोणी बैरागी किंवा भणंग असावासें वाटत नव्हतें. तो आपल्या आंथरुणावर पडला तोंच धर्मध्वजानें त्यास सहज विचारलें, " कोणहो तुह्मी, कोठून आला व जाणार कोठें ? "

हा सरळ प्रश्न ऐकतांच तो गृहस्थ उठून बसला. त्यानें राजपुत्राच्या प्रश्नास उत्तर केलें, " मी याच फणीपूरगांवचा राहणारा आहे. मला कांहीं कामाकरतां सिंधावतीस जावयाचें आहे. आज पहाटे रस्ता क्रमावयास लागावें असा माझा संकल्प आहे. "

इतकें बोलून त्यानें धर्मध्वजासही त्याच्यासारखाच प्रश्न केला. तेव्हां धर्मध्वजानें त्यास उत्तर केलें, " मी खुद्द सिंधावतीचाच रहिवासी आहें. मी कांहीं महत्वाच्या कामगिरीवर गेलों असतां रस्ता चुकून या प्रदेशांत आलों आहे. माझ्या बरोबर एक ह्मातारबोवा होते. ते गांवांत कांहीं सामान आण-ण्यास गेले ते तिकडेच गेले. त्यांचा उदईक तपास करून मीही परत सिंधावतीलाच जाणार आहे. पण, आपण याच गांवचे राहणारे असून या वेळीं धर्मशाळेंत कां ? तुमचें घरदार येथेंच आहेना ? "

यावर तो गृहस्थ ह्मणाला, " आज संध्याकाळीं सात वाजतां घर सोड-ण्याला अत्यंत शुभ मुहूर्त होता. त्या वेळीं प्रस्थान करून मग पहाटे घरा-बाहेर पडावयाचें त्यापेक्षां अंगप्रस्थानानेंच बाहेर पडणें बरें असें वाटून मी येथें झोंप काढण्याच्या हेतूनेंच आलों आहे. तुह्मीही आज पहाटे सिंधाव-तीला चलत असला तर बघा. सोबतीनें जाऊ. प्रवास लांबचा आहे; वाटेनें परस्परांना परस्परांची करमणुक होईल ! पण हा घोडा तुमचाच वाटतें. तसें असेल तर तुमचें आमचें जमणारच कसें ! "

हा मजकूर ऐकतांच राजपुत्रानें त्यास सांगितलें, " तुमचें ह्मणणें मी समजलों. त्या घोड्याचा तसा कांहीं विशेष उपयोग नाहीं; आणि असला

तरी तुमच्या संगतीकरतां मी घोडे हातांत धरूनच तुमच्याबरोबर चालेन. कारण आतांशा मला तशीही संवय पडली आहे. किंवा फार झालें तर तुमच्या साठीं आपण एखादें घोडें पैदाही करूं. तें सर्व जमेल ! पण माझा ज्ञातारा सांपडेपर्यंत, निदान या तुमच्या फणीपुरांत तरी तो नाहीं असें कळेपर्यंत मला सिंधावतीस येतां येणार नाहीं. तुह्मी जर चार आठ दिवस असेच थांबत असाल तर मात्र तुमचा आमचा बेत जमेल ! ”

या भाषणावरून त्या जासुदानें राजपुत्राचा थोरपणा ओळखला. पण त्याच्या शब्दास मान देण्यास आपल्याला सवड नाहीं असें व्यक्त करण्याकरितां त्यानें सांगितलें, “ तुमच्या स्वभावावरून तुमचा आमचा प्रवास मजेदार झाला असता हें खास. पण माझा सध्यां इलाज नाहीं. कारण मीं सांप्रत दुसऱ्याची कामगिरी गळ्यांत घेतली आहे. ती अति निकडीची आहे. व त्याबद्दल मला त्या मालकानें पांचशेंच काय एक हजारही रुपये देण्याचें आश्वासन दिलें आहे. ”

हें ऐकतांच राजपुत्र चकित झाला. फणीपुराहून निघून सिंधावतीला जाण्याबद्दल एक हजार रुपये देण्याचा हेतु काय असावा आणि ते देणारा तरी कोण असावा याबद्दल साशंक होऊन राजपुत्रानें त्यास विचारलें, “ तुमचें ह्मणणें खरें असेल तर हें मोठेंच आश्चर्य होय ! काम तरी असें अत्यंत महत्वाचें किंवा अवघड, अगर जोखमीचें असें काय आहे बरें ? ”

ह्या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं तो जासूद बोलला, “ माझ्या म्हणण्याचें आपणास आश्चर्य वाटावें हेंच खरें ! एवढेंच काय, पण एकहजार रुपये बक्षिस मिळणार याचें मलाही आश्चर्य वाटत आहे. काम तर तसें महत्वाचें दिसत नाहीं. मग त्या मालकाचा काय बेत व मतलब आहे तो कोणास ठाऊक ? कसेंही असलें तरी तें काम गुप्त आहे व तें मजकडून तुम्हाला कळणार नाहीं. कारण तसा अविश्वास कसा करावा ! तुह्मीच सांगा. ”

यावर राजपुत्र ह्मणाला, “ असें विश्वासाचें काम मला कळविण्याबद्दल मी आग्रहही पण करीत नाहीं. पण ही कामगिरी सांगणारा कोण हें सांगण्यास कांहीं हरकत असेलसें दिसत नाहीं. ”

राजपुत्राची ही जिज्ञासा तृप्त करण्यास अडचण नाहीं असें वाटून जासूद बोलला, “ सदर गृहस्थ आमच्या गावांत नुकताच येऊन राहिलेला आहे;

तो कोठचा आहे व काय पेशाचा आहे हें आह्मांस ठाऊक नाहीं. तो तरूण असून मोठा देखणा आहे. त्याचें नांव नित्यंक असें आहे."

असें वर्णन करून जासूद थांबला. नित्यंकाचें नांव ऐकतांच राजपुत्राचें चित्त वेधलें. तो मोठ्या औत्सुक्यानें पुन्हां त्यास म्हणाला, "तो नित्यंक घरचा एकटाच आहे कीं त्याला कांहीं परिवार आहे ?"

राजपुत्र ही हकीगत केवळ जिज्ञासातृप्तीसाठींच विचारीत असावा अशी समजूत करून घेऊन तो जासूद पुढें म्हणाला, "त्याला बायको आहे. ती अत्यंत स्वरूपवान् आहे. तिला प्रमिला असें ह्मणतात ! खेरीज त्याच्या घरांत एक बुड्ढा व एक बुड्ढी आहे. ते परस्पर कोण व त्यांचें नातें काय हें मात्र मला ठाऊक नाहीं. ती प्रमिला आजपर्यंत कोठें नाहींशी झाली होती आणि त्या नित्यंकानें तिला नुकतीच सोधून काढली असें कांहीं त्याच्या घरचा गडी मला सांगत होता."

हा वृत्तांत ऐकतांच राजपुत्राचें अंतःकरण आश्चर्यानें थक्क झालें. त्यानें त्या जासुदाकडून नित्यंकाच्या बिऱ्हाडाच्या खाणाखुणा चांगल्या समजावून घेतल्या. आणखी अवश्य ती किरकोळ माहिती विचारून घेऊन राजपुत्रानें आपलें बोलणें आखडतें घेतलें. तो जासूदही लवकर उठावयाचें असल्यामुळें लागलीच स्वस्थ पडला आणि अर्ध्या घटकेंत घोरूं लागला.

---

## प्रकरण ४१ वें.

### द्वंद्व.




सुदाच्या तोंडून ऐकलेल्या हकीगतीनें धर्मध्वजाचें अंतःकरण क्रोधानें व्याप्त झालें. त्या प्रकरणांत पराकाष्ठेची बदमाषगिरी असावी असा त्याला संशय आला. राजकन्येचा पती शिष्य नित्यंक सिंधावतीच्या प्रमिलाबागेंत सुखरूप आहे हें तो पूर्णपणें जाणत होता. कोणीतरी कपटी दुष्टानें नित्यंकाचें सोंग घेऊन प्रमिलेला चकविलें असलें पाहिजे अशा कल्पनेनें तो प्रमिलेची कींव करून

त्या बदमाष, नामधारी नित्यंकावर क्रोधाचें फूत्कार टाकूं लागला. त्याच्या घरांत जो बुड्डा गृहस्थ आहे तोच प्रमिलेबरोबरचा म्हातारा सेवक असून ती बुड्डी तिच्या बरोबरची दासी असावी असा त्याचा ग्रह होऊन त्या हकी-गतीसंबंधानें त्याच्या विचारांत निश्चितपणा आला. तो नामधारी नित्यंक कोण असावा असा त्यानें कयास चालविला. कामसेनानेंच तसें सोंग आणलें असेल असें त्याला बरोबर वाटेना. कारण प्रमिला कामसेनाला खात्रीनें ओळखील अशी त्याची समजूत होती. कोणीतरी चांडालकर्मी शठानें प्रमि-लेचा वृत्तांत जाणून हा सर्व घात केला असावा अशी त्याची ठाम समजूत झाली. शांभवीनें सांगितलेल्या गुहेंतून तिला काढून तो दुष्ट या गांवीं कांहीं मतलबानें राहिला असावा आणि त्यानें राजधानीमध्यें प्रमिलेबद्दल काय वाटावाट चालली आहे याचा शोध आणण्यासाठीं किंवा तत्संबंधींच कांहीं कपटक्रिया साधण्यासाठीं एक हजाराचें बक्षीस कबूल करून हा जासूद रवाना केला असावा; अशा प्रकारच्या विचारांनीं राजपुत्र त्रस्त झाला. सकाळ होतांच म्हाताऱ्याच्या शोधाबरोबर नित्यंकाचाही तपास काढावयाचा आणि त्याचें घर निरीक्षण करून त्याच्या नरडीचा घोट घ्यावयाचा असा त्यानें निर्धार ठरविला. प्रमिलेची गांठ घेऊन तिला खरा प्रकार विचारावयाचा व त्या म्हाताऱ्या दासदासीनाही सत्य वृत्तांत सांगण्याची आज्ञा करून त्यांच्या हकीगतीवरून प्रमिला फसली आहे असें दिसून आलें तर तिला कांहींच बोलावयाचें नाहीं. पण जर कां प्रमिलेनें समजून उमजून किंवा भीतिग्रस्त होऊन, किंवा वैभवाला मोहून अगर चैनीला हुरळून धर्मतत्वाविषयीं बेपर्वा होऊन नामधारी नित्यंकाचा खुषीनें स्वीकार केला असें कळून येईल तर त्या दोघांचीही तात्काळ खांडुळीं करून टाकावयाचीं असा त्याचा दृढ निश्चय ठरला; आणि सूर्योदय केव्हां होतो ह्मणून अत्यंत अधीर होऊन तो सारखा पूर्वदिशेकडे टक लावून बसला. त्याच्यापुढें तो नामधारी नित्यंकच छायारूपानें दिसूं लागला !

रात्रीचा काल संपून दिनमणी उदयाचलावर येण्याचीं पूर्वचिन्हें दिसूं लागलीं. प्रातर्विधी उरकल्यावर गुरुभारतीचें स्मरण करून राजपुत्रानें आपलें सामान घोड्यावर घातलें. नंतर घोडा चालू लागून गांवाच्या वेशीशीं जाईपर्यंत तो शूर व शुद्धसत्वपरायण वीर धर्मध्वज एकसारखा आपली समशेर सावरीत होता.

प्रथमतः त्यानें सर्व गांव हिंडून म्हाताऱ्याची विचारपूस केली. परंतु तशा प्रकारचा म्हातारा त्या गांवांत कोणी दृष्टीनें नुसता पाहिल्याचाही सुगावा लागेना. त्यामुळें तो मनामध्यें कष्टी झाला; पण त्याच्या मनांतील दुसरें योजलेलें कार्य त्याच्यापुढें अकाळविक्राळ रूप धारण करून उभें असल्यानें त्यानें त्यावेळीं सर्व कष्ट बाजूस सारिले आणि विजय संपादन करण्याची उमेद धरली. जासुदाच्या खाणाखुणांस अनुसरून त्यानें नित्यंकाच्या घराचा तपास काढला. आपला घोडा तेथीलच एका दुकानदाराच्या परड्यांत बांधून ठेवण्याची परवानगी मिळवून तो महावीर लष्करी पोषाखानें चांगला सज्ज झाला. त्यानें आपल्या अंगावर चिलखत चढवून त्याच्यावर नेहमींचें वस्त्र धारण केलें. कट्यार, खंजीर, जंबीया, वगैरे हत्यारें गुप्तपणें कंबरेला लटकावून त्यानें आपली तरवार चांगली पुसून पुन्हां म्यानांत घालून ठेविली. अशा प्रकारें युद्धास सज्ज होऊन तो नामधारी नित्यंकाच्या घरांत शिरला व घरच्या यजमानाचा शोध करूं लागला.

कोणी मनुष्य अंगणांत येऊन घराच्या यजमानाचा शोध करीत आहे असें कळतांच नित्यंक घराच्या बाहेर आला. त्यास पाहतांच तो आपल्या राजधानींतील शिष्य नित्यंक नव्हे अशी राजपुत्रानें आपली चांगली खात्री करून घेतली. नित्यंकानें राजपुत्राची चौकशी केली. राजपुत्रानें त्यास एकदम सांगितलें, " माझी व तुमची ओळख नाहीं. तुमच्या बायकोची व माझी मात्र फार चांगली ओळख आहे. आपलें नांव नित्यंक आहे असें ऐकूनच मी येथें आलों आहे. आपल्या बायकोस माझ्या समोर आणा. तिच्याशींच माझें काम आहे. "

अशा अनोळखी, परक्या गृहस्थाचें हें विपरीत व चमत्कारिक भाषण ऐकूनही नित्यंकानें त्यास शांतपणानें विचारलें, " तुमचें हें भाषण बरेंच चमत्कारिक आहे. दुसऱ्याच्या घरांत बेलाशक प्रवेश करून घरांतील पुरुष मनुष्याशीं कांहींच सरळ भाषण न करतां बायकांशीं कारस्थानें करणारे तुह्मी कोण हें मला प्रथम कळलें पाहिजे ! तुमचें हें कृत्य [illegible]रास धरून नाहीं. हा असभ्यपणा होय. "

[illegible] चोख उत्तरानें राजपुत्राचें मन जास्तच चेतलें. प्रत्यक्ष वर्तन कितीही [illegible] असलें तरी भाषणांत मात्र सभ्यतेचें स्तोत्र गाणारांच्या बोलण्याचा विचार करावयाचें कारण नाहीं असें समजून राजपुत्र नित्यंकास

म्हणाला, " अरे वाहवारे वाहवा ! तुला व्यवहार व सभ्यपणाची तत्वें फार छानदार समजलेलीं दिसतात. चोरा, राजकन्येवर दरोडा घालून व हवातसा कपटाचार करून राजकन्येला फसविलेंस आणि तिच्याशीं विवाह उरकून घेऊन तिच्या जन्माचें मातेरें केलेंस हा तुझा सभ्यपणा बिनतोड आहे. हा तुझा व्यवहार अनुपमच होय ! तुझ्यासारख्या चोरांना लाथावांचून अन्य बक्षीस उपयोगीं नाहीं. प्रमिलेला पळवितांना तुला गोड वाटलें. पण तिच्या कैवारार्थ धावून येणाऱ्यांच्या शस्त्रांतील तिखटपणा तूं ध्यानांत आणला नाहींस ! बोल, प्रमिला कोठें आहे ती माझ्या समोर आण. "

या दरडावणीस नित्यंक डगमगला नाहीं. त्यानें आपल्यावरील आरोपांचें निराकरण करण्यासाठीं धिमेपणानें सांगितलें, " तूं कोणी तरी प्रमिलेचा कैवारी असशील कदाचित्; पण तूं मजवर जो दोष लादीत आहेस तो निवळ खोटा आहे. राजकन्येनें आपण होऊन आपल्या मनानें मला माळ घातली आहे, हें सिद्ध करण्याकरतां मजजवळ हवा तेवढा भरपूर पुरावा आहे."

यावर राजपुत्रानें अधिकच चौताळून उत्तर केलें, " तुझ्या सोंगास फसून जर तिनें तुझा मनानें स्वीकार केला असेल तर त्यांत तिची चूक नाहीं हें उघड होय ! पण यांत तूं निर्दोषी ठरत नाहींस. तूं कोण हें पुरतेपणीं समजून जर प्रमिलेनें तुला माळ घातली असेल तर आज माझ्या शस्त्राला दोन बळींची प्राप्ती होणार हें निश्चित होय ! जा; हरामखोरा ! तुझ्या त्या कुलांगार बायकोला—त्या अवदसेला माझ्यासमोर आण. "

नित्यंकाला या भाषणानें त्वेष आला. त्याचे आंख चढून गेले. त्यानें खडखडीत पणानें सांगितलें, " तुझी आज्ञा जुमानण्यास मी तुझा बंदा नाहीं. तूं कोणीही असलास तरी मी तुला कःपदार्थ समजतों. इतःपर तूं जर माझ्या पत्नीविषयीं चकार शब्द काढशील व मला अधिकारयुक्त वाणीनें कांहीं हुकुम करशील तर तत्क्षणींच तुझ्या जिव्हेचे तुकडे होतील. तुझ्यासारख्या मूर्ख व अविचारी घमेंडखोरांच्या आज्ञा जुमानण्यास मी तुझ्या बापाची एक कपर्दिकही लागत नाहीं. हें खूप समजून ऐस. "

हे अपमानकारक शब्द नित्यंकाच्या तोंडून निघतांच धर्मध्वज जोरानें ओरडून ह्मणाला, " असें आहे तर मी आपल्या सामर्थ्यानें तुला माझी आज्ञा मान्य करण्यास लावतों. "

असें ह्मणून राजपुत्रानें नित्यंकावर चाल केली. तेवढ्यांत नित्यंकानें आपलें गुप्त हत्यार उपसून राजपुत्राला प्रतिकार केला. दोघेही शस्त्रपारंगत होते. दोघेही शुद्धभावी होते. दोघेही आपल्याला मनानें यथायोग्य वागत होते. दोघांच्याही अंगांत शत्रूशीं सामना करण्याचें अवसान होतें. दोघांचीं शस्त्रें विजेप्रमाणें चमकूं लागलीं. राजपुत्र मोठ्या शिताफीनें त्यास वार करून जमिनीवर लोळविण्यासाठीं सर्व युद्धचातुर्य खर्चूं लागला; पण नित्यंकानें तितक्याच समरकौशल्यानें आपलें संरक्षण केलें. दोघेही वीर घामाघूम झाले. बराच वेळ युद्ध झाल्यानंतर दोघांनाही एकमेकांच्या युद्धाकौशल्याबद्दल कौतुक वाटलें. अखेर राजपुत्रानें संधी साधून नित्यंकास वार केला. त्या बरोबर नित्यंकानें कच खाऊन जराशी माघार घेतली. त्याचें अवसान खचलें आहे असें ध्यानांत येतांच राजपुत्र अधिक जोरांत येऊन त्याला पुरता जखमी करण्याच्या इच्छेनें पुढें सरसावला. नित्यंकाला लागलेला वार त्याला पीडा करीत होता तरी आत्मसंरक्षणार्थ त्यानें तसेंच अवसान धरिलें आणि त्वेषपूर्ण होऊन राजपुत्राशीं पुन्हां लगट केली. त्यानें आपलें सर्व कसब खर्च केलें तरी राजपुत्र त्याला रतिमात्र दाद देईना. तो कोणीतरी युद्धशास्त्रविशारद महान योद्धा आहे असें वाटून नित्यंकाचें मन किंचित् वचकलें. वारामधून होणाऱ्या रक्तस्रावामुळेंही त्याचें सामर्थ्य ढिलें पडूं लागलें. त्यांतल्या त्यांत नेट धरून आपली सर्व शक्ती मनगटांत एकवटून राजपुत्रावर प्रहार करावा अशा विचारानें तो आपली समशेर फिरवूं लागला तों राजपुत्राच्या हातांतील दुधारी खांड्यानें नित्यंकाच्या समशेरीचे तुकडे झाले. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं हत्यारानें दगा दिला तेव्हां नित्यंकाचा धीर कांहींसा सुटला; पण त्या शूर वीरानें लागलीच राजपुत्रास सांगितलें, " माझ्या शस्त्रानें माझा घात केला आहे. आतां तुझ्याशीं मी मल्लयुद्ध करण्यास तयार आहें. माझ्या शस्त्राच्या अविश्वासावरून मी पराभूत व्हावें अशी परमेश्वराची इच्छा दिसते. तें कसेंही असो; पण मी कांहींएक पातक केलेलें नसतां माझ्या शस्त्राचे तुकडे कां व्हावेत याचें मला आश्चर्य वाटतें."

हें भाषण ऐकून राजपुत्रानेंही त्यास सांगितलें, " हा तुझ्या भ्रष्ट मनाचा परिणाम होय. शुद्ध मनाला न कळणारें असें पातकच अद्याप जन्मास आलेलें नाहीं. तूं निःशस्त्र झाल्याकारणानें तुजवर मीं हत्यार चालविणें हा अन्याय होईल; मीही शस्त्र खालीं ठेवून तुझ्याशीं मल्लयुद्धच करावयास

पाहिजे; पण वस्तुतः मी तुला वीर समजून तुझ्याशीं द्वंद्व करण्यास आलोंच नाहीं. मी तुला कपटी, बदमाष, चोर असें समजून शासन करण्यास आलों आहे. यासमयीं मी तुझा प्राण घेणेंच उचित होय. पण कोणत्याही प्रकारानें कां होईना तूं माझ्या प्रमिलेचा पति झाला आहेस. तुझा जीव घेणें ह्मणजे प्रमिलेच्या जन्माचा सत्यनाश करणें होय. यास्तव, तुला जीवदान देणें भाग पडत आहे. पण तुला तुझ्या कपटकर्माबद्दल व तुझ्या भ्रष्टाचाराबद्दल जन्माची आठवण राहणें इष्ट आहे. एतदर्थ मी तुझ्याशीं मल्लयुद्ध न करतां दुसरें कांहीं तरी करणार आहे त्यासाठीं तूं तयार हो. तुझा एक हात किंवा एक पाय कायमचा बायाळ करून तुला जन्माची आठवण ठेवणें रास्त होय. तुला पसंत पडेल असें या दोहोंतून काय तें निवड. ”

ही सूचना ऐकतांच नित्यंकाचें मन गहिंबरलें. त्याला त्याचा गुरु दृष्टिपुढें दिसूं लागला. प्रमिलेचें सर्व वृत्त त्याच्यापुढें मूर्तिमंत उभें राहिलें व तो कंपित स्वरानें ह्मणाला, “ कोणत्याही प्रकारें मी दोषी नाहीं. राजकन्या प्रमिला हिचा शोध करून तिला तिच्या आईबापांच्या हवालीं करावें या उद्देशानें मीं घर सोडलें. पण त्यासमयीं मीं आपल्या गुरूची परवानगी मात्र घेतली नाहीं. या अपराधामुळें मजवर गुरुकोप झाला असेल तर तसेंही संभवत नाहीं. माझा गुरु सुजाण, उदार, ज्ञाता, दयाळू व क्षमावान् आहे. खेरीज मी त्याचें अक्षय स्मरण करीत आहें. या प्रमिलेशीं लग्न करण्याचें मी स्वप्नांत देखील मनांत योजलेलें नव्हतें. बागेंतील घरधन्याकडून मिळालेल्या रुमालावरून मला प्रमिलेनें वरलें आहे असें समजून आलें. नंतर केवळ तिच्या शुभ निश्चयासाठींच मीही स्वमनानें व मातापित्यांच्या आज्ञेनें तिचा स्वीकार केला. त्या दुष्ट वीरबाहूच्या जाचांतून तिला मुक्त करून मीं तिला निर्भय केलें हें मजकडून पाप घडलें असें कसें म्हणावें ? कांहींही असो; मी मनानें शुद्ध असतां, मजकडून तसा कांहीं घोर अपराध घडला नसतां माझा पाय किंवा हात तुटावा अशी जर सद्गुरु भारतीची इच्छाच असेल तर ती मला कबूल आहे ! शुद्ध आचार आणि परोपकार यांविषयीं भावना धरून सतत गुरुस्मरण करण्यानें असलेंच फळ मिळावयाचें असेल तरीही मी त्यांत संतोष मानून प्राण जाईपर्यंत माझ्या गुरूचें—माझ्या ह्याताच्या ईशतुल्य सद्गुरूचें—माझ्या श्रीभारतीचेंच मी स्मरण करीत राहीन ! ”

आपण सांगितल्याप्रमाणें हात किंवा पाय यांतून कांहींच निवड न करतां

नित्यंकानें जे शब्द उच्चारले त्यामुळें राजपुत्र अतिशय घोटाळ्यांत पडला. नित्यंकाच्या तोंडून सद्‌गुरुभारतीच्या नांवाचा उच्चार होतांच राजपुत्राचें अवसान सुटून त्याचें शस्त्र खालीं गळून पडलें. तो एकदम नित्यंकाच्या जवळ जाऊन ह्मणाला, " नित्यंका ! मी आश्चर्यानें थक्क होऊन अतिशय गोंधळून गेलों आहें. तूं श्रीभारतीचा अनुग्रहित शिष्य दिसतोस; ह्मणजे तूं माझा बंधूच आहेस ! तुझ्या हातून असें हें भलतेंच कपटकर्म कसें घडलें याचेंच मला आश्चर्य वाटतें. "

राजपुत्र या प्रकारचें आणखी कांहीं भाषण करून आपली गोंधळलेली व आश्चर्यचकित झालेली वृत्ति जास्त स्पष्ट करणार तोंच त्याला सोडून फणीपुरांत नाहींसा झालेला ह्मातारा त्या ठिकाणीं अकस्मात् प्राप्त झाला. त्यानें एकदम राजपुत्रास हाक मारून सांगितलें, " तुला जसें तें आश्चर्य वाटतें त्याप्रमाणेंच तुला तसें कां वाटावें याबद्दल मलाही आश्चर्य वाटतें."

हे शब्द कानीं पडतांच आणि ह्मातार्‍याचा गंभीर, शांत व अधिकार-प्रेरित असा चेहरा पाहतांच राजपुत्रानें त्याला नमस्कार घातला. नित्यंकानेंही धांवत जाऊन त्याच्या पायावर लोटांगण घातलें आणि तो ह्मणाला, " हे सद्गुरु श्रीभारती माझ्या संरक्षणार्थच तूं धावून आलास काय ? " इतकें बोलून नित्यंक गहिंवर दाटल्यामुळें पुढें बोलण्यास अडखळूं लागला. भारतीनें त्याला प्रेमानें पोटाशीं धरिलें. धर्मध्वज व नित्यंक यांचा सामना सुरूं होण्याच्या वेळीं जी बोलाचाली झाली ती ऐकून ईशपती, पार्वती व प्रमिलाही घरांतून बाहेर आली होती. त्यांना त्यांतील भावार्थ नीटसा समजलेला नव्हता. युद्ध सुरूं होऊन नित्यंकाला जखम झाली आणि राजपुत्र त्याच्यावर भलताच आरोप करीत आहेसें पाहून ते सर्वजण आपल्या नशिबाला हात लावून आक्रोश करीत होते. ईशपती व पार्वती मनामध्यें अपर्णेश्वराचा धावा करीत होते. आणि प्रमिला आपल्या बंधूला पुष्कळ प्रकारें बोलून अश्रुपात करीत होती. श्रीभारतीचें आगमन होतांच नित्यंक व धर्मध्वज यांचा त्याच्याशीं जो भावनायुक्त आचार घडला त्यावरून त्याच्या थोरवीची कल्पना होऊन त्या त्रिवर्गांनींहि डोळे पुशीत पुशीत श्रीभारतीला वंदन केलें आणि ते उठून त्याच्या तोंडाकडे पहात बाजूस उभे राहिले.

---

# प्रकरण ४२ वें.

## पाटीलबोवा.



आपल्याला ज्यानें सहाय्य करण्याचें वचन देऊन प्रमिला भेटविण्याच्या आश्वासनानें येथवर आणलें, ज्यानें आपणास अरण्याच्या सीमेवर कल्याणकारक सद्‌बोध केला तो ह्मातारा ह्मणजेच सद्गुरु भारती होय असें कळून येतांच राजपुत्राचें चित्त द्रव पावलें. ज्यानें प्रमिलेचें पाणिग्रहण केलें तो भारतीचा शिष्य नित्यंक कोण याविषयीं राजपुत्रास मोठा विचार पडला. त्या नित्यंकानें प्रमिलेला कोणाच्या हातांतून सोडविलें याविषयींही तो चिंतामग्न झाला. त्यानें हे सर्व विचार बाजूस सारून भारतीपुढें हात जोडले आणि असें भाषण केलें कीं " हे सद्गुरो ! मी आपलाच दास आहे. आपल्याच प्रसादानें मी या जगतीतलावर उत्पन्न झालों आहे. आपल्या दर्शनासाठींच मी आजपर्यंत तळमळत आहे. आपण यापूर्वी बराच काळ मजबरोबर घालविला तरी आपणास मीं जाणलें नाहीं ही माझी चूक होय ! पण मी आपणास जाणावयाचें तरी कसें ? माझें चित्त असंख्य विचारांनीं व्याप्त झालें आहे. मला कांहींच समजेनासें झालें आहे. हा आपला शिष्य नित्यंक आपल्या नांवाचा उच्चार न करतां तर माझ्या हातून भलतेंच कृत्य घडलें असतें हें खासच होय ? हा नित्यंक कोण ? हा ह्मातारा व ह्मातारी कोण हें मला कांहींच कळत नाहीं. मला ज्ञान नाहीं. मी अगदीं मूढ आहें. तरी पण जसा आहे तसाच आपला शरणागत आहे. आपण मला पदरांत घ्या. यापेक्षां मीं जास्त काय बोलावें ? "

राजपुत्राच्या भाषणावरून त्याचें चित्त जाणून भारती म्हणाले, "राजपुत्रा ! तूं कांहींएक काळजी करूं नको. तुला मीं स्वीकारलेलाच आहे. तूं शुद्धभावी, सदाचारी, धर्मनिष्ठ व भक्तिपर आहेस हें मी जाणत आहें. आतां, तुझ्या मनांतील कांहीं घोटाळे दूर होण्याकरितां तुला या नित्यंकाची सर्व हकीकत सांगणें जरूर आहे. ती तुला हा नित्यंकपिता ईशपती सांगेल

व त्यामध्येंच प्रमिलेचा वृत्तांत बराचसा येईल. त्यांतून जो काय राहील त्याची पूर्तता नित्यंक करील. ”

इतकें सुचवून भारती नित्यंकाकडे वळून ह्मणाला, “ हें सत्वपर राजपुत्रा! तुझी जखम तुला बरीच पीडा देत असेल. तेव्हां आधी तिला उपचार करूं आणि मग तुमच्या चरित्रकथनास आरंभ होऊं द्या. ”

यावर नित्यंकानें आपली जखम दाखविली. त्या वेळीं तींतून वाहणारें रक्त बंद झालें होतें. त्याला तिची यत्किंचितही पीडा होत नव्हती. तेव्हां नित्यंकानें थोडक्यांत भाषण करून गुरुकृपेनें आपण अगदीं व्यथा-रहित झालों असल्याचें कळविलें. नंतर सर्व मंडळी नित्यंकाच्या घराच्या आंतील बैठकीच्या दालनांत गेली. भारतीच्या अनुज्ञेनें त्यांनीं जेवणखाण वगैरे विधि आटोपला. आज कांहीं तरी अतिभयंकर प्रकार घडण्याची वेळ आली होती पण तीं गुरुनामोच्चारानेंच टळली याबद्दल सर्वांनीं भारतीचें महात्म्य गाइलें. भारतीनें त्यांना ईश्वराची स्तुति करण्यास सांगून आपला निरहंकार व्यक्त केला. नंतर ईशपती हकीगत सांगू लागला. सर्वजण त्याच्या भाषणाकडे लक्ष्य लावून बसले. ईशपती थांबल्यानंतर नित्यंकानें प्रमिला सटवाईच्या देवळांतून वीरबाहूनें पळविल्यापासून आतांपर्यंतची सर्व हकीकत सांगितली. त्या दोन्ही हकीगती ऐकून राजपुत्रास मोठाच अचंबा वाटला. प्रमिलेच्या या विश्वसनीय हकीगतीवरून त्याला शांभवीची हकीगत सपशेल खोटी वाटूं लागली. शांभवीनें सर्व हकीगत बनावट सांगितली याबद्दल राजधानींत गेल्यावर तिला चांगलीच झाडावयाची असा त्यानें बेत ठरवून ठेवला. त्या बाबतींत त्याचें बरेंचसें समाधान झालें. पण फर्णापुरामध्यें आपण चोहोंकडे शोध केला तरी जो भारती कोठेंही सांपडला नाहीं तो ऐनसमयीं नेमका नित्यंकाच्या घरीं कसा प्राप्त झाला या विषयीं तो अतिशय बुचकळ्यांत पडला. भारती धर्मशाळेंतून निघून गेल्यापासून तो पुन्हां प्रगट होईपर्यंत मध्यंतरी आपली काय हवाल झाली ती स्वतःच्या मुखानें सांगून टाकून त्यानें भारतीला त्याचा मजकूर सांगण्याची विनंति केली.

भारती ज्या वेळीं नित्यंकाच्या घरांत प्रगट झाला त्या वेळींच त्याच्या बरोबर कोणी एक अनोळखी मनुष्य होता. तो मध्यम दर्जाचा दिसत होता. त्याचा व भारतीचा संबंध काय हें अद्याप कोणासच कळलेलें नव्हतें. धर्म-ध्वजाची विनंति ऐकून भारती ह्मणाला, “ राजपुत्राला गांवाबाहेरील

धर्मशाळेंत बसवून कांहीं शिधासामग्री आणण्याच्या निमित्तानें मी या फणीपूर गांवांत यावयास निघालों. वेशीच्या ताडाशीं मी येतों तों मला हा गृहस्थ भेटला. याला मीं वेशीसंबंधानें कांहीं प्रश्न केला त्यावरून त्यानें मी कोणीतरी परका आहें असें तेव्हांच जाणलें. अशा प्रकारें माझी व याची ओळख पडून मी त्याच्याजवळ कांहीं सामग्रीची याचना केली. हा मनुष्य भला असल्यामुळें व तो घरचाही चांगला असल्यामुळें मला त्यानें त्याच्या-बरोबर त्याच्या घरीं नेऊन शिधासामग्री देण्याचें कबूल केलें. त्याचें घर गांवाबाहेरील शेतांत आहे. गांवामध्येंही त्याचा वाडा आहे. पण तो स्वतः आपल्या शेतांतील घरांत राहतो. मी याच्याबरोबर त्याच्या घरीं गेलों. तेथील व्यवस्थेवरून तो मध्यमस्थितींतला मनुष्य असावा अशी माझी कल्पना झाली. पण त्यानें जेव्हां माझ्यापुढें एकेक पदार्थ काढून ठेवले तेव्हां तो चांगलाच जिवट पाटील आहे असें मला कळून आलें. इतकें असून हा फार भाविक, श्रद्धाळू व ईश्वरभक्त आहे. अतीत, अभ्यागत, पांतस्थ, भिक्षुक वगैरेंची यथास्थित बरदास्त राखण्यांत पुण्याई आहे अशी त्याची समजूत आहे. त्यानें मला तेथें एकदोन दिवस तरी निदान रहावें असा आग्रह केला. मला धर्मशाळेकडे परत जाण्याची निकड असल्याबद्दल सांगून मीं त्याच्याजवळ राजपुत्राचें वर्णन केलें. त्या वर्णनांत मी राजपुत्राच्या सद्गुण, सदयता, परोपकार वगैरे गुणांची वाखाणणी केली. ती ऐकून हे पाटील ह्मणाले, " ह्मातारबुवा ! जगतांत सगळ्या प्रकारचीं माणसें असतात, सुगुणी आहेत, दुर्गुणी आहेत, दयाळू आहेत, कठोर आहेत. " अशाप्रकारें जगांतील रहाटीचें वर्णन करून हे पाटील मला स्वर्गद्वारावरील अपर्णेश्वराच्या देवळांतील कांहीं हकीगत सांगूं लागले. त्या हकीगतीनें माझें चित्त वेधलें. त्यांची ती हकीगत ऐकून घेण्यानें अखेर मला जें वृत्त कळलें तें तर अत्यंत आश्चर्यकारक असल्यामुळें मला वाटलें कीं, तें वर्तमान राजपुत्र धर्मध्वजास कळणें जरूर आहे. तेव्हां त्यांच्याकडून तें राजपुत्राला कळवावें ह्मणून मीं त्यास गांवांत चलण्याची विनंति केली. पण त्यांच्या इकडे येण्याकरतांच मला एक दिवस तेथें रहावें लागलें. नंतर त्याच्यासह मी धर्मशाळेंत आलों. तेथें राजपुत्र नाहींसे पाहून अदमासानें त्याच्या शोधार्थ गांवांत शिरलों. बऱ्याच ठिकाणीं हिंडून अखेर या नित्यं-काच्या घरीं जावें या हेतूनें या माहितगार पाटलांसह येथें आलों; यापुढें काय

प्रकार झाला तो सर्वांस ठाऊकच आहे. आतां हे दयाळू पाटीलबोवा काय हकीगत सांगतात ती ऐका. ती अत्यंत हृदयद्रावक असल्यानें तुमचेंही चित्त वेधील आणि कांहीं गोष्टींचा चांगलाच उलगडा होईल."

भारतीची अनुज्ञादर्शक सूचना ध्यानांत आणून पाटीलबोवा भाषण करूं लागले, "मी या ज्ञातारबोवांना ह्मणजे या गुरुभारतींना वेशीपाशीं भेटलों. त्या पूर्वी दोन तीन दिवसच मी गांवाहून घरीं आलों होतों. या फणीपुरा पलीकडे बऱ्याच अंतरावर जो स्वर्गद्वार या नांवाचा पर्वत आहे त्यावर अपर्णेश्वराचें एक देऊळ आहे. तेथें देवदर्शनासाठीं मी कधीं कधीं जात असतों. त्या माझ्या नेहमींच्या क्रमास अनुसरून कांहीं दिवसापूर्वी मी तेथें गेलों होतों. तेथें कोणीएक वीरबाहू या नांवाचा मनुष्य अत्यंत हाल अपेष्टा भोगीत असतांना मीं पाहिला. त्याचे दोन्ही पाय गळून पडलेले मला दिसले. तो कांहींतरी व्याधीनें ग्रस्त असल्यामुळें देवाच्या सेवेला येऊन राहिला असावा अशी माझी कल्पना झाली. आपल्या हातून त्याला कांहीं मदत झाली तर पहावी ह्मणून मी त्याची चौकशी केली. तेव्हां त्यानें अति केविलवाणी मुद्रा करून मला अशी हकीगत सांगितली कीं, "मी या ठिकाणीं सेवेला राहिलों तेव्हां चांगला होतों. माझें कांहीं कार्य सफल व्हावें ह्मणून मी येथें येऊन ईश्वराराधना करीत राहिलों. मी चांगला सधन आहें. पुढें कांहीं दिवसांनीं कोणीएक नित्यंक या नांवाचा खुनी बदमाष येथें आला. त्यानें माझ्याशीं लबाडीनें परिचय केला. स्नेह वाढत चालला तेव्हां माझ्याकडूनच त्याला माझी श्रीमंती समजली. माझ्याजवळच्या हिऱ्याच्या आंगठ्या, जडावाच्या कंठ्या वगैरे जिन्नस त्याच्या पाहण्यांत आले. एके दिवशीं त्या नीचानें मी निजलों असतां माझे दोन्ही पाय तोडून टाकले आणि मला निर्बल करून तो माझे सर्व बहुमूल्य जिन्नस उपटून पळून गेला. तरी आपण कृपा करून मला कांहीं सहाय्य करण्यास तयार असाल तर सिंधावती राजधानींत जा. तेथें सरदार जयसिंग व त्याचा मुलगा कामसेन यांना माझें हें वृत्त गुप्ततेनें कथन करा. आणि त्यांना असें कळवा कीं, राजकन्या प्रमिला ही माझ्या हातून निसटली. तिला नित्यंक या नांवाच्या गृहस्थानें पळविलें आहे. तो गृहस्थ मीं कधींही पूर्वी पाहिलेला नाहीं. तरी तुह्मी ताबडतोब निघून मजकडे या. माझी वाट लावा. त्या नित्यंकाचा तपास करा. त्याच्या बरोबर प्रमिला खास आहे. कदाचित् तो नित्यंक भद्रपतीचा पुतण्याही असूं शकेल. मी मात्र त्यास ओळखलें नाहीं."

" या कामगिरीबद्दल त्यानें मला सरदाराकडून मोठें बक्षीस द्यावयाचें ठरविलें. पण मीं बक्षीस नको ह्मणून सांगितलें. येवढा निरोप कळविण्याचा परोपकार होऊन त्या दुःखित पंगूचें काम झालें तर कांहीं अनाठायीं जाणार नाहीं अशा समजुतीनें मीं तें कार्य फुकटच अंगावर घेतलें आणि तेथून देवदर्शन करून सिंधावतीला जाण्यास निघालों. तिकडे जातांना मीं वाटेनें घरीं येण्याचा देखील ओढा धरला नाहीं. पण मी त्या सरदाराकडे जाण्यापूर्वीच त्या पांग्यानें सरदार जयसिंग किंवा कामसेन यांस तिकडे बोलावलें असावें असें पुढें मला एक मनुष्य भेटला त्यावरून कळून आलें. मी राजधानीच्या दिशेनें चाललों असतां मला तिकडून मजकडे येतांना दोन चार स्वार दिसले. ते स्वार व मी असे जरी भिन्न दिशेला जाणारे होतो तरी त्यांचा आमचा मुक्काम एकाच ठिकाणीं पडला. सबंध एकरात्र आह्मीं त्या जागीं काढली. रात्रीं त्या स्वारांमध्यें कांहीं संदिग्ध बोलणें सुरू झालें. तें बोलणें सरदारपुत्र कामसेनासंबंधींच असावें असा मला संशय आला. तेव्हां मीं त्यांच्या भाषणाकडे विशेष बारकाईनें लक्ष्य लावलें तों माझा सर्व संशय फिटून जेव्हां मी त्यांच्याशीं या पांग्या वीरबाहूबद्दल गोष्ट काढली तेव्हां तेही माझ्या भाषणाकडे चित्त लावून बसले. अखेर त्यांचें आमचें जमतां जमतां आमचीं स्पष्ट भाषणें सुरू झालीं. मीं त्यांना वीरबाहूचा वृत्तांत विदित करून सरदार जयसिंग व त्याचा पुत्र कामसेन यांजकडेच जात असल्याचें कळविलें तेव्हां त्यांनीं मला त्यांची संदिग्ध हकीगत स्पष्ट करून सांगितली. ती येणेंप्रमाणेः—" राजकन्या प्रमिला हिला मोहसंघानेंच पळविलें. त्यानें तिला भूताद्री नांवाच्या पर्वतावर एका गुहेंत नेऊन दडविलें आहे. तिच्याबरोबर तिची एक ह्मातारी दासी व एक तसाच म्हातारा चाकरही आहे. ह्मातारी दासी मोकळी असून त्यांना जेवणखाण घालते. राजकन्येच्या व त्या वृद्धांच्या हातापायांत बिड्या ठोकल्या आहेत. तेथें एक शिपाई त्यांच्यावर आळीपाळीनें राखण असतो. तीं ज्या गुहेंत आहेत तिच्या तोंडाशीं एक मारुतीची मूर्ति आहे. ती मूर्ति बाजूला सारली ह्मणजे गुहेचें द्वार दिसतें. त्यामध्यें शिरकाव करून प्रमिलेला आणणेंच श्रेयस्कर होईल. प्रमिलेला तेथून कोणीं पळविलें हें गुप्त राखण्यासाठीं सर्व देह आच्छादित करून जाणें इष्ट होय. अमुक एक दिवसांत राजकन्या तेथून उचलून दुसऱ्या गुप्तस्थळीं न्यावी असा मोहसंघाचा बेत आहे. ती एकदां त्या गुहेंतून

निवाली ह्मणजे पुढें मग तिचा शोध लागणें शक्य नाहीं. अशा प्रकारची बातमी कामसेनाला कळल्यावरून तो अति त्वरेनें व अतिशय गुप्तपणें त्या गुहेंत शिरला. पण तेथें कांहीं विपरीत व अत्यंत हानीकारक प्रकार घडून आला. कामसेन सर्व शरीर झांकून आणि फक्त दिसण्यापुरतीं डोळ्याचीं द्वारें उघडीं ठेवून त्या गुहेंत शिरला. तो गुहेंमध्यें बसण्या उठण्यासारखी जागा आहे तेथवर सुरक्षित गेला. पण पुढें एकाएकीं अनेक शिपायांनीं त्याच्यावर शस्त्रें चालविलीं. ते सर्व शिपाईही त्याच्या प्रमाणेंच वेष केलेले होते. आपल्या अंगावर शस्त्राचे प्रहार होतांच कामसेन अतिशय घाबरला. आपण आतां मेलोंच असें समजून तो मोठ्यानें ओरडला कीं, ' सरदार जयसिंगपुत्र मी कामसेन आहें. हें लक्ष्यांत आणूनच मजवर कोणी तीं शस्त्रें चालवावीत. याचा पुरा सूड उगवला जाईल. ''

" हे शब्द ऐकतांच त्या सर्व शिपायांनीं अगदीं घाईघाईनें शस्त्रें थांबविलीं आणि आपलीं आच्छादनें दूर झुगारून कामसेनाचेंही रक्तानें भरलेलें आच्छादन बाजूस काढून घेतलें. ज्याच्यावर आपण अनेक शस्त्रप्रहार केले तो सरदारपुत्र कामसेन आहे असें दिसून येतांच ते सर्वजण घाबरले. त्यांना कापरें भरलें. कारण ते जयसिंगानेंच ठेवलेले नवीन शिपाई होते. आपण आपल्या यजमानावरच शस्त्र चालविलें याबद्दल ते विस्मयान्वित झाले. त्या ठिकाणीं कामसेन कसा आला याचें त्याला मोठेंच कोडें पडलें. पण उपयोग काय ? त्यांनीं केलेल्या शस्त्राघातांनीं कामसेन रक्तानें न्हाला होता. त्याला ठिकठिकाणीं जखमा झाल्या होत्या. सुदैव इतकेंच कीं, त्याच्या डोक्यावर किंवा छातीवर जबर प्रहार न लागल्यानें तो अद्याप जिवंत मात्र होता. त्या प्रकारच्या गूढपणाबद्दल वाटावाट करण्यांत विशेष वेळ न घालवितां त्या सर्वांनीं मिळून कामसेनाला कांहीं हितोपचार चालू केले. कोणत्याही उपचारांनीं तो ताबडतोब शुद्धीवर येण्यासारखा नव्हता. दोन तीन दिवसांनीं तो कांहीं शुद्धीवर येऊन हालचाल करूं लागला. मग त्या स्वारांनीं ती बातमी टाकोटाक सरदार जयसिंग यांस कळविली आणि मोठ्या सावधगिरीनें जपून, अति कळकळीनें कामसेनास राजधानीमध्यें त्याच्या वाड्यांत नेलें. जयसिंगानें ही बातमी अत्यंत गुप्त राखून हा प्रकार कसा घडला याचा शोध चालविला. त्या गुहेंत नेमलेले शिपाई सरदाराच्याच आज्ञेनें मोहसंघ महाराजांच्या स्वाधीन

केलेले होते. त्यांनीं सरदारास ती सर्व मसलत शांभवी बाईसाहेबांची होती असें कळविलें. त्या गुहेमध्यें जे कोणी एक किंवा दोन इसम देहाच्छादन करून प्रवेश करतील त्यांचे तिळतुल्य तुकडे करून टाकावे अशी त्या शिपायांना शांभवीची अनुज्ञा होती असें सरदारास कळून आलें. वस्तुतः शांभवीचें हें कारस्थान जयसिंग व मोहसंव यांना ठाऊक होतें. पण त्या बाबतींत आपण अगदीं निर्लेप आहों असें दर्शविण्यासाठींच त्यांनीं शिपायांजवळ ही रिकामीच चौकशी केली. कामसेन हा ज्या समयीं त्या गुहेकडे जाण्यासाठीं प्रवासास निघाला तेव्हां त्यानें प्रवासांतील आपला हा खरा हेतु गुप्त राखला होता. त्यानें वरकरणीं प्रमिला किंवा दीक्षादेवी अगर वीरबाहू यांच्या शोधार्थ पर्यटणास जात असल्याचा बहाणा केला होता. कारण मोहसंवानें प्रमिलेला दडवून ठेवून तें आपणास कळूं दिलें नाहीं तेव्हां त्याला त्याचा संशय आला होता. आपण परस्परच प्रमिलेला पळवून मोहसंवाच्या हातावर तुरी द्याव्या या हेतूनें कामसेनानें हें कृत्य केलें. कामसेनाला आराम पडल्यावर त्याच्या तोंडून या गोष्टीचा खुलासा झाला असल्यानें यांत आतां कांहीं संशय राहिलेला नव्हता. शांभवी, मोहसंव, जयसिंग यांची ही गुहेंतील कपटमय योजना कामसेनाकरतां खास नव्हती; पण तो साक्षात् मृत्यूचा दरबार कोणासाठीं भरवलेला होता हें मात्र अद्याप खातीलायक असें बाहेर आलेलें नव्हतें."

"अशाप्रकारचें स्वारांच्या मुख्यानें स्वारांना सांगितलेल्या भाषणाचें सार मला समजलें. जयसिंगाला वीरबाहूची हकीगत विदित झाली असून कामसेनाच्या या प्रकरणामुळेंच त्याला वीरबाहूच्या व्यवस्थेस जाण्यास दिरंगाई लागली आहे असें वीरबाहूस कळवून त्याची तैनात करण्याकरतांच ते स्वार रवाना झाले आहेत असें मला कळतांच मीं माझें सर्व कार्य त्यांच्या ध्यानांत आणून दिलें. अर्थात् माझें राजधानींत जाण्याचें कामच संपलें असें माझ्या व स्वारांच्या मतानें ठरलें. नंतर ते स्वार घोडे उडवीत आपल्या मार्गास लागले व मीही माझ्या घराचा रस्ता सुधारला. प्रथमतः ह्मणजे मी या गुरुभारतीबरोबर येथें येऊन आपणा सर्वांच्या हकीगती ऐकेपर्यंत मला हा नित्यंक, तो वीरबाहू, प्रमिला, वगैरे माणसें गैरमाहीत होतीं; पण आतां मला सर्वच हकीगत यथास्थितपणें ज्ञात झाली असून तिच्यांतील बरेंचसें वर्मही कळल्यासारखें झालें आहे. या ह्यातारबोवांना

थकील, सामान्य सभ्यगृहस्थ समजून मीं घरीं नेलें आणि त्यांच्या मनमिळाऊ व गोड स्वभावामुळेंच मीं त्यांच्याबरोबर इकडे येण्याचें पतकरलें. पण हे महाराज कोणत्या अधिकारानें संपन्न असे महाजन आहेत हें मला येथें कळून आलें. त्यामुळें माझ्या मनाला परमावधीचा आनंद होत आहे. मजसारख्या मराठे गड्याला ईश्वरासारख्या साधूची सेवा करण्याचा लाभ मिळाला याहून अधिक काय पाहिजे. ”

असें भाषण करून पाटीलबोवा थांबले. श्रोतृवृंदापैकीं बहुतेकांना पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. पण या हकीगतीनें राजपुत्र धर्मध्वजाची स्थिति अतिशयच नाजुक झाली. तो एकसारखा भारतीच्या चरणाकडे पहात राहिला. त्याचें अंतःकरण क्षणभर भारतीमय होऊन गेलें. थोड्या वेळानें त्याची ती अवस्था नाहींशी होऊन तो ह्मणाला, “पाटीलबोवांनीं जी हकीगत सांगितली तीच हकीगत माझी भावजय शांभवी हिच्या तोंडून मीं ऐकलेली आहे. ती बनावट होती, त्यांत शांभवीचें कृत्रिम होतें हें तर आतां स्पष्टच झालें. पण त्यावर भरंवसा ठेवूनच मी प्रमिलेच्या शोधार्थ निघालों होतों. परंतु, सद्गुरुभारतींनीं मला दर्शन देऊन जर माझा रस्ता चुकविला नसता तर कोणत्याना कोणत्या तरी प्रयत्नानें मीं त्या घातकी गुहेंत प्रवेश केलाच असता. आणि तेथें कामसेनाची जी वाट लागली तशीच वाट माझी लागली असती ! इतकेंच नव्हे तर त्या शिपायांना तो कामसेन आहे असें कळलें तेव्हां त्यांनीं त्याच्यावर शस्त्र चालविण्याचें बंद ठेविलें यावरून त्यांचा इच्छित बळी कामसेन नव्हता हें सत्य होय. त्या कामसेनाच्या जागीं जर मी असतों तर त्या मारेकऱ्यांनीं आपलीं शस्त्रें तशींच चालू ठेवून माझे तिळतुल्य तुकडे केले असते. तो कपटव्यूह माझ्यासाठींच रचलेला होता अशी आतां माझी पक्की खात्री पटते. कारण मीं जरी शांभवीच्या तोंडची हकीगत गुप्तपणें ऐकली तरी ती मला समजण्यासाठींच तिनें शिष्य नित्यकाजवळ सांगितली यांत संशयच नाहीं. शिष्य नित्यकाकरवीं ती मला समजतांच मी प्रमिलेच्या आशेनें त्या गुहेंत जाईन असा तिला भरंवसा असला पाहिजे. या कामांत सरदार जयसिंग व मोहसंघ हे खात्रीनें सामील असले पाहिजेत. असो; त्याविषयीं पुढें काय तें पाहतां येईल. तूर्त इतकेंच सांगावयाचें कीं आज मी जो जिवंत दिसत आहे हे गुरुभारतीच्या कृपेचेंच फळ होय ! पुढील भविष्य जाणूनच केवळ माझ्या—या दीन पामराचें संरक्षण करण्याच्या बुद्धीनेंच गुरुभारती

त्या अरण्याच्या सीमेवर बसले असावेत. या त्यांच्या नामपाठकाच्या कल्याणा-करतांच त्यांनीं मला आपल्याबरोबर वागवून रस्ता चुकल्याचें निमित्त करून भूताद्रीवरील गुहाप्रवेशाची शेवटची भिती टाळली असली पाहिजे. अरण्यांतून बाहेर पडून जेव्हां आह्मी या गांवांत येण्यासाठीं निघालों तेव्हां प्रमिलाप्राप्तीबद्दल माझी निराशा झाली. त्यासमयीं भारतींनीं मात्र निराश न होतां मला प्रमिला असलेल्या ठिकाणीं नेऊन सोडण्याचें आश्वासन दिलें त्यांतील इंगित आतां स्पष्टपणें उमगत आहे. असो; हें सर्व गुरुमहाराजांनीं घडवून आणलें. माझा जन्म जसा श्रीभारतींच्या कृपेचें फळ होय त्याप्रमाणें माझी स्थिति, लय, यांचेही मालक भारतीच आहेत. तात्पर्य, श्रीभारतीवाचून या जगतांत मला अन्य प्रिय नाहीं ! भारतींच्या सेवेसाठींच माझा जन्म आहे असें मी समजतों. ”

राजपुत्रानें सर्व प्रकारचें श्रेय आपणास दिलें असें पाहून भारतीनीं सांगि-तलें, “ तुह्मी आपले श्रद्धेनें बोलतां त्याचें मला कौतुक वाटतें. पण मला तसें अवसान नाहीं. भविष्य जाणण्याचें मला ज्ञान नाहीं. हें जें काय घडलें हा निवळ योगायोग होय. ही सर्व शुद्ध-सत्व-लोलुप परमेश्वराची कृपा होय ! मी केवळ निमित्तमात्र झालों यावांचून माझें त्यांत कांहींएक महत्व नाहीं. ”

भारतींच्या निरहंकारी भाषणावर राजपुत्र बोलला, “ आपलें हें लीनतेचें भाषण आपल्या अगाध साधुत्वास साजेसेंच आहे. असो; एकंदरींत आह्मां सर्वांचेंच संरक्षण आपल्या कृपेनें झालें आहे. राजकन्या प्रमिला देखील आपल्याच प्रसादानें मुक्त झाली आहे. तिनें आपल्या मनानें या नित्यंकास वरलें हें तिच्या प्रतिज्ञेप्रमाणें योग्यच होय. शिष्य नित्यंकास तिनें दृष्टीनें पाहिलें नव्हतें. त्याचे सद्गुण व स्वरूपवर्णन मात्र तिनें ऐकलें होतें. आमच्या बगीच्यांत जो गोसावीबावाचा शिष्य नित्यंक आहे तो व हा आपला शिष्य नित्यंक यांच्या नांवांत व गुणांत पूर्ण साम्य आहे. राजकन्येनें आपल्या मनानें या नित्यंकास माळ घातली व त्यानेंही औदार्यानें तिला कृतार्थ केलें हा सर्व व्यवहार त्यांच्या मनानें शुद्धच झाला. आपणा सर्वांची याला संमती दिसते. माझीही याला आतां पूर्ण संमती आहे. पण बागेंतील शिष्य नित्यंकाच्या मनाची स्थिति आतां कशी होईल ? या प्रमिलेवांचून जगांतील सर्व स्त्रिया त्यानें मातेसमान मानल्या आहेत. राजा वसुप्रसाद दमनपुरोहित, मी व आणखी इतर राजसेवारत लोक या सर्वांनीं त्या

प्रमिलेच्या स्वीकाराचा अत्याग्रह करून त्याचें वचन घेतलेलें आहे. वस्तुतः तो नित्यंक किंवा गोसावीबोवा हे कोणीही या गोष्टीस कबूल नव्हते. अखेर त्यांनीं त्याकामीं त्या नित्यंकाची बहीण मीं स्वीकारावी अशी अट कबूल करून घेऊन प्रमिलेचा स्वीकार केला. आतां हें प्रमिलेचें कथानक राजधानींत जाहीर झालें ह्मणजे गोसावीबोवा किंवा तो शिष्य नित्यंक यांस आह्मी जाब काय द्यावा ? या नित्यंकाबद्दल तो शिष्य नित्यंक जर वैरभाव दर्शवील व प्रमिलेला अपाय करण्यास प्रवृत्त होईल तर न्याय्य धर्मास अनुसरून आह्मां सर्वांना गप्पच राहणें भाग आहे. "

राजपुत्राच्या या भाषणास नित्यंकानें जोड दिली कीं, " हा प्रसंग खरोखरीच बिकट व भानगडीचा आहे. ही राजकन्या तर माझी विहित पत्नी होऊन चुकली आहे. तो गोसावी व त्याचा शिष्य नित्यंक हे मला माहीत आहेत. एवढेंच नव्हे तर त्यांना मी सटवाईच्या देवळांत असतांना शक्य ती सर्व मदत केली आहे. देऊळ सोडून राजवाड्यांत जातांना ते दोघे माझ्या स्वतःच्या घरींही एक दिवस पाहुणे म्हणून आले होते. त्यावेळीं गुरुभारतीही तेथें होते. त्यांनीं त्यावेळीं त्यांना आपलें नांव न कळवितां गुरुभारतीचे गुरुबंधु या नात्यानें बिनमोल उपदेश केलेला आहे. त्या शिष्याचें नांव नित्यंक असून प्रमिलेनें त्यालाच वरलेलें आहे हें जर मला कळलें असतें तर मी ही राजकन्या निःशंकपणानें त्यालाच नेऊन अर्पण केली असती. एकंदरींत हा प्रश्न विचारणीय आहे हें खरें ! "

दोघांचें बोलणें ऐकून घेऊन भारतींनीं सांगितलें, " तो विचार तूर्त बंद ठेवा. हा माझा शिष्य नित्यंक व प्रमिला यांचीच गांठ ब्रह्मदेवानें मारली होती हें सत्य झालें आहे. मग आतां दुसरा विचार काय करावयाचा ? राजधानींत गेल्यावर जर तो शिष्य नित्यंक वाद करील, रागावेल, तुमच्याशीं अगदीं निर्वाणीला येईल तर त्याचा विचार तेथें पाहू. तुह्मी आतां येथून लवकरच कूच करा. तुह्मी राजधानीस जाऊन दाखल होतां न होतां तों मी तेथें येतों. "

भारतींचा हा विचार सर्वांना मान्य झाला. भारती कांहीं तरी समजूत काढून गोसाव्याची व शिष्य नित्यंकाची बाब मिटवितील असा त्यांना भरंवसा होता. दोन तीन दिवस तेथेंच काढून मग शिवावतीकडे जावयाचें असा बेत कायम झाला. तेव्हां पाटीलबोवांनीं गुरुभारतीस विनंति केली कीं, "ईश्वराच्या कृपेनें आज आपणाप्रमाणें सोन्यासारख्या मंडळींशीं माझा परिचय घडला

आहे. तेव्हां सर्वत्रांना बरोबर घेऊन आपण चार दोन दिवस माझ्या घरीं चलावें ह्मणजे मी स्वतःला कृतार्थ मानीन. आपले पाय माझ्या घराला वरचेवर कशानें लागणार आहेत ? ''

पाटीलबोवा सगळ्यांनाच प्रिय झाले होते. शिवाय त्यांचा स्वभाव उमदा असल्यामुळें गुरुभारतींनीं त्याचें ह्मणणें कबूल केलें. पाटलास त्यामुळें मोठाच संतोष झाला. दोन तीन दिवसांत बाकीची अवश्य ती व्यवस्था लावून तें सर्व मंडळ पाटीलबोवांच्या शेतांतील घराकडे रवाना झालें.

---

## प्रकरण ४३ वें.

### आरोपसिद्धता.



जपुत्र धर्मध्वज आपल्या सवंगड्यास अरण्याच्या सीमेवर बसवून डोंगराच्या पायथ्यांचा तपास करण्यास गेला. तो बराच वेळ परत आला नाहीं तेव्हां ते सर्व अनुयायी चुळबुळ करूं लागले. त्यांनीं ती एक रात्र तो परत येईल या आशेनें तेथेंच बसून काढली. दुसरा दिवस उजाडला अद्यापही राजपुत्र परत आला नाहीं हें पाहून ते जरा भ्याले. त्यांनीं त्याचा माग काढीत काढीत बराच शोध केला. पण कांहींच पत्ता लागेना तेव्हां ते हताश होऊन राजधानीकडे जाण्याच्या हेतूनें परतले. त्यांना परतीची वाटही चांगलीशी माहीत नव्हती. मार्ग चुकतां चुकतां ते बऱ्याच वेळानें सरळ मार्गास लागले आणि राजधानीस जाऊन पोंचले. त्यांनीं झालेला वृत्तांत राजाला निवेदन केला. त्यांनीं सांगितलेली हकीगत ऐकून राजा मोठ्या विवंचनेंत पडला. दमन-पुरोहितांनीं राजाचें बहुत प्रकारें सांत्वन केलें पण व्हावा तसा उपयोग झाला नाहीं. तो कोणत्या स्थानाकडे गेला आहे हें नक्की ठाऊक नसल्यानें त्याचा शोध करण्याला कोणास पाठविणें देखील अवघडच होतें. त्यांतल्यात्यांत

कांहीं हुषार व धीरवान् स्वार परत आलेल्या अनुयायांकडून माहिती घेऊन राजपुत्र नाहींसा झाला त्या प्रदेशांत रवाना केले; ते जाऊन बरेच दिवस झाले तरी त्यांचा किंवा राजपुत्राचा कांहींच पत्ता नाहीं असें पाहून राजाच्या मनांत भलताच संशय येऊं लागला. त्याच्या पाठोपाठ कांहीं महत्वाच्या कामाचें निमित्य करून घराबाहेर पडलेले भोगपाळ व गोसावीबोवा हे देखील परत आलें नाहींत याबद्दलही राजा व पुरोहित फिकीरींत पडले. एकुलती एक पोरगी, सातसायासानें झालेला पोरगा यांची अशी वाट झालली पाहून राजाची कंबर खचली. दमनपुरोहितही साशंक होऊन जरा बावरले. तरीपण सद्गुरु भारतीच्या प्रसादानें जन्म पावलेला राजपुत्र सुरक्षित राहण्याबद्दल त्यांना भरंवसा मात्र वाटत होता. सेनापतीशीं विशेष बोलणें करून पुरोहित त्या प्रवासास गेलेल्या सर्व मंडळींचा गुप्तपणें शोध करूं लागले.

राजा व पुरोहित या अशा भलत्याच विवंचनेंत असतांना त्यांना कामसेनाबद्दलचें वर्तमान विदित झालें. सरदार जयसिंग व मोहसंघ यांनीं कामसेनाचें वृत्त गुप्त राखण्याचा बराच प्रयत्न केला तरी अखेर तें वृत्त राजमंडळाच्या कानावर गेल्यावांचून राहिलें नाहीं. प्रथमतः ते वर्तमान दमनपुरोहिताच्या कानावर आलें. त्यांनीं फार बारकाईनें तपास केला. त्याकामीं त्यांनीं शिष्य नित्यंकाची मुलाखत घेतली. नित्यंकानें आपलें व शांभवीचें झालेलें मंदिरांतील एकांत भाषण पुरोहितांच्या आग्रहावरून त्यांना सांगितलें. पुरोहितांनीं शांभवीच्या दासींना सेनापतीकडून दहशत वाटविली. भीतीनें गांगरून जाऊन त्यांनीं तें भाषण कामसेनानें दडून ऐकलें असल्याचें वृत्त पुरोहितांना कळविलें. अशा प्रकारच्या विशेष व गुप्त चौकशीनें पुरोहितांना मोहसंघ व शांभवी यांच्या घातकी व अविश्वासी कर्माचा पूर्ण संशय आला. त्यांनीं मोहसंघ व शांभवी यांच्यावर फार बारकाईनें नजर ठेवण्याची व्यवस्था केली. सेनापती, प्रधान, मंत्री यांना सरदार जयसिंगाबद्दलही जबरदस्त संशय होताच तो कांहीं तरी दगा करण्याच्या तयारींत असावा अशाबद्दल दिवसेंदिवस जास्त खात्री होत चालल्यामुळें सर्वांच्या विचारें राजानें त्याच्यावरही गुप्त नजर राखण्याची व्यवस्था केली आणि आपल्या सेनापतीस फार सावधगिरीनें व तयारीनें राहण्याची सूचना केली.

दमनपुरोहिताच्या कौशल्यामुळें राजमंडळांस आपलें कारस्थान ज्ञात झालें असून आपल्या कपटाचाराबद्दल व दंगेखोरपणाबद्दल राजदरबारांत अक्षम्य

विचार चालतो असें समजून येतांच मोहसंघानें आपलें सर्व बस्तान जमवून राजवाड्याचा त्याग करण्याचा निश्चय केला. एत्रीतेवी आपणास आपला गुप्त हेतु साधावयाचा आहे हें ठरलेलें असतांना आपण उघडपणें राजाच्या विरुद्ध खटपटी आरंभण्यास भिणें हें नामर्दपणाचें आहे असें समजून त्यानें जयसिंगाच्या वाड्यांत जाऊन राहण्याचा निर्धार ठरविला. तशी गोष्ट झाली ह्मणजे जयसिंगास स्पष्टपणें राजाशीं शत्रुत्व करून सामना ठोकावा लागेल हें निश्चित होतें. तरीपण आपला सर्व जम जमून येईपावेतों पडतेंच घ्यावयाचें आणि उघड वैर करून दंगादंगीस सुरवात करावयाची नाहीं असें जयसिंगाचें मत होतें. जयसिंग जरी उघड शत्रुत्व दाखवीत नव्हता तरी मोहसंघानें कांहींतरी त्रागा करून राजवाडा सोडावा आणि आपल्या बायकोसह आपल्या वाड्यांत यावें हें जयसिंगास मान्य होतें. तसा तो डरणारा नव्हता. वीरबाहूच्या मार्फत त्यानें सैन्याची तयारी चालविली होती. पण प्रमिला किंवा दीक्षादेवी यांच्या नादांत वीरबाहूचें तें खरें काम ढिलें पडलें होतें आणि आतां तर तो वीरबाहू लुला होऊन पडला होता. तेव्हां त्याच्याशीं प्रत्यक्ष मुलाखत होऊन कोणता तो बेत निश्चित होईपर्यंत सरदार जयसिंग स्वतःस कमकुवत समजत होता. खेरीज कामसेनाच्या त्या घोर प्रकरणामुळेंही त्याचे हातपाय मोडावले होते.

सरदाराच्या सल्यास अनुसरून मोहसंघानें राजवाड्याचा कायमचा त्याग करण्याचा निश्चय ठरविला. त्यानें त्याकामीं आपल्या शांभवीशीं खलबत केलें. शांभवीला ती गोष्ट पसंत होती; पण तिला शिष्य नित्यंकाचा मोह सुटेना. तिचें व नित्यंकाचें भाषण चाललें असतां बाहेर कामसेन आला होता हें वृत्त तिला तिच्या दासीकडून कळलें होतें. आपलें गुप्त भाषण कामसेनाला कळल्याकारणानें तो आपणास हीन लेखील व आपली भ्रष्टवृत्ती जगजाहीर होऊन आपली नाचक्की होईल अशी तिला कांहींशी भीति पडली होती. पण ती विद्यासंपन्न, शहाणी व ज्ञानी असल्यानें असला नीचपणा पचविण्याचें काम साधणें हें तिच्यासारखीला मुळींच कठीण वाटणारें नव्हतें. कारण त्याकामीं या बोटावरची थुंकी त्या बोटावर कशी करावयाची त्याची योजना तिनें आधींच करून ठेविली होती. त्या योजनेवरच ती मोहसंघाला सारखा चकवीत होती. पण त्या हकीगतीनुसार कामसेन उतावीळपणानें प्रमिलागुहेंत

जाईल, अशी मात्र तिची कल्पना नव्हती. अखेर कामसेनाचें भयंकर वर्तमान कळतांच तो सर्व प्रकार कसा घडला याबद्दल तिला बिलकुल आश्चर्य वाटलें नाहीं. कामसेन मेला काय किंवा जगला काय ? शांभवीला त्याचें कांहींच नव्हतें. तिला राजपुत्राचें मरण मात्र इष्ट होतें. राणीपद, नित्यंकसहवास आणि औरस संतति या गोष्टींची तिला मनापासून अपेक्षा होती. प्रमिलागुहेकडे गेलेला राजपुत्र मारेकऱ्यांकडून मारला गेला नाहीं असें धरावें तर तो अद्याप परतही आला नाहीं हें कसें ? त्याच्या मागोमाग गोसावीबोवा व भोगपाल हेही आगींत उडी घ्यावयास गेले ! पण, त्यांच्याही मृत्यूचें वर्तमान कळलें नाहीं आणि ते परतही आले नाहींत हें काय ? अशा प्रकारच्या प्रश्नांनीं तिच्या मनाची धांदल उडाली. ती रोज नित्यंकाची बागेंत गांठ घेई व त्याला गोसावीबोवांची कांहीं हवाल कळली असल्यास विचारून पाही. नित्यंकही अतिशय दुर्मुखपणानें नकारात्मक उत्तर देई. यामुळें राजपुत्र, गोसावी, व भोगपाल यांच्यासाठीं नित्यंक पराकाष्ठेचा कष्टी झाला आहे असें तिला स्पष्टपणें दिसून येई.

मोहसंघानें जेव्हां शांभवीला गृहत्यागाचा निर्धार सांगितला तेव्हां ती मोठ्या विवंचनेंत पडली. आतां आपल्यापासून नित्यंक लांब राहतो हें तिला कसें मानवणार ? तिनें त्यासंबंधानें बराच वेळ विचार केला आणि नित्यंकाला आपल्या सन्निध नेण्याची युक्ति योजली.

नित्यंकाला आपण प्रमिलागुहेची हकीगत निवेदन केली आहे या गोष्टीची तिनें मोहसंघाला आठवण देऊन त्याला भीति घातली. कोणाच्या तरी कपटास किंवा चातुर्यास फसून अगर दरडावणीस वचकून नित्यंक ती बातमी जाहीर करून सर्वच लचांड आपल्या गळ्यांत आणील असें सुचवून तिनें मोहसंघास भयग्रस्त केलें आणि आपणास पूर्णपणें निर्भय होण्याकरतां नित्यंकाला कैद करून संगती नेणें इष्ट आहे असें सुचविलें. मोहसंघास ही युक्ति पसंत झाली. पण तो नित्यंक राजाच्या मर्जीतला—राजाचा प्रत्यक्ष जामातच असल्यामुळें त्यास कैद कसें करावें हा त्यांना मोठा विचार पडला. पण शांभवीसारख्या पढिक स्त्रीला असल्या गोष्टींची अडचण पडेल तर तिच्या पोटभरू व केवळ सौख्यदायी शिक्षणाचा उपयोग काय ? तिनें आपल्या पत्निनिष्ठ पतीला सांगितलें कीं, “ आपली परवानगी असेल तर मी बेमालुम उपाय सांगतें. या कामीं हें मुख्य लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, नित्यंकाला

अपाय करणें हें आपलें काम नव्हे. आपलें संरक्षण करणें हें आपलें कार्य-होय! मी त्याच्यावर भलताच आरोप करतें! त्यानें पापबुद्धीनें माझा अव मान केला, कुचेष्टा केली, माझ्याशीं असभ्य वर्तन केलें असा बहाणा करून मी अकांडतांडव उडवून देतें व त्याबद्दल आपण क्रोधाचा आविर्भाव आणून त्याच आवेशांत नित्यंकास कैद करून गुप्ततेनें सरदार जयसिंगाचा वाडा दाखवा. तेथें आपण जाऊन राहिलों ह्मणजे नित्यंकाची समजूत करूं. त्याला बाहेर जाण्याची बंदी करून घरांतल्या घरांत स्वतंत्र व चैनींत ठेवला ह्मणजे तोही आनंदानें राहील व मोकळ्या मनानें वागेल. कदाकाळीं प्रमिला सांपडलीच तर तिचें लग्न कामसेनाबरोबर उरकलें ह्मणजे नित्यंकास सोडून द्यावें. या कृत्यास सरदार जयसिंग अर्थातच अनुकूल होईल. आणि नित्यंकावरील भल-ताच आरोप जाणून त्याच्यावरील राजाची मर्जी खप्पा होऊन राजा आपणास कांहींएक बोलणार नाहीं. नित्यंकाची अशी वाट लाविली ह्मणजे आपण व सरदार यांनीं स्वार व शिपाई बरोबर घेऊन भूताद्रीच्या आसमंतांत सावध-गिरीनें प्रवास करावा. धर्मध्वज, बैरागी व भोगपाल हे तेथेंच कोठें तरी भटकत असतील. त्यांना गांठून तेथेंच तोडून टाकावें ह्मणजे राजेसाहेबांशीं साधारण गोडवा रोष दाखवून आपली मुख्य कार्यें पार पडतील आणि आपलें व सरदाराचें ध्येय खात्रीनें प्राप्त होईल!"

शांभवीचें हें समग्र भाषण ऐकून मोहसंघास ती शांभवी ह्मणजे आपल्या रक्षणार्थ तत्पर असलेली कोणी देवांगनाच आहे असें वाटलें. तो त्या चातुर्य पुतळीकडे मोठ्या कौतुकानें कांहींवेळ नुसताच बघत राहिला. अखेर तिच्या कौशल्याची-कौटिल्याची अतोनात वाहवा करून तो तशा स्वर्गीय पत्नीलाभाबद्दल आपणास धन्य मानूं लागला.

---

# प्रकरण ४४ वें.

## नज़रकैद.




हसंघानें आपला सर्व बेत जयसिंगास कळविला. जयसिंगानें त्याचें ह्मणणें मान्य केलें. जयसिंगासही माधवीबद्दल कुवासना उद्भवली होती. त्यानें तिला आपल्या घरांतील भुयारांत छपवून ठेविलें होतें. तिला त्याच्याकडून राजवाड्यांतील बहुतेक वृत्त समजत असे. भोगपाल तिच्याबद्दल हळहळत असून तिचा तपास करीत आहे असेंही तिला समजलें होतें. कांहीं दिवस अशा स्थितींत गेल्यावर जयसिंगानें तिला आपल्याशींच लग्न करून सरदारीण होण्याविषयीं अप्रत्यक्ष रीतीनें सुचविलें. तिचा नवरा भोगपाल हयात असतां सरदारानें असें विपरीत भाषण बोलावें याबद्दल माधवीनें त्याचा धिःकार केला. भोगपालाचा तिनें आतां कायमचाच त्याग करावा आणि आपल्याला गुप्तपणें माळ घालावी असेंही तिला सुचविण्यास जयसिंगानें कमी केलें नव्हतें. माधवीनें त्याबद्दलही सरदाराची खरडपट्टी काढली. पण एकंदरींत तिच्याविषयीं त्याचे विचार कसे आहेत हें तिला कळून चुकलें. त्या कारणानें ती अत्यंत चिंतायुक्त होऊन भिऊन गेली होती. भलतीच हाव धरून आपण आपल्या पतीस टाकून पळून आल्याबद्दल तिला आतां पश्चात्ताप वाटूं लागला होता. पण करणार काय ? स्वतःच्या शहाणपणाच्या घमेंडींत आणि आपल्या विद्याजन्य ज्ञानाच्या तोऱ्यांत नवऱ्यावर ताण करूं पाहण्याच्या आतुरतेनें, भलत्याच विचारांस सुविचार ठरवून सुखसाधणारांची अखेर कशी दशा होते हें तिला पहिल्यानें कळलें नाहीं. शांभवीसारख्या विद्यावंत, पढिक स्त्रीचा सल्ला तिला आरंभी गोड वाटला; तिची झगझगींत भाषणें तिला आनंददायक भासलीं; तिचीं स्त्रीपुरुषांच्या हक्कांचीं तत्वें तिला मोहक दिसलीं; तिची अधिकारसमतेवरील व्याख्यानें तिला संतोषदायीं झालीं; तिची भावनासाम्यावरील विचासरणी तिला पसंत पडली; परिस्थितीनुसार हवातसा आचार पालटण्याचें शास्त्रच तिला चांगलें वाटलें आणि मनसोक्त आचार

करावयास सांपडून इच्छेस येईल तें सुख भोगावयास आपण स्वतंत्र असावें अशा मोहानें ती सद्धर्म व अनादि सदाचारास लाथाडण्यास तयार झाली आणि अखेर गोत्यांत पडली त्यांस कोणीं काय करावें ? सरदाराचें भलतेंच धोरण ध्यानांत येऊन तिनें आपलें भवितव्य जाणलें; पण अनुवंशिक संस्कारांच्या जागृतीमुळें आणि धर्मध्वज, वसुप्रसाद, भोगपाल व इंदुमती यांसारख्या पवित्र दीर, सासरा, पती, सासू यांच्या पुण्याईमुळें ती लवकर सावध झाली आणि शेवटपर्यंत शक्य त्या प्रयत्नानें आपला शुद्धपणा राखण्याचा प्रयत्न करण्याचा तिनें निर्धार ठरविला. भारती किंवा दमनपुरोहित यांसारख्या विभूतींच्या तोंडून कधींकाळीं ऐकलेल्या पतिव्रतेच्या शुद्ध धर्मास अनुसरून ती भोगपालाचें चिंतन करीत राहिली !

कोणत्याही मोहानें माधवीचें मन आपल्याला अनुकूल होत नाहीं याचें मुख्य कारण तिच्या मनांत भोगपालाबद्दलची भीति असावी अशी कल्पना करून जयसिंगानें त्यावर खासा उपाय शोधून काढला. त्यानें मोहसंघाशीं खल-बत करून असें ठरविलें कीं, माधवीला भोगपालाचें निधनवृत्त कळवावें. भोग-पाल व गोसावीबोवा यांस आपण नाहींतरी मारणारच आहों हें ध्यानांत आणून मोहसंघानेंही त्याचें ह्मणणें मान्य केलें. या सर्व प्रकारामुळें राजा वसुप्रसा-दाचा व आपला उघड बेबनाव होणार ही गोष्ट ते दोघेही जाणून होते तेव्हां राजधानींत राहून या गोष्टी सुरक्षितपणें करतां येणार नाहींत असें वाटून त्यावर त्या दोघांनीं तोड काढली. मोहसंघ कसा झाला तरी राजघराण्यांतील आहे इतकेंच नव्हे राजाचा अगदीं जवळचा नाते-वाईक असून पुढें मागें गादीचा मालक होणारा आहे त्याअर्थीं त्यानें राजधा-नींतच सरदाराच्या वाड्यांत रहावें. त्यानें राजाच्या प्रधान, सेनापती वगैरेंच्या हालचालीवर नजर ठेवावी आणि आपली शक्य ती तयारी गुप्ततेनें करावी. सरदारानें राजधानीचा त्याग करावा. त्यानें वीरबाहूची गांठ घेऊन त्याच्या कलिंग नगरींत जाऊन रहावें. किंवा त्याच्या मालकीचा जो जालंदराचा प्रदेश तेथें जाऊन आपला कारभार स्वतः पहावा. त्या प्रदेशांत सर्व सैन्याची जमवाजमव करावी आणि प्रसंग येईल त्या दिवशीं वसुप्रसादाशीं सामना ठोकावा. असा त्यांचा निश्चय कायम झाला. सरदारानें जालंदर देशांत जाण्याची सर्व तयारी केली. माधवीला त्याच देशांत नेली ह्मणजे तिला गुप्त रहण्याचें कारण नाहीं असें वाटून व तेथें ती राजघराण्यांतील कोणत्याही माणसाच्या भया-

पासून दूर झाल्याचें जाणून आपल्याशीं पुनर्विवाह करील, निदान त्या देशांत आपण तिला जबरीनें पुनर्विवाह करावयास लावूं असा सरदाराला भरंवसा होता.

या प्रकारची सर्व पूर्वतयारी होऊन ते दोघे आपापल्या कार्यास लागले. कामसेनास बराच आराम पडला. तेव्हां सरदारानें मोठ्या व्यवस्थेनें त्याला जालंदरास रवाना केलें. माधवीला भोगपालाच्या अकस्मिक मृत्यूचें वर्तमान मोठ्या दुःखानें कळवून तिला आपला स्वतःचा सर्वतोपरी आधार दाखवून त्यानें धीर दिला. मोहसंघानेंही माधवीला तिच्या पतिनिधनाबद्दल पुष्कळ समजुतीच्या गोष्टी सांगून तिचें सांत्वन केलें आणि अखेर सरदारानें मोठ्या बंदोबस्तानें माधवीला जालंदरास पाठवून दिलें.

नित्यंकाच्या संरक्षणार्थ किंवा करमणुकीसाठीं राजवाड्यांतून कोणीना कोणी तरी येत असे. केव्हांही पाहिलें तरी तो एकटा नसे. शांभवी त्याची वरचेवर गांठ घेई आणि त्यालाच केवळ अर्थबोध होईल अशा रीतीनें कांहीं सांकेतिक किंवा गूढ भाषण करून त्याला आपल्या मनांतील भाव प्रकट करून दाखवी. एक दिवस मोहसंघाशीं ठरविलेल्या कृष्णकारस्थानानुसार शांभवी नेहमींप्रमाणें नित्यंकाच्या दर्शनास गेली. गोसावी व धर्मध्वज यांच्याविषयीं नित्यंक मोठ्या फिकीरींत असल्याविषयीं तिनें दिलगिरी प्रदर्शित करून तिनें त्याला आपल्या मंदिरांत एकटे चलण्याचा आग्रह केला. आपण शांभवीला एकेप्रसंगीं जो उपदेश केला तो निष्फळ झाला अशाविषयीं नित्यंकाची अनेकवेळ खात्री झाली असल्यामुळें तो मंदिरांत जाण्यास कबूल होईना. अखेर शांभवीनें त्याला मोहसंघानें तेथें बोलाविलें असल्याबद्दल सुचविलें. त्यानें आपल्याबरोबर राजवाड्यांतील कोणी शिपाई प्यादा आणण्यास हरकत नाहीं असेंही तिनें सांगितलें आणि अतिशय आग्रह धरला तेव्हां तो शिष्य नित्यंक एका सेवकासह शांभवीच्या मंदिरांत गेला. त्या ठिकाणीं मोहसंघ बसला होता. नित्यंकाचें व त्याचें थोडें बोलणें झालें. मोहसंघानें बोलतां बोलतां नित्यंकास राजपुत्र धर्मध्वज व गोसावीबोवा यांच्याविषयीं अर्धवट रीतीनें कांहीं भयंकर बातमी सांगितली. त्यांच्यावरील भयंकर प्रसंगाबद्दल त्यानें स्वतःही बहुत दुःख प्रदर्शित केलें. त्याच्या तोंडच्या बातमीवर कितपत विश्वास ठेवावा याबद्दलच्या विचारांत नित्यंक चूर आहेसें पाहतांच मोहसंघानें त्याच्या बरोबरच्या सेवकास अधिकारयुक्त वाणीनें बाहेर निघून जाण्यास सांगितलें

तो हुकमाचा चाकर नित्यंकाकडे पाहत पाहत बाहेर जाऊं लागला. तेव्हां नित्यंक त्याला थांबावयास सांगून मोहसंघाला कांहीं बोलणार तोंच मोहसंघ त्यास ह्मणाला, " त्याला येथून जाऊं द्या. माझ्या मनांत तुमच्याशीं कांहीं गुप्तपणें बोलावयाचें आहे. ती गोष्ट तुमच्या फायद्याची आहे. माझ्या प्रियपत्नीच्या वशिल्यामुळें मला तुमचें कल्याण साधेल अशीच गोष्ट करावयाची आहे. "

येवढें भाषण होत असतां तो चाकर दाराबाहेर पडला. शांभवीनें लागलीच दाराला आंतून कडी लावून टाकली. तें पाहतांच नित्यंक जरा साशंक वृत्तीनें मोहसंघास ह्मणाला, " माझें सर्व कल्याण झालेंच आहे. आपण आतां माझें आणखी काय हित साधणार ? "

हा प्रश्न ऐकून मोहसंघ त्यास म्हणाला, " तुमचें हें बोलणें वैतागलेल्या अनुतापी माणसासारखें आहे. प्रमिला अद्याप सांपडत नाहीं ह्मणून आपण रागावलेले दिसतां हें साहजिकच आहे. मी आतां तुह्मांस असें सांगतों कीं, राजकन्या प्रमिला हीं कामसेनास द्यावी असा सरदार जयसिंगाचा आग्रह होता. मीही त्यास अनुकूल होतों! आतां प्रमिला हयात आहे असें आह्मांला कळलेलें आहे पण ती केवळ आपली पत्नी झाली आहे ह्मणून आह्मी तिचा नाद सोडून देतों. ती तुमची तुह्मांस लखलाभ होवो ! तिला हुडकून काढण्याबद्दल आह्मीही हवे ते परिश्रम करण्यास तयार आहों. यापुढें तिला व तुह्माला एकत्र बसलेले पाहून आह्मांला अत्यानंद व समाधानच वाटणार आहे. पण मी तुह्मास असें विचारतों कीं, या आमच्या उदार व परोपकारी भावनेबद्दल योग्य तो मोबदला देण्यास तुह्मी कां तयार होऊं नये ? "

मोहसंघाचें बोलणें ऐकून घेऊन नित्यंकानेंही मोठ्या उत्सुकतेनें विचारलें, " आपला हा मजकूर सत्य आहे असें जर आपण ईश्वरसाक्ष सांगत असाल तर आपण आमच्याजवळून काय मोबदला इच्छितां तें सांगा. शक्य असल्यास आह्मी कृतघ्न होणार नाहीं. "

नित्यंक बहुतेक आपणास वळणार असें वाटल्यानें मोहसंघाच्या तोंडास पाणी सुटून तो बोलला, " तुमची आतेबहीण किंवा मामेबहीण जी दीक्षादेवी ती तुह्मीं धर्मध्वजाला काय ह्मणून देऊं केली ? बरें, तुमच्याकडून ती गोष्ट होऊन गेली ह्मणून ती सोडून दिली तर आतां ती दीक्षादेवी तुह्मी होऊन कामसेनास देण्यास हरकत काय आहे ? राजपुत्र धर्मध्वजाची आशा आज सुटल्यासारखीच आहे. तेव्हां सरदारपुत्र कामसेन

हा थोडा आजारी आहे तो चांगला बरा होतांच तुह्मी व आह्मी मिळून दीक्षादेवीला त्याच्या पदरीं बांधून टाकूं. तोहि तिच्यावर आसक्त आहे. तो तिला जीव कीं प्राण करील. असें करण्यांत त्याला व तुह्मालाही सुख लागेल. हाच मोबदला आह्मी तुह्मापासून इच्छितों. तुह्माला जर कृतघ्न होणें हा नीचपणा वाटत असेल तर तुह्मी आम्हाला दीक्षादेवीची खबर सांगा. ह्मणजे तुह्मी येत असल्यास बरेंच, नसल्यास आह्मीच कोणीतरी जाऊन तिला घेऊन येऊं आणि आपला कार्यभाग उरकूं. यदाकदाचित् ईश्वराच्या कृपेनें धर्मध्वज जिवंत परत आला असें अशक्य असलेलें शक्य मानलें तरी कामसेन त्याला व दीक्षादेवीला मरेपर्यंत स्वस्थ बसूं देणार नाहीं हें तुह्मी ध्यानांत ध्या व आपल्या हितास जागा. ”

मोहसंघाचें हें भाषण नित्यंकास मुळींच रुचलें नाहीं. पण त्याबद्दल कांहींच अस्वस्थता किंवा तिरस्कार न दाखवितां त्यानें मोहसंघास सरळ सांगितलें, “ माझे गुरु गोसावीबोवा यांच्यावर सर्व कांहीं अवलंबून आहे. त्यांच्याखेरीज मला स्वतंत्रतेनें कांहींच करतां येण्यासारखें नाहीं. दीक्षादेवीची सर्व गुप्त बातमी त्यांनाच ठाऊक आहे. ते परत आल्यानंतर आपण ही गोष्ट त्यांच्याजवळ काढावी किंवा मीही ही हकीकत त्यांना कळवीन आणि फार झालें तर मी आपला शब्द तुमच्या वतीनें खर्चून पाहीन. ”

नित्यंकाचा इतपत रुकार पटल्याबद्दल मोहसंघ त्याचे आभार मानणार तोंच गुप्तरीतीनें ठरल्याप्रमाणें कोणीएक राजदूत मोहसंघाचा शोध करीत तेथें आला. शांभवीनें दार उघडून त्यास आंत घेतलें. तो दारांतच उभा राहिला आणि मोहसंघास मुजरा करून त्यानें एक बंद केलेला लखोटा मोहसंघाच्या हातांत टाकला. मोहसंघानें तें पत्र फोडून मजकूर वाचला आणि चेहरा गंभीर करून तो तसाच त्या शिपायासह धांदलीनें बाहेर पडला. शिपायानें जातांना दार ओढून घेतलें आणि शांभवीनें लगबगीनें त्याला आंतून कडी लाविली.

हा सर्व मायावी प्रकार नित्यंकानें बहुतेक जाणला पण त्याला त्या प्रसंगाचा मुख्य भावार्थ बरोबर कळेना. कसेंही असलें तरी आपण येथून चालतें होणें श्रेयस्कर आहेसें जाणून तो दाराकडे जाऊं लागला तोंच त्याला शांभवीनें अडविलें. तिला एकाएकीं धक्का कसा द्यावा अशी शंका येऊन तो तिला साध्या शब्दांनीं वाट सोडण्यास सांगणार तों शांभवी त्यास ह्मणाली,

" मी आपल्या पतीला फसवून देखील आपलें कल्याण साधीत आहे हें आपल्या ध्यानांत आलेंच असेल. आतां मी आपणास इतकीच विनंति करतें कीं, आपण आह्मी जाऊं तिकडे येण्यास कबूल व्हा. तेथें तुह्माला गुप्तपणानें दडून राहिलें पाहिजे. तसें न होईल तर आपल्यावर मोठा प्रसंग गुदरेल. मग आपल्याला सहाय्य करणें माझ्याही हातांत राहणार नाहीं ! पूर्ण विचार करून काय तें उत्तर द्या. "

शांभवीची आजची ही चमत्कारिक भाषा ऐकून नित्यंकानें तिला सांगितलें, " मी आपल्या मनाचा तितका स्वतंत्र नाहीं. आतां तर मला राजाज्ञेवांचून कांहींच करतां येणार नाहीं. आपण मला जो मजकूर सांगतां हा कांहीं विपरीतच आहे. मीं यायचें कोठें आणि गुप्त काय ह्मणून रहावयाचें ? मला काय तें स्पष्ट सांगा. मी राजेसाहेबांना सर्व कांहीं विदित करतों आणि यांच्या विचाराप्रमाणें तुह्मास उत्तर देतों. "

नित्यंकाचें बोलणें अगदीं सरळ होतें. पण त्या कैदासणीस तें कसें पटणार ! ती त्यास भय दाखविण्याच्या बुद्धीनें ह्मणाली, " तस कांहीं जमणार नाहीं आणि तितकी आतां सवडही नाहीं. तुह्माला या घटकेला येथूनच आह्मी ह्मणतों तिकडे आलें पाहिजे. तुह्मी खुषीनें नच याल तर तुम्हाला जबरदस्तीनें नेणें भाग पडेल. "

या धमकावणीनें नित्यंक कांहींसा भ्याला. आपणही शांभवीला कांहीं दहशत घालावी ह्मणून त्यानें तिला सांगितलें, " असें होणार नाहीं. आणि झालेंच तर राजाच्या हुकुमावरून माझ्या शोधार्थ व संरक्षणार्थ अनेक वीर रवाना होतील हें तुह्मी जाणतच असाल. खेरीज तुह्मी माझ्या नाशास प्रवृत्त झाला ह्मणजे मीही तुमचें सर्व बिंग बाहेर फोडून सर्व जगांत तुमची छी थू करीन. मग तुमचा पति मोहसंघ हा देखील तुह्मास लाथांनीं तुडवील. जो तो तुह्मांकडे बोट दाखवील आणि तुमचा तुह्माला जन्म नकोसा होईल हें चांगलें ध्यानांत आणा. दुसऱ्याला आपल्या पगांत धरण्यापूर्वी आपण कोणाच्या पगांत सांपडलों आहों याचा प्रत्येकानें विचार केला पाहिजे. "

या भयप्रद भाषणानें शांभवीचें मन दचकलें. पण त्या भयग्रस्ततेनें ती सर्पीण सुमार्गाकडे न वळतां अधिकच खवळली. तिनें नित्यंकाशीं आणखी घासाघीस करण्यांत मतलब नाहींसें पाहून एकदम जोरानें किंकाळ्या

मारण्यास सुरवात केली. तिनें आपल्या गळ्यांतील दोन तीन दागिने तोडून जमिनीवर फेंकून दिलें आणि आपल्या संरक्षणार्थ कोणीतरी धांवून यावें म्हणून दीनवाणीनें सारखा सुहृदांचा व दासदासींचा धावा चालविला.

शांभवीच्या मंदिरांतून केविलवाणा स्वर बाहेर ऐकूं येतांच छपून बसलेले सेवक एकदम धांवून गेले आणि त्यांनीं दार उखळतांच मोहसंघही त्या ठिकाणीं हत्यार घेऊन प्राप्त झाला. शांभवीची ती खेदनीय अवस्था पाहतांच मोहसंघानें व सर्व शिपायांनीं नित्यंकाचा अपराध ओळखला. मोहसंघानें आपल्या सेवकांना नित्यंकाच्या मुसक्या बांधण्यास सांगितलें. ते सेवक नित्यंकाला गोसावीबोवांचा शिष्य व राजजामात या नात्यानें ओळखीत होते. त्यामुळें ते प्रथमतः नित्यंकाच्या अंगास हात लावण्यास कचरले. पण मोहसंघानें जेव्हां त्यांना खडकावलें तेव्हां त्यांच्यांतील दोघेजण पुढें सरसावले. ते आतां नित्यंकाला कैद करणार तोंच त्यांना दुसऱ्या चार पांच राजसेवकांनीं प्रतिकार केला हे प्रतिकार करणारे सेवक नित्यंकाचे स्नेही होते. त्याच्या तैनातीकरतां राजाज्ञेवरून जे आळी-पाळीनें नित्य त्याच्या पर्णकुटींत जात होते तेच यासमयीं सर्वजण एकत्र गोळा झालेले होते. मोहसंघानें नित्यंकाच्या बरोबर मंदिरांत आलेल्या ज्या सेवकास बाहेर हाकून लावले होतें त्यानेंच हे सर्व सेवक एकत्र जमविले. बाहेर आल्यावर त्या सेवकानें गुप्तपणानें नित्यंकाचें व शांभवीचें भाषण मन लावून ऐकलेलें होतें. खेरीज तो मोठा चाणाक्ष होता. आपल्या मंदिरांतून हाकून दिल्याबद्दल तो मोहसंघावर चिडला होता. एकंदर रागरंगावरून नित्यंकावर आज कांहीं तरी प्रसंग गुदरणार अशी त्याची कल्पना झाली होती. त्यामुळें त्यानें मंदिरांतून बाहेर पडतांच नित्यंकाशीं विशेष परिचित असे सर्व राजसेवक एकत्र जमवून मंदिराभोंवतीं छपवून ठेविले होते. मोहसंघाच्या शिपायांबरोबरच तेही मंदिरांत शिरले आणि त्यांनीं मोहसंघाच्या सेवकांना नित्यंकाला कैद करण्याच्या कामीं प्रतिकार केला.

याप्रमाणें चाकरांमध्यें लठ्ठालठ्ठी सुरू झाली तेव्हां मोहसंघानें राजदूतांना दरडावले. तेव्हां त्यांच्यांतील मुख्य म्हणाला, " या नित्यंकानें तुमचा गुन्हा काय केला तें आम्हास स्पष्टपणें समजलें पाहिजे. "

हा प्रश्न मुद्दाम लबाडीनें केला असावा असें समजून मोहसंघानें तिरस्कार-

पूर्वक त्यांना सांगितलें, " ह्या नीच गृहस्थाला कांहीं कामासाठीं येथें आणला असतां एकांत पाहून यानें माझ्या प्रिय पत्नीचा पापबुद्धीनें अपमान केला हें तुम्हाला धडधडीतपणें माझ्या प्रिय पत्नीच्या स्थितीवरून दिसत असतांना तुह्मी असा हा मूर्खासारखा प्रश्न करतां तेव्हां तुम्हाला काय म्हणावें ! तुह्मी मुकाटयानें चालते व्हा. हा नीच, बदमाष नित्यंक माझा कैदी आहे. "

या भाषणानें ते दूत किंचित् वचकले; पण त्यांना राजाश्रयाचा जोर वाटत असल्यानें ते त्यास म्हणाले, " आपलें म्हणणें कदाचित् खरें असेल पण आम्हा सर्वांस या राजजामाताच्या संरक्षणास नेमलेलें आहे. आह्मी त्याला राजाज्ञेवांचून आपल्या स्वाधीन कसें करावें ? खेरीज यासंबंधानें त्याचें म्हणणें काय आहे तें अद्याप समजावयाचें आहे. "

ते लोक राजाज्ञेची सबब सांगतात असें पाहून मोहसंघ जोरानें त्यांना म्हणाला, " आमची आज्ञा ही राजाज्ञा नव्हे काय ? ठीक आहे ! वसुप्रसादाचा हुकूम म्हणजे राजाज्ञा असें तुह्मी मानीत असाल तर मी तुह्मांस असें विचारतों कीं, माझ्या या मानवती भार्येचा अपराध व कुचाळी करणाऱ्या नित्यंकाला कैद करण्याच्या कामीं राजा वसुप्रसाद माझ्या विरुद्ध जाईल असें तुह्मांस वाटतें काय ? "

हा प्रश्न ऐकतांच नित्यंकानें निक्षून सांगितलें कीं, " ही स्त्री स्त्रीजातीच्या कौटिल्यदंभानें युक्त आहे. साहस, अनृत, माया, मोह, कपट, अशुद्धता इत्यादि अवगुणांचें मूळ वास्तव्यस्थान म्हणजे स्त्रिया होत हें ह्मणणें सार्थ करण्याकरितांच ही स्त्रीजातींत जन्म पावली आहेसें दिसतें. या स्त्रीबद्दल सांगण्यासारख्या पुष्कळ गोष्टी आहेत. पण त्या मी तूर्त बोलूं इच्छित नाहीं. तूर्त मी इतकेंच सांगतों कीं, याकामीं मी अत्यंत शुद्ध आहें. माझा रतिमात्र अपराध नाहीं. या डांकिणीबद्दल मला कोणत्याही प्रकारची पापभावना असणें शक्यच नाहीं हें मी तुह्मास प्रतिज्ञेवर सांगतों. "

या भाषणांत नित्यंकानें शांभवीस दुर्गुणी ठरविण्याचा यत्न केला आणि मध्यंतरीं कांहीं निंद्य नांवांचा उच्चार केला हें न सोसून मोहसंघ बोलला, " लोकाला निंद्य व दुराचारी ठरविण्याचा यत्न करून आपला अपराध छपविण्याची कला कोणाकोणाला साधलेली असते. या बेरडाचें संरक्षक भाषण तशाच मासल्याचें आहे. याच्या मनांत जर माझ्या पत्नीबद्दल

कांहींच भलता भाव नव्हता व नाहीं तर त्याच्या तोंडून तिच्यासंबंधानें अपशब्दांचा उच्चार होईल तरी कसा ? कसेंही असो; तुह्मी याला माझ्या स्वाधीन करा; नाहींतर मला जरा उग्रस्वरूप धारण करून तुमचाही समाचार घेतला पाहिजे. ”

हे शब्द ऐकून ते राजदूत मोहसंघास ह्मणाले, “ आह्मी सरकारच्या हुकमाचे चाकर ! आम्हाला या नित्यंकाच्या संरक्षणार्थ राजानें नेमलें आहे. आह्मास राजाज्ञा शिरसा वंद्य आहे. आह्मी यास अपराधी या नात्यानें तुमच्या स्वाधीन करूं ! पण ती गोष्ट तुमच्या हुकमानें होणार नाहीं. या कामीं आम्हास प्रत्यक्ष राजेसाहेबांचा हुकूम पाहिजे. ”

राजदूतांचा हा खडखडीत जाब ऐकतांच मोहसंघ राजा वसुप्रसादावर दांत ओठ चावूं लागला. त्याला हा अपमान असह्य झाला. तो त्या दूतांबरोबर वर्दळीला येऊन त्यांच्याशीं कांहीं शस्त्रप्रसंग करणार तोंच त्या ठिकाणीं राजा वसुप्रसादाकडून सुमंत व दमनपुरोहित कांहीं निवडक सरदारांसह प्राप्त झाले. त्यांना पाहतांच मोहसंघ घडलेली हकीगत तिखटमीठ लावून सांगणार तोंच सुमंत म्हणाले, “ दूतांच्या तोंडून सरकारस्वारीला हा सर्व मजकूर कळला आहे. त्यांच्याच आज्ञेवरून आह्मी या ठिकाणीं आलों आहों. नित्यंकाला तूर्त नजरकैदेंत ठेवावें, असा राजेसाहेबांचा हुकूम आहे. या संबंधींची सर्व चौकशी खुद्द सरकार स्वतः पुढें करणार आहेत. आपण फिर्यादी या नात्यानें नित्यंकावरील आरोप सिद्ध करण्याची तयारी करावी. ”

असें सांगून सुमंतांनीं नित्यंकास शिपायांच्या स्वाधीन करून राजवाड्यांत नेण्यास सांगितलें. बाकीच्या सर्व शिपायांना मंदिरांतून निघून आपापल्या कामास जाण्याची आज्ञा झाली. मोहसंघ व शांभवी यांना चार समजुतीच्या गोष्टी सांगून शांत करण्याचा प्रयत्न पुरोहितांनीं केला; व त्यांनीं मंदिरांतून आपलें ठाणें हलवून राजवाड्यांत येऊन रहावें अशा अर्थाचा हुकूम सुमंतांनीं मोहसंघास दाखविल्यावर सुमंत व पुरोहित बरोबरच्या शिपायांसह नित्यंकास घेऊन राजवाड्याकडे चालते झाले.

---

# प्रकरण ४५ वें.

## राजस्नुषा.



नित्यंकाच्या हातून भलताच अपराध घडल्याबद्दल राजा वसुप्रसादाला अत्यंत आश्चर्य वाटलें. नित्यंकाच्या विशेष परिचयांतील व सतत त्याच्या सहवासांत असणाऱ्या अशा दूतांनीं राजाला नित्यंक निरपराधी असल्याविषयीं सांगितलें. पण त्याला त्यांचें म्हणणें विशेष खरें असेल असें वाटेना. शांभवी ही जरा अति शहाणी व उलाढाली बायको आहे असें त्यानें जाणलें होतें; पण ती दुर्वर्तनी असेल अशी कल्पना करण्यास त्याचें मन घेईना. त्याचें मन द्विधा झालें. नुसत्या कल्पना करून त्याला नित्यंक व शांभवी हे दोघे अपराधी आहेत असें वाटे आणि दोघेही अपराधी नसावेत असें वाटे. त्याच्या स्वतःच्या मनाचा कायम असा कांहींच निश्चय ठरेना. नित्यंकाचा गुरु गोसावीबोवा तेथें नसल्यानें त्याला त्याची मोठी उणीव भासूं लागली. गोसावीबोवा परत येईपर्यंत नित्यंकास नजरकैदेंत ठेवून चौकशी तशीच लांबणीवर टाकावी तर मोहसंघ स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. तो एकसारखा नित्यंकाला आपल्या ताब्यांत मागत होता. त्यानें त्या संबंधानें इतका तिटकारा दर्शविला कीं, त्यानें राजवाड्यांत पाऊल टाकण्याचें बंद केलें. त्याला बागेंतील मंदीर सोडून देण्याची राजाज्ञा झाली होती. तिचाही पूर्ण निषेध व तिरस्कार व्यक्त करण्यासाठीं त्यानें बागेचा त्याग करून आपल्या प्रियपत्नीसह सरदार जयसिंगाच्या वाड्याचा आश्रय केला. वस्तुतः हा त्याचा बेत पूर्वींच ठरला होता. तोच त्यानें या निमित्यानें अमलांत आणला. त्याच्या तैनातींतील त्याला अनुकूल असे सर्व लोक त्याच्या उपदेशानें राजसेवेचे राजीनामे देऊन सरदाराच्या गोटांत नोकरीस राहिले. जयसिंग सरदारही याच सुमारास माधवसिह जालंदरास निघून गेला होता. तो मध्यंतरीं सिंधावतीस येई आणि ताबडतोब पुन्हां तिकडे निघून जाई. तेथें त्यानें सैन्याची जमवाजमव चालविली होती. राजाच्या टेहळणीवाल्या सेवकांकडून राजदरबारांत ही बातमी कळली. तेव्हां मोहसंघाला दरबारी लोक जरा वचकूं लागले. मोहसंघाचें

मन शांत होऊन त्यानें पुन्हां राजवाड्यांत यावें ह्मणून राजानें त्याची बहुत-प्रकारें समजी केली. पण तो ताळ्यावर आला नाहीं; एवढेंच नव्हे तर तो बेधडक असें सांगूं लागला कीं, "आतां राजवाड्यांत राहण्याची माझी इच्छा नाहीं. राजवाड्यांतील कोणत्याही माणसाशीं संबंध ठेवण्याचा मला वीट आला आहे. मी व माझी प्रियपत्नी यांच्यापेक्षां राजा व दरबारी लोक यांना तो भिकारडा नित्यंकच सत्य वाटूं लागला आहे. मला सरदार जयसिंगाच्या जालंदर नांवाच्या स्वतंत्र देशांत प्रधानकीची जागा मिळत आहे. इतकेंच नव्हे तर तेथील अधिपत्यही मला देण्यास सरदार व त्याचा पुत्र कामसेन हे दोघे कबूल आहेत. या नित्यंकाच्या खटल्याकरितां मी येथें राहिलों आहें. बऱ्या बोलानें राजेसाहेबांनीं माझ्या म्हणण्यावर भरंवसा टाकून नित्यंकाला माझ्या कबजांत देण्याचा निकाल केला तरच सर्व गोष्टी सुरळीत चालतील; नाहींतर आमचे पुन्हां राजाशीं मुखावलोकनही होणार नाहीं. मग आम्ही परस्परास मेलों असेंच सर्वांनीं मानावें. या मोहसंवाची पत्नी म्हणजे काय अगदीं कःपदार्थ झाली! हा मोहसंव म्हणजे काय वाळलेला पाचोळा बनला! आणि तो भणंग गोसावी आणि तो नीच कमअस्सल नित्यंक हे दोघे उपटसुंभ सर्वश्रेष्ठ, सत्यवादी आणि विश्वासू झाले काय!!"

मोहसंवाच्या या भाषणामुळें वसुप्रसाद खिन्न होई. त्याचें समाधान करून गृहकलह मिटवावा आणि जयसिंगापासून मोहसंवाला फोडून प्रसंग पडल्यास जयसिंगाची खोड मोडावी असेंही एका अर्थानें वसुप्रसादाच्या मनांत येई. पण न्यायान्यायाचा पूर्ण विचार केल्यावांचून नित्यंकाच्या विरुद्ध वागणेंही त्याला एका अर्थानें बरें दिसेना. अखेर नित्यंकाच्या खटल्याचा दिवस मुकरर करून राजानें मोहसंव व त्याची पत्नी यांना दरबारास हजर राहण्याचा हुकूम सोडला.

नित्यंकाचें खटलें राजापुढेंच चालावयाचें होतें. त्याच्या चौकशीसाठीं राजानें आपल्या खाजगी महालांत कचेरी भरविली. त्या कचेरीला, सुमंत, प्रधान, सेनापती, सुरनीस, डबीर, दमनपुरोहित, इतर शास्त्री, पंडित वगैरे मंडळी हजर होती. राजा वसुप्रसाद न्यायासनावर आरूढ झाला होता. बाकीची मंडळी आपापल्या इतमामाप्रमाणें आपापल्या जागेवर बसली होती. मोहसंघ व नित्यंक यांना प्रथमतः पुकारण्यांत आले. मोहसंघ फिर्यादी या नात्यानें मोठ्या दिमाखानें राजाच्या उजव्या बाजूला जाऊन उभा राहिला.

कायद्याच्या कामीं त्याला सल्ला देणारे कायदेबाज त्याच्या सांनिध्यच स्थित झाले. राजदूतांनीं नित्यंकाला आणून आरोपी या नात्यानें राजाच्या डाव्या बाजूला उभे केले. राजाच्या सांगण्यावरून वादीप्रतिवादींना प्रश्न करण्यास सुमंत उभे राहिले.

सुमंतांनीं मोहसंघाला आपली फिर्याद काय आहे ती बोलून दाखविण्याचा हुकूम करतांच तो ह्मणाला, " माझी प्रिय व पवित्र पत्नी शांभवी हिच्याशीं या नित्यंकानें असभ्य वर्तन केलें तेणेंकरून तो घोर अपराधी ठरून शिक्षेस पात्र झाला आहे. तेव्हां त्या नीचाला माझ्या ताब्यांत द्यावें अशी माझी विनंति आहे. "

हें ऐकून सुमंतांनीं नित्यंकास त्याचें ह्मणणें काय आहे तें विचारलें. नित्यंक हा तरुण होता. तो स्वरूपवान् व उमदा दिसत होता. तो शुद्ध, श्रद्धाळू, धर्मप्रिय व नीतिसंपन्न होता. पण जबाब देण्याच्या कामीं या सद्गुणांचा उपयोग काय ! त्याला कायद्याची बिल्कुल माहिती नव्हती. सर्वप्रकारें त्याची जबाबदारी घेणारा गोसावीबोवा तेथें हजर नव्हता. तेव्हां तो नित्यंक आपल्या संरक्षणाकरितां आपला श्वशुर जो न्यायाधीश राजा त्याच्या तोंडाकडे आशेनें पहात राहिला. त्याची ती स्थिति व त्याचें आपल्याशीं असलेलें नातें ध्यानांत घेऊन राजा म्हणाला, -" वस्तुत: आरोपी नित्यंक हा माझा जामात आहे. सर्वप्रकारें आम्हीच त्याचे संरक्षणकर्ते आहों. पण या कामीं त्याचें संरक्षण करणें आमच्या हातांत नाहीं. त्याच्या गुन्ह्या संबंधानें आम्हास कांहींच माहिती नाहीं. त्याच्या तर्फे तो निर्दोष असल्याबद्दल पुरावा करणें हेंच त्याचें काम आहे. त्यासाठीं लागेल ती मदत करण्यास आम्ही तयार आहों. आतां न्याय देण्याचें काम व जबाबदारी आमची आम्हीच स्वीकारली असल्यामुळें आम्हाला नात्याचा विचार करण्याचें कारण नाहीं. हें न्यायासन आहे. ही न्यायदेवतेची कामगिरी आहे. या ठिकाणीं निःपक्षपाताचें काम आहे. नित्यंक हा माझा जामात आहे हें तर कांहींच नाहीं. पण यदाकदाचित् माझ्या हातून अनीतिकारक वर्तन घडण्याचा प्रसंग येईल तर मी स्वतःसही कडक शासन करण्यास संमती देईन. मग पुत्र, कन्या, कांता, जामात यांची कथा काय ? नित्यंकास स्वसंरक्षणार्थ काय सांगावयाचें असेल तें त्यानें स्वतः सांगावें. कायद्या संबंधानें त्याचें अज्ञान असलें तरी चालेल. तो प्रकार स्वतंत्रतेनें आह्मी पाहूं. "

राजाच्या या भाषणानें नित्यंकानें स्वतःच भाषण करण्याची उमेद धरली आणि तो म्हणाला, " मी पूर्णपणें शुद्ध आहें. मी असला अपराध करणें संभवनीय नाहीं. मोहसंव व त्याची कांता शांभवी यांचें हें सर्व कपट आहे. त्यांनीं हें मजवर कुभांड रचिलें आहे. कोणीकडून तरी मला पेचांत आणावें हा त्यांचा उद्देश आहे. ईश्वरास स्मरून मी पुन्हां सांगतों कीं, मी धुतल्या तांदुळासारखा शुद्ध आहें. "

नित्यंकाचा मृदु शब्दांनीं दिलेला जबाब ऐकतांच सुमंतांनीं मोहसंवास सांगितलें, " तुमची पत्नी या ठिकाणीं आणून तिचा जबाब घेणें इष्ट आहे. ती कुलवधू असली तरी या ठिकाणीं म्हणजे राजवाड्यांतील खाजगत राजमहालांत येण्यास तिला मुळींच हरकत नाहीं. "

शांभवीला कचेरींत न्यावी लागेल असा मोहसंवाचा अजमास होताच. त्याप्रमाणें त्यानें तिला वाड्यामध्यें आणलेलीही होती. खेरीज शांभवी ही कांहीं साधी बायको नव्हती. पिळपिळीत विनय, बावळी सलज्जता, असल्या भिकार, अज्ञानजन्य, अशिक्षितपणाला योग्य, प्राचीन काळच्या आचारास अनुरूप आणि नेभळ्या ऋषिमुनिप्रणीत शास्त्रास मान्य अशाप्रकारच्या गुणास हार जाणारी शांभवी ही स्त्री नव्हती. तिचें नांव पुकारतांच ती धीटपणानें पुढें झाली आणि स्पष्टपणें बोलली, " हा चांडाळकर्मी नित्यंक जिवंत जाळून टाकण्यास योग्य आहे. हा तारुण्यसंपन्न आहे. हा अद्याप अविवाहितच आहे. हा गोसाव्याबरोबर भिक्षा मागत हिंडणारा आधाशी, बुभुक्षित आहे. हा पापप्रवृत्त असणें अगदीं साहजीक आहे. यानें पापकर्मास उद्यक्त होऊन आपल्या पापी मनाच्या प्रेरणेस हार जाऊन माझा पूर्णपणें अपमान करण्याचें धाडस केलें आहे. यांत चाणाक्ष सभासद व बुद्धिमान् न्यायदेवता काय तें सर्व समजेलच. हा दंडास पात्र आहे. माझ्या दासी व मंदिरांत धावून आलेले सेवक याची साक्ष देतील. "

इतकें बोलून शांभवी थांबली. नंतर तिच्या दोन दासी व मोहसंवाचे शिपाई यांच्या साक्षी शांभवीला अनुकूळ अशाच झाल्या. तेव्हां वसुप्रसादानें नित्यंकावर आरोप लागू केला आणि त्याला त्याचें विषयीं संरक्षक भाषण करण्यास सांगितलें. तेव्हां नित्यंक म्हणाला, " मला तूर्त आतां इतकेंच सांगावयाचें आहे कीं, सरकारांनीं गोसावीबोवा परत येईपर्यंत हा खटला तहकूब करून मला हवेतर बंदोबस्तानें नजर कैदेंत ठेवावें. "

यावर राजानें सांगितलें, " अशी मुदत देण्यास हरकत नाहीं; पण गोसा-वीबोवा केव्हां येतील याचा कांहींच नेम नसल्यानें खटला तहकूब ठेवतां येत नाहीं. आपलाला वादीच्या पुराव्याला निर्बल ठरविण्यासाठीं कांहीं बोला-वयाचें असल्यास बोलावें. "

असें उत्तर मिळतांच नित्यंक बराच निराशयुक्त व कांहींसा धैर्ययुक्त होऊन ह्मणाला, " ही बाई मला पापी ह्मणते तें खरें नसून हिचें सर्व शरीर पापानें न्हालेलें आहे. माझ्या वतीनें साक्ष देण्यास कोणी पुढें आणणें जवळ जवळ अशक्यच होय. ही बाई ह्मणते ती गोष्ट साफ बनावट आहे. तिच्या तर्फे साक्ष देणाऱ्या दासी व सेवक जें सांगतात तें खरें आहे. पण त्यायोगें मी अपराधी कसा ठरेन? ही बाई ओरडतांना, रडतांना, आकांडतांडव कर-तांना त्यांनीं पाहिली; पण तिच्या त्या गर्गशाचें कारण मीच हें खरें कसें मानतां येईल? या बाईचें दागदागिने तुटून जमिनीवर पडले होते, तिचा चेहरा म्लान दिसत होता, अपमानाच्या दुःखानें ती पीडित झाली होती हें शिपायांच्या नजरेस आलें हें सत्य होय! पण मीं तिला त्या दुःखांत लोटलें हें कसें ठरतें? माझ्या गरिबाच्या पण सत्य वचनांवर विश्वास ठेवण्याची जेर परमेश्वर न्यायदेवतेस प्रेरणा करील तर मी असें धडधडीतपणें सांगतों कीं, ही शांभवी मला वरचेवर मंदिरांत बोलावून नेई. ती आपल्या पतीचा त्याग करून मजबरोबर पळून येण्यास तयार असे. पण मींच त्यावेळीं तिला सदुपदेश करून पातिव्रत्याचें महत्व सांगितलेलें आहे. ज्या गुहेमध्यें सरदारपुत्र कामसेन जखमी झाला ती गुहा— "

नित्यंकाच्या तोंडून भलताच इतिहास बाहेर पडून कांहीं विपरीत प्रकार घडेल अशा भीतीनें त्याला पुढें बोलूं न देतां एकदम मोहसंघ ह्मणाला, " हे असले बदमाष लोक अशाच शकला लढवून आपल्या अपराधांची निष्कृति करूं पाहतात. या भणंगाबरोबर—या भिकारड्याबरोबर—या हुरडेभुंक्या-बरोबर मोहसंघाची पत्नी, धर्मध्वजाची भावजय आणि वसुप्रसादाची सून शांभवी पळून जाऊन दारीं ओसरी हिंडून करटी फिरविण्यास तयार झाली होती या ह्मणण्याचें न्यायमूर्तीमही हंसूच येईल. हे असले भामटे, हे बेरड, हे रामोशी अशाच क्लृप्त्यांनीं दुसऱ्याला हीनपणा देण्याचें धाडस करून आपल्या गुन्ह्याला मऊ बनवूं पाहतात; पण चाणाक्ष, धोरणी, ज्ञानी, अनुभवी, कायदेबाज, व्यवहारज्ञ न्यायदेवता

अशा लबाडयांना चकत नसतें हें यांच्यासारख्या बदमाषांना काय ठाऊक !"

या भाषणांत बरेच अपशब्द आलेले पाहून दमन पुरोहित राजास ह्मणाले, " अवश्य तो पुरावा प्राप्त झाला आहे असें वाटत असल्यास सरकारांनीं काय तो निकाल द्यावा. हा खटला नाजुक आहे. अशा खटल्याचा कीस काढीत बसणें बरें नव्हे. यांत थोरमाणसांची नाचक्की होण्याचा विशेष संभव असतो. तेव्हां वादी प्रतिवादींना गप्प बसण्यास सांगून सरकारांनीं आतां निकाल सांगावा हें बरें असें आह्मांस वाटतें. "

पुरोहितांची खाजगत सूचना राजाला पसंत झाली. राजानें सर्वांस शांत बसण्यास सांगून तोही त्या खटल्यांतील मुद्याचा व पुराव्याचा विचार करूं लागला. तो चतुर, ग्राहकशक्तियुक्त सूज्ञ व बुद्धिमान् असल्यानें त्यानें थोडक्याच वेळांत नित्यंकास अपराधी ठरविलें; पण त्यास मोहसंघाच्या ताब्यांत न देतां त्याला जन्मभर तुरुंगांत ठेवून त्यानें अनंत तऱ्हेचे कष्ट सोसावे व यातना भोगाव्या असा निकाल लिहिला. सुमंतानें तो निकाल भरकचेरींत वाचून दाखविला. सर्व सभासद तटस्थ राहून नित्यंकाच्या तोंडाकडे पाहूं लागले. कांहींजण राजाची वाहवा करूं लागले.

हा निकाल ऐकून नित्यंकाला पराकाष्ठेचा खेद झाला. त्याला आपल्या दैवाच्या कठोरतेबद्दल अत्यंत विषाद वाटला. त्याला गोसावीबोवा आठवूं लागला. त्याच्या डोळ्यापुढें धर्मध्वजाची मूर्ति स्पष्टपणें दिसूं लागली. त्याची सर्वत्र निराशा झाली. पण त्या निराशेनें त्याला जमीनदोस्त केलें काय ! तशा निराधार स्थितींत तो अश्रुपात करून भूमातेला भिजवूं लागला काय ! नाहीं ! नाहीं ! त्याच्या शुद्धसत्व आचारसंपन्नतेनें त्याच्या अंगांत धैर्य उत्पन्न केलें आणि जी गोष्ट फोडण्यास तो आजपर्यंत फारच जपून व सावध होता ती फोडून आपलें रक्षण करण्याचा त्यानें निर्धार केला. निकाल ऐकतांच सर्व मंडळी तटस्थ झालेली पाहून आणि राजाज्ञेस अनुसरून शिपाई लोक लोहशृंखला घेऊन आपल्या अगदीं सन्निध आले आहेत हें जाणून तो त्या शिपायांस दरडावून ह्मणाला, " हं खबरदार ! या देहास स्पर्श करण्याची तुमची किंमत नाहीं. या उपर पुढें सरण्याचें धाडस करून तुह्मी जर हा शुद्ध, पवित्र देह विटाळाल तर तो सिंधुपती राजा वसुप्रसाद याच्या स्नुषेचा अपमान होईल ! या देहानें कांहींएक गुन्हा केलेला नाहीं, एवढेंच नव्हे तर या देहावर ज्या घाणेरडया गुन्ह्याचा अपराध शाबीत

करण्यांत आला आहे तसा गुन्हा या देहाच्या हातून घडण्यास देवानें याची रचनाच तशा प्रकारची केलेली नाहीं. हें भाषण तुह्मी सत्य माना. महापराक्रमी व पवित्र असा राजावसुप्रसाद आणि पतिसेवादक्ष महानसाध्वी राणी इंदुमती या भाग्यवान जोडप्याच्या पोटीं जन्म पावलेल्या भारतीच्या प्रसादपुत्राची भार्या दीक्षादेवीच हे शब्द बोलत आहे हें सत्य समजून तुह्मी आला तसें चालते व्हा ! ! ”

असें भाषण करून दीक्षादेवी ( नित्यंक ) थांबली आणि विनयशीलतेनें राजा व दमनपुरोहित यांच्याकडे ओझरत्या दृष्टीनें पाहूं लागली.

दीक्षेचें हें भाषण ऐकून सर्वांच्याच अंतःकरणाची मोठी धांदल उडाली. जो तो तिच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागला. त्या गोष्टीच्या संभवासंभवाबद्दलच्या कल्पनांनीं सर्वांची मनें व्याप्त झालीं. दमनपुरोहित व वसुप्रसाद यांनीं लागलीच त्या आरोपीचा हात धरून त्यास राजमहालांतील आंतल्या दिवाणखान्यांत नेलें. इतक्यांत राजाकडून इंदुमतीला ती बातमी कळून ती तेथें आली. दीक्षादेवीनें विनयानें खालीं वांकून सासूसासऱ्यास व पुरोहितास नमस्कार केला. इंदुमतीनें तिला लागलीच आपल्या मंदिरांत नेलें. तेथें आणखीही कित्येक बायका हां हां ह्मणतां जमल्या. त्या सर्वांनीं कौतुकानें दीक्षादेवीचें मुख न्याहाळून पाहत पाहत तिला स्त्रीच्या सुंदर पोषाखानें सजविलें व त्याच प्रकारचे तिच्या अंगावर अलंकारही घातले. या सर्व राजोपचारामुळें ती मूळची राजकुलोत्पन्न दीक्षादेवी देवांगनेप्रमाणें झळकूं लागली. सुनेचें वैभव झळकूं लागतांच सर्वजण राजा व राणी यांच्या दैवाची वाहवा करून तशा लावण्यगुणसंपन्न स्त्रीच्या प्राप्तीबद्दल सर्वांच्या तोंडून धर्मध्वजाला धन्यवाद मिळूं लागले.

इकडे कचेरींतील सर्व मंडळी राजा व पुरोहित यांच्या आगमनाकडे डोळे लावून बसली. थोडक्याच वेळांत पुरोहितांनीं तेथें येऊन दरबारी मंडळीस तो सर्व प्रकार अक्षरशः सत्य असल्याची आनंददायक हकीगत सांगितली. ती ऐकतांच सर्व मंडळींच्या चेहऱ्यावर आनंद व उत्सुकता यांचें गंभीर तेज झळकूं लागलें. पण तेवढ्या अवधींत मोहसेन आपल्या पत्नी शांभवीसह तेथून पाय काढून एकदम आपल्या वाड्याकडे निघून गेला. बाकीच्या मंडळींनीं पुरोहितास विनंति करून राजस्नुषा प्रत्यक्ष पाहण्याची इच्छा दर्शविली. पुरोहितांनीं राजाला ती गोष्ट सांगितल्यावर दीक्षादेवीसह राजा व राणी हे

कचेरींत प्राप्त झाले. दीक्षेनें सलज्जतेनें खालीं लवून सर्व कचेरीला नमस्कार केला. तिचें तें अभिनव सौंदर्य, व आविर्भाव पाहून प्रत्येकाचे डोळे तृप्त झाले. नंतर राजानें लागलीच गांवामध्यें पेढे बर्फी वाटण्याचा हुकुम सोडला. आंधळे पांगळे वगैरे व्यंग लोकांना वस्त्रें दान करण्यांत आलीं. नंतर राजवराण्यांतील स्त्रीपुरुष यांना दीक्षेच्या हकीकतीची जिज्ञासा उत्पन्न झाली. राजा व राणी यांच्या अनुज्ञेस अनुसरून दीक्षेनें आपली प्रथमपासून आतां-पर्यंतची शक्य ती हकीगत निवेदन करण्याविषयीं तत्परता दाखविली. या आनंदाच्या गडबडींत मोहसंघ व शांभवी या विचित्र जोडप्याचा विचारच कोणी मनांत आणला नाहीं.

---

## प्रकरण ४६ वें.

### पुत्रशोध.



दीक्षादेवींची बहुतेक हकीगत तिच्या तोंडून ऐकल्यामुळें सर्वत्रांना गोसावीबोवा ह्मणजे भद्रपती होय हें कळून चुकलें. भद्रपतीचा पुतण्या नित्यंक हा हयात असल्या-संबंधानें भद्रपतीस भ्रम किंवा प्रेमातिरेक होऊन तो दीक्षादेवीलाच नित्यंक ह्मणूं लागला आणि वीरबाहूच्या भीतीस्तव गृहत्याग करून तो दीक्षादेवीला पुरुषवेष देऊन बाहेर पडला वगैरे गोष्टीही दीक्षेच्या हकीगतीनें स्पष्ट झाल्या. कांहीं दिवस त्यांच वाटावाटींत व आनंदांत गेले. पण त्या आनंदांत त्यांना खरा अर्थ वाटला नाहीं. त्यांचे सर्व मजेचे प्रकार वरकरणी होते. राजा, राणी, पुरोहित यांना राजपुत्राच्या गैरहजीरीमुळें तो सर्व आनंदाचा प्रकार नीरसच वाटत होता. दीक्षादेवी आपल्याला होणाऱ्या सर्व उपचारास केवळ बाह्यतः मान देत होती पण अंतरंगामध्यें ती अत्यंत कष्टी होती. बरोबरच आहे. ती आर्यांगना होती. ती सनातन धर्मांतील साध्वी होती. भारतीय पतिव्रतांचें तेज तिच्या अंगांत खेळत होतें. सत्वगुणानें तिचें हृदय निर्मळ झालेलें होतें. सद्धर्म, सदाचार, उच्च नीति यांचीं तत्वें तिला ठाऊक झालेलीं होतीं. पत्नी व पति

यांचा संबंध म्हणजे स्त्रीपुरुषांच्या परस्पर अवश्यकतेकरतां व सृष्टिपोषाकरतां होणारा कायदेशीर योग होय अशी तिची कल्पना नव्हती. समभावना, समाधिकार, समसमान हक्क यांच्या कमी जास्तीपणा बरोबर पतिपत्नी संबंधाचा लय होण्यास हरकत नाहीं असें म्हणण्यापुरतें तिचें ज्ञान नव्हतें. पत्नीच्या मानानें पतीला जास्त हक्क कां असावेत, पतीलाच पत्नीपेक्षां वरचढपणा काय ह्मणून मिळावा, पत्नीनें पतीची सेवा कशासाठीं करावी, पत्नीनेंच पतीला देव कां मानावें, पत्नीनें आपलें सर्वस्व पतीचरणीं वाहून त्याच्या सुखदु:खाचे विभागी काय कारणानें व्हावें, पत्नीनें आमरणांत एकपतिनिष्ठ राहून पतिसेवेनेंच देव किंवा मोक्ष जोडण्याची भावना कां ठेवावी वगैरे गोष्टींचीं कारणें शुष्क, फोल व दंडेलीची आहेत असें ठरवून, प्राचीन शास्त्रकारास दूषणें देऊन, लोककल्याणकारी साधुसंतांच्या कपाळीं मूर्खत्वाचा शिक्का मारून स्वत:ची मनसोक्त सौख्यस्थिति साधण्याकरतां आपल्या ज्ञानाचा, शिक्षणाचा, चातुर्याचा, बुद्धीचा, विचारांचा उपयोग करण्यांत धन्यता मानण्याला तिचें शिक्षण, तिचें ज्ञान, तिचा सहवास लेचापेचा, पोटार्थी व ढिला नव्हता. खेरीज सटवाईच्या भोप्याच्या घरीं विश्ववंद्य श्रीभारतीच्या तोंडून तिनें आर्यपातिव्रत्य धर्माचें महत्व ऐकलें होतें. भारतीसारख्या नरश्रेष्ठाच्या तोंडचीं उपदेशाक्षरें निष्फळ होणें शक्य नसल्यानें दीक्षादेवीच्या जन्मसिद्ध शुद्धतेंत पराकाष्ठेची बळकटी उत्पन्न होऊन ती आर्यांगना सात्विक व विशुद्ध सद्गुणांच्या रसानें ओतलेली मूर्तीच बनून राहिली होती. अशा भाग्यवान कुलीन कन्यकेला आपल्या पतिसान्निध्यावांचून कोणतेंही सुखोपभोग, कोणतेही आनंदोपचार विषतुल्य वाटावे यांत नवल काय ?

दीक्षादेवीची ती स्थिति राजा, राजकांता, राजपुरोहित यांच्या ध्यानांत आली. दीक्षेच्या प्रगट होण्यानें राजाच्या मनावर आणखी कित्येक दुसरे परिणाम झाले. शिष्य नित्यंकाचीच दीक्षादेवी बनली तेव्हां आतां राजकन्येच्या पतीची वाट काय करावयाची हा मोठाच प्रश्न त्याच्यापुढें येऊन पडला. प्रमिला अद्याप सांपडली नव्हती हा प्रश्न निराळा; पण ती केव्हांतरी सांपडण्याची आशा होती. मग प्रमिलेला नित्यंकपति कसा मिळावयाचा ही एक चिंता; दीक्षेकडून जें शांभवी व मोहसंघाचें कथानक समजलें त्यामुळें राजाचें मन विषाद व उद्वेग यांनीं व्यापलें ही दुसरी गोष्ट; गोसावी बोवा

व भोगपाल यांची कांहींच हवाल समजेना; ही तिसरी काळजी; राजपुत्र धर्मध्वजाचा कांहींच पत्ता लागेना ही त्याची चवथी काळजी; अशा स्थितींत राजा ळतमळत होता. तशांत आतां स्नुषेच्या खेदनीय स्थितिमुळें त्याचें चित विशेष व्याकूळ होऊं लागलें. त्याला अन्नपाणी गोड लागेना. तो रात्रीच्या रात्री जागून काढूं लागला. अखेर त्यानें स्वतःच धर्मध्वजाच्या शोधास बाहेर पडण्याचा निश्चय केला. दीक्षादेवीस हें वर्तमान कळतांच तिनेंही राजाबरोबर पतीच्या शोधार्थ जाण्याची इच्छा दर्शविली. तिचा दृढ निर्धार कळतांच राजानें तिला बरोबर नेण्याचा संकल्प केला. त्यानें लागलीच दमनपुरोहितास बोलावून आणून सांगितलें, "मी स्वतः पुत्राच्या शोधास जातों. स्नुषा दीक्षादेवी हिच्या कृतनिश्चयास अनुसरून मी तिलाही बरोबर घेऊन जात आहे. माझी प्रिय कांता आतां तुह्मी सांभाळावी. प्रधान, सुमंत, मंत्री, सेनापती यांच्या सल्ल्यानें राज्यरक्षण करावें. मोहसंब व शांभवी यांच्या कुकर्माबद्दल आतां त्यांना पश्चात्ताप होईल. तेव्हां तूर्त त्यांना शब्दानें किंवा कृतीनें दुखविणें इष्ट नव्हे. कांहीं दिवसांच्या अवधीनें त्याची वृत्ति कशी काय पालटते तें पाहून मी परत आल्यावर त्याचा कायतो विचार करूं. तोंपर्यंत तुह्मी सर्वजण मोठ्या बंदोबस्तानें व सावधगिरीनें रहावें."

हा विचार राणीला कळला तेव्हां ती राजाला सोडून राजवाड्यांत राहण्यास कबूल होईना. तिनेंही पतिसमवेत जाण्याचा अत्याग्रह धरिला. अखेर राजानें तिला हरप्रकारें समजावून अमुक एक मुदतींत परत येण्याचें आश्वासन देऊन कशी तरी तिची समजूत घालून तिला राहती केली. आणि देव व पुरोहित यांना वंदन करून श्री भारतीचें स्मरण करीत करीत तो वसुप्रसाद आपल्या स्नुषेसह अवश्य ती सामुग्री व दासदासी घेऊन राजधानीच्या बाहेर पडला ! !

---

# प्रकरण ४७ वें.

## सद्बोध.



पाटील बोवांच्या विनंतीस मान देऊन गुरुभारती आपल्या दोन्ही शिष्यांसह पाटलाच्या शेतांतील घरीं गेला. पाटलानें अत्यादरपूर्वक त्यांचा बहुमान करून त्यांना मोठमोठ्या तीन मेजवान्या दिल्या. नंतर भारतीनें राजपुत्र व नित्यंक यांना सांगितलें, "मला कांहीं कार्यासाठीं दुसरीकडे जाणें अवश्य आहे. वसुप्रसादाचा पुरोहित दमन हा जसा माझा शिष्य आहे त्याच प्रमाणें माझा एक दुसरा शिष्य आहे. तो बराच वृद्ध आहे. त्याची माझी भेट होऊन बराच काळ लोटला. मध्यंतरीं तो मला भेटला होता पण त्यावेळीं मला त्यानें ओळखलें नाहीं. मीही त्याला ओळख दिली नाहीं. तो शिष्य कोण हे आतां कदाचित् तुमच्या ध्यानांत आलें असेल. तो शिष्य म्हणजे सिंधावती राजधानींत जाऊन राहिलेला शिष्य नित्यंकाचा गुरु गोसावी हा होय! हल्लीं तो मोठ्या संकटांत आहे असें मला नुकतेंच समजलें आहे. सांप्रत तो राजधानींत नाहीं. त्याचा शिष्य राजधानींतच आहे. तरी मी गोसाव्याच्या भेटीस जाऊन त्याला घेऊन राजधानीस येतों. तुम्ही एक दोन दिवसांत राजधानीकडे मोर्चा फिरवा. मी लौकरच तेथें आल्यावर शिष्य नित्यंक व प्रमिला यांच्या शाब्दिक लग्ननिश्चयाचा विचार पाहूं. आणि मग दीक्षादेवींचाही शोध काढूं."

असें सांगून भारती गोसाव्याकडे जाण्यास निघाले. त्यांचा उपदेश खरा होता. पण राजपुत्रास तो पसंत पडला नाहीं. त्याचें चित्त निराळ्याच गोष्टीकडे व्यापलें होतें. राजधानींत जाऊन राजोपचार भोगावे, आपल्या पत्नीचा तपास करून तिच्या समवेत आनंदानें कालक्रमणा करावी, आपल्या वृद्ध पित्याचा राज्यकारभार आपल्या शिरावर घेऊन आपला लौकिक पसरावा वगैरे गोष्टींत त्याला गंमत वाटेना! त्याचें चित्त व्यग्र झालें. श्रीभारतींच्या सामर्थ्याच्या विचारांतच तो गढून गेला. भारतीसारख्या शक्तिहीन, वृद्ध, कंगाल माणसांच्या अंगांत जें

सामर्थ्य वास्तव्य करतें तें सामर्थ्य वसुप्रसादाच्या तरवारींत नाहीं किंवा प्रधान, सुमंत यांच्या मेंदूतही नाहीं ही कल्पना धर्मध्वजाच्या हृदयांत दृढ होऊन बसली. आपण राजपुत्र आहों, वसुप्रसादासारख्याचे आपण सुत आहों, आपल्याला अक्कल आहे, आपण हुषार व गुणसंपन्न आहों, आपण विद्याभ्यास केला असून क्षत्रियाच्या कर्मांतही निष्णात आहों; आपण श्रीसंपन्न आहों, दासदासी आपल्या आज्ञा पाळण्यास तयार आहेत, आपल्या शब्दाबरोबर अनेक सेवकजन झुलणारे आहेत; गणक, ज्योतिषी, मंत्री, वैदिक, याज्ञिक, शास्त्रज्ञ, वैद्य, सरदार, उमराव, प्रधान, सेनापती अशा प्रकारचे अनेक गुणज्ञ, कलासंपन्न पंडितजन व शूर लोक आपल्या पदरीं आहेत; तरीपण या ज्ञात्या भारतीनें जर आपल्याला रस्ता चुकविण्याचें निमित्त दाखवून प्रमिलागृहापासून बहुत दूर नेलें नसतें तर वरील कोणत्याही गोष्टीनें आपलें प्राण वाचविलें नसते ! या व अशाच प्रकारच्या अनेकविध कल्पनातरंगांत तो राजपुत्र गटंगळ्या खात राहिला. त्यामुळें त्याचा जीव कासावीस होऊन गेला. पाटलाच्या घरीं जावयास निघण्यापूर्वींच त्याच्या चित्तांत या अशा प्रकारच्या विचारांनीं खळबळ उडवून दिली होती. श्रीभारती त्यांना राजधानींत जाण्याची आज्ञा करून जेव्हां आपल्या स्वतःच्या कामासाठीं अज्ञात अशा प्रदेशांत जावयास निघाले तेव्हां धर्मध्वज त्यांच्यापुढें हात जोडून ह्मणाला, " आपल्या आज्ञेप्रमाणें आह्मी राजधानीस जावयास पाहिजे पण मला तसें वाटत नाहीं. या बाकीच्या मंडळींनीं राजधानीस जावें. मी आपल्याच संगती येतों किंवा याच ठिकाणीं किंवा दुसऱ्या एखाद्या अन्य एकांतस्थानीं हरिचिंतन करीत बसतों. राजधानींत जाऊन काय करावयाचें तें मला समजत नाहीं. "

राजपुत्राच्या शब्दांवरून त्याची वृत्ति ओळखून भारतींनीं आपला जाण्याचा बेत थोडा लांबणीवर टाकला आणि ते त्यास ह्मणाले, " असें कसें ह्मणतोस ! तुला राजधानींत जाऊन राहिलेंच पाहिजे. तूं राजपुत्र आहेस ! राजवाड्यांतील विलासावांचून तुला चैन पडणार नाहीं. रानोवनीं हिंडून, कंदमुळें खाऊन, वारा, ऊन, पाऊस यांची पीडा सोसून दिवस काढणें तुझ्यानें होणार नाहीं. तुला राजवाड्यांतच सुख लागेल. "

**राजपुत्रः**— खऱ्या सौख्याचा निर्णय अद्याप आपण केलेलाच नाहीं. कमी दुःख ह्मणजेच सौख्य होय असें आपण आतापर्यंत स्थापिलें आहे.

त्यास अनुसरून राजवाड्यांत मला दुःख कमी होईल असें मानतां येईल पण वस्तुतः तसें खरें नव्हे. राजधानीचा त्याग करण्यापूर्वी मी राजवाड्यांत होतों हें केव्हांही खरेंच आहे. मग राजवाड्यांतील स्थिति जर सौख्यप्रद असती तर मला त्याचा त्याग करून दूरदेशांत कां भटकावें लागलें असतें ?

**भारती**:— हें तुझें ह्मणणें खरें आहे. पण तुला अशी उदासवृत्ति धरून उपयोगाची नाहीं. तुझा बाप वसुप्रसाद थकला आहे. राज्यकारभार स्वीकारून तुला पित्याचा भार हलका केला पाहिजे. वृद्ध मातापित्यांना सुख होईल अशा तऱ्हेचें वर्तन ठेवणें हा तुझा पुत्रधर्म आहे.

**राज०**:—पुत्रधर्मास अनुसरून वागण्यास मी एका पायावर तयार आहें. मी राजधानींत जाऊन मातापित्यासह देशांतरीं जाऊन अरण्यवास करतों, तेथें मी त्यांची एकनिष्ठपणें चाकरी करीन. त्याकरतां राजधानींत राहण्याची कांहीं अवश्यकता वाटत नाहीं. राज्यसूत्रें हातांत घेऊन मी कारभार करूं लागलों ह्मणजे मला सुख होईल असें वाटत नाहीं. कारण माझा बाप हा राजपद भोगीत असूनही तो सुखी आहे असें मी तर नाहींच पण स्वतः तो देखील ह्मणणार नाहीं. त्याच्यामागें कोण व्याप आहेत पहा !

**भारती**:— मनुष्याला केव्हांही व्याप हा करावा लागणारच ! अरण्यवासांतही व्याप हा आहेच ! येथें आहारतृप्तीसाठीं धान्यादि पदार्थ मिळविणें आणि वनांमध्यें राहून कंदमुळें प्राप्त करून घेणें या दोहोंत व्याप आहेच! अरण्यांत राहिल्यानें जर सुखप्राप्ति होण्याची खात्री असती तर सुखलोलुप मनुष्य जातीनें अरण्यवास खुषीनें पतकरला असता ! अरण्यांतही मनुष्याचीं इंद्रियें त्याला चैन पडूं देणार नाहींत. तरटावर निजा, गादीवर लोळा, वाळक्या काटक्यावर देह पसरा मनुष्याला निद्रेची अवश्यकताही आहेच. अशीच सर्व इंद्रियांची तऱ्हा आहे. मनुष्याला कोणत्याही गोष्टीची उणीव भासली कीं त्यांत दुःख हें आलेंच. मग अरण्यांत राहिलें असतां तुला उणीव अशी मुळींच भासणार नाहीं असें खात्रीनें सांगतां येईल काय ?"

**राज०**:—मला आधीं हें आपलें ह्मणणेंच नीटसें समजत नाहीं. उणीवीमुळें पीडा होते असें ह्मणावें तर मला सध्यां अन्नवस्त्राची काय वाण आहे ? असें असतांना मी दुःखी आहें हें कसें ? यावरून मला असें वाटत आहे कीं, मनुष्य उलाढाली करीत असला ह्मणजे तो नसत्या गोष्टी व व्यवहार उत्पन्न करतो किंवा त्याला तसे भानगडीचे व्यवहार करावे लागतात; आणि त्यामुळेंच

त्याला दुःख होतें. सर्व उलाढालींचा त्याग करून एकांताचा स्वीकार केला म्हणजे कांहीं व्यापच उरला नाहीं. मग उणीव कोठली आणि दुःख कोठलें?

**भारती:**—म्हणजे तूं उणीव हेंच दुःखाचें मूळ कबूल करतोस ! मग अरण्यांत तुला कांहीं जरूर भासावयाची नाहीं असें कसें म्हणतां येईल? अरण्यांत जाऊन उणीव किंवा जरूरी यांस वैचित्र्य उत्पन्न होईल पण उणीवींचा अभाव होणार नाहीं. खेरीज मनुष्याचीं इंद्रियें हीं विषयप्रिय आहेत. त्यांचा स्वभावधर्म आपापल्या विषयांकडे ओढ घेण्याचा आहे. तुला या वेळीं क्षणिक उद्वेगामुळें एकांतवास पसंत वाटत आहे; पण इंद्रियांनीं स्वभावधर्मानुसार उचल खाल्ली म्हणजे तुला अरण्यवासाचाही कंटाळा येईल ! मग तशा स्थितींत तरी तुला सुख कसें लागणार? तूं अद्याप तरुण आहेस. इंद्रियांचा उपशम झाल्यावांचून तुला सौख्य लाभणार नाहीं. वैराग्य हा विषय बोलावयास सोपा आहे. पण वैराग्य स्वीकारून पश्चात्ताप होण्याचा प्रसंग आलेल्यांचीं उदाहरणें अनेक आहेत ! उणीवी भागण्यांतच सौख्य आहे असें तुला तूर्त तरी धरून चाललें पाहिजे !

**राज०:**— उणीव ह्मणजे दुःख आणि उणीव भागणें ह्मणजे सौख्य असें ह्मणतां येणार नाहीं. यावांचून सौख्य या शब्दाला स्वतंत्र अस्तित्व असलें पाहिजे असें मला वाटतें ! मूल्यवान् धोतरजोडा प्राप्त झाला नाहीं ह्मणून ज्यानें कधींही दुःख दर्शविलें नाहीं किंवा तशी इच्छा प्रगट केली नाहीं त्याला देखील तशा मूल्यवान वस्त्रप्राप्तीनें सौख्य होतें. मग यांत त्याच्या सौख्यास उणीवींची प्राप्ति हें कारण कोठें झालें?

**भारती:**— तेंच त्याच्या सौख्याचें खरें कारण होय ! नाहीं असें कसें ह्मणतां येईल. त्यानें जरी तशी इच्छा प्रगट करून दाखविली नाहीं तरी त्याच्या सौख्यभावनेस त्याची इंद्रियतृप्ति हीच कारणीभूत होय ! कारण इंद्रियांच्या उत्पत्तीबरोबरच इंद्रियांच्या उणीवा कायमच्या स्थापित झालेल्या आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध यांच्या प्राप्तीनेंच श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा, घ्राण यांची तृप्ति व्हावयाची हा अनादि सिद्धांत आहे. तो कोणत्याही प्रकारच्या शब्दपांडित्यानें खोडला जाणें शक्य नाहीं.

**राज०:**—असें आहे तर मग मनुष्याचें सुख सर्वस्वी त्याच्याच हातांत आहे. त्यानें आपापल्या उणीवा व इंद्रियांच्या स्वाभाविक इच्छा पूर्ण करण्याची साधनें तयार करावीं म्हणजे झालें !

**भारती:**—पण अशानेंही सौख्य साधणार नाहीं. कारण अशीं किती साधनें निर्माण करणार ? व अशा किती प्रकारच्या प्रयत्नांत खात्रीनें यशच येणार ? शिवाय तुपानें अग्नि शमत नाहीं त्याचप्राणें विषय-विलासानें इंद्रियेंही तृप्त होणार नाहींत. मग अशानें सौख्यप्राप्ति संभवनीय आहे काय ?

**राज०**—आपलें हें ह्मणणें चमत्कारिक आहे. आपल्या प्रतिपादनांत एक निश्चय असा दिसत नाहीं. आधिभौतिक शास्त्रज्ञानानें आपल्या जरूरी व इच्छा पूर्ण कराव्या तर तें आपणास मान्य नाहीं. सर्व व्यवहार टाकून वैराग्य घ्यावें तर तेंही निभावणीचें नव्हे असें आपण ह्मणतां ! ह्मणजे मग मनुष्यानें सौख्यप्राप्ति साधावी तरी कशी ? कां सौख्य ही भ्रमित कल्पना डोळ्यापुढें ठेवून मनुष्यानें सतत लालुचीनें परिश्रम करावे आणि सौख्याच्या आशेंत राहूनच प्राण सोडावा ?

**भारती:**—असेंही नाहीं आणि तसेंही नाहीं. सौख्याच्या अनेक स्थिति आहेत. पण अशा प्रकारच्या सर्व स्थिति टाकाऊ होत. खरें सौख्य समाधानांत आहे. समाधानवृत्ति ठेवतां ठेवतां इंद्रियें विषयपराङ्मुख झालीं पाहिजेत. ह्मणजेच खरी तृप्ति होय. नुसती उणीव भागविणें ह्मणजे तृप्ति नव्हे ! उणीव भासमान न होतांही जरी ठराविक विषय ठराविक इंद्रियास आनंददायी होईल तरी ती खरी वासनातृप्ति नव्हे. वासना नष्ट झाली पाहिजे ह्मणजे उणीव भासो किंवा न भासो; कोणत्याही विषयाच्या आशेनें दुःख वाटत नाहीं असें होऊन खेरीज कोणत्याही विषयाच्या प्राप्तीनें सौख्यही वाटत नाहीं असें होणें अत्यंत अगत्याचें आहे. विषयाची प्राप्ति किंवा अप्राप्ति या दोन्हीमुळें ज्याच्या मनाला सुखदुःखाचा स्पर्शही होत नाहीं तो नित्य तृप्त होय. याच स्थितीला समाधान असें नांव शोभेल आणि असल्याच समाधानांत सौख्याचा मुख्य ठेवा आहे. मग या समाधानाला अरण्य किंवा एकांत सेवनाची जरूर काय ? प्रपंचव्यवहारांत मनाची किंवा वृत्तीची केवळ कसोटी लागणारी असते !

**राजपुत्र**— आपलें हें ह्मणणें कबूल केलें ह्मणजे सुख, सोय, विलास, आराम, आनंद यांचें निरनिराळे प्रकार शोधून काढणें व यांच्या प्राप्तीच्या साधनांची परमावधी करणें या गोष्टी खऱ्या सुखाचा, शांतीचा, स्वस्थतेचा लाभ करून देणार नाहींत असें ठरतें ! मग तसे प्रयत्न करणें ह्मणजे

मूर्खपणाच काय ? असें ह्मणावें तर तशा साधनसंभार प्राप्तीचे लोक जास्त आनंदी व सुखी भासतात हें कसें ?

**भारती:—** ते तसे भासतात हें खरें आहे पण ते भासतात तसे असतात असा मात्र अनुभव येणार नाहीं. सौख्यवर्धक शोध लावणें व सौख्यसंवर्धक साधनांची प्राप्ति करून घेण्याकरतां झटणें, राबणें, यत्न करणें हा मुर्खपणा कीं शहाणपणा याचा विचार करण्याचें कारण नाहीं. त्या गोष्टी खरें सौख्य किंवा शांति प्राप्त करून देणार नाहींत हें सत्य होय. तशा वैभवानें संपन्न असे जीव किंवा प्राणी आपणास अधिक सुखी मानतात त्यास इलाज नाहीं; पण त्यांना ती गोष्ट सिद्ध करून देतां यावयाची नाहीं आणि समाधान हेंच सौख्याचें स्थान हा सिद्धांतही त्यांना खोडतां यावयाचा नाहीं. क्षुद्र, मध्यम, उच्च असे तीन दरजाचे जीव आपण उदाहरणार्थ घेऊं ! माशीला लाडवाचा एक हरबऱ्या एवढा तुकडा तृप्त करतो, मांजराची भूक चार पांच लाडूंनीं भागते आणि मनुष्याला पंधरा वीस लाडू खाऊन तृप्ति होते. आतां त्या मांजरानें माशीपेक्षां मी जास्त खाल्लें ह्मणून अधिक सुखी किंवा मोठें समजणें त्याचप्रमाणें मनुष्यांनीं आपण सर्वांत अधिक खाल्लें म्हणून आपणास सर्वांत सुखी किंवा मोठें मानणें हा मूर्खपणा किंवा निदान असमंजसपणाच नव्हे तर काय ? कारण खाण्याचें प्रमाण कितीही असलें तरी तिघांच्या समाधानाचे सौख्य अगदीं समसमान होय ! त्यांत रतिमात्र अंतर नाहीं. स्वर्गलोकीं भ्रमरमंचकावर लोळणारा देवेंद्र आणि येथें फाटक्या रकट्यावर पडणारा धनगर यांना निद्रानंदाचें सौख्य सारखेंच असतें !

**राजपुत्र:—** मग हें सर्व समाधान मानण्यावरच अवलंबून राहिलें ह्मणावयाचें. असें समाधान मानून राहणें यांतच शहाणपणा आहे, हें खरें ! पण मनाची अशी भावना होणें हें जवळ जवळ दुरापास्तच होय ! हें समाधान प्राप्त होण्याचें अन्य कांहीं साधन असणें इष्ट आहे.

**भारती:-** तें तसें अत्यंत दुरापास्त आहे ह्मणूनच त्यानें युक्त अशीं माणसें अगदीं क्वचित् सांपडतात. अशी समाधानवृत्ति वैराग्यावांचून प्राप्त होणार नाहीं. पण तुला तूर्त तसें वैराग्य स्वीकारणें योग्य नव्हे. वैराग्य हें विवेकयुक्त असलें पाहिजे. तुझ्या ठिकाणची वैराग्यभावना तशी नाहीं. [illegible]मुळेंच तुला प्रापंचिक व्यापाराचा कंटाळा आला आहे तो

खरा नव्हे. तुझी कामना अद्याप तारुण्यावस्थेंत आहे. तिची पूर्तता व्हावयास पाहिजे. आपला वेदप्रणीत विहितधर्म तुझ्या कामना पूर्ण करील. धर्म हा कामना पूर्ण करण्यास समर्थ आहे; पण ती कामना अतिशुद्ध व सन्मान्य पाहिजे. धर्मसंमत आचारतत्परतेनें शुद्ध कामना पूर्ण होऊन मनुष्य ईश्वरध्यानमग्न होतो आणि त्यांतच त्याच्या ठिकाणीं विरक्तता जन्म पावून तो खऱ्या समाधानाच्या स्थितींत जाऊन नंतर अनंत सौख्य-कल्याण-गुण अशा अखंड पदाला पोंचतो. यासाठीं तूं प्रापंचिक कर्तव्य बजावण्यास भिऊं नको. वेदमान्य आचाराचा काठी हातांत असली ह्मणजे या प्रपंचाच्या खडतर मार्गांत अडखळून पडण्याचें भयच नको. तूं आपल्या क्षत्रियधर्माला जाग. धर्ममान्य आज्ञा शिरसावंद्य मानून तूं आपलीं क्षत्रियास उचित अशीं कर्में यथास्थित बजाव. धर्मसंगोपन हेंच मुख्य ध्येय मनांत दृढ बाळगून विहितकर्में करीत असतां उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखस्थितीला जुमानूं नको. विहितकर्मेंच सर्व श्रेष्ठ होत. प्राप्तकर्में अत्यंत गौण होत. तीं करण्याचा प्रसंग आला असतां तीं नीच असलीं तरी चालतील पण तीं निषिद्ध असल्यास त्यांपासून परावृत्तच हो. परिस्थितीला हार जाऊन धर्मसंमत कर्मांना बाध आणणें हा अत्यंत दुर्बलपणा होय. कसलीही परिस्थिति प्राप्त झाली आणि त्यायोगें कोणतीही खडतर, कष्टप्रद कर्में करावीं लागलीं तरी तीं विहितकर्माला पोषक आहेत अशी खात्री नसेल तर त्यांचा स्वीकार करूं नकोस. दुःख सोसाव लागतें त्याप्रमाणें सुखही सोसावेंच लागतें एतदर्थ दोहोंच्याही पीडेस आणि आनंदास जुमानूं नको. कोणत्याही प्रकारच्या मोहास भुलून स्वधर्मपराङ्मुख न होतां अखेरपर्यंत धर्माचें दास्य करीत राहिलास तर निर्वाणीला तो एक धर्मच तुझ्या उपयोगीं पडून तुझें इहपरत्र खरें कल्याण करील.

भारतीची ही अमृतवाणी श्रवणद्वारें प्राशन करीत असतां राजपुत्र आणि त्याच्याच बरोबर नित्यंक असे दोघेही अगदीं तन्मय होऊन डोलूं लागले. भारतीचें तोंड बंद रहातांच त्यांना आपल्या पुढील आनंदाचें ताट कोणीतरी उचलून नेल्यासारखें वाटलें. त्या भारदस्त व उच्चविचारमयवाक्सुधेचा वर्षाव पाहून ईश्वर्ता, पार्वती, पाटीलबोवा, प्रमिला या सर्वांनाही भारतीची खरी योग्यता समजून आली. राजपुत्र भारतीच्या पायांना वंदन करून त्यांच्या आज्ञेप्रमाणें राजधानीस जाण्यास कबूल झाला. आपला उपदेश राजपुत्राच्या मनांत

चोख बिंबला असें पाहून भारतीही आनंदानें भरून गेला. आणखी एक दिवस तेथें मुक्काम करून तो आपल्या कामाच्या सबबीनें पाटीलबोवांच्या गृहांतून निघून गेला. दुसऱ्या दिवशीं आपलाही मुक्काम हलवावयाचा असें राजपुत्र व नित्यंक यांचें ठरलेलेंच होतें.

---

## प्रकरण ४८ वें.

### पुनः निराशा व शोध.



नुष्यप्राणी विकारवश असल्या कारणानें ज्या विकारांचें प्राबल्य होईल त्याच्या तो आधीन होतो. विकारांच्या कासेला लागण्यांतच सुख आहे अशी त्याची समजूत असते. मनुष्याला जमीनदोस्त करून टाकणाऱ्या या विकारांच्या जोडीलाच मनुष्याच्या अंगीं विवेकाचें वास्तव्य झालेलेंच आहे. तो विवेक व विकार यांचें सामर्थ्य परस्परविरोधी आहे. पण या दोन वृत्तींची तऱ्हा मात्र अगदीं भिन्न भिन्न आहे. विषयमनन किंवा उपभोग्य पदार्थांचें दर्शन अगर श्रवण एवढ्यानें विकारांची जाग्रती होते. इतकेंच काय पण हे विकार स्वयंस्फूर्तीनेंही सदा जागृत होऊन राहिलेले असतात. या कारणानें मनुष्य त्यांच्या सपाट्यांत तेव्हांच सांपडतो! पण विवेकाची गोष्ट तशी नाहीं. तो आपण होऊन क्वचितच जागा होतो. एखाद्या महान् योग्याप्रमाणें तो समाधिसौख्यांत नेहमीं गर्क झाल्यासारखाच असतो. त्याला सज्जनांच्या अमृतमय उपदेशाच्या स्मृतीनें जागें करावें लागतें. तो ब्रह्मानंदास लालचावलेला असल्यानें सज्जनांच्या मुखांतील चिद्रससिंचनानें जागा झाला तरी पुन्हां पुन्हां डोळे झाकूं लागतो. पण सद्बोधाच्या मननानें किंवा सदुपदेशाच्या श्रवणानें त्याचा सारखा पाठपुरावा केला ह्मणजे मात्र तो चांगला जागा होतो. तो अतुल सामर्थ्यसंपन्न असल्याकारणानें जागृत झालेल्या मुचकुंदाप्रमाणें त्यानें जागृत होऊन पुरे डोळे उघडले ह्मणजे त्याच्या दिव्य तेजानें वृत्तींचा मूढपणा भस्मसात होतो

आणि उच्छृंखळ वृत्ती जर मधून मधून चवचालपणा करूं लागल्या तर त्यांच्यावर सतत प्रहार करून तो त्यांची डोकीं सडकून काढतो. अशा प्रकारचा हा विवेक ज्यांच्या ठिकाणीं ज्याप्रमाणानें जागा झालेला असेल त्याप्रमाणानेंच ते शहाणे व ज्ञानी होत. पण बहुतेक शहाणे व ज्ञानी ह्मणविणारे लोक ही मुख्य गोष्ट विसरून आपल्या स्वतःच्या विकारजन्य क्रियांतच आपल्या शहाणपणाची व ज्ञानाची परमावधी मानतात ही मोठ्या दुःखाची गोष्ट नव्हे काय ? कांहीं लोकांच्या ठिकाणीं सज्जनांच्या बोधवाक्यांनीं विवेकजागृती होते व कांहींच्या ठिकाणीं त्यांच्या स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या अनुभवानें विवेक जागा होतो. पण ज्यांचे जन्मच केवळ नरकापासून झालेले असतात, जे साक्षात् पातकाच्या समुद्रांतच कुस्नात होऊन आलेले असतात, त्रिभुवनांतील दुर्गुण एकत्र करून त्यांच्या रांध्यांतूनच ज्यांच्या देहाची घटना झालेली असते त्यांच्या ठिकाणीं विवेकजागृती होणें जवळ जवळ असंभवनीय असतें असें ह्मटलें तरी चालेल. ज्या वेळेस त्यांच्या अनुतापाचा कांहींच उपयोग होण्यासारखा नसतो अशा वेळीं त्यांचा विवेक जागा होऊं शकतो; पण तो त्यावेळेस फक्त त्यांना त्यांच्या पापमय दुराचारांच्या आठवणीनें त्यांच्या दुःखावर डागण्या देण्यासच उपयोगीं पडतो !

मोहसंवाची बायको शांभवी ही अत्यंत उपद्व्यापी बाई होती. ती अडाणी नव्हती, बावळी नव्हती, नेभळी नव्हती, अशिक्षित नव्हती. ती चांगली विद्वान् होती, तरतरीत होती, अवसानबाज होती, सुशिक्षित होती; पण तिच्या ठिकाणीं सुविचार नसल्यामुळें किंवा तिच्या मनावर धार्मिकशिक्षणजन्य सात्विक दाब नसल्या कारणानें ती नीच व दुराचारी बनली होती. आतां पावेतों तिनें अनेक कुटिल क्रिया केल्या; पण आपलीं सर्व कपटकर्में फसलीं आणि अखेर आपली सर्वच छी थू झाली हें पाहतांच तिला कृतकर्माचा पूर्ण पश्चात्ताप झाला ! आतां जगतांत तोंड दाखविण्यास आपल्याला जागा नाहीं असें जाणून ती अत्यंत खेदयुक्त झाली. आपण आपल्या नीच मनोवृत्तींच्या ताब्यांत जाऊन आपल्या प्रियपतीशींही अविश्वास करण्यास प्रवृत्त झालों, आपल्या अनर्थकारक व पापप्रवृत्त वर्तनानें आपण आपल्या पतीची अब्रू गमावल्यासारखीच केली याबद्दल तिचें चित्त बहुत उद्विग्न होऊन तिला तिचा जन्मही नकोसा झाला. राजमहालाच्या कचेरींतून

निघून जातांच तिनें आत्मघात करण्याचा निश्चय ठरविला आणि त्याच दिवशीं रात्रीं ती घरांतून चोरून एकटीच बाहेर पडली.

मोहसंवाची गोष्ट मात्र तशी नव्हती. तो स्वतःला आपल्या पत्नीपेक्षां जास्त शाहणा व हिंमतवान् ह्मणवी. आतांपर्यंतच्या अनुभवाचा विचार न करतां त्यानें आपल्या दुर्वर्तनांतच अधिक नेट धरण्याचा यत्न केला. ज्या दीक्षादेवीच्या निमित्तानें आपलें सर्व कपटव्यवहार उघडकीस आले; जिच्यामुळें आपल्या स्त्रीचें नांव बद्दू होऊन आपल्या तोंडास काळोखी आली त्या दीक्षादेवीचें तिळतुल्य तुकडे करून टाकणें हीच गोष्ट त्या शाहण्याला पुरुषार्थाची वाटली. ज्या वसुप्रसादाच्या आडकाठीनें आपल्याला आपलें भलतेंच इच्छित प्राप्त करून घेतां आलें नाहीं; ज्याच्या पुत्रप्राप्तीमुळें आपली अमर्याद महत्वाकांक्षा तृप्त झाली नाहीं त्या वसुप्रसादास आडवाटेंत गाठून कंठस्नान घालण्यांतच त्या ज्ञानसंपन्नाला शूरपणा वाटला आणि त्या संबंधानें सर्व तजवीज जमविण्याकरितां त्यानें जयसिंग व कामसेन यांची गांठ घेतली.

यासमयीं कामसेन चांगला बरा झाला होता. तरीपण त्याच्या शरीरावरील एक जखम अद्याप त्याला पीडा करीतच होती. सांपळयांत अडकलेला व्याघ्र सुद्धां जसा बकऱ्याला चावण्याकरतां तत्परच असतो त्याप्रमाणें तो स्वाभाविक दुराचारी व क्रूर कामसेन मोहसंवाच्या मसलतीस अनुकूल झाला. मोहसंवरूपी लांडगा दीक्षारूपी मेंढीस गट्ट करण्यास सरसावला त्याचप्रमाणें हा कामसेनरूपी बोका प्रमिलारूपी सारिकेवर झडप घालण्यास सज्ज होऊन राहिला. या दोन मनुष्यरूपी हिंस्र पशूंच्या कटांत सरदार जयसिंग सामील न होऊन कसें भागेल ! त्यांना भोगपालाची पत्नी माधवी इच्याशीं लग्न लावावयाचें होतें ! तिला त्यानें भोगपालाच्या मरणाची वार्ता कळविली होती व याला मोहसंवानेंही पुष्टि दिली होती तरी तिला ती गोष्ट विश्वसनीय वाटत नव्हती. तेव्हां प्रत्यक्ष भोगपालाचें प्रेतच तिच्यापुढें आणून टाकलें ह्मणजे ती आपला स्वीकार करील अशा समजुतीनें जयसिंग भोगपालास मारावयास टपलेला होता. तात्पर्य तो जयसिंगरूपी वाघ भोगपालाचा जीव घेऊन माधवीरूपी गाईचा ग्रास करण्यास उद्युक्त झाला होता. जयसिंगाची व वीरबाहूची मुलाखत होऊन त्याला एकंदर हकीकत विदित झाली होती. त्यांची व कामसेन, मोहसंव यांची भेट होऊन त्यांच्यामध्यें परस्पर

सर्वच गोष्टींचा खुलासा झाला होता. वीरबाहूच्या मनास शांतता देण्याकरतां नित्यंकाचा सूड उगविणें जरूर झालें होतें. खेरीज ज्या जंबालवंशाच्या मालकीच्या जालंधरदेशावर जयसिंग स्वतंत्र सत्ता गाजवीत होता. त्या देशाचा खरा हक्कदार ह्मणजे ईशपतीचा मुलगा नित्यंकच होय हें स्पष्ट कळल्या कारणानें जयसिंगाच्या दृष्टीनें नित्यंक ह्मणजे प्रमिलेचा पती याचा नाश करणें जरूर झालें होतें. तात्पर्य वसुप्रसाद, दीक्षादेवी, प्रमिला, भोगपाल, माधवी, नित्यंक वगैरे मंडळींचा निःपात करण्यास ते शनि, मंगळ, राहू असे तीन ग्रह एकवटले होते.

राजपुत्र धर्मध्वज आपल्या सुहृदांसह राजधानीस येऊन पोंचला. येतां येतां वाटेनें त्यांनीं नित्यंकाच्या मूळच्या घरीं मुक्काम केला. त्या ठिकाणीं प्रमिलेबरोबरची वृद्ध दासी व तो वृद्ध दास हे भेटले. या समयीं ते विशेष थकलेले होते. नित्यंकाच्या ह्मणजे सटवाईच्या भोप्याच्या आज्ञेप्रमाणें ते त्याच्या घरीं गेल्यापासून ते आतांपर्यंत तेथेंच होते. त्यांनीं आपली हवाल अशी सांगितली कीं, "आह्मी या घरीं येतांच आह्माला येथें एक ह्मातारा भेटला. त्याला आह्मी भोप्या व प्रमिला यांची हकीगत कळविली. चार दोन दिवसांनीं त्या ह्मातार्‍यानें एक मनुष्य चाकरीस ठेवला. त्याला त्यानें सटवाईच्या देवळांतील काम करावयास सांगितलें. आमची हकीगत अगदीं गुप्त राखण्याचीही ह्मातार्‍यानें त्याला सूचना दिली. तोच मनुष्य सध्यां भोप्याचें काम करतो आहे. आह्मी केव्हांही देवळांत जाऊं नये किंवा घराबाहेर पडूं नये असें ह्मातार्‍यानें आम्हांस बजावलें आणि तो नित्यंकाला आणण्यासाठीं म्हणून येथून निघून गेला तो अद्याप येतोच आहे. आह्मी त्याची वाट पाहून पाहून कंटाळलों आणि अखेर निराशेनें स्वस्थ बसलों. आम्हाला कांहींच वार्ता कळेना. अखेर थोडया दिवसापूर्वीं येथें एक जासूद आला. तो कांहींतरी म्हातार्‍याची वार्ता सांगेल असें आम्हाला वाटलें. पण तो म्हातार्‍याचाच शोध करूं लागला. म्हातारा येथें नाहीं असें पाहून तो परत निघाला. आम्हाला तो कांहींच सांगेना. शेवटीं अती आग्रह केला तेव्हां त्यानें आम्हांस नित्यंक सुखरूप असल्याचें वृत्त कळवून चालता झाला. पण आज तुह्मा सर्वांना पाहून आमचें सर्व क्लेश हरण झाले. पण तुमच्यामध्यें तो म्हातारा नाहीं याची फार खंत वाटते ! ! "

ही हकीगत ऐकतांच धर्मध्वज व नित्यंक यांना जासुदाची आठवण झाली.

त्यानें आपलें काम चोख बजावलें असें वाटून त्यांना त्याच्या इमानीपणाचें कौतुक वाटलें. केव्हां तरी त्याची आपली भेट होईल एवढया भरंवशावर ते त्या विषयीं त्यावेळीं जास्त कांहीं बोलले नाहींत.

राजपुत्र राजधानींत येतांच दमनपुरोहित, प्रधान, सुमंत, राणी इंदुमती यांना अत्यानंद झाला. राजकन्या प्रमिला सुरक्षित पाहून इंदुमतीच्या डोळ्यांचें पारणें फिटल्यासारखें झालें. आणखी राजकन्येला अनुरूप वर मिळून ती आपल्या पतीसमवेत आली आहे हें समजतांच इंदुमतीचा हर्ष गगनांत मावेना. तिनें आपला जामात नित्यंक व आपला व्याही व विहीण अनुक्रमें ईशपती व पार्वती यांना पाहून आदरयुक्त आनंद व्यक्त केला. राजपुत्र धर्मध्वजानें पुरोहित व इंदुमती यांना नमस्कार करून आपण सुरक्षित परत आल्याबद्दल त्यांचेंच यश वर्णन केलें.

हा सर्व प्रकार ठीकच झाला. पण राजा वसुप्रसाद हा दीक्षादेवीसह धर्मध्वजासच शोधावयास गेला आहे हें वर्तमान कळतांच राजपुत्र व नित्यंक अतिशय आश्चर्यचकित झाले. दमनपुरोहितांनीं त्याला त्याच्या पश्चात् घडलेली सर्व हकीगत निवेदन केली. शिष्य नित्यंक या नांवाचा मनुष्य खरा नसून दीक्षादेवीच त्या वेषानें राहिली होती हें कळतांच राजपुत्राला आपली कांता डोळ्यापुढें दिसूं लागली. पण त्याच समयीं त्याला गुरुभारतीची मूर्ति दृश्यमान झाल्याचा भास झाला. शिष्य नित्यंक आपण होऊनच प्रमिलेवरचा हक्क सोडील हें भारतीचें भाकीत किती सार्थ होतें याविषयीं राजपुत्र व नित्यंक यांची अक्कल गुंग झाली. भारती राजधानींत येऊन केव्हां दाखल होतो याविषयीं ते अगदीं उतावीळ झाले. आठ पंधरा दिवस तेथें मुक्काम करून त्यांनीं भारतीची वाट पाहिली. आतां तो बहुतेक येत नाहीं असें त्यांच्या मनानें घेतलें. तेवढ्या अवधींत राजपुत्रानें मोहसंवाची भेट घेण्याचाही यत्न केला. पण तो त्यावेळीं राजधानींत नसल्याबद्दलचें वृत्त समजलें. अखेर राजा वसुप्रसाद, दीक्षादेवी आणि श्रीभारती यांच्या शोधार्थ राजपुत्र व नित्यंक पुन्हां प्रवासास निघाले. प्रमिला व तिचीं सासु आणि सासरा हे राजवाड्यांतच राहिले.

---

# प्रकरण ४९ वें.

## वैराग्य भावना.



गोसावीबोवा आणि भोगपाल हे दोघेजण राजपुत्र धर्मध्वजाला वाचविण्याच्या हेतूनें प्रमिलागुहेकडे राजपुत्राच्या आधीं पोंचावें या मतलबानें आड वाटेनें भूताद्रीच्या रोखानें चालूं लागले. भोगपालाला पुष्कळ चोरवाटा व जवळची वळणें ठाऊक असल्यानें आपण तेथें इच्छित वेळीं पोहोंचूं असा त्याना भरंवसा होता. मजलदरमजल करीत करीत ते सरळ मार्गानें खुणेच्या जंगलाशीं येऊन पोंचले. पण पर्वत चढूं लागण्याचे वेळीं भोगपालाची दिशाभूल होऊन ते भलत्याच मार्गास लागले. ते बराच काळ रखडले तरी इच्छित गुहा किंवा तिच्या द्वारावरचा मारुती त्यांच्या नजरेस येईना. त्यांनीं सभोंवार नजर टाकली तों आपण कोठें आलों आहों हेंच त्यांना नीटसें समजेना. आपण दुर्दैवानें वाट चुकलों आहों याचें मात्र त्यांना ज्ञान झालें. आपली मुदत टळणार या काळजीनें ते तळमळूं लागलें पण उपयोग काय ! मुदतीचा दिवस टळेपर्यंत त्यांनीं निष्फळ आशेनेंच कसा तरी धीर धरला. पण अखेरचा दिवस संपतांच त्यांच्या मनाचा धर सुटला. मनुष्याला जें काम होण्याची अत्यंत हुरहुर असते त्या कामांतील अडथळे व हरकती तो कल्पनेनेंच दूर करतो आणि आपल्या कार्यसफलतेला अनुकूळ अशीच स्थिति निर्माण करण्याच्या नादांत असतो. गोसावी व भोगपाल यांच्या मनांत राजपुत्राला अपाय घडूं नये ही गोष्ट दृढपणानें वास्तव्य करीत होती. राजपुत्राच्या संरक्षणाकरतांच ते रात्रीचा दिवस करून प्रमिलागुहेकडे निघाले होते. पण अखेर दैवाच्या उलट्या फेऱ्यामुळें ते वाट चुकून जेव्हां निराश झाले आणि प्रमिलागुहेंत राजपुत्र धर्मध्वज मारेकऱ्यांच्या तरवारींना बळी पडला असावा अशी त्यांची कल्पना वाहूं लागली तेव्हां त्यांनीं ती कल्पना दूर होण्याकरतां असा तर्क बांधला कीं, आपण या रस्त्याचे चांगले माहीतगार असून ज्या अर्थीं वाट चुकलों त्या अर्थीं धर्मध्वजही खात्रीनें मार्ग चुकून गुहेपर्यंत ठर-लेल्या मुदतींत पोंचलाच नसावा. तो आडवळणानें न जातां सरळ रस्त्यानें

त्यानें आपलें काम चोख बजावलें असें वाटून त्यांना त्याच्या इमानीपणाचें कौतुक वाटलें. केव्हां तरी त्याची आपली भेट होईल एवढया भरंवशावर ते त्या विषयीं त्यावेळीं जास्त कांहीं बोलले नाहींत.

राजपुत्र राजधानींत येतांच दमनपुरोहित, प्रधान, सुमंत, राणी इंदुमती यांना अत्यानंद झाला. राजकन्या प्रमिला सुरक्षित पाहून इंदुमतीच्या डोळ्यांचें पारणें फिटल्यासारखें झालें. आणखी राजकन्येला अनुरूप वर मिळून ती आपल्या पतीसमवेत आली आहे हें समजतांच इंदुमतीचा हर्ष गगनांत मावेना. तिनें आपला जामात नित्यंक व आपला व्याही व विहीण अनुक्रमें ईशपती व पार्वती यांना पाहून आदरयुक्त आनंद व्यक्त केला. राजपुत्र धर्मध्वजानें पुरोहित व इंदुमती यांना नमस्कार करून आपण सुरक्षित परत आल्याबद्दल त्यांचेंच यश वर्णन केलें.

हा सर्व प्रकार ठीकच झाला. पण राजा वसुप्रसाद हा दीक्षादेवीसह धर्मध्वजासच शोधावयास गेला आहे हें वर्तमान कळतांच राजपुत्र व नित्यंक अतिशय आश्चर्यचकित झाले. दमनपुरोहितांनीं त्याला त्याच्या पश्चात घडलेली सर्व हकीगत निवेदन केली. शिष्य नित्यंक या नांवाचा मनुष्य खरा नसून दीक्षादेवीच त्या वेषानें राहिली होती हें कळतांच राजपुत्राला आपली कांता डोळ्यापुढें दिसूं लागली. पण त्याच समयीं त्याला गुरुभारतीची मूर्ति दृश्यमान झाल्याचा भास झाला. शिष्य नित्यंक आपण होऊनच प्रमिलेवरचा हक्क सोडील हें भारतीचें भाकीत किती सार्थ होतें याविषयीं राजपुत्र व नित्यंक यांची अक्कल गुंग झाली. भारती राजधानींत येऊन केव्हां दाखल होतो याविषयीं ते अगदीं उतावीळ झाले. आठ पंधरा दिवस तेथें मुक्काम करून त्यांनीं भारतीची वाट पाहिली. आतां तो बहुतेक येत नाहीं असें त्यांच्या मनानें घेतलें. तेवढ्या अवधींत राजपुत्रानें मोहसंत्राची भेट घेण्याचाही यत्न केला. पण तो त्यावेळीं राजधानींत नसल्याबद्दलचें वृत्त समजलें. अखेर राजा वसुप्रसाद, दीक्षादेवी आणि श्रीभारती यांच्या शोधार्थ राजपुत्र व नित्यंक पुन्हां प्रवासास निघाले. प्रमिला व तिचीं सासु आणि सासरा हे राजवाड्यांतच राहिले.

---

# प्रकरण ४९ वें.

## वैराग्य भावना.



गोसावीबोवा आणि भोगपाल हे दोघेजण राजपुत्र धर्मध्वजाला वाचविण्याच्या हेतूनें प्रमिलागुहेकडे राजपुत्राच्या आधीं पोंचावें या मतलबानें आड वाटेनें भूताद्रीच्या रोखानें चालूं लागले. भोगपालाला पुष्कळ चोरवाटा व जवळची वळणें ठाऊक असल्यानें आपण तेथें इच्छित वेळीं पोहोंचूं असा त्याना भरंवसा होता. मजलदरमजल करीत करीत ते सरळ मार्गानें खुणेच्या जंगलाशीं येऊन पोंचले. पण पर्वत चढूं लागण्याचे वेळीं भोगपालाची दिशाभूल होऊन ते भलत्याच मार्गास लागले. ते बराच काळ रखडले तरी इच्छित गुहा किंवा तिच्या द्वारावरचा मारुती त्यांच्या नजरेस येईना. त्यांनीं सभोंवार नजर टाकली तों आपण कोठें आलों आहों हेंच त्यांना नीटसें समजेना. आपण दुर्दैवानें वाट चुकलों आहों याचें मात्र त्यांना ज्ञान झालें. आपली मुदत टळणार या काळजीनें ते तळमळूं लागले पण उपयोग काय ! मुदतीचा दिवस टळेपर्यंत त्यांनीं निष्फळ आशेनेंच कसा तरी धीर धरला. पण अखेरचा दिवस संपतांच त्यांच्या मनाचा धर सुटला. मनुष्याला जें काम होण्याची अत्यंत हुरहूर असते त्या कामांतील अडथळे व हरकती तो कल्पनेनेंच दूर करतो आणि आपल्या कार्यसफलतेला अनुकूळ अशीच स्थिति निर्माण करण्याच्या नादांत असतो. गोसावी व भोगपाल यांच्या मनांत राजपुत्राला अपाय घडूं नये ही गोष्ट दृढपणानें वास्तव्य करीत होती. राजपुत्राच्या संरक्षणाकरतांच ते रात्रीचा दिवस करून प्रमिलागुहेकडे निघाले होते. पण, अखेर दैवाच्या उलटया फेऱ्यामुळें ते वाट चुकून जेव्हां निराश झाले आणि प्रमिलागुहेंत राजपुत्र धर्मध्वज मारेकऱ्यांच्या तरवारींना बळी पडला असावा अशी त्यांची कल्पना वाहूं लागली तेव्हां त्यांनीं ती कल्पना दूर होण्याकरतां असा तर्क बांधला कीं, आपण या रस्त्याचे चांगले माहीतगार असून ज्या अर्थी वाट चुकलों त्या अर्थी धर्मध्वजही खात्रीनें मार्ग चुकून गुहेपर्यंत ठरलेल्या मुदतींत पोंचलाच नसावा. तो आडवळणानें न जातां सरळ रस्त्यानें

गेला असेल असें मानलें तरी सरळ रस्त्याच्या लांबलचकपणामुळेंही त्याची ती मुदत साधली नसावी ! एवंच राजपुत्र सुरक्षित असून आपल्याला भेटेल अशा अर्धवट संशयित स्थितींत नेट धरून तेथून सिंधावतींत परत जाण्यासाठीं ते वाट चालूं लागले. पण या समयीं त्यांचें चित्त थाऱ्यावर नसल्यामुळें ते परतीचीही वाट चुकले आणि भलतीकडेच पाहडावरील जंगलांत भटकले.

त्या जंगलांतून मार्ग काढीत असतां ते पर्वताच्या पायथ्यापाशीं आले तों त्यांना असें आढळलें कीं, आपण भलत्याच प्रदेशांत आलों आहों. कारण तेथें त्यांना एक वाडी लागली आणि तेथील एका गृहस्थाकडून त्यांना त्या जागेची हकीगत समजली. त्या प्रदेशांतून राजधानीकडे जाण्याचा रस्ता बराच दूर होता. त्या रस्त्याला लागून ते अदमासानें राजधानीकडे जाण्याचा मार्ग पाहूं लागले. विचारपूस करीत मार्गक्रमण करीत असतां ते पुन्हां मार्ग चुकले आणि पुन्हां एका डोंगराच्या पायथ्याशीं आले. या ठिकाणीं बरीच सपाटी होती व मधून मधून कांहीं प्रवासीही भेटत होते. त्यांच्याकडून त्यांना असें समजलें कीं, आपण भूताद्री नांवाच्या डोंगराशीं आलों आहों. त्याच ठिकाणीं त्यांना कोणीएक मराठा भेटला व त्यानें त्यांना प्रमिलागुहेंमध्यें कोणी एक राजपुत्र मारला गेला असें वर्तमान सांगितलें. त्या मराठ्याला गुहेंतील वर्तमान उडत उडत कळलें होतें. त्याच्या तोंडून राजपुत्राच्या निधनाचें वृत्त कानीं पडतांच त्यांचे पाय मोडले. त्यांना त्या वेळेस त्या गांवढळाच्या बातमीची सत्यासत्यता पाहण्याचें अवसानच राहिलें नव्हतें. ते दोघे विगलित होऊन तेथेंच खालीं बसले. त्यांची ती अवस्था पाहून तो मराठाही तेथें थांबला. त्यानें त्यांची चौकशी केली. त्यांनीं त्यास आपण खरे कोण हें न कळवितां त्याच्याकडून शक्य ती मदत मिळविण्याचा बेत केला. त्या मराठ्याचें शेत जवळच होतें. रात्रीं त्यांनीं त्याच्या कोपींत वास्तव्य केलें. गोसाव्यानें त्याला आपण जाळींमध्यें ऐकलेली हकीगत सांगितली कीं, " मी व माझा शिष्य नित्यंक एका महाअरण्याच्या जाळींत गुप्तपणें राहिलों असतांना आह्माला सरदार जयसिंग व मोहसेन यांचा दुष्ट बेत ऐकण्यास सांपडला. राजपुत्र धर्मध्वज यास ठार मारावयाचें आणि मालतीला जयसिंगाला अर्पण करावयाची असा त्यांचा नीच संकल्प ठरला. तेव्हां त्या दोन्ही गोष्टी घडूं देऊं नयेत एवढ्याच उद्देशानें आम्ही राजधानींत आलों. पण अखेर आमचे बेत फसले. राजपुत्र मारला गेला

नव्हे मींच त्याला वांचविण्याऐवजीं मृत्यूच्या दरबारांत पोंचविलें. माधवी जी नाहींशी झाली आहे ती आपण होऊन कोठें गेलेली नाहीं. तिला जयसिंग व मोहसेव यांनींच फसवून पळविली आहे. ती आतां अद्याप सरदाराच्या तडाक्यांतून वाचली नसावी. ती जिवंत असेल तर सरदारानें हरप्रयत्नानें तिच्याशीं लग्न लाविलें असलेंच पाहिजे. मग ती त्याच्या मुरळीस भुलून फसली असो किंवा त्यानें तिला तसें करणें भाग पाडलें असो ! ”

हें खात्रीलायक गुप्त वर्तमान ऐकून भोगपालाचें मन अगदीं भांबावून गेलें. त्याला एकदम वैताग उत्पन्न झाला आणि घरदार नकोसें झालें. त्याला सर्व जगाचा कंटाळा आला आणि आतां घरीं परत जावयाचें नाहीं असें त्यानें आपल्याशीं ठरविलें.

याच ठिकाणीं गोसाव्यानें त्याला सांगितलें कीं, “ आतां माझें मन द्विधा झालें आहे. एका अर्थानें राजधानींत परत जाणें अवश्य आहे असें मला वाटतें. कारण त्या ठिकाणीं माझा शिष्य नित्यंक आहे त्याची आतां वाट काय होईल ! ”

इतकें बोलून गोसाव्यानें आपल्या डोळ्यास पाणी आणलें. आतांपर्यंत गोसाव्यानें बहुत दुःखोद्गार काढले पण नित्यंकाची आठवण होतांच तो रडावयास लागला. याचें विशेष कारण काय ह्मणून भोगपालानें त्यास विचारलें तेव्हां तो आपले अश्रु पुशीत पुशीत ह्मणाला, “ आतां मी आपलें कर्म काय तुह्माला सांगूं ? तो शिष्य नित्यंक दिसतो तसा खरा नाहीं. तो माझा शिष्य नाहीं. ती माझी भाची आहे. दीक्षादेवी ह्मणतात ती तीच होय ! तिनें धर्मध्वजास आपल्या मनानें माळ घातलेली आहे. धर्मध्वज तिचा पति ह्मणूनच आह्मी त्याच्या संरक्षणार्थ राजधानींत येऊन राहिलों. पण तो मोहसेव व शांभवी यांच्या नादांत राहिल्यानें अखेर सर्व फसगत होऊन अंशतः कसलें सर्वशः राजपुत्राच्या नाशास मीच कारण झालों ! ह्मणजे दीक्षादेवीच्या जन्माचा घात मींच केला ! आतां मी हें तोंड तिला किंवा राजाराणीला कसें दाखवूं ! यामुळें मला असें वाटतें कीं, आतां घरीं परत जाऊं नये. मी दीक्षादेवीच्या बरोबर असतांना तिला जर कांहीं सुख लागलें नाहीं तर मी तिला सोडून येथेंच राहिलों ह्मणून तिला दुःख लागेल ही तरी भीति मानण्याचें कारण काय ? कांहीं नाहीं ! कांहींही होवो; आतां राजधानींत परत जावयाचें नाहीं असाच निश्चय मी ठरवितों. ”

या भाषणाचा भोगपालास मोठाच चमत्कार वाटला. ते दोघेही आपापल्या-घरीं सताप्त असल्यानें शेवटीं त्या दोघांनीं कोठें तरी डोंगरांत राहून तप करावें असा बेत ठरविला. सर्वसंगपरित्याग करून तपश्चर्या करण्यास योग्य स्थळ कोणतें शोधून काढावें ह्मणून ते विचार ठरवूं लागले तों गोसावीबोवास गुरुभारतीच्या निवासस्थानाची आठवण होऊन तो भोगपालास ह्मणाला, "माझा श्रीभारती या नांवाचा एक गुरु आहे. तो यशस्कारावर मध्यंतरी राहत होता. पण अलीकडे बरेच दिवसांत त्याचा पत्ता नाहीं. त्याचें दर्शन होईल तर आपल्याला बराच आराम वाटेल. तो कोठें हिंडत असेल त्याचा पत्ता लावणें कठीणच आहे. पण एका निबिड जंगलांत त्याचें एक वास्तव्यस्थान असल्याचें मला माहीत आहे, तेथें त्यास आपण पाहूं. त्याची भेट झाली तर उत्तमच झालें; तसें न होईल तर त्याच ठिकाणीं राहून आपण तपश्चर्या करूं. तें स्थान अगदीं नित्रस्त आहे. कधीं काळीं भारती तेथें येण्याचा संभवही आहे."

हा विचार भोगपालास पसंत पडला. नंतर लागलीच ते वाट चालावयास लागून शोध करितां करतां मोठ्या मिनतवारीनें आपल्या इच्छित स्थळीं जाऊन पोंचले. हें ठिकाण ह्मणजे जेथें भारतीनें धर्मध्वजास प्रथम भेट दिली त्या अरण्यांतील एकांत स्थल होय. त्या समयीं भारती तेथें नसल्यानें ते दोघे किंचित् निराश झाले पण त्याच्या आगमनाची आशा धरून त्यांनीं त्या एकांत व शांतस्थळींच वास्तव्य केलें.

---

# प्रकरण ५० वें.

### अग्निकाष्ठ.



र्मध्वज व नित्यंक हे दोघे वसुप्रसाद व भारती यांच्या भेटी-करतां हिंडत असतां एका अरण्यांत त्यांचा मुक्काम पडला. ती वेळ रात्रीची होती. ती रात्र चांदण्याची होती पण अभ्रपटलानें आकाश आभ्राच्छादित झालें असल्यानें त्या रानांत विशेषसा स्वच्छ प्रकाश पडला नव्हता. साधारणतः तेथें अंधारच होता. रात्रीं अकरा वाजेपर्यंत राजपुत्र व नित्यंक बोलत बसले होते. पुढें त्यांना झोंप येऊं लागली तेव्हां ते पथारीवर आडवे झाले. अरण्यामध्यें फार सावधगिरीनें राहिले पाहिजे असें जाणून त्यांनीं आळीपाळीनें झोंप घ्यावी असें ठरविलें होतें. तेव्हां प्रथमतः नित्यंक निजला आणि धर्मध्वज जागसूद राहिला.

सरासरीं दोन घटका राजपुत्र तसाच पडून राहिल्यानंतर त्याला कांहीं अंतरावरील झाडीमध्यें उजड दिसूं लागला. तो चांदण्याचा प्रकाश नव्हे अशी त्यानें आपली खात्री करून घेतली. थोडयाच अवधींत त्या ठिकाणीं ज्वाळा दिसूं लागल्या तेव्हां राजपुत्र उठून बसला. त्यानें आपली दृष्टी सारखी तिकडे लावली. क्षणभरानें त्या ज्वाळा जस्त प्रज्वलीत होत आहेत असें पाहतांच त्यानें नित्यंकास जागे करून तो प्रकार दाखविला. त्या ठिकाणीं कांहीं तरी चमत्कार असावा अशी कल्पना करून ते शूर वीर समशेरी सज्ज करून घोडे उडवीत त्या ठिकाणीं गेले तों कोणी एक स्त्री केश मोकळे सोडून त्या प्रज्वलीत अग्नीपुढें उभी आहे असें त्यांच्या नजरेस आले. त्या शुद्र व सामर्थ्यवान् वीरांनीं लागलीच घोडयांवरून उडया टाकून त्या बाईचा दंड धरून तिला बाजूस ओढलें. त्यांच्या हाताचा तिच्या शरीरास अक-स्मात् स्पर्श होतांच ती घाबरली आणि तिचें सर्व अवसान सुटलें. राजपुत्र तिला बाजूस ओढीत असतां तिची बोबडी वळल्यामुळें कांहीं तरी बडबडत ती त्याच्याच हातावर पडूं लागली. त्यानें व नित्यंकानें तिला तशीच सावरून तेथून जरा दूर नेलें. ती बहुतेक बेशुद्ध झाली तेव्हां त्यांना मोठा विचार पडला. राजपुत्र तिला मांडीवर घेऊन बसला आणि नित्यंक

तो अग्निकुंडाची जागा व त्याच्या भोंवतालची झाडी तपासूं लागला. त्याला तेथें अन्य कोणीही दिसलें नाहीं. ज्या काय वस्तु दिसल्या त्यावरून त्या बाईच्या अग्निप्रवेशाचें कारणही कांहीं ठरवितां आलें नाहीं. एवढ्या वेळांत राजपुत्रानें त्या स्त्रीला वारा वाहून, तिचे डोळे झांकून धरून, तिची टाळू मृदुपणानें थापटून तिला सावध करण्याचा यत्न केला आणि नित्यंक तेथें येतो तों तिनें डोळे उघडले. ती कांहीं वेळानें चांगली सावध होऊन आपल्याला तिची हवाल कळेल ह्मणून ते दोघे तिला सारखे उपचार करीत राहिले. सुमारें एक घटकेनें ती चांगली सावध होऊन उठून बसली. आपल्याला मांडी देणारा परकीय पुरुष पाहतांच ती दचकली. अरण्यांतील तो एखादा समंध किंवा चोर असावा असें तिला प्रथमतः वाटलें. पण बेसावध होण्याच्या वेळची स्थिति स्मरून आणि त्यांनीं केलेला उपचार साधारणतः आठवून तिला ते कोणी तरी प्रवासी असावेतसें वाटलें. त्या तिघांतून आतां कोणी तरी बोलण्यास सुरुवात करणार तोंच अभ्रपटलांनीं कृपा करून चंद्राच्या आड आलेला पडदा दूर केला. क्षणांत फटफटींत चांदणें झळकूं लागलें. त्या प्रकाशांत राजपुत्रानें त्या स्त्रीस ओळखलें. तिनें मात्र त्याला पुरतें ओळखलें नाहीं. राजपुत्र एकदम तिच्या सन्निध जाऊन ह्मणाला, “ आपण तर शांभवी वहिनी दिसतां ! वहिनी ! आपण मला आतां चांगलेंच ओळखलें असेल. मी आपला दीर धर्मध्वज आहें. हा माझा सोबती राजकन्या प्रमिलेचा पती नित्यंक होय. गोसावशाचा शिष्य जो नित्यंक तो तुह्माला चांगला माहीतच आहे. हा नित्यंक ह्मणजे सटवाईच्या देवळांतील भोग्या होय ! ”

राजपुत्राचीं हीं अक्षरें ऐकतांच शांभवी गर्भगळीत झाली. तिला तिचीं सर्व दुष्कृत्यें मूर्तिमंत दिसूं लागलीं. तिचा जीव गोळा होऊन ती राजपुत्राच्या चरणापुढें लोळूं लागली. तिची ती नम्र व अनुकंपनीय अवस्था पाहून राजपुत्र तिला ह्मणाला, “ वहिनी, उठा ! आपली सर्व हवाल मला कळली आहे. पण आपण या अग्नीमध्यें स्वतःला जाळून घेण्यास कां प्रवृत्त झालां हें मात्र मला समजलें नाहीं. ”

असें बोलून राजपुत्रानें आपल्या हातांनीं तिला उठवून बसविली. त्याच्या भाषणावर कांहीं उत्तर करण्याचा ती प्रयत्न करूं लागली पण तिच्या दुःखःपूर्ण हुंदक्यामुळें तिचे शब्द ओठाबाहेर येण्यास अडखळूं लागले.

तेव्हां राजपुत्र तिला ह्मणाला, " वहिनी ! तुह्मी घाबरूं नका. शांत व्हा. तुह्मीं कसाही वर्तनक्रमाचा विगाणा घातला असला तरी वडिलांच्या पुण्याईनें अद्याप तुह्मी शुद्ध असाल असें मला वाटतें. आपल्या अग्निप्रवेशाचें कारण मला सांगा. मी आपणास सुरक्षितपणें आपल्या पतीकडे पोंचवीन ! तुह्मी अगदीं काळजी करूं नका. तुमची आहुती पडण्याच्या ऐन समयास ज्याच्या प्रेरणेनें मी येथें आलों तोच तुह्मास सद्बुद्धी देईल. "

यावर कांहीं वेळ थांबून शांभवी हात जोडून राजपुत्रास म्हणाली, " हे भाग्यवान राजपुत्रा ! मी सर्वस्वी तुझीच अपराधी आहें. मला माझ्या विपरीत आचाराचा उच्चारही करवत नाहीं. मी आपल्या ज्ञानाच्या घमेंडींत, विद्येच्या मदांत, पैशाच्या धुंदींत, आणि सधनतेच्या फुशारकींत व विन जरूरीच्या तोऱ्यांत देव, धर्म, विहिताचार यांच्याशीं बेपर्वाईनें वर्तन केलें त्याचें मला योग्य प्रायश्चित्त मिळालें. माझ्या मनावरील अशुद्ध संस्कारामुळें माझ्या मनांत विकल्पाचें ठाणें बसलें आणि भलत्याच इच्छा, भलतीच हाव धरून मी प्रत्यक्ष आपल्या पतीचा गळा कापण्यासही सरसावले. या सर्व गोष्टींचा मला पूर्ण पश्चात्ताप होऊनच मीं घराचा त्याग केला. अशा प्रकारच्या अत्यंत ओंगळ पातकांनीं काळेकुट्ट बनलेलें मुख जगास दाखविण्याची मला लाज वाटूं लागली. आणि ज्या या माझ्या देहानें बुद्धिभ्रष्ट आचरणाचा व मनसोक्त कल्पनांचा सन्मान केला तो देह नष्ट करावा एवढ्याच भावनेनें मी अग्निकाष्ठ भक्षण करण्यास प्रवृत्त झालें. राजपुत्रा ! तूं मला वांचविलेंस पण या घाणेरड्या देहानें जगतांत वास्तव्य करण्याची माझी इच्छा नाहीं. ईश्वराच्या कृपेनें तूं मला भेटलास हें उत्तम झालें. आतां तूं मला सर्व अपराधांची क्षमा करून आपल्या हातानेंच अग्नींत लोट किंवा तुझ्या शस्त्रानें माझी खांडुळीं करून टाक ! "

शांभवीच्या भाषणानें राजपुत्राला तिच्या मनांतील स्थिति समजली. तो तिला धीर देण्यासाठीं ह्मणाला, " वहिनी ! तूं जरी कोणतीही अधर्माचीं कृत्यें करून मला ठार करण्यास प्रवृत्त झाली होतीस तरी माझें संरक्षण करण्यास माझा रक्षणकर्ता खंबीर होता. माझा तुझ्यावर क्रोध नाहीं. मीं तुला काय क्षमा करावी. मी तुझें लेकरूं आहें. तूं माझी वडील भावजय आहेस. तुला जर तुझ्या कृतकर्मांचा पूर्ण पश्चात्ताप झाला आहे तर तुला तुझा पापमल धुऊन काढतां येणें शक्य आहे. अद्यापही तूं सद्धर्माला शरण जा.

कुलवंत कामिनीचा आचार डोक्यावर धारण केल्यास अद्यापही तुला शुद्ध पतिव्रतांच्या पंक्तींत जागा मिळेल. तुझा शुद्धपणा मळलेला नाहीं !! ”

यांप्रकारें शांभवीचें समाधान करून राजपुत्र व नित्यंक तिच्यासह आपल्या पहिल्या मकाणाच्या जागीं गेले. तेथें त्यांनीं पहाटेपर्यंत विश्रांति घेतली; आणि आपल्या पुढील कार्यावर नजर देऊन त्या अरण्यांतून कूच केलें.

राजपुत्राच्या उपदेशानें शांभवीस बराच धीर आला होता. अग्नीमध्यें उडी घेण्याच्या ऐन समयास राजपुत्राला तेथें पाठवून आपला प्राण वाचविण्यांत देवाचा कांहीं तरी विशेष उद्देश असावा किंवा आपण ज्या सद्धर्मापुढें मनानें लोटांगणें घातलीं, त्याच्या कृपेनें आपणास राजपुत्र भेटला आणि उत्तेजनपर भाषण बोलला, अशी कल्पना करून तिनें आपल्या पुढील आयुष्याची सर्व भिस्त राजपुत्रावरच टाकली.

---

## प्रकरण ५१ वें.



### मस्तीचा पाडाव.



जपुत्र व नित्यंक यांनीं भारतीचा शोध चालविला होता. तो कोठेंच भेटेना तेव्हां त्याच्या राहण्याच्या सर्व जागा हिंडाव्या अशा उद्देशानें ते यशस्कारावर गेले. तेथेंही भारतीची कांहींच हवाल कळली नाहीं तेव्हां तेथील शंकराचें दर्शन करून ते पर्वत उतरून खालीं आले. नंतर राजपुत्राला जें त्याचें महारण्यांतील दुसरें स्थळ ठाऊक होतें, ह्मणजे ज्या ठिकाणीं प्रमिलेची गांठ पडण्यापूर्वी ह्मातार्‍यानें त्याला नेलें होतें त्याच्या रोखानें ते वाट चालूं लागले. साधारण खुणा ध्यानांत आणून राजपुत्रानें एक जंगल ओलांडलें आणि तो पलीकडील सपाटीवर पोहोंचला. तेथून खुणांची आठवण करीत करीत तो दुसर्‍या जंगलाच्या मर्यादेवर येऊन पोहोंचला. याच ठिकाणीं भारतीनें प्रथमतः आपल्याला दर्शन दिलें असें त्यानें नित्यंकाला सांगितलें. त्या निबिड अरण्याच्या मध्याच्या जवळ भारतीचें एकांत स्थान होतें. राजपुत्र,

नित्यंक व शांभवी यांसह तेथें पोहोंचला तों तेथें भलताच प्रकार त्याच्या नजरेस पडला.

त्या समयीं त्या ठिकाणीं बराच दंगा चाललेला होता. गोसावीबोवा व भोगपाल यांचा व सरदार जयसिंग व त्याचे अनुयायी यांचा झगडा जुंपलेला होता. राजपुत्र व नित्यंक तेथें जातात तों त्यांच्या कानीं असे शब्द आले कीं, " या भोगपालाला जबर जखम लागून तो बेशुद्ध पडला आहे, त्याच स्थितींत त्याचें नरडें कापून टाकूं. गोसावड्या ! तूं मुकाट्यानें माघार घेऊन येथून चालता हो. नाहींतर तुझीही तशीच दशा करून मी या माधवीला तुमच्या उरावर पाय देऊन घेऊन जाईन आणि तिच्याशीं जबरदस्तीनें लग्न लावीन ! "

हे शब्द सरदार जयसिंगाच्या तोंडून निघाले होते. गोसावीबोवांच्या हातांत शस्त्र असून ते माधवीच्या रक्षणार्थ झगडत होते. सरदाराच्या भाषणास उत्तर देण्याच्या भरीस न पडतां ते आपली तरवार फिरवून सरदाराच्या शिपायांना कंठस्नान घालीत होते. इतक्यांत सरदारानें मोठें चातुर्य लढवून, अति चपळाई करून गोसावीबोवास आपल्या मिठींत धरलें. त्यांच्या शस्त्राचे सरदारानें तुकडे करून टाकले. गोसाव्याचा इलाज नाहींसा होऊन तो अगदीं निराशेनें मरणास तयार झाला. त्याच्या भोंवतीं सरदाराच्या शूर शिपायांचा गराडा पडला. सरदाराचें शस्त्र आतां गोसाव्याच्या मानेवर पडणार तोंच धर्मध्वज व नित्यंक शांभवीला दूर ठेवून समशेर फिरवीत धांवले. त्यांनीं पहिल्या धडाक्यासरशी तो गराडा फोडल्यावर वेढ्यांतील शिपाई व नित्यंक यांचें युद्ध जुंपलें. तेवढ्यांत अत्यंत चलाखीनें धर्मध्वजानें सरदाराचा शस्त्रधारी हात छाटला आणि त्यास एका ठोशासरशी जमिनीवर लोळवून तो आवेशानें ह्मणाला, " सरदार जयसिंग, मीं तुह्मास ओळखलें आहे. तुह्मी राजपुत्रा धर्मध्वजास जाणतां काय ? श्रीभारतीशिष्य धर्मध्वज भूलोकावर हयात असतांना—नव्हे या निबिड अरण्यांत जिवंत उभा असतांना—भोगपाल किंवा गोसावीबोवा यांचे गळे कापून माधवीला पळवून नेण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या तुमच्या जिव्हेचे तिळतुल्य तुकडे करूं काय ? सरदार, तुह्मी कोणत्या दमांत आहां ? तुमचीं बदमाषगिरीचीं कृत्यें सतत आमच्या कानावर येतच होतीं ! तुह्मी सरदार घराण्यांत निपजून सरदारी, शूरत्व व वीरवृत्ति यांना खालीं पाहण्यास

लावलें. तुमच्या नीचपणाची कमाल झाली. महत्वाकांक्षा तृप्त करण्याकरतां तुह्मी हवा तो पराक्रम गाजवून कीर्ति व वैभव पैदा करावयाचें होतें; पण माझा खून करून, राज्याचा वारशी हक्क प्राप्त होण्याकरतां परमावधीचा नीचपणा करणें हें मनुष्यत्वाचें काम नव्हे. तुह्मी जिवंत राहण्यास योग्य नाहीं. मी याक्षणींच तुमच्या मांसाची मेजवानी गिधाडांना दिली असती पण तुह्माला अनंत अपेक्षा सोसावयास लागून तुमचा अंत व्हावा या हेतूनें मी तुह्मास जिवंत ठेवतों. मग राजा वसुप्रसादाचा जसा हुकूम होईल तशी तुमची वाट लावूं."

राजपुत्राची ही गर्जना ऐकतांच सरदाराचे नित्यंकाच्या तडाक्यांतून राहिलेले शिपाई अवसानगलित होऊन त्यांचीं शस्त्रें त्यांच्या हातांतून गळून पडलीं. नित्यंकास क्षुल्लक जखमा लागल्या होत्या. त्यांतून वाहणारें रक्त आणि शत्रुपक्षीयांतील लोकांच्या जखमांतील रक्त यांच्या रंगानें नित्यंक तांबडा लाल रंगला होता. त्यानें सर्व शिपाई पादाक्रांत करून राजपुत्राच्या साह्यार्थ धाव ठोकली. राजपुत्रानें आपल्याच वीर्यशालीपणानें पूर्ण यश संपादन केलें आहे असें पाहतांच त्याला संतोष झाला. तो लागलीच गोसावीबोवांच्या तैनातीला लागला. गोसावीबोवाना विशेष जखमा लागल्या नव्हत्या; पण ते पराकाष्ठेचे दमले होते. नित्यंकानें त्यांचा घाम पुसला आणि तो त्यांना आराम वाटण्यासाठीं आपल्या मांडीवर त्यांचें डोकें घेऊन वारा घालीत बसला.

आपल्यापेक्षां भोगपालाच्या आरामाचीच जास्त काळजी घेणें इष्ट आहे असें वाटून गोसावीबोवा लागलीच उठले आणि नित्यंकासह भोगपालाच्या तैनातीस लागले. इतक्यांत भोगपालही चांगला सावध होऊन उठून बसला. त्याच्या शेजारींच त्याची पत्नी माधवी पडली होती! तो अतिभयंकर प्रकार आणि पतीच्या अंगांतील रक्तस्राव पाहून ती झीट येऊन पडली होती. गोसावीबोवा माधवीचीही शुश्रुषा करूं लागले. तेवढया वेळांत राजपुत्रानें नित्यंकास पाठवून शांभवीला तेथें आणविलें. सरदार जयसिंग रक्तामध्यें लोळत व कण्हत पडला होता. त्यास तसाच लोळत ठेवून राजपुत्र तेथून उठला आणि जयसिंगाच्या बलहत होऊन तटस्थ राहिलेल्या शिपायांस ह्मणाला, "तुमचे हे यजमान! हे तुमचे सरदारबहादूर, आमच्या प्रमिलेचे हे काल्पनिक सासरे आणि कामसेनाला राजजामात करून आमचा खून केल्यानंतर वसुप्रसादाचें सिंहासन मंडित करणारे हे सिंवावर्तीचे काल्पनिक

राजे धूळ खात पडले आहेत ! तुह्मी त्यांच्या पदरचे शूर शिपाई आहां तरी पण आह्मी तुह्माला अपराधी मानीत नाहीं. तुह्मी हुकमाचे अनार्थी चाकर ! तुमचे धनी भलतींच कामें करण्यास प्रवृत्त झाले तेव्हां तुह्मी शूरवृत्तीनें त्यांना सदुपदेश करून योग्य सल्ला द्यावयास पाहिजे होता. पण चाकरांच्या अंगीं असा जोमदारपणा क्वचितच सांपडतो. यास्तव तुम्हाला विशेष दोष न देतां सुरक्षित ठेवण्याचें आम्ही आश्वासन देतों. तुम्ही आमच्याच बरोबर राहून आह्माला मदत करा. ”

राजपुत्राच्या या भाषणानें शिपाई लोक खुष झाले. त्याचे उमदे विचार व औदार्यपूर्ण वाणी या योगानें त्यांना तोच त्यांचा पुढारी व मालक असें वाटूं लागलें. त्यांनीं एकमतानें राजपुत्राचे पाय धरिले आणि त्याच्या सेवेस वाहून घेण्याची उत्सुकता दाखविली.

---

## प्रकरण ५२ वें.

### ओळख पटली.



धवी व धर्मध्वज यांना प्रत्यक्ष पाहून गोसावी व भोगपाल यांना आपल्या वैतागाचा व्यर्थपणा समजून आला. माधवी पूर्ण शुद्ध आहे अशी त्यांची खात्री पटलीच होती. त्यांच्यावरील प्रसंगासंबंधानें त्यांनीं धर्मध्वजाजवळ खुलासा करण्यापूर्वी आपली पूर्वीची सर्व हकीकत त्याला कळविली आणि पुढें गोसावी ह्मणाला, “ वैताग उत्पन्न होऊन आह्मी या ठिकाणीं येऊन राहिल्यानंतर आमचे कांहीं दिवस आरामांत गेले. पुढें एके रात्रीं आह्माला लांब कोठें तरी कांहीं आवाज ऐकूं आल्याचा भास झाला व तसा भास वरचेवर होऊं लागला. तेव्हां त्यांत कांहीं तरी खरा अर्थ आहे असें वाटून आम्ही आमच्या दगडी मठीच्या बाहेर पडलों. आवाजाची दिशा ध्यानांत आणून आह्मी बरेच पुढें गेलों तों तो आवाज स्पष्टपणें कानीं पडूं लागला. आवाज ह्मणजे किंकाळ्या होत्या. कोणीतरी दीन प्राणी संकटांत सांपडून दुसऱ्याच्या मदतीची अपेक्षा करीत असावा असें वाटून आह्मी त्या दिशेकडे धावलों तों

सरदार जयसिंग माधवीचा छळ करून तिला आपल्याशीं पुनर्विवाह करण्याची कबुली मागत होता. ती साध्वी नानाप्रकारें त्याला उपदेशपर गोष्टी सांगत होती. पण तो दुष्ट तें मुळींच न जुमानतां तिला मारीत होता आणि तिचा पति भोगपाल याचा मुडदा तिच्यापुढें आणून टाकण्याची दहशत घालून तिला भेंवडावीत होता. त्यावेळीं त्या मांगहृदय जयसिंगाबरोबर त्याचे फक्त दोन तीन नीच सेवक होते. हा प्रकार आडून पाहतांच भोगपाल व मी मांधवीच्या मदतीस धांवलों. जयसिंग व त्याचे नीच भृत्य आमच्यावर तुटून पडले; पण परमेश्वराच्या कृपेनें त्यांतला एक सेवक घायाळ होऊन पडला आणि बाकीचे दोघे पळून गेले. तें पाहतांच सरदारानेंही माधवीची आशा सोडून पळ काढला. आह्मी माधवीला घेऊन येथें आलों या गोष्टीस अवघे तीनच दिवस झाले. आजचा चौथा दिवस होय. पूर्वीचें वैषम्य ध्यानांत ठेवून जयसिंग अनेक शिपाईगडी घेऊन येथें आला व तो माधवीची मूर्खासारखी मागणी करूं लागला. तें सहन न होऊन भोगपाल एकदम त्याच्यावर तुटून पडला. त्याला लहानसा वार लागून तो भूमीवर निचेष्ट पडला. माधवी त्याच्या चरणाजवळ पडली. मी शक्य त्या नेटानें आत्मसंरक्षण चालविलें. माझा नाइलाज होऊन माझ्या गळ्यावर त्या नीचाचें नीच शस्त्र पडणार तों तुह्मी दोघांनीं धांव ठोकून मला कायमचे ऋणी करून ठेविलें. ''

हें वृत्त ऐकून राजपुत्रास आश्चर्य व समाधान वाटलें. त्यांच्याबरोबर शांभवी कशी आली. याविषयीं गोसावी व भोगपाल यांची कांहींच कल्पना चालेना. माधवी, भोगपाल व गोसावीबोवा यांना पाहून शांभवीचें चित्त फाटून गेलें होतें; पण सर्व गोष्टीसंबंधानें मौन धरूनच सर्व मानसिक यातना सोसावयाच्या असा तिनें निर्धार ठरविला होता. शांभवीसंबंधानें प्रश्न होतांच नित्यंकानें त्यांना माहीत नसलेली सर्व हकीगत कळविली. फक्त त्यानें त्यांत आपण स्वतः कोण व आपला आणि प्रमिलेचा विवाह झाला आहे एवढें सांगण्याचें वगळलें. नित्यंकाच्या हकीगतीनें गोसावी व भोगपाल यांना प्रमिलागुहेंत राजपुत्राच्या ऐवजीं सरदारपुत्र कामसेन जखमी झाला हें कळून त्यांना त्यांच्या पूर्वीच्या अर्धवट शंकित कल्पनेचें आश्चर्य वाटलें. शिष्य नित्यंकावरील आरोप कळून त्यानें आपलें संरक्षण करण्याकरतां आपलें खरें स्वरूप प्रगट केलेलें कळतांच गोसाव्यानें त्या प्रकाराबद्दल थोडें फार समाधान दर्शविलें.

गोसावीबोवा नित्यंकाला सटवाईचा भोग्या अगर भय्या या नांवानें ओळखत होते. एकेकाळीं त्या भय्यानें आपल्याला बहुत संभाळलें असल्याचा उल्लेख करून गोसावीबोवांनीं त्याच्या आणि राजपुत्राच्या निकट परिचयचा व अस्खलित लोभाचा मजकूर विचारला. तेव्हां राजपुत्रानें त्यास त्याची सर्व हकीगत सांगितली. ती हकीगत ऐकत असतां गोसावीबोवा अर्थातच सारखे डोळे पुसूं लागले; आणि अखेर त्यांना त्यांचा प्रेमा व गहिंवर अनावर होऊन त्यांनीं नित्यंकापुढें हात करून ह्मटलें, " बाळा ! हे माझ्या प्रिय पुत्रा ! ये ये ! तुझ्या या चुलत्याला—या भद्रपतीला कडकडून मिठी मार ! माझा बंधु ईशपती व भावजय पार्वती हे अद्याप जिवंत असून महान् सत्वस्थ बनले आहेत आणि त्या सत्वसंपन्न मातापित्यांचा ह्मातारपणीं तूं पुत्रानें उद्धार केलास हें ऐकून मला स्वर्गलोकांतील इंद्रपदाचें सौख्य वाटत आहे. बाळा, प्रिय पुत्रा, तुझें कडकडून आलिंगन ह्मणजे मूर्तिमंत आनंददेवतेचीच भेट होय ! "

असें बोलून भद्रपतीनें नित्यंकास गाढ आलिंगन दिलें. तो चुलत्या पुतण्यांचा समागम पाहून धर्मध्वजाला पांडव आणि विदुर यांची आठवण होऊन तोही आनंदातिशयानें प्रसन्न दिसूं लागला. गोसावीबोवांना जेव्हां वीरबाहूची हकीगत श्रुत झाली तेव्हां ते नित्यंकास ह्मणाले, " बाळा ! ज्या वीरबाहूनें दीक्षादेवी कामसेनाला अर्पण करण्याच्या भलत्याच मोहानें सुबाहूचा प्राण घेतला; दाक्षायणीला मरणप्राय यातना देण्यास आणि अखेर तिच्या अंतास जो वीरबाहूच कारण झाला, ज्यानें ईशपती व पार्वती यांचा वृथा छळ करून परमेश्वराचा अपराध केला, ज्यानें दीक्षादेवीचा नाश योजून माझ्या घरावर छापा घालून, मला देशोधडी लावून श्रीभारतीच्या एका दीन शिष्याला गांजून गुरूचा राग करून घेतला त्या चांडाळकर्मी वीरबाहूचे पाय तोडून तूं त्याला जन्माचा पांगळा करून, त्याला जन्माची आठवण देऊन ठेवलीस हा तुझा पुरुषार्थ वर्णन करावा तितका थोडा आहे. तुझ्या हातून या सर्व गोष्टी पार पडल्या याचें कारण श्रीभारतीची तुजवरील कृपा हेंच होय ! आतां ज्या दीक्षादेवीनें धर्मध्वजाला माळ घातली आहे ती कुलवंत, सत्वपूर्ण कन्यका ह्मणजे तुझ्या अत्याबाईची मुलगी होय ! भारतीच्या प्रसादानेंच तुला प्रमिला प्राप्त झाली. तो भारतीच तुझा कल्याणकर्ता होय ! तो भारतीच माझा गुरु होय ! सटवाईच्या देवळांतून राजवाड्यांत जाण्यासाठीं मी निघालों त्या

वेळीं मी तुझ्या घरीं पाहुणचारा करतां ह्मणून आलों. त्यासमयीं जो ह्मातारा मीं तेथें पाहिला तो भारतीच होता असें आतां स्पष्ट होतें. पण ह्या चांडाळानें त्या वेळीं त्याच्या वृद्धपणामुळें त्यास ओळखलें नाहीं याची मला शरम वाटते ! असो; आजच्यासारखा सोन्याचा दिवस प्राप्त होईल ही कल्पना मला शिवली देखील नव्हती; पण हे प्रिय पुत्रा नित्यंका ! मी तुला बरोबर लीलेनें रानावनांत घेऊन गेलों असतां मजवर मोठा बिकट प्रसंग गुदरला आणि तुला एक अक्राळविक्राळ व्याघ्र उचलून घेऊन गेला. त्यासंबंधानें पुढें मजवर काय आरोप आला हें तुला कळलेंच असेल. तें पुढें सांगतांही येईल. पण मी तुला असें विचारतों कीं, त्या क्रूर श्वापदाच्या हातून तुझी सुटका होऊन तूं जिवंत कसा राहिलास ? तुझी व भारतीची गांठ कशी पडली व त्यानें तुझ्यावर कृपा केव्हां केली ? ”

चुलत्याच्या या प्रश्नावर नित्यंकानें सांगितलें, “ मी व्याघ्रमुखांतून कसा सुटलों व या भारतीला मी कोठें, कसा प्राप्त झालों हें अद्याप मला मोठें गूढच पडलें आहे. सटवाईच्या देवळांत जे लोक पूर्वी व्यवस्थेला होते त्यांच्या घरीं मी लहानाचा थोर झालों. या ह्मातान्यानें मी अगदीं लहान असतां मला त्यांच्या हवालीं केलें एवढेंच मला अगदीं पुसट ज्ञान आहे. त्या सटवाईच्या भोप्यास मी बाप मानी व त्याच्या बायकोस आई ह्मणे. त्या मनुष्याचें कुटुंब बरेंच मोठें होतें. कालांतरानें त्याच्या घरचीं सर्वच माणसें मेलीं व मी एकटा राहिलों. हा प्रकार त्या म्हातान्यास कोणत्या तरी मार्गानें श्रुत होऊन तो तेथें रहावयास आला. पुढें त्यानेंच माझा सांभाळ केला. त्याचें नांव भारती आहे असें त्यानेंच मला सांगितलें. पण त्यानें मला त्याच्या नांवाचा अन्य कोठेंच उल्लेख न करण्याची ताकीद देऊन ठेविली. तो थकील होता त्यामुळें तो नेहमीं घरांतच बसलेला असे. कांहीं दिवस तो आपल्या हातांनीं मला स्वयंपाक करून घाली. मी त्या ह्मातान्यावर अत्यंत प्रेम करीत असे व अनेक प्रकारें मी त्याची सेवा करीत होतों. तो ह्मातारा मला पुष्कळ करमणुकीच्या गोष्टी सांगे आणि त्या सांगतां सांगतांच तो मला सदुपदेशाचीं आद्य तत्वें सांगे. त्यानें मला अशाप्रकारें बहुत कथा सांगून ज्ञानोपदेश केला आहे. आपणास पाहिजे त्या माझ्या हकीगतीचें माझें मलाच कांहीं ठाऊक नाहीं. श्रीभारतीचें दर्शन घडेल तेव्हां या गोष्टींचा सर्व खुलासा होईल. ईशपती, पार्वती वगैरे मंडळींनाही

तें गूढ अद्याप समजावयाचेंच आहे. यावांचून बाकीची आपली व ईशपती, पार्वती यांची हकीगत मला एका बागेच्या घरधन्याच्या घरीं कळली. आळं-घरचें राज्य व जंबालवंश यांचा सर्व इतिहास मला तेथेंच समजला. त्याचप्रमाणें आपण आपल्या शिष्यासह माझ्या घरीं पाहुणे आला तेव्हां त्या ज्ञात्यानें म्हणजे भारतीनें तुम्ही व तुमचा शिष्य हे पुरुष दिसत असून तुम्हांला स्त्रीधर्माचा उपदेश कां केला हें गूढही मला आतां उलगडलें. पण माझी प्रिय भगिनी म्हणजे आपली भाची जी दीक्षादेवी तिला पुरुषवेष देऊन व आपल्या पुतण्याचें म्हणजे माझें नांव देऊन हिंडविण्याचें कारण काय वगैरे गोष्टी आपण उघड कराल तर फार बरें होईल!"

नित्यंकाची ही इच्छा ऐकून भद्रपतीनें त्याला दीक्षादेवी पोरकी होईपर्यंतची हकीगत प्रथमतः थोडक्यांत सांगितली. आणि पुढें तो म्हणाला, "माझी बहीण दाक्षायणी हिच्या बोलण्याप्रमाणें मी कलिंगाला निघालों; पण वाटेंत मजवर कांहीं बिकट प्रसंग गुदरून मला तेथें जाण्यास फारच विलंब लागला. तेवढ्या वेळांत दीक्षादेवी केवळ स्वसंरक्षण करण्याच्या उद्देशानें या सद्गुणसंपन्न धर्मध्वजाचें चिंतन करीत माझ्या घराकडे गुप्तपणें निघाली. मी निराशेनें घरीं परत येत असतां तिची व माझी वाटेंत गांठ पडली. त्यावेळीं तिनें पुरुषवेष धारण केलेला होता. तोच तिचा वेष मीं कायम ठेवला. तूं वाघाच्या तोंडांत गेल्याचें वृत्त तुझ्या आईबापांना खरें वाटलें नाहीं. मी त्यावेळीं कांहीं मंत्रतंत्र क्रिया करण्याच्या नादांत असे. तेव्हां कांहीं मंत्रक्रियेच्या साधनार्थ मीं तुला बळी दिलें असा घाणेरडा आरोप मजवर तुझ्या मातापित्यांनीं लोकांच्या बुद्धीनें केला. तेव्हां मला वैताग येऊन मीं गृहत्याग केला. पण मला तुझेंच वेड लागलें. मला तूं जिवंतच आहेस असें वाटून मी वाटेल त्याला तुझ्याच नांवानें हांक मारी. असें होतां होतां मी अगदीं भ्रमितचित्त झालों. तुझा नामजप हाच माझा मंत्र बनला. अशा स्थितींत माझी व श्रीभारतीची भेट झाली कांहीं पूर्वपुण्याईच्या बळामुळें भारतीला माझा स्वीकार करण्याची बुद्धी झाली. त्याच्या कृपेनेंच मला पैसा, वतनवाडी प्राप्त झाली. त्याच्या उपदेशाकडे चित्त ठेवून मी ईश-सेवेंत काळ घालवीत स्वस्थ राहिलों. नोकरचाकर ठेवून मी आपलें घर सजविलें. त्यांतच कोणाला तरी मी नित्यंक ह्मणें. कोणी मला नित्यंक याचा अर्थ विचारला ह्मणजे मी सांगें कीं, माझा एक लाडका पुतण्या नित्यंक

ह्मणून आहे तो चुकला आहे; हरवला आहे; कांहीं दिवसांनीं तो परत येऊन मला भेटणार आहे. तेव्हां त्याच्या आठवणी प्रीत्यर्थ मी कोणा ना तरी नित्यंक ह्मणून मनाचें समाधान करून घेतों. दीक्षादेवी पुरुषवेषानें माझ्या घरीं येतांच मीं तिलाच माझा पुतण्या नित्यंक असें ठरविलें. पुढें मजवर वीरबाहूचा घाला आला तेव्हां मी व तो वेषधारी पुतण्या असे सिंधावतीकडे जाण्यासाठीं निघालों. वाटेनें कांहीं दिवस एका जंगलांत आम्हीं मुक्काम केला. गुप्तपणानें रहातां यावें म्हणून आह्मी एका जाळींत राहिलों. तेथें दाट गुल्मांत असतांनाच आम्हाला सरदार जयसिंग व मोहनसिंग यांचा नीच, घातकी बेत ऐकावयास सांपडला. तेव्हां राजपुत्राचें संरक्षण आणि माधवीचा बचाव या गोष्टींवर ध्यान देऊन आम्हीं दोघे राजधानींत येण्यास उत्सुक झालों. मी गोसावीबोवा बनलों आणि माझा पुतण्या शिष्य बनला. राजधानींत एकदम प्रवेश करण्यापेक्षां साधु या नात्यानें शहराबाहेर राहणें बरें असें वाटून आह्मी सटवाईच्या देवळांत मुक्काम ठोकला. पुढें काय काय प्रकार झाला, चंद्रहाराच्या निमित्तानें शांभवीनें आमचा कसा बोज पाडला, संततिप्राप्तीकरतां ती कशी नादावली, शिष्य नित्यंकावर ती कशी लोभ करूं लागली आणि अनेक भानगडी उत्पन्न होऊन आतांपर्यंत त्यांचा काय काय परिणाम घडला तो तुह्मी सर्वजण जाणतच आहां. ''

असा इतिहास सांगून गोसावीबोवा थांबले. त्यांच्या हकीगतींत ज्या गोष्टी स्पष्ट व्हावयाच्या राहिल्या किंवा ज्या अधिक स्पष्ट होणें जरूर वाटलें त्याबद्दल राजपुत्र, भोगपाल, नित्यंक यांनीं त्यांना प्रश्न करून सर्व खुलासा करून घेतला. भद्रपतीला पाहिजे असलेल्या प्रश्नांचीं त्यांनींही खुलासेवार उत्तरें दिलीं.

भद्रपतीला आपल्या भावाची भेट घेण्याची उत्कंठा लागली होती; पण त्याहीपेक्षां तो भारतीच्या दर्शनासाठीं अधिक उतावळा झाला होता. तेव्हां सर्वांच्या विचारें काय ठरेल तें करण्याची कबुली देऊन त्यानें आपल्या या दोन्ही इच्छा राजपुत्राजवळ व्यक्त केल्या. एकंदर परिस्थिति व प्रसंग ध्यानांत घेऊन त्यांनीं तें स्थान सोडून वसुप्रसाद व गुरु भारती यांच्या भेटीकरतां पृथ्वीसंचार करण्याचें ठरविलें. सरदार जयसिंग यास त्यांनीं त्याच्या शिपायांसह आपल्या स्वारीबरोबर घेतलें.

# प्रकरण ५३ वें.



## सात्विक संरक्षण.

सरदारपुत्र कामसेन आतां चांगला खडखडीत बरा झाला होता. त्याला पुन्हां अवसान चढलें. त्याचा पिता माधवीला आपल्या कबजांत घेण्याकरितां शिपाईलोकांसह भोगपाल व गोसावी यांच्या समाचारास गेला त्याच वेळीं त्याच्याशीं खलबत करून तो विझवटा कामसेन शिपायांसह प्रमिलेवर हल्ला करण्याकरतां राजधानीस गेला. प्रमिलेला पळवून आणून तिला वीरबाहूच्या पायाची बटीक करण्याबद्दल त्यानें त्याच्या जवळ प्रतिज्ञा केली होती. मोहसंघाशीं कारस्थान करून दीक्षादेवीला आपली दासी बनविण्याबद्दल त्यानें मोहसंघाकडून वचन घेतलें होतें.

कामसेन गुप्तपणें जाऊन राजधानीमध्यें आपल्या वाड्यांत छपून राहिला. सरदार व कामसेन जालंधरास कायमचेच राहणार याविषयीं सर्व राजधानींत बातमी होती. त्यानें आपल्या वाड्यांतील विश्वासू शिपायांना द्रव्यमोहानें वश करून घेतलें आणि राजकन्येविषयीं सर्व गुप्त माहिती मिळविली.

राजकन्या रात्रीं कोठें शयन करते, तिच्या भोंवतीं बंदोबस्त कसा असतो; पाहऱ्याची व्यवस्था कशी आहे वगैरे सर्व वर्तमान समजून घेतल्यानंतर कामसेन अनुकूल समयाची वाट पहात बसला. योग्य संधी दिसतांच एक दिवस रात्रीं बारा वाजण्याच्या सुमारास त्यानें आपल्या नीचकर्मपारंगत साथीदारांसह प्रमिलेच्या महालांत प्रवेश केला. त्यानें एकप्रकारचें मादक द्रव्य पैदा केलें होतें. राजकन्या, तिच्या दासी व बाहेरील अंगास निजलेले रखवालदार या सर्वांच्या नाकावर त्या द्रव्याचा मोठ्या सावधगिरीनें प्रयोग करून त्यानें त्या सर्वांना शुद्धिगत केलें. नंतर त्यानें राजकन्येला आपल्या साथीदारांच्या सहाय्यानें उचललें आणि आपल्या वाड्याकडे चालविलें. त्या समयीं जी काय गडबड झाली तेवढ्यावरूनच पाहऱ्यावरील राजदूतांना संशय आला. त्यांनीं लागलीच भयसूचक शिंगें वाजविलीं व चोरट्यांचा पाठलाग केला. पण यावेळीं कामसेन प्रमिलेच्या मेण्यासह राजवाड्याच्या जवळ जवळ

गेला होता. त्याच्या सुरक्षितपणासाठीं जे साथीदार मागें राहिले होते त्यांना आपला पाठलाग होत आहे असें समजतांच ते भलत्याच दिशेला पळाले. राजदूत त्यांनाच दगेखोर समजून त्यांच्या पाठीस लागले. पळतां पळतां ते सर्व साथीदार राजदूतांच्या हातीं लागले. त्यांनीं त्या सर्वांना कैद करून राजवाड्यांत आणून हजर केलें. भयसूचक शिंगांच्या आवाजामुळें प्रधान, सेनापती, दमनपुरोहित वगैरे मंडळी राजवाड्यांत हजर झाली होती. त्यांच्यापुढें ते अपराधी उभे करतांच सेनापतींनें त्यांना सर्व मजकूर विचारला. त्यांनीं प्रथमतः आपल्या जातकुळीस अनुसरून व आपल्या यजमानाच्या दुराचारास स्मरून सर्व गोष्टी नाकारल्या. पण चौदावें रत्न दाखविल्याबरोबर त्यांनीं सर्व कांहीं कबूल केलें आणि कामसेन व प्रमिला यांचा समग्र वृत्तांत सांगितला.

ही बातमी ऐकतांच सेनापती दमनपुरोहितासह कामसेनाच्या वाड्याकडे आले. त्यांच्याबरोबरच्या सेवगणांनीं वाड्याला चोहोंकडून वेढा टाकला. सेनापती आंत शिरले. त्यांनीं सर्व वाडा धुंडला; पण कामसेनाचा पत्ता लागेना.

सेनापती वाड्यावर चाल करणार अशी बातमी कामसेनाला पोहोंचली होती. त्यामुळें त्या चोरानें वाड्याची दिशा चटकन् बदलली. राजदूत त्याच्या शोधार्थ चालले असतां तो भामट्या एखाद्याला नांगी मारून दडून बसणाऱ्या अपराधी विंचवाप्रमाणें आड सांधींत छपून बसला होता. शिपाईलोक निघून गेलेले पाहतांच त्यानें तशाच सांधीकोंदींतून लपत छपत राजधानींतून पाय काढला. या सुमारास प्रमिला शुद्धींत आली होती. आपण पलंगावर शयन केलें होतें हें तिला चांगलें आठवत होतें. पण सांप्रत आपण मेण्यांत बसून चाललों आहों हें ध्यानांत येतांच ती घाबरली. ती आपल्या सखीजनांना हाक मारूं लागली. तिचा आवाज ऐकतांच कामसेनानें शिपायाकडून तिला दरडावलें आणि मेणा थांबेपर्यंत चकार शब्द काढाल तर माराल अशी भीति घातली. आपणास कोणी तरी दगा करून पळवून नेत आहे हें तिच्या ध्यानांत आलें. शिपायांनीं घातलेली दहशतही तिनें ऐकली. पण त्यांतल्या त्यांत धीर करून तिनें शिपायास विचारलें, " मी मौन धरून बसतें; पण मला कोणी व कोणीकडे चालविलें आहे एवढें सांगा. "

ही तिची विनंति कामसेनाच्या आज्ञेवरून मान्य करण्यांत आली आणि त्याच्याच सूचनेवरून शिपायानें तिला सांगितलें, " तुम्हाला सीरोहूनें कैद

केलें आहे. हल्लीं तुम्हाला कलिंगदेशाकडे चालविलें आहे. तुमच्यामुळेंच ज्या वीरबाहूला जन्माचा लंगडेपणा प्राप्त झाला त्याची जन्मभर सेवाचाकरी करण्याकरितां तुम्हाला त्याच्या बटकीचा मान मिळावयाचा आहे. आतां तुम्ही पुन्हां जर कोणताही शब्द काढाल तर लागलीच तुमची जिव्हा कापली जाईल. मेणा थांबल्यानंतर तुम्ही काय पाहिजे तें बोला."

हा निर्वाणीचा जाब ऐकतांच प्रमिला गप्प बसली. तिच्यापुढें लंगडा वीरबाहू दिसूं लागला. ती आपल्या मनांत अतिशय भिऊन गेली. ती आपल्या प्रिय पतीस व शूर भावाला आठवूं लागली. आपल्या चोरीची बातमी वाड्यांत कळली म्हणजे कोणीतरी आपल्या रक्षणार्थ धावेलच असा तिला भरंवसा होता; पण आपल्या तपासाकरतां धावणाऱ्यांना आपला नेनका शोध कसा लागेल या विवंचनेनें ती निराश झाली. वीरबाहू आतां आपले अतोनात हाल करील अशा कल्पनेनें ती तरुणी गांगरली. ती आपल्याशींच रडूं लागली. तिच्या पोटांत दुःखाचे उमाळे येऊन ती वसुप्रसाद, इंदुमती, दमनपुरोहित यांचें स्मरण करीत राहिली.

या प्रकारें जातां जातां सर्व रात्र गेली. सकाळ होतांच कामसेनाच्या आज्ञेवरून चाकरांनीं मेणा थांबविला. कामसेन लागलीच मेण्याच्या दाराशीं येऊन निर्भयपणानें तिला ह्मणाला, "प्रिये प्रमिले ! ये, ये; आतां बेलाशक बाहेर ये. या अरण्यांत तुझें व माझें प्रेमाचें भाषण ऐकण्यास आपल्या या विश्वासू सेवकांवांचून अन्य कोणीही येण्याचा संभव नाहीं !"

हे उद्गार ऐकतांच ती नागिणीप्रमाणें खवळून मेण्याच्या बाहेर आली. तिनें कामसेनास पाहतांच त्याच्याविषयीं अत्यंत आश्चर्य व तिटकारा दाखवून ती त्यास ह्मणाली, "हे चांडालकर्मी सरदारपुत्रा ! अद्याप तुझ्या नशिबीं यातना भोगावयाच्या आहेत असें दिसतें ! माझ्या नादांत पडण्यानें भूताद्रीवरील गुहेंत तुला काय प्रायश्चित्त भोगावें लागलें तें तूं विसरलास वाटतें ! त्यावेळीं तुला लागलेल्या शस्त्रप्रहारांतून तूं जगलास हें चांगलें झालें नाहीं. अद्याप तुला तुझ्या अनाचाराचा अनुभव पटला नाहीं काय ? अजून तरी सावध हो ! तूं मला दगा करून राजवाड्यांतून पळवून आणलें आहेस; पण याबद्दल तुला शासन झाल्यावांचून राहणार नाहीं हें ध्यानांत आणून तूं माझ्या समोरून आपलें तोंड काळें कर."

प्रमिलेच्या या भयोत्पादक भाषणास कामसेन अर्थातच डरला नाहीं.

आपण त्या अरण्यांत सुरक्षित आहों अशी त्याची खात्री होती. राजकन्या आपल्या पतीच्या किंवा धर्मध्वजाच्या पराक्रमावरच विसंबली असेल असें जाणून कामसेन तिला ह्मणाला, "तुझ्या त्या भिकारड्या नित्यंकाची एवढी प्रतिष्ठा बाळगण्याचें कारण नाहीं. वीरबाहू बेसावध असतांना तुझ्या नेभळ्या नवऱ्यानें त्याचे पाय कापले यांत कांहीं मोठें शौर्य नाहीं. तो जर या ठिकाणीं तुझ्या शोधार्थ येईल तर या कामसेनाच्या तरवारीनें त्याचे एका क्षणांत दोन तुकडे झालेले तूं आपल्या डोळ्यांनीं पाहशील. तूं तसल्या पतीस सोडून मला माळ घाल; आणि मग तुला कोणी दगा करण्यास प्रवृत्त होतो कां पहा!"

कामसेनाला निर्भयपणाची घमेंड झाली आहे असें जाणून राजकन्या त्यास बोलली, "हे पापप्रवृत्त सरदारपुत्रा! तूं स्वतःला निर्भय समजूं नको. तुझ्या पापकर्मांचा देव साक्षी आहे. त्या चांडाळ वीरबाहूला अशीच घमेंड झाली होती. पण अर्पणेश्वराच्या कोपामुळें एका क्षणार्धांत त्याची घमेंड उतरली. ही गोष्ट ध्यानांत आणून सावध हो व माझा नाद सोडून चालता हो. एकदां वरलेला पती सोडून तुझा स्वीकार करण्यास मी तुझ्यासारखी पशुवृत्ती मान्य करणारी स्त्री नव्हे!"

तिला जरा जास्त भय दाखवावें या हेतूनें कामसेन तिला ह्मणाला, "तुझें आयुष्य आतां थोडकें उरलें आहेसें दिसतें. ह्मणूनच तुला मरणाचे डोहाळे होत आहेत. तुला आतां मी एकच सांगतों कीं, तुला जर येथून पुढें जगण्याची इच्छा असेल तर तुला या कामसेनाची पत्नी म्हणूनच जगलें पाहिजे. तूं आपला काय तो विचार ठरीव."

या त्याच्या दहशतीस न जुमानता राजकन्येनें सांगितलें, "माझ्या पाति-व्रत्यापुढें मला मरणाची मुळींच परवा नाहीं. वस्तुतः स्त्रीजात ही पुरुषापेक्षां भित्री आहे. ती पुरुषाच्या मानानें निर्बल आहे. पण कुलवंत कामिनीच्या पातिव्रत्यधर्माकडे जर कोणी वांकड्यानजरेनें पाहील तर त्या साध्वीचें तेज व शौर्य प्रत्यक्ष मृत्यूलाही थरथर कापावयास लावतें हें तुला मूढाला कसें समजणार!!!"

अशानेंही ती भीत नाहीं हें पाहून कामसेन तिला म्हणाला, "प्रमिले! तुला मीं घातलेली मरणाची भीति खरी कां वाटली? तुझ्यासारख्या कोमल लतिकेवर शस्त्राचे घाव घालण्यास कोणता मनुष्यजातींतील प्राणी तयार

होईल बरें ? मी तुला असें सांगतों कीं, तूं आपलें खरें कल्याण पहा ! राजा वसुप्रसादासारख्या वैभवशाली नृपतीची तूं कन्या, महापराक्रमी धर्मध्वजासारख्या राजपुत्राची तूं भगिनी ? असें असतां तुझ्यासारख्या स्त्रीला करवंटी घेऊन फिरणाऱ्या नित्यंकासारख्या भणंगासमवेत संसार करण्यांत सुख काय लागणार आणि विलास तरी कसले भोगावयास सांपडणार ? तूं मलाच योग्य आहेस ! मी सरदारपुत्र आहें. जालंधर देशांत माझें स्वतःचें राज्य आहे. ”

दहशतीचा किंवा भयाचा प्रकार बंद करून आतां तो आपणास मोह घालीत आहे हें ध्यानांत आणून राजकन्या त्यास म्हणाली, “ नीचा ! तुला काडीचीही अक्कल दिसत नाहीं. तूं वस्तुतः पशू आहेस. तुला मनुष्यजातींत उत्पन्न करण्यास देवाला एवढी कोणाची भीड पडली कोण जाणें ! मनुष्यजातीमध्येही कांहीं द्विपाद पशू कसे असतात याचा मासला दाखविण्याच्या हेतूनेंच तुला ब्रह्मदेवानें मनुष्याचा देह दिला असावासें दिसतें ! नीचा ! तुझ्या वैभवाची किंमत काय आहे ? माझ्या प्रियपतीच्या अंगांतील एकेका सद्गुणाच्या पासंगालाही तुझें सर्व वैभव पुरावयाचें नाहीं ! आपला प्रियपती कोणत्याही स्थितींत असला तरी त्याचीच सेवा करणें या थोरवीपुढें अस्सल आर्यांगना इंद्राच्या वैभवावरही लाथ मारतात. तुझें वैभव उतूं चाललें असेल तर तें उकिरडयावर नेऊन टाक ! माझ्या सौभाग्यालंकारापुढें व माझ्या प्राणप्रिय पतीविषयींच्या एकनिष्ठ भक्तीपुढें तुझेंच काय पण सर्व जगांतील वैभव मी शेणासमान मानतें. राजावसुप्रसाद, साध्वी इंदुमती यांची मी कन्या आहें, धर्मध्वजाची मी भगिनी आहें, ईशपती व पार्वती यांची मी सून आहें आणि श्रीगुरु भारतीच्या शिष्याची मी पत्नी आहें हें समजत असतांही जर तूं माझा छळ करशील, माझा अंत पाहण्याचें धाडस करशील तर तुझी सर्व अक्कल मातींत पडली असें होऊन तूं आपल्या हातांनींच आपला अंतकाळ जवळ ओढून आणलास असें म्हणावें लागेल. ”

ज्या नित्यंकाच्या जिवावर प्रमिळा उड्या मारीत आहे त्याची क्षुद्रता तिच्या ध्यानांत आणून देण्याच्या बुद्धीनें कामसेन म्हणाला, “ तुला तुझ्या पतीचा पराक्रम कळत नाहीं म्हणूनच तूं अज्ञानतः त्याच्याविषयीं अभिमान व्यक्त करीत आहेस. तुझा पति अगदीं नादान आहे. तो भितरा आहे. त्याच्यानें तुझें संरक्षण करवणार नाहीं. त्याचें तुझ्यावर प्रेम नाहीं. नाहींतर तुझ्यासारख्या तरुणीला सोडून तो रानोवनीं भटकण्यास गेलाच नसता ! तूं

मला माळ घाल ! म्हणजे मी एक क्षणही तुला विसंबणार नाहीं. तुझ्या पती-सारख्या शेंकडों नित्यकांना मी एकटा भारी आहें ! ”

त्याची पराक्रमाची कल्पना त्याच्याच गळयांत अडकविण्यासाठीं प्रमिलेनें उत्तर केलें, “ तुझा पराक्रम केवळ तुझ्या तोंडांत आहे. तूं जर खरा शूर असतास तर तूं मला पळवून आणण्याचें हें चोराचें काम केलेंच नसतेंस. हा तुझा भ्याडपणा होय ! तूं मोठमोठ्या बाता माझ्यासारख्या स्त्रीजनापुढें मारण्यांत हुशार दिसतोस ! माझा पती प्रत्यक्ष सामन्यांत तुझें हाडही शिलक ठेवणार नाहीं ! हें तर काय ! पण माझ्यावर जर तूं मी झोपेंत असतांना घाला घातला नसतास; मी जर जागी असतें तर मीं अबलेनें देखील तुला बद्ध करून ठेवला असता ! तूं शूर, वीर तर नाहींसच, पण उलट चोर, भामट्या, दरवडेखोर, गळेकापू आहेस. अशा क्षुद्र माणसांच्या शब्दश्रवणांत-देखील पातक आहे ! ! ”

राजकन्येचें हें तिरस्कारयुक्त गालिप्रदान कामसेनाला बरेंच झोंबलें. तो रानडुकरासारखा तिच्या अंगावर धावून गेला तोंच प्रमिला त्यास ‘ खबरदार ’ ह्मणून बाजूस सरली. कामसेनाच्या मुसंडीचा वेग त्याला न आवरून तो बेअवसानीं जमिनीवर पडला त्यामुळें त्याच्या अंगास सपाटा बसून त्याचें कपाळाला खरचटलें. त्याच्या नाकाच्या शेंड्याला हाबका बसुन त्याला झिणझिण्या आल्या. पण नाकांत मिरें फुंकलें ह्मणजे माजलेला बकरा जसा जोरानें धडक मारतो तसा तो अधिकच खवळून प्रमिलेचा खून करण्या-करतां तरवार उपसून तिच्या अंगावर धावला. तो आतां तिच्या शरीरास स्पर्श करून तिला जखमी करणार तोंच त्या ठिकाणीं दमनपुरोहित कांहीं शिपायांसह आरोळ्या ठोकीत प्राप्त झाले. त्यांना पाहतांच कामसेन प्रमिलेला आपल्या शिपायांच्या ताब्यांत देऊन आपण आड दडून बसला.

कामसेनाच्या राजवाड्याचा झाडा घेऊन सेनापतीची जेव्हां प्रमिले-बद्दल निराशा झाली तेव्हां सर्वांनाच मोठा विचार पडला. कांहीं झालें तरी राजकन्येच्या संरक्षणार्थ खटपट केलीच पाहिजे अशा निर्धा-रानें सेनापती व दमनपुरोहित यांनीं शिपायांच्या दोन टोळ्या केल्या. एकेक टोळी बरोबर घेऊन ते दोघे वेगवेगळ्या दिशांनीं कामसेनाच्या पाठलागार्थ धावले. दमनपुरोहितांना सुदैवानें कामसेनाच्या दिशेस जाण्याची बुद्धि झाली. वाटेनें तपास करतां करतां त्यांना एक मेणा त्या

दिशेनें पुढें गेल्याची वार्ता समजली. त्या धोरणानें अति त्वरा करून ते ऐन समयास त्या जंगलांत प्राप्त झाले. कामसेनाचे शिपाई पुरोहिताशीं सामना करण्यास शस्त्रें उपसून तयार झाले. त्यांचा कांहीं बोलाचाली सुरू झाली. पुरोहितांनीं त्यांना सामभावानें प्रथमतः सांगितलें कीं, "तुह्मी सरदारपुत्र कामसेनाचे सेवक आहां यांत कांहीं शंका नाहीं. तुमचे जे साथीदार आह्मीं कैद केले आहेत त्यांनीं आह्मास तुमच्या धन्याची ह्मणजे त्या नीच कामसेनाची कपटक्रिया कळविली आहे. परंतु तुमचा नीच धनी येथें कोठें दिसत नाहीं हें कसें! तें कसेंही असो; तूर्त आह्मांस त्याची कांहीं विशेष चौकशी करण्याचें कारण नाहीं. तुह्मी शहाणपणानें ही राजकन्या आमचे स्वाधीन करा. तुह्माला आह्मी अपराधी समजत नाहीं. तुह्मी असें न कराल तर पुढें मागें तुह्माला वसुप्रसाद, धर्मध्वज, सेनापती यांच्यापुढें दरवडेखोर या नात्यानें उभे रहावें लागेल हें पक्कें ध्यानांत ठेवा. राजकन्येला अपाय करण्याच्या कामीं तुह्मी साथीदार होता हें वर्तमान धर्मध्वज किंवा वसुप्रसाद यांना कळलें म्हणजे तुमच्या प्राणावर गदा येईल. तेव्हां यावेळीं रक्तपाताचा प्रसंग न आणतां तुह्मी दूरदर्शीपणा धरा आणि राजकन्या आमच्या हवालीं करा. म्हणजे तुम्हाला दोषी किंवा गुन्हेगार न समजतां उलट उपकारकर्ते असेच आह्मी मानूं."

दमनपुरोहितांच्या या सामभावी भाषणाचा त्या शिपायांच्या मनावर चांगला परिणाम झाला. ते आपल्या भविष्यत् हानीस भ्याले आणि आपापसांत कांहीं कुजबूजून प्रमिला पुरोहितांच्या स्वाधीन करण्याचा विचार निश्चित करूं लागले. हा सर्व प्रकार जवळच दडलेल्या कामसेनानें ओळखला. भीतीला हार जाऊन ते प्रमिलेला मुक्त करणार असें पाहून आणि तेवढ्याच शिपायांच्या मदतीनें आपण पुरोहित व त्याचे लोक यांना पराभूत करूं असा आत्मविश्वास वाटून कामसेन एकदम धाऊन आला आणि तो त्या शिपायांना उद्देशून म्हणाला, "तुह्मी या भटुरड्याच्या भाषणास भिऊं नका! हा भटजी तुमचें काय करणार! तरवारीची चमक पाहतांच याच्या वल्गना तोंडांत राहून याच्या अंगाचें पाणी होईल. त्याच्या दहशतीस तुह्मी जुमानूं नका. वसुप्रसादाच्या नांवाला तुम्ही वचकूं नका. मोहसंघाच्या सपाट्यांतून आतां वसुप्रसाद जिवंत परत येण्याची आशा व्यर्थ होय. सरदार जयसिंगाचा पराक्रम तुम्ही जाणत आहांच.

आतां सरदार जयसिंगच वसुप्रसादाचा अधिकार चालविणार आहे. तुह्मी जर भ्याडपणानें या प्रमिलेस सोडून द्याल व रक्तपातास वचकाल तर तुह्माला जयसिंगाचें अपराधी समजून कडक शासन होईल. तुह्मी माझ्या मागोमाग या राजदूतांवर हल्ला करा. ”

असें उत्तेजनपर व दहशतीचें भाषण करून कामसेन तरवार फिरवीत दमनपुरोहितावर धावला. पुरोहिताचें संरक्षण करण्याकरतां त्याचे शूर व विश्वासू राजदूत त्याच्यापुढें येऊन कामसेनाशीं सामना करूं लागले. त्याबरोबर कामसेनाचे शिपाईही त्या झगड्यांत घुसले. एकदम चकमक सुरूं झाली. तरवारीवर तरवारीचे आघात होऊन ठिणग्या निघूं लागल्या. कामसेनानें मोठा पराक्रम करून कित्येक राजदूतांना जमिनीवर लोळविलें. त्याच्या शिपायांनींही कित्येकांना जखमी केलें. अखेर राजदूतांचा नाइलाज होऊन कामसेन विजयी झाला. त्यानें लागलींच राजकन्येला विशेष खबरदारीनें संभाळण्याची सूचना देऊन दमनपुरोहितास पकडलें. पुरोहित तो प्रसंग लक्ष्यांत आणून कामसेनास ह्मणाला, “ सरदारपुत्रा ! तूं सांप्रत विजयी झाला आहेस हें खरें आहे तरी तूं आपल्याला यशस्वी समजूं नकोस. तूं शूरत्वानें संपन्न आहेस; पण दुर्गुण आणि दुराचारानें तुझी माती केली आहे. तूं मला व राजकन्येला मुक्त करून दुराचारपराङ्मुखतेचा पाया घाल ! ”

तो भटजी आपल्या मरणाला भिऊन आपल्याला उपदेश करीत आहे आणि मधून मधून आपलें गुणवर्णन करीत आहे हें पाहून कामसेन त्यास ह्मणाला, “ तुमचा सर्व सदुपदेश धर्मध्वजाला करा. तुमच्या नीरस, नेभळ्या वैराग्यपर व रुक्ष उपदेशाला वंद्य समजण्यास मी धर्मध्वजासारखा मूर्ख नाहीं. आतां तुह्मी माझ्या हातांत सांपडलां आहां ह्मणून माझी करुणा भाकतां ! पण राजकन्या प्रमिला सरदारपुत्रास न देण्याच्या कामीं हट्ट धरणारे दमनपुरोहित ते तुह्मीचना ! सरदार जयसिंगाच्या सूचनांचा अव्हेर करणारे राजपुरोहित ते तुह्मीच काय ? मोहसंघाचें बोलणें खोडून टाकण्याचा अट्टहास करून कामसेनाला नाक मुरडणारे भटजी तुह्मीच ना ? मी तुम्हाला पूर्णपणें जाणतों आहें. आमच्या कार्यांत खरोखर आडकाठी उत्पन्न करणारे जर कोणी असेल तर ते तुह्मीच आहां. तुह्माला जिवंत ठेवणें हा अन्याय होईल! कामसेन ह्मणजे तुम्हाला काय कसपटासमान वाटला होता ! ”

यावर त्या सत्वस्थ ब्राह्मणानें उत्तर केलें, “ सरदारपुत्रा ! तूं म्हणतोस

त्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. तूं जें जें विचारतोस तें तें सर्व कांहीं करणारा राजपुरोहित मीच होय ! अशा स्थितींतही मला तूं तेच प्रश्न पुन्हां विचारशील तरी मी पूर्वीप्रमाणेंच उत्तरें देईन. पण यावरून आम्ही तुझा द्वेष करतों असें तूं समजूं नको ! आमचें तुझ्याशीं वैर असण्याचें कारण काय ? मी राजाश्रित आहें; पण माझा आश्रयदाता वसुप्रसादही अनाचार करील, दुराचारास वंद्य मानील, दुर्गुणांचा सन्मान करील तर त्याचीही पर्वा न करतां मी सत्य, धर्म, नीति, न्याय, शुद्धता, सद्गुण यांचाच अवलंब करून योग्य तेंच बोलेन. यावरून तूं हें ध्यानांत घे कीं तूं, तुझा बाप व मोहसंघ यांतून कोणाचाही मी द्वेष्टा नाहीं. तुम्ही सर्वांनीं ज्या दुर्गुणांना व भ्रष्टतेला देव्हाऱ्यांत ठेविलें आहे त्या तुमच्या आराध्य दैवत दुर्गुणांचा व भ्रष्टतेचा मी द्वेष्टा आहें. असल्या दुराचारांचा मी जिवंत आहें तोंपर्यंत धिःक्कारच करीन ! ! ”

पुरोहिताच्या या शुद्ध बाणेदारपणामुळें कोणाच्याही मनांत गांभीर्य, सद्भावना व सदाचार यांवर प्रेमच उत्पन्न व्हावयास पाहिजे होतें; पण कामसेन हा पापोपात्मक असल्यामुळें तो त्या ब्राह्मणाला नीचपणानें बोलला, “ भटुरड्या ! काय तुझ्या या वल्गना ! हें तूं बोलत नसून राजाच्या पदरचें जें फुकटचें अन्न तुझ्या पोटांत जातें तें हें तुला बोलावयास लावतें आहे ! मोहसंघ, कामसेन, जयसिंग हे तुला दुर्गुणाचे पुतळे दिसतात ! आणि धर्मध्वज, वसुप्रसाद, नित्यंक, दीक्षा, या तुला सदाचाराच्या मूर्ति वाटतात ! पुण्याईमुळें त्यांना चार चार हात फुटले आहेत काय ? सदाचारामुळें त्यांना काय तीन तीन डोळे झाले आहेत मूर्खा ! तूं आणि कुत्रा यांचा प्रकार एकच होय ! आपल्या अन्नदात्या, धनदात्या व वस्त्रदात्या यजमानाच्या कोणत्याही कृतीचें, विचाराचें कौतुक करून त्याला प्रसन्न राखावें हें श्वानाचें काम करण्यांत तूं पारंगत आहेस हें खास. आतां तूं सर्व राजविलास विसर ! वसुप्रसाद, धर्मध्वज यांच्या मदतीची आशा सोड. आपले अपराध ध्यानांत आण. आमची नालस्ती लक्ष्यांत घे आणि मरणास तयार हो ! तुझा कोणताही उपदेश, मनधरणी यावेळीं कुचकामाची आहे. तूं वसुप्रसादाचा लाडका श्वान आहेस ! तूं आपल्या श्वानवृत्तीनें आह्मावर अनेकवेळां तोंड टाकून आमचे बहुत लचके तोडले आहेस ! तुला ठार करण्याकरतां आह्मी टपलेलेच होतों ! आतां तुझी कांहीं इच्छा

असल्यास आम्हाला सांगून ठेव. आम्ही ती तुझ्या बायकापोरांना कळविण्याची तेवढी तजवीज करूं ! ”

कामसेन इतकें भाषण बोलून आपली तरवार परजूं लागला. त्यानें आपल्या शिपायांपैकीं कांहींजण त्याच्या सभोंवतीं उभे केले. ते सर्वजण तरवारी उपसून त्या चमकावूं लागले. तो सर्व प्रकार पाहतांच दमनपुरोहितांना आपला अंतकाळ ओढवलासें वाटलें. तो कामसेन व त्याचे शिपाई म्हणजे पुरोहिताला कृतांत व त्याचे दूतच भासले ! प्राणाच्या भीतीनें त्याचें मन भयभीत झालें. तो अगदीं निस्तेज व केविलवाणा दिसूं लागला. त्याला त्याचीं मुलेंमाणसें आठवलीं. वसुप्रसाद, धर्मध्वज, नित्यंक, भोगपाल, इंदुमती वगैरे मंडळी त्याला दिसूं लागली. क्षणभर अगदीं निश्चल राहून त्यानें गंभीरतेनें एक दीर्घ सुस्कारा टाकला. नंतर आपल्या भोंवतालचा तो कृतांतांचा गराडा सुस्कारे टाकीत टाकीत अवलोकन करून तो धैर्यानें, धिम्मेपणानें व आत्मविश्वासानें स्पष्टपणें म्हणाला, “ हे सरदार पुत्रा, नीच कामसेना ! हे कामसेनाच्या पोटार्थी सेवकांनो, मी तुमचा कांहींएक अपराध केला नसतांना तुम्ही माझा जीव घेण्यास तयार झाला आहां ही गोष्ट न्यायी परमेश्वरास सहन होईल असें तुम्हांस वाटतें काय ? परमेश्वर आंधळा आहे अशी तुमची समजूत आहे काय ? महापातकी लोकांना यशस्वी करून सदाचाराचा धिःक्कार करण्यास परमेश्वर तयार होईल अशी तुमची कल्पना आहे काय ? तुमच्यासारख्या चांडालांच्या हातून माझा घात व्हावा अशीच जर माझ्या श्रीभारतीची इच्छा असेल, धर्मसेवा करणें हें पातक ठरवून अशा हीनप्रकारें माझें नरडें उडण्यांतच माझ्या श्रीभारतीला कौतुक वाटत असेल; नीतिदास्य हा महदपराध समजून जर माझा श्रीभारती माझ्यावर क्रुद्ध होऊन तुम्हाला माझ्या हृदयांत तरवारी भोंसकण्याची प्रेरणा करीत असेल तर तुम्ही क्षणाचाही विलंब न करतां माझे असंख्य तुकडे उडवा ! शुद्ध, परमयशदायक, अचिंत्यसामर्थ्यसंपन्न, चिरसौख्यकारक अशा सनातन धर्मतत्वांचा पाडाव झाला असें मानून मी आनंदानें मरण पतकरण्यास सज्ज होऊन राहिलों आहें. ”

त्या हृदयद्रावक, भारदस्त, परिणामकारक भाषणास न जुमानतां तो राक्षसकर्मी चांडाळ कामसेन शिपायांना खुणवून दमनपुरोहितांच्या नरड्यांतील रक्तस्रावानें सनातन प्रभुसत्तेच्या उज्ज्वलकीर्तीचें मुख मलीन करणार तोंच त्या

ठिकाणीं दोन शूर वीर सिंव्हाप्रमाणें उड्या ठोकीत अकस्मात् प्राप्त झाले. त्यांनीं आपल्या वेगपूर्ण सोसाट्यानें पुरोहिताच्या भोंवतालचा गराडा फोडला आणि त्यांच्यापैकीं एकानें मैंदकर्मी कामसेनानें वर उचललेला हात सपाट्या-बरोबर छाटून टाकला. तेवढ्याच अवधींत दुसऱ्यानें कामसेनाचा दुसरा हातही कापून खालीं पाडला. त्याबरोबर कामसेन थोटा होऊन जमिनी-वर लोळत पडला. दमनपुरोहितासारख्या ईशप्रिय महाजनापुढें नाक घासण्याकरतां जणू काय त्या पापमत्त कामसेनानें लोटांगणच घातलें. आपल्या धन्याची ती आपदा पाहून त्याचे सर्व सेवक भयानें तटस्थ होऊन स्वस्थ उभे राहिले ! !

आपल्या प्राणरक्षणाकरतां अकस्मात् धांवून येणारे दोन वीर्यशाली योद्धे कोण ते ओळखण्यास दमनपुरोहिताला क्षणाचाही विलंब लागला नाहीं. त्यानें लागलीच उभे राहून त्या दोन्ही वीरांना एकदम घट्ट आलिंगन दिलें. त्याला गहिंवर दाटून तो त्यांना उद्देशून म्हणाला, " राजपुत्रा धर्मध्वजा, राज-जामात नित्यंका, मी हें स्वप्न पहात नाहींना ! तुह्मी खरोखरीच भारतीशिष्य राजपुत्र व राजजामात आहां किंवा माझ्या सद्गुरु भारतीनेंच हीं दोन रूपें धारण केलीं आहेत न कळे. "

यावर राजपुत्रानें भाषण केलें कीं, " हें स्वप्न नव्हे. हा भास नाहीं. हा सर्व प्रकार सत्य आहे. श्रीभारतींनीं दोन रूपें धारण केलीं नाहींत तरी पण यासमयीं आपणास त्या भारती महात्म्यानेंच मुक्त केलें आहे हें खास ! "

राजपुत्राच्या बोलण्याचा स्पष्ट अर्थ कळावा ह्मणून पुरोहित गहिंवरयुक्त वाणीनें बोलला, " या ह्मणण्याचा गूढार्थ समजण्यास मी सध्या तरी समर्थ नाहीं. मला नीट समजेल असें सर्व उलगडून सांगा. श्रीभारतीनें तुम्हाला माझ्या संकटाची बातमी कळवून इकडे पाठवून दिलें काय ? "

पुरोहितांचें समाधान करण्यासाठीं धर्मध्वज बोलला, " अशांतलाच कांहीं प्रकार घडला. आमच्याबरोबर सांप्रत पुष्कळ मंडळी आहेत. सरदार जय-सिंगही आमच्याबरोबर कैदी या नात्यानें आहे. गोसावीबोवा, भोगपाल, शांभवी, माधवी हीं सर्व माणसें सध्यां आमच्या स्वारींत आहेत. आमचा मुक्काम येथून बराच दूर आहे. या ठिकाणची आरडाओरड, आरोळ्या वगैरे तेथें कांहींएक ऐकूं येण्यासारखें नाहीं. आपल्यावरील संकट आह्मास समजून आह्मी येथें धांवून आलों असें नाहीं. आह्मी दोघेजण आमच्या सर्व मंडळी-

समवेत आमच्या तळावर बसलों होतों. बोलतां बोलतां मी व नित्यंक इकडे तिकडे उगीच फेऱ्या घालीत हिंडूं लागलों. इतक्यांत आमच्या समोरच्या झार्डीत श्रीभारती शिरत आहेत असा आह्मास दृढ भास झाला. त्याबरोबर आह्मी दोघेही तिकडे धावलों. आमच्या गुप्त हत्यारांवाचून त्यावेळीं आमच्याजवळ कांहीं नव्हतें. श्रीभारती आमच्यापुढें चालले आहेत असा आम्हास वरचेवर भास होई तेव्हां त्यांच्या मागोमाग धांवतां धांवतां व त्यांना हाका मारतां मारतां आम्ही या जंगलापर्यंत आलों. याजागीं भारती याच जंगलांत शिरले असें आम्हास प्रत्यक्ष पाहिल्यासारखें वाटलें. म्हणून आह्मी या झार्डींत शिरलों. तों आम्हाला लांबून तुमचा हा प्रकार पहावयास सांपडला. आपल्या भाषणांतील कांहीं शब्दही अस्पष्टतेनें आमच्या कानीं पडले. हा दुष्ट कामसेन आपल्या अमृतमय वाक्यांना न जुमानतां आपलें नीच शस्त्र घेऊन आपल्यावर चालून आला तेव्हां आह्मी गुरुस्मरण करून धावलों. पुढील प्रकार आपण जाणताच आहां ”

हा खुलासा ऐकतांच पुरोहिताचे डोळे पाण्यानें भरून आले. त्यानें तो हुंदका तसाच दाबून धरला आणि परमेश्वररूपी भारतीला मनोमय वंदन केलें. नंतर त्यांनीं कामसेनाची शक्य ती शुश्रुषा करून त्यास केदी करून बरोबर घेतलें. त्याच्या जिवंत राहिलेल्या शिपायांना तेथून हाकून दिलें, मेलेल्यांची व्यवस्था केली आणि ते सर्वजण निर्भय व मुक्त झालेल्या प्रमिलेसह आपल्या मुख्य तळाकडे गेले. वाटेनें जात असतां राजपुत्र व नित्यंक यांना पुरोहिताकडून प्रमिलेवरील घाल्याची हकीगत समजली आणि त्यांच्याकडून त्याला भद्रपती, नित्यंक, भोगपाल, माभत्री, शांभात्री, यांचें वृत्त कळलें.

---

# प्रकरण ५४ वें.



## पितृ-पितृव्य-मुक्तता.



हलके हलके मार्गक्रमण करीत राजपुत्र आपल्या सर्व मंडळी समवेत मुख्य तळाशीं येतो तों त्याला असें समजून आलें कीं, भद्रपती तेथें हजर नाहीं. त्याच्याविषयीं त्यानें मोठ्या उत्सुकतेनें प्रश्न करतांच भोगपालानें त्यास सांगितलें, "तुह्मी दोघे कांहींच न बोलतां जंगलाकडे पळत सुटला हें पाहून तुमच्या मागोमाग भद्रपतीही धावला. तें पाहतांच मीही त्वरा करून त्याचा पाठलाग केला आणि त्यास गांठलें. राजपुत्र व नित्यंक हे परत आले ह्मणजे आपणाला त्यांच्या धावण्याचें कारण समजेल. त्यांना आपल्या सान्निध्याची जरूर असेल तर ते आपल्याला तशी सूचना करतील; तों पावेतों आपण तळाचें रक्षण करण्यास येथें असणेंच जरूर आहे आणि आपल्या आधारावरच राजपुत्र व नित्यंक बेलाशक तंत्र झुकले असावेत अशा समजुतीच्या गोष्टी सांगून मीं त्यास पुन्हां तळावर आणलें. भद्रपती येथें येऊन अर्ध घटका झाली असेल नसेल तोंच तो पुन्हां अति वेगानें धांवूं लागला. त्यासमयीं त्यानें तुमची दिशा सोडली. तो तुमच्या विरुद्ध दिशेच्या झाडीकडे पळूं लागला. मीं पूर्वीप्रमाणेंच त्वरा करून त्याला निसटतें धरिलें. पण त्यानें मला हिसडा देऊन आपणाला सोडवून घेतलें आणि तो समोर पळाला. तेवढ्यांतल्या तेवढ्यांत त्यानें मला असें ओरडून सांगितलें कीं, "माझा गुरु श्रीभारती या झाडींत शिरला आहे. तो मला हातानें खुणवीत आहे. कदाचित हा मला भ्रम झाला असेल; पण त्याची पुरती शहानिशा केल्यावांचून मी परत येणार नाहीं. तोंपर्यंत तूं स्वस्थ राहून तळाचें रक्षण कर. मी परत येईपर्यंत किंवा धर्मध्वज परत येईपर्यंत तूं तळ सोडूं नको."

हें ऐकतांच धर्मध्वज व नित्यंक भोगपालाच्या स्वाधीन राजकन्या व पुरोहित यांना करून भद्रपतीच्या शोधार्थ धावले. तो झाडींतून कोठें गेला असेल, तो आपणास लवकर सांपडेल कीं नाहीं वगैरे विचारांत

घुटमळत न बसतां ते सरळ त्या झाडींत शिरले. तो धावण्याचें कारण व ते धावून गेले होते त्याचें कारण यांचा मेळ बसला असल्यामुळें त्यांना आपल्याला कांहीं तरी अश्रुतपूर्व असा चमत्कार पहावयास सांपडेल असा भरंवसा वाटत होता. अतिवेगानें जंगल तुडवीत ते बरेच लांब गेले तों त्यांना कांहीं गडबड ऐकूं आली. त्यांनीं तेथेंच किंचित् थबकून त्या गडबडीचा ध्वनी कान देऊन ऐकला आणि ती कोठें चालली असावी याचा निर्णय ठरवून नेमक्या त्याच दिशेला त्यांनीं आपला रोख वळविला. पवनगतीनें रस्ता चालतां चालतां ते एका घनदाट जंगलाशीं गेले तोंच त्यांना पुढील संवाद ऐकूं आला, " मोहसंव महाराज ! आपण कांहीं तरी विचार पाहिला पाहिजे ! वस्तुतः या वसुप्रसादाचें संरक्षण करणें हें आपलें काम आहे. पिता आणि पितृव्य यांमध्यें मोठासा फरक नाहीं. वसुप्रसाद आतां वृद्ध झालेला आहे. आपल्याशीं सामना करून त्या म्हाताऱ्यानें आपलें क्षात्रतेज तुमच्या प्रतितीस आणून दिलेलें आहे. आतां वृद्धापकाळाच्या निर्बलतेमुळें श्रम असह्य होऊन तो गैरसावध होऊन पडला असतां त्यावर शस्त्र चालविणें बरें नव्हे ! "

या बोलण्यावरून त्यांनीं जंगलामधील सर्व प्रकार जाणला. उपदेशकारक वाक्यें उच्चारणारा भद्रसतीच होय हेंही त्यांनीं सहजच ओळखलें. आतां त्यांचा संवाद ऐकण्यांत मतलब नाहीं व दिरंगाई करणें धोक्याचें आहे असें जाणून त्यांनीं आपलीं शस्त्रें सरसावलीं. आतां जंगलांत जाऊन ते आपल्या शस्त्राचा प्रभाव दाखविणार तों वसुप्रसाद सावध होऊन उठून बसला आणि मोहसंवास हाक मारून म्हणाला, " मोहसंवा ! अरे ! तुला मीं पोटच्या पोराप्रमाणें वागविलें आहे आणि तूं मजवरच शस्त्र चालविण्यास तयार होतोस याचा अर्थ काय ? मी वृद्धपणामुळें थकित झालों आहें तरी मीं जातीचा क्षत्रिय आहें. हें तुला सांगावयास पाहिजे का ? सत्य व न्याय्य गोष्टीच्या कामांत येणारें मरण पतकरण्यास क्षत्रियवीर तयारच असावयाचे ! तूं आपल्या मनांत काय समजून आहेस ! तुला भलतीच भावना उद्भवली आहे हा तुझा मूर्खपणा नव्हे काय ? बिचाऱ्या दीक्षादेवीनें तुझा कांहींही अन्याय केलेला नाहीं. मला अरण्यांत गांठून माझे शिपाई जखमी करून तूं दीक्षादेवीला कैद केलें आहेस हें तुला केवढें लांछन आहे बरें ! तुझ्या कुकर्माचा दंड करण्यास मीं हयगय केली आणि पश्चातापानें तूं सन्मार्गवर्ती बनशील अशा भावनेनें मी तुला

किंवा तुझ्या बायकोला त्यावेळीं चकार शब्दानेंही दुखवलें नाहीं त्याचेंच हें फळ काय ? तूं विझवटा निपजलास; तुझी बायको कपाळकरंटी निघाली त्याला दीक्षादेवीनें काय करावें ! तुमच्या नीच आचारामुळें तुमचे धिंडवडे निघाले, तुमच्या तोंडाला कोळसा लागला तेथें दीक्षादेवीचा अपराध काय ? तूं दीक्षादेवीला मुक्त कर. तिला तुझ्या ताब्यांत ठेवून येथून निघून जाण्यास मी सांघी कोंबींतील कोणी कमअस्सल पण नीच कृत्यांनीं वैभवास चढलेला दासीपुत्र पाहिजे होतो ! ”

वसुप्रसादाशीं वासाबीस करीत बसण्यांत अर्थ नाहीं असें पाहून आणि आपल्याला अद्याप बराच पल्ला गांठावयाचा आहे असें जाणून मोहसंव त्यास ह्मणाला, “ म्हातारड्या ! हा तुझा बावळा उपदेश त्या तुझ्या धर्मकर्मिष्ठ नेभळ्या कारट्याला सांग ! या दीक्षादेवीच्या पायींच मी आपल्या प्रिय पत्नीला मुकलों आहें. याचा मोबदला म्हणून मी तिला तिच्या पतीला मुकवीन आणि सरदारपुत्र कामसेनाची दासी करून ठेवीन ! मी तुला ठार मारलें तरी कांहीं मोठेंसें गैर होणार नाहीं. तूं आतां जगून तरी करणार काय ? तेव्हां मी तुझा पुतण्या तुझ्यावर मेहेरबानगी करून तुला या जगांतून कायमचा सोडवून तुझी शेवटची सेवा करतों. कामसेन, जयसिंग यांच्या तडाक्यांतून तुझा कारटा जिवंत परत येईल ही कल्पनाच नको. तूं आणि धर्मध्वज अशा तुम्हा दोघांना तुमच्या पुण्याईमुळें स्वर्गलोकाचें राज्य मिळेल. मग येथील राज्याचा वारस मीच आहें. तूं आतां सर्व आशा सोड. तुला पुत्रलाभ करून देणाऱ्या त्या भारतीच्या नांवानें हवीतर एकदां बोंब मार ह्मणजे तुझ्या गळ्यावर हत्यार ठेवण्यास मला मोकळिक मिळाल्यासारखें होईल ! ”

हे बेपर्वाईचें व मांजुरीपणाचे शब्द ऐकतांच भद्रपती खवळला. तो त्वेषपूर्ण वाणीनें ह्मणाला, “ मोहसंवा ! तूं हा असा उद्दामपणा करण्याला प्रवृत्त तरी कशानें झालास ! वैभव, पैका, ज्ञान या गोष्टी नीच अंतःकरणांत माजुरीपणा उत्पन्न करतात. पण यांतून सर्वांना अद्याप तरी तूं पारखाच आहेस ! कसेंही असो; तूं जर पुन्हां या वृद्ध वसुप्रसादाला किंवा गुरुभारतीला कांहीं अपमानमारक शब्द बोलशील तर प्रथमतः तुला माझ्याशीं सामना करून आपल्या भविष्यत् आशा नष्ट करून घ्याव्या लागतील ! ”

हें ऐकतांच मोहसंव अधिकच मस्त झाला. तो त्यास ह्मणाला, “ गोसावड्या ! आतां मी तो मागला बागेंतील गोंडवा मोहसंव नाहीं. तुझा माझा

पूर्वीचा परिचय ध्यानांत आणून मीं एवढावेळ तुला दुखविलें नाहीं. तूं मलाच सहाय्य करशील, निदान माझ्या विरुद्ध तरी जाणार नाहींस असें मला वाटलें होतें; पण तुझा बेत निराळाच दिसतो ! मात्र तूं आपल्या बलाचा विचार केला नाहींस ! तूं अविश्वासू व चोर आहेस ! या वसुप्रसादाच्या कृपेला तूं आमच्यामुळेंच पात्र झालास ! आमच्यामुळेंच तुझा राजवाड्यांत प्रवेश झाला. या गोष्टी विसरून ज्याअर्थी तूं माझ्याविरुद्ध जातोस त्याअर्थी तूं पूर्ण कृतघ्न दिसतोस ! या कृतघ्नतेचें प्रायःश्चित्त ह्मणजे जन्मभर कैद किंवा हालअपेष्ठायुक्त मरण हेंच होय ! आतां माझ्या पुढील कार्यांत विघ्न येऊ नये म्हणून माझे शूर सेवक प्रथमतः तुझा बळी घेतील ह्मणजे मग मला सावकाशपणें या थेरड्या वसुप्रसादाच्या स्वर्गारोहणाची तयारी करण्यास शांतपणा प्राप्त होईल ! ”

असें बोलून मोहसंघानें आपल्या पादचाऱ्यांना हल्ल्याची इशारत दिली. त्या बरोबर ते भद्रपतीच्या अंगावर धावले. वसुप्रसाद त्याच्या मदतीला धावण्यास चुकणार नाहीं अशा भरंवशानें मोहसंघ स्वतः तरवार पाजळून त्या वृद्ध नृपतीवर चाल करून गेला. हा प्रकार पाहतांच धर्मध्वज आणि नित्यंक हे दोघे पट्ठे अति चपळाई करून वेगानें झाडींत शिरले. नित्यंकानें अतुल पराक्रम करून मोहसंघाच्या पादचाऱ्यांच्या पापीरक्तानें तृषित भूमातेला शांत केलें. धर्मध्वजानें वाघाप्रमाणें उड्डाण करून मोहसंघाचें नरडें पकडलें आणि तो त्यास ह्मणाला, “ तुझ्या उन्मत्तपणाचा योग्य मोबदला ह्मणजे प्रथमतः तुझें नाक व कान कापले पाहिजेत ! ”

असें बोलून त्या दिव्य राजपुत्रानें, त्या भारतीच्या पवित्र छात्रानें मोहसंघाला घ्राणकर्णविहिन करून धरणीवर लोळविलें आणि पुन्हां तो अत्यंत तिरस्कारयुक्त वाणीनें बोलला, “ नीचा ! यावेळीं मी तुझे तिळतुल्य तुकडेच करावयास पाहिजे होते; पण तूं माझा बंधु पडलास ! खेरीज आपल्या पापाचाराच्या पश्चात्तापानें होरपळून शुद्ध झालेल्या शांभवीच्या सौभाग्यावर कालपाश टाकण्यास कारण होणें योग्य नव्हे हें जाणूनच मीं तुला जिवंत राखलें आहे. तुझ्या पातकांचा साक्षी न्यायी परमेश्वर तुला योग्य दंड करीलच ! ”

इतकें बोलून तो सत्वनिष्ठ राजपुत्र नित्यंकाच्या मदतीस धावणार तों पूर्ण यशस्वी झालेला नित्यंक आपल्या चुलत्यासह वसुप्रसादाच्या सन्निध येऊन पोंचला. आपला पुतण्या नित्यंक व आपला सत्पुत्र धर्मध्वज यांनीं

अलौकिक पराक्रम करून आपलें रक्षण केलें हें ध्यानांत आणून त्या दोन्ही बुढ्यांनीं त्यांना घट्ट मिठी मारून पोटाशीं धरले व ते त्यांना धन्यवाद देऊं लागले.

त्या वृद्धांनीं आपल्यावर स्तुतीचा वर्षाव चालविला आहेसें पाहून त्या दोन्ही तरुण वीरांनीं त्यांना हात जोडून सांगितलें, " आपल्याला आमच्या-बद्दल प्रेम वाटणें साहजिक आहे; पण आह्मी एवढया स्तुतीस पात्र नाहीं. आपल्या मुक्ततेचें यश आमच्या पदरांत पडलें ह्यांत आमचा कांहींच पराक्रम नाहीं. आपल्याच चरणाच्या पुण्यप्रभावानें आह्मी यशस्वी झालों. आपला आम्हां बालकांना कल्याणकारक आशिर्वाद मिळावा. "

ही त्यांची नम्रता व वडिलांविषयींची पूज्यभावना पाहून त्यांना अति संतोष झाला. अशा सुपुत्रांच्या प्राप्तीनें त्यांना आपलें कुल धन्य झालेसें वाटलें. इत-क्यांत नित्यंकानें दीक्षादेवीला मुक्त करून वसुप्रसादासन्निध आणलें. तिनें नम्रतेनें राजा व भद्रपती यांना नमस्कार करून ती एका बाजूस सलज्ज उभी राहिली. तिचें अंतःकरण अत्यानंदानें भरून गेलें होतें. ती आपल्या पतीकडे चोरून पाहत होती. धर्मध्वजही अत्यंत चाणाक्षतेनें तिच्या कटाक्षांचा आदर करीत होता. याप्रमाणें हकीगत झाल्यावर राजा वसुप्रसाद राजपुत्राच्या तळाकडे जाण्याची इच्छा करूं लागला तेव्हां मोहसंघाला कैद करून घेऊन ती सर्व मंडळी त्या भयानक पण अंतीं अत्यानंददायक अरण्यांतून बाहेर पडली. वाटेनें व तळावर जाऊन पोहोंचल्यावर सर्वांनीं त्याच त्याच हकीगतींची उजळणी करून एकमेकांस सर्व पूर्वेतिहास विदित केले. एकंदर सर्व गोष्टी यशदायक व आनंदपर्यवसायी होण्यास श्रीभारतीप्रसाद आणि ईश्वरीकृपा कारण झाली याविषयीं सर्वांच्या मनाला विश्वास पटला.

---

## प्रकरण ५५ वें.

### अभिषेकोत्सव.



माधवी, शांभवी, प्रमिला यांना सर्व हकीगत विदित होतांच त्यांना दीक्षादेवीबद्दल अत्यंत प्रेम उत्पन्न झालें. त्या तिला पुन्हां पुन्हां तिचें चरित्र विचारूं लागल्या. तेवढ्या वेळांत कांहीं कथानक सांगत असतां दीक्षा-देवी एकदम घेरी येऊन भूमीवर पडली. तो प्रकार पाहतांच सर्व बायका घाबरल्या. पुरुष मंडळींना सर्व हवाल कळतांच ते तिला उपचार करूं लागले. कांहीं केल्या ती सावध होईना. दमनपुरोहितांना कांहीं नाडीज्ञान असल्यामुळें त्यांनीं तिचा हात पाहून सांगितलें, " हिच्या शरीरांत कोणताही दोष प्रबल झालेला भासत नाहीं. हिला पराकाष्ठेची क्षीणता प्राप्त झाली आहे. हिची ही मूर्च्छना अशक्तताजन्य आहे. "

हें निदान ऐकतांच सर्वजण त्यावरच चर्चा करूं लागले. शिपाईगड्यांतून कोणी कांहीं वनस्पती सुचवूं लागले. तिला इतकी क्षीणता उद्भवण्याच्या कारणांचा विशेष खल सुरूं झाला. तेव्हां मोहसंघाच्या पदरचा कोणी म्हातारा शिपाई सर्वांना मुजरा करून ह्मणाला, " सरकार ! ही मुलगी आज चार दिवसांत अन्नरहित आहे. मोहसंघानें तिला कैद केल्यापासून तिनें अन्नपाणी वर्ज केलें. मोहसंघ आपला छळ करील, तो आपणास कामसेनाच्या हवालीं करील अशा स्थितींत राहण्यापेक्षां प्राण गेलेलाच बरा अशा समजुतीनें ती तशी देह वाळवून एकसारखी आपल्या प्रिय पतीचें चिंतन करून अश्रुपात करीत होती. औषधाच्या ऐवजीं तिच्या पोटांत अन्नरस जाईल तर ती लवकर सावध होईल. "

ही सूचना ऐकतांच वसुप्रसाद, भद्रपती, धर्मध्वज यांच्या नेत्रांस पाणी आलें. नित्यंक व भोगपाल यांनीं लागलींच तिला महत्प्रयासानें कांहीं पौष्टिक अन्न घातलें व उत्तम उदक तिला पाजलें. कांहीं वेळानें ती हुषार होऊन चांगली सावध झाली आणि त्यामुळें आनंद होऊन तिच्या

विषयींच्या उच्च भावनेनें सर्वजण तिच्या पातिव्रत्यसंकल्पाची वाहवा करूं लागले.

आणखी एक दोन दिवस तेथेंच मुक्काम झाला. राजा, पुरोहित, भद्रपती यांचा एकविचार ठरून राजधानीकडे कूच करण्याचें ठरलें. त्या सर्व हकीगतीची वर्दी राजधानींत कळविण्याकरतां त्यांनीं कांहीं दूत पुढें रवाना केले. दूतांच्या तोंडचें वर्तमान कानीं पडतांच सुमंत, प्रधान, सेनापती यांना अति आनंद झाला. राणी इंदुमती तर आनंदातिशयानें क्षणभर भानच विसरली. प्रधान व सेनापती यांनीं सर्व राजधानी सुशोभित केली. नगरवासी लोक राजाच्या स्वागताकरतां प्रेमानें नगरशोभेच्या कामांत तल्लीन झाले. ठरलेल्या दिवशीं प्रधान, सुमंत, सेनापती अपूर्व थाटानें मोठा लवाजमा घेऊन राजाला सामोरे गेले. राजा वसुप्रसाद सर्व पौरजनांचा सन्मान स्वीकारीत व त्यांचा आदर करीत करीत सुमुहूर्तावर राजवाड्यांत प्राप्त झाला. पार्वती, दीक्षा, ईशपती व भद्रपती एकमेकास भेटून आनंदाश्रू गाळूं लागले. राणी इंदुमती सर्व परिवार पाहून संतुष्ट झाली. मोहसंब, जयसिंग, कामसेन यांना तुरुंगावरच्या मुख्य अधिकाऱ्याच्या स्वाधीन करून त्याला त्यांच्या औषधोपचारांची काळजी घ्यावयास सांगितलें.

या आनंदांत चार आठ दिवस जातांच राजा भद्रपती व ईशपती हे दमनपुरोहिताच्या सल्लयानें राजपुत्र व नित्यंक यांच्या लग्नविधीची वाटाघाट करूं लागले. वसुप्रसादानें तर आपला स्पष्ट निर्धार सांगितला कीं, " जालंधराचें सर्व राज्य जंबालवंशाच्या मालकीचें आहे. ते सरदार जयसिंगापासून हिसकावून घेऊन नित्यंकाला देऊन टाकावें. जयसिंगाचा सर्व इतमाम, वतन, इनाम, सरंजाम नित्यंकाला अर्पण करावा. वीरबाहूला पकडून तुरुंगांत ठेवावें. त्याचें सर्व राज्य हरण करून तेंही नित्यंकाला भाल करावें. वीरबाहू हा दीक्षादेवीचा सावत्र चुलता होय. त्याचा वारशीहक्क दीक्षादेवीकडे येऊन त्याचा मालक धर्मध्वज ठरतो तरी धर्मध्वजाला जास्त प्रदेशाची अपेक्षा नको आहे. हा सर्व प्रकार पार पडतांच, आणि धर्मध्वज दीक्षा व नित्यंक प्रमिला यांचा लग्नविधि उरकतांच मी व ईशपती त्या दोघा राजपुत्रांना राज्याभिषेक करून अधिकार परावृत्त होणार ! ! "

राजाचें बोलणें बहुतेक सर्वांना पसंत पडलें. ईशपतीनें मात्र असें सांगितलें, " सरदार जयसिंगानें मला तुरुंगांतून मुक्त करण्याच्या अटीवर मजजवळून

जालंधराचें बक्षीसपत्र करून घेतलें आहे. ह्मणजे मीं त्याला तो देश माझ्या पत्नीच्या मुक्ततेकरतां दंड ह्मणूनच भाल केला आहे. तो सरदार सध्यां आपद्ग्रस्त असला तरी तो देश परत घेऊन त्याच्यावर अधिकार चालविण्याची हाव नित्यंकानें धरूं नये. ''

बापाचे हे शब्द ऐकतांच नित्यंक पुढें होऊन ह्मणाला, जळो तो जालंधर देश ! पित्राज्ञा किंवा पित्रेच्छा यापुढें मला त्रिभुवनाचें राज्यही तुच्छ आहे. मी तो देश सरदाराकडेच चालूं ठेवण्यास खुषी आहें. ''

हें उदात्त व औदार्यपूर्ण, शुद्ध भाषण ऐकून सर्वांना त्या पितापुत्रांच्या न्यायप्रियतेची धन्य वाटली. त्याबद्दल त्यांची वाहवा करून वसुप्रसाद ह्मणाला, " तुह्मी दोघेही पुण्यपुरुष आहां यांत तिळमात्र संशय नाहीं. पण जयसिंगासारख्याला अशा सवलती देणें म्हणजे दुर्गुणाचा सन्मान करणें व क्रौर्यावर दया करण्यासारखेंच आहे. तुह्मी तुमचें वचन पाळलेंच आहे. तो जालंधर देश आह्मी जिंकून घेऊन आमच्या जामातास नजर केला आहे असें समजा ! सरदार जयसिंग, कामसेन, मोहसंघ यांच्या बायकापोरांना उपाशी मारण्याची आमची इच्छा नाहीं. तेवढ्यापुरती आह्मी त्यांची अन्य तजवीज करून देऊं ! ''

यावर कोणीही कांहीं भाषण करण्याची इच्छा दर्शविली नाहीं. राजाच्या आज्ञेप्रमाणें लग्नाची तयारी सुरू झाली. जो तो मनुष्य मोठ्या उल्हासानें आपापल्यापरी काम करण्यांत दंग झाला. इतर देशचे राजेरजवाडे, उमराव, सरदार, संस्थानिक सगळ्यांना विवाहाच्या निमंत्रणपत्रिका गेल्या. पाहुण्यांच्या दरजानुसार त्यांची सोय करण्याकरतां मंडप व निरनिराळ्या जागा तयार करण्यांत आल्या. ठिकठिकाणचे विद्वान् ब्राह्मणही राजधानीस येऊन दाखल झाले. गवई, कथेकरी, पुराणिक वगैरे मंडळी बिदागीच्या आशेनें राजधानीकडे धावूं लागली. विवाहसमारंभ उरकतांच राज्याभिषेक समारंभाचा अपूर्व थाट व्हावयाचा असल्यानें हरेक प्रकारच्या प्रजाजनांच्या झुंडीच्या झुंडी वसुप्रसादाच्या पाहुणचाराचा आराम भोगण्याकरीतां सिंधावतीकडे लोटत होत्या.

हें सर्व ठीकच चाललें होतें. प्रत्येक मनुष्याच्या मनांत आनंद उचंबळत होता. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर प्रसन्नता विलसत होती. पण मुख्य व्यक्ती ह्मणजे राजपुत्र व नित्यंक यांचें चित्त निराळ्याच विचारांनीं व्याप्त झालें होतें. त्यांना त्या आनंदांत गंमत वाटत नव्हती. विवाहविधीचा सोहळा

होण्यापूर्वीच त्या दोघांचें आणि दीक्षा व प्रमिला यांचें मानसिक पाणिग्रहण झालेलें असल्यानें त्यांनीं त्या विवाहविधीमध्यें कांहीं विशेष हरकत घेतली नाहीं. सुहृज्जनांच्या इच्छेप्रमाणें उपचार सेवन करण्यास त्यांनीं आपापलीं शरीरें त्यांच्या स्वाधीन केलीं होतीं. राजाच्या वैभवास व इतमामास अनुसरून विवाहसमारंभ यथास्थितपणें पार पडल्यानंतर लागलीच राज्याभिषेकाचा मुहूर्त धरण्यांत आला. तेव्हां मात्र धर्मध्वज व नित्यंक यांनीं त्या संबंधानें आपली निरिच्छा प्रदर्शित केली. त्यांनीं औदासीन्य धारण केलें. त्यांच्या मुखावर म्लानता येऊन ते कांहीं तरी अंतर्व्यथेनें पीडित झाल्यासारखे दिसूं लागले. ही त्यांची स्थिति पाहून राजपरिवार हवालदिल झाला. राज्याभिषेकोत्सवासंबंधीं त्यांची नावड पाहून राजा व पुरोहित यांसह सर्वजण त्यांना त्यांच्या औदासीन्याचें कारण विचारीत याचें त्यांना महदाश्चर्य वाटे. शेवटीं सर्वांनीं त्यांना भंडावलें तेव्हां धर्मध्वज उघडपणें राजसभेंत बोलला, " या विलासाच्या चेष्टा आणि सौख्योत्पादक हालचालींत अर्थ काय? आपणा सर्वांवरील संकटें ज्याच्या प्रसादानें टळलीं तो श्रीभारती जर आह्मांस दर्शन देत नाहीं तर आह्मांस हें सर्व विलास विषमयच वाटतात! भारतीच्या दर्शनानंदाच्या पासंगालाही हें अभिषेकोत्सवसुख पुरणार नाहीं. तुम्हा सर्वांची आपत्ति हरण होऊन आपला मिलाफ होण्यास श्रीभारतीची कृपाच मुख्यतः कारण झाली हें आपण जाणतों. भारतीच्या स्मरणानें, चिंतनानें, सेवेनें, जपानें आम्हाला इतर कार्यें पार पाडण्याचें यश जोडतां आलें. पण आतां त्या महात्म्याचें दर्शन होण्यास आह्मी कशी प्रार्थना करावी हें आह्मांस समजत नाहीं. "

राजपुत्राचें भाषण अगदीं यथार्थ आहे असें वाटून राजा, दमन, भद्रपती वगैरे मंडळी ओशाळली. आनंदाच्या भरांत व सौख्याच्या नादांत आपणाला भारतीची बहुतेक विस्मृतीच झाली याबद्दल त्यांना शरम वाटून ते मनामध्यें बहुत पस्तावा पावले. धर्मध्वजाच्या भाषणाचा तात्पर्यार्थ ध्यानांत घेऊन व त्याच्या एकनिष्ठ गुरुभक्तीबद्दल त्याची वाहवा करून दमनपुरोहित ह्मणाले, " श्रीभारतीच्या प्रसादानें जशीं अनेक अद्भुत कार्यें, कल्पनातीत प्रकार घडून पार पडलीं त्याचप्रमाणें स्वतः श्रीभारतीचें दर्शनही त्याच महात्म्याच्या कृपाप्रसादानें घडेल ! "

यावर धर्मध्वजानें सांगितलें, " हें ह्मणणें खरें आहे-तरीपण त्या महात्म्याचें दर्शन, सहवास, सेवा, जप, यांवाचून आह्मांस कांहींएक नको आहे.

आह्मांस राज्यलक्ष्मीची जरूर नाहीं. नारायणस्वरूपी सद्गुरु श्रीभारती आमच्या सन्निध असेल, तो जर आमच्या स्वाधीन होईल, तो जर आह्माला त्याच्या सहवासाचा अक्षय लाभ देईल तरच भगवान् लक्ष्मीकांत नारायण आमचें मनास आपलें वास्तव्यस्थान बनवील; आणि मग त्याची महापतिव्रता कांता जी श्री ती आपल्या पतीला सोडून राहणें शक्यच नाहीं. असें झालें ह्मणजे आह्माला वैभवाला काय कमी आहे. मग आमच्या वैभवापुढें कोणाची किंमत आहे. अशा त्या वैभवापुढें हीं नाशवंत सिंहासनें जुमानतो कोण? या भूलोकांतील क्षणिक सौख्यविलासास कवटाळून दुःख, यातना, पीडा, त्याप यांना पदरांत बांधून ठेवतो कोण. या अंतवत सौख्याच्या लालसेनें दुष्ट विकारांचे दास बनून अनेक कर्मांची चरणसेवा करण्याचें हीन काम पत्करण्याची आमची इच्छा नाहीं. आम्ही आपले सर्व हक्क ईश्वरस्वरूपी भारतीचरणीं वाहिले आहेत. आम्हांस कांहींच उपाधी नको!"

राजपुत्राचें हें भाषण नित्यंकास पूर्णपणें मान्यच दिसलें. बहुत लोकांनीं बहुत प्रकारें त्या दोघांची समजूत केली; तरी धर्मध्वजाचा शुद्ध निर्धार यत्किंचितही ढळेना. उत्सवाचा मुहूर्त दोन दिवसावर आला. तेव्हां राजा, प्रधान, पुरोहित, मंत्री, राणी, सर्वजण त्याच्या वैराग्यपर वृत्तीबद्दल व्याकुळ झाले. त्यांनीं थोरथोर मंडळी, अमीरउमराव, सरदार, वैदिक, शास्त्री, पंडित यांची सभा भरवून राजपुत्राची समजूत घालण्याचा खटाटोप केला. पण कोणासही न जुमानतां तो भारतीकरतां हपापला आणि त्याच्या मूर्तीचें चिंतन चालू ठेवून सर्वांच्या उपदेशवाक्यांना नकार देत राहिला. कांहीं तरी करून त्याची समजूत पडेल अशा आशेनें स्वतः वसुप्रसादानें अगदीं निर्वाणीला येऊन श्रीभारतीची मनोमय प्रार्थना केली आणि धर्मध्वजास सांगितलें, "कसेंही असलें तरी तूं अभिषेक करून घेऊन राज्याधिकाराचा स्वीकार करावास अशी माझी— तुझ्या पित्याची— तुझ्या वृद्ध जनित्याची आज्ञा आहे:— "

यावर पूर्ण विचार करून धर्मध्वज कांहीं योग्य उत्तर सांगणार तोंच त्या ठिकाणीं अगदीं जख्ख झालेला श्रीभारती मोठ्या लगबगीनें मंडळींच्या दाटींतून वाट काढीत आला. राजाचें बोलणें संपतें तोंच तो राजपुत्राला हाक मारून म्हणाला, "आणि, पिता म्हणजे साक्षात् शंकर होय. मग तूं त्याची आज्ञा अमान्य करणार काय? वृद्ध सत्वस्थ माता पित्यांना शिणवून, त्यांच्या

इच्छांचा भंग करून, त्यांचा अवमान करून, त्यांच्या कीर्तीचा अपहार करून सुकृत जोडल्याचें किंवा परत्र साधल्याचें उदाहरण नाहीं. "

हे शब्द ऐकतांच धर्मध्वज व नित्यंक यांनीं भारतीच्या चरणांवर लोटांगण घातलें. भारतीनें त्यांना उचलून पोटाशीं धरलें. आपल्या पदरानें त्यांचे गहिंवराश्रु पुसून तो त्यांना ह्मणाला, " राजपुत्रांनो ! तुह्मी आपल्या विमल कीर्तीनें व अमल यशानें सर्व जगत् प्रकाशमान केलें आहेत. तुमच्या सदाचारानें तुमची काया पावन झाली आहे. तुह्मी व तुमच्या पातिव्रत्यास प्राण समजून सद्धर्ममान्यव्रताचें दास्य करणाऱ्या स्त्रिया यांनीं दोन्हीं वंश पावन केलें आहेत. तुह्मी कुलदीपक आणि त्या कुलदीपिका यांच्या दिव्य तेजानें तुमच्या कुलांना दिव्य शोभा आली असून तुमच्या कुलांतील मागील पिढयांचाही उद्धार झाला आहे. धर्मध्वजा, आतां पित्याची आज्ञा शिरसावंद्य मानून राज्यपदाचा स्वीकार कर. परमार्थ हाच सर्वश्रेष्ठ, अविनाशसुखदायी व श्रेयस्कर होय. पण त्यासाठीं प्रपंच सोडण्याचें किंवा प्रपंचाला भिण्याचें कारण नाहीं. जनक, श्रीरामचंद्र, युधिष्ठिर यांनीं ऐहिक वैभवाचा त्याग केला असें नाहीं. तूंही राज्यसूत्रें स्वीकारून प्रजाहितदक्ष होऊन रहा व प्रजेच्या कल्याणांत तुझें कल्याण पहा. गर्भिणी जसें गर्भाचें रक्षण करते तसें तूं प्रजाजनांचें संरक्षण कर. तूं जातीचा क्षत्रिय आहेस. क्षत्रियाच्या विहित कर्मास प्राणापलीकडे जप. सनातनधर्माला मान्य, वेदशास्त्राला संमत, साधुसज्जनांना कबूल अशाच क्षात्रधर्माच्या विहित आचारास क्षणभरही विसंबूं नको. सुखदुःखें हीं अभ्रपटलासारखीं आहेत. त्यांचा आनंद किंवा खेद मानूं नको. विहित कर्तव्य परमेश्वराची सेवा ह्मणून कर. विकार, विकल्प, ऊर्मी, यांना हार जाऊन भलत्याच आचरणाचा अवलंब करूं नकोस. साधूवांचून अन्य कोणाची संगत करूं नको; संतावांचून अन्य कोणाचीं वचनें मान्य करूं नको; सज्जनावांचून अन्य कोणाच्या सिद्धांतास जुमानूं नको; ईश्वरावांचून अन्य कोणाला थोर मानूं नको; लोभ, मोह, कीर्ति, मान्यता, दुराग्रह, वैभव इत्यादिकांना भुलून भलत्याच गोष्टींस धर्म्य ठरवूं नको. धूर्तवादी बनून, श्लेष निर्माण करून, कल्पना बहकूं देऊन, चढाओढीस लागून दुराग्रहास भाळून भलत्याच कृत्यांना विहित कर्म ठरवूं नको. या प्रकारें सदाचार व सत्कर्म पाळून परमेश्वराकडे चित्त ठेवून रहा ह्मणजे तुझें इहपर कल्याणच होईल. धैर्य, सत्व, शांति आणि दया या चार गुणांचा दृढ अवलंब

करूनच सर्व थोरांनीं, खरी थोरवी; खरी कीर्ति, खरें हित साधून कुलो-द्धार केलेला आहे. हे चार गुण म्हणजे प्रापंचिक किंवा पोटार्थी शास्त्र-प्रणीत व्याख्येप्रमाणें मानावयाचे आहेत. ह्यांचा अर्थ अध्यात्मपर व धर्मपर व्याख्यांना मान्य असाच घ्यावयाचा हें विशेष ध्यानांत ठेवलें पाहिजे. ”

असा दिव्य बोध करून श्रीभारती स्वस्थ राहिला. राजा, पुरोहित वगैरे सर्व सभासद तटस्थ झाले. धर्मध्वज व नित्यंक त्या गुरुवाक्यामृताच्या पानानें ब्रह्मानंदांत तल्लीन होऊन डोलूं लागले. भारतीच्या आज्ञेप्रमाणें उत्सवाची तयारी करवून मुहूर्त साधण्याचा संकल्प ठरला. वाद्यांचा कर्णमधुर कल्लोळ भाटांच्या सुस्वर गर्जना, पौरजनांचा जयजयकार, वेत्रपाण्यांच्या ललकाऱ्या, वैदिक ब्राह्मणांचा वेदघोष, यांच्या ध्वनीनें सर्व राजधानी चार दिवस दुमदुमून गेली. अनेक प्रकारच्या व अधिकाराच्या मान्य जनांच्या नेत्रासमक्ष शास्त्र-सिद्ध धर्मध्वजास राज्याभिषेक झाला. दमन पुरोहीत, भद्रपती, ईशपती, व सर्व कल्याणकर्ता श्रीभारती यांचे शुभ आशिर्वाद घेऊन त्या कुलोद्धारक धर्मध्वजानें वंशतारिणी दीक्षेसह सिंधावतीचें पवित्र सिंहासन मंडीत केलें आणि पौरवांच्या राज्यवैभवाचीं सूत्रें धारण केलीं. तो सर्व सोहळा प्रत्यक्ष पाहणारे जन धन्य नव्हेत काय ?

*      *      *      *      *

श्रीभारती व वसुप्रसाद यांच्या इच्छेस व सात्विकवृत्तीस अनुसरून राज-पुत्र धर्मध्वजानें उदारबुद्धीनें लहान थोर अशा सर्व प्रजाजनांचा यथायोग्य प्रतिपाल केला. शुद्ध वर्तनी व सन्मार्गी लोक आपापल्या शुद्ध आचारास वंद्य समजून सुखानें कालक्रमण करीत राहिले. कुमार्गाचा स्वीकार केल्या-कारणानें अंतीं गोत्यांत पडलेले जन अनुतापी बनून परम शुद्ध अशा सदसद्विवेकबुद्धीच्या डागण्यांनीं होरपळून हाय हाय करीत आयुष्याचा काळ कंठीत राहिले ! हें सांगणें नकोच.

